॥ महाराष्ट्रसाहित्यसेवक ग्रंथमाला ॥

पुष्प ९ वें

# भारतवर्षाचा धार्मिक इतिहास.

(पूर्वार्ध)



॥ श्री ॥

# "महाराष्ट्रसाहित्यसेवक ग्रंथमाले"ची माहिती, पुस्तकें व नियम.

प्रारंभः— 'माले'चा प्रारंभ सन १९२२ च्या जून महिन्यांत झाला.

उद्देशः—( १ ) पौराणिक, ऐतिहासिक, धार्मिक, सामाजिक, पारमार्थिक, चरित्रात्मक वगैरे विषयांवर ललित (काव्य, कादंबरी व नाटक), तसेंच निबंधात्मक उच्च व चटकदार वाङ्मय निर्माण करणें.

( २ ) व तेंही होतांहोईतों अज्ञात पण गुणवान् अशा लेखकांच्याकडून करणें.

विकासः—आतापर्यंत 'मालें'त ९ पुष्पें गुंफिलीं गेलीं आहेत. तीं अशीं:—

( १ ) **कमला!**—श्री. गं. रा. सानेकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. प्रो. ल. ग. लेलेशास्त्री यांची मार्मिक प्रस्तावना. 'मुकुंदराय'कवी, 'ज्ञानप्रकाश,' व 'स्वराज्य' यांचा उत्तम अभिप्राय. किं. ८१०

( २ ) **भगवान् श्रीकृष्ण!**—अर्थात्—श्रीकृष्णाचें नितांत रम्य चरित्र! लेखक—श्री. गं. रा. साने. श्री. चि. वि. वैद्य, प्रो. श्री. नी. चापेकर, प्रो. ल. ग. लेलेशास्त्री, प्रो. शि. म. परांजपे, श्री. न. चिं. केळकर, 'केसरी,' 'मुमुक्षु,' 'आनंद,' 'चित्रमयजगत्,' यांचें उत्तमोत्तम अभिप्राय. इंदूरच्या 'म. ग्रं. मंडळा'कडून बक्षीस. सचित्र द्वितीयावृत्ति! किं. १८४रु.

( ३ ) **अलौकिक आत्मयज्ञ!**—श्री. गं. रा. सानेकृत ऐतिहासिक नाटक. श्री. ल. ब. भोपटकर यांचा उत्तम अभिप्राय. इंदूरच्या 'म. ग्रं. मंडळा' कडून बक्षीस. गॅदरिंगसाठीं करण्यास योग्य. द्वितीयावृत्ति लवकरच निघेल.

**कविसंसार!**—श्री. गं. रा. सानेकृत मोरोपंत व रामजोशी कवींवरील नाटक. श्री. ल. ग. लेलेशास्त्री यांचा उत्तम अभिप्राय. (प्रती शिल्लक नाहींत.)

( ४ ) **लीला!**—श्री. गं. रा. सानेकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. 'केसरी' म्हणतो "पुस्तकाची भाषा गोड व आकर्षक असल्यामुळें वाचताना कंटाळा येत नाही." किं. १ रु. (प्रती फारच थोड्या शिल्लक.)

( ५ ) **भारतीय संग्राम !**—श्री. गं. रा. सानेकृत कौरवपांडवांची समग्र हकीकत. प्रो. ल. ग. लेलेशास्त्री, श्री. ल. ब. भोपटकर, प्रो. श्री.

नी. चापेकर, व ' केसरी ' इ. चे उत्तम अभिप्राय. ' डे. व्ह. ट्रा. सोसायटी ' व इंदूरच्या ' म. ग्रं. मंडळा'कडून बक्षीस. सचित्र द्वितियावृत्ति ! किं. १८४ रु.

( ६ ) हिरकणी!–श्री. य. गो. जोशीकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. दोन चित्रांसह २०० पृष्ठें. ' मुकुंदराय ' कवी, 'मनोरंजन,' इ. चे उत्तम अभिप्राय. किं. १ रु.

( ७ ) सायुज्यसोपान !–श्री. गं. रा. सानेकृत पारमार्थिक चटकदार ग्रंथ. ह. भ. प. साखरेबुवांची गोड प्रस्तावना, प्रो. शं. वा. दांडेकर, ' केसरी, ' 'नवाकाळ,' 'बलवंत,' 'भाला' ' चित्रमयजगत् ' ' प्रजापक्ष ' यांचे उत्तमोत्तम अभिप्राय. इंदूरच्या 'म. ग्रं. मंडळा'कडून बक्षीस. किं. २ रु.

( ८ ) मुरारि !–श्री. वि. वा भिडेकृत शिवकालीन ऐतिहासिक कादंबरी. ' केसरी, ' ' ऐक्य ' यांचे उत्तम अभिप्राय. किं. २ रु.

( ९ ) भारतवर्षाचा धार्मिक इतिहास ! ( पूर्वार्ध )–श्री. गं. रा. सानेकृत वेदकाल ते भागवतसंप्रदायापर्यंत सचित्र चटकदार विवेचन. प्रो. चापेकर, प्रो. लेलेशास्त्री, व श्री. माटे यांचेकडून प्रशंसन. किं. २ रु.

पुढीलकार्य—'यमुना' ' पावित्र्यप्रभाव ' ' भारतवर्षाचा धार्मिक इतिहास ' ( उत्तरार्ध ) ' मानवी हृदय ' ' दिव्य आत्मार्पण ' ' रम्य रामायण ' इ. चटकदार पुष्पें यापुढें प्रसिद्ध होतील.

ग्राहकांसाठीं नियमः—( १ ) १ रु. प्र. फी. भरून कोणासही 'माले'चे मेंबर होतां येते. ( २ ) 'माले'चे मेंबर होणारास सर्व जुनीं नवीं पुस्तकें ¾ किं. स मिळतात. ( ट. ख. नि.) इतरास भर आकार. ( ३ ) 'माले'चें कोणतेंही पुष्प खलास झाल्यास त्याबद्दल आम्ही जबाबदार नाहीं. पुन्हां तें छापल्यावर पाहिजे त्यास मिळेल. ( ४ ) 'माले'चीं पुष्पें साधारणपणें वर्षातून दोन (जानेवारी व जुलैमध्यें) प्रसिद्ध होतात.

लेखकांसाठीं नियमः—( १ ) लेख सुवाच्य, शाईनें, कागदाच्या एकाच अंगास लिहिलेला असावा. ( २ ) 'माले'च्या उद्देशास धरून लेख असावा. ( ३ ) पसंत लेखास सवडीप्रमाणें स्थळ व परिस्थितीप्रमाणें मदत मिळेल.

जाहिराती व एजन्सी याबद्दल समक्ष अगर पत्रद्वारें खुलासा करावा.

पत्रव्यवहारास पत्ताः—गं. रा. साने, संपादक, ५३९ सदाशिव, पुणें शहर.

॥ महाराष्ट्रसाहित्यसेवक ग्रंथमाला ॥

पुष्प ९ वें.

# भारतवर्षाचा धार्मिक इतिहास

## ( पूर्वार्ध )



लेखक,

श्री. गंगाधर रामचंद्र साने, बी. ए., बी. टी.



प्रथमावृत्ति ] किंमत २ रुपये. [ सन १९३०

प्रकाशकः—

**गंगाधर रामचंद्र साने**, बी. ए., बी. टी.

संपादक, महाराष्ट्रसाहित्यसेवक ग्रंथमाला,

५३९ सदाशिव पेठ, पुणे.



मुद्रकः—

१ ला फॉर्म–सन्मित्र छापखाना, पुणें.

बाकीचें पुस्तक–रा. रा. **शंकर नरहर जोशी**

'चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव पेठ,

पुणें शहर

# । समर्पण ।



भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासाची परंपरा

उज्वल राखण्यासाठीं

ज्या ज्या महात्म्यांचा, संतांचा, कवींचा व विभूतींचा

उपयोग झाला

त्या सर्व संतांना, महात्म्यांना, कवींना, व विभूतींना

हा ग्रंथ

अत्यादरपूर्वक

**समर्पीत आहे.**

—ग्रंथकर्ता.



॥ श्रीगोपालकृष्णायनमः ॥

# प्रकाशकाचे चार शब्द.



मंगलमय प्रभूच्या कृपेनें आज बरेच दिवसांनीं आमच्या मालेचें हें नववें पुष्प आमच्या प्रिय वाचकांचे हातीं देतांना आम्हांस आनंद वाटत आहे. साडेसातीच्या सपाट्यांत सापडल्यामुळें सहायाचे कामीं सर्वत्र ' सहारा'च दिसत असूनही तो सहन करीत त्यांतल्या त्यांत चिकाटीनें आम्ही हें पुष्प आज आमच्या सहृदय आश्रयदात्यांचे हातीं देत आहोंत. तरी त्यांनीं झालेल्या दिरंगाईबद्दल राग न मानितां ' माले ' वरील आपला लोभ असाच कायम ठेवावा व ' माले'स अधिकाधिक आश्रयदाते मिळवून देऊन तिला अधिक कार्यक्षम करावें अशी त्यांना आमची नम्र पण आग्रहाची विनंति आहे.

प्रस्तुत ग्रंथलेखनाचे कामीं श्री. चिं. वि. वैद्य, कै. सितारामपंत फडके, वगैरे विद्वानांच्या त्या त्या विषयावरील ग्रंथांचा आम्हांस फार उपयोग झाला. साधुसंतांच्या वाङ्मयाचें ऋण तर मजवर कायमचेंच आहे. त्याच प्रमाणें प्रो. श्री. नी. चापेकर, एम्. ए. एल्. एल्. बी. (डेक्कन कॉलेज, पुणें) व प्रो. लेलेशास्त्री (सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें व श्रीयुत श्री. म. माटे एम्. ए. ( नू. म. हायस्कूल, पुणें. ) या विद्वानांनीं वेळांत वेळ काढून आम्हांस आपापले अभिप्राय लिहून दिले याबद्दल या मंडळींचे मजवर फार उपकार आहेत. तरी त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानून व यत्न करूनही कांहीं मुद्रण दोष प्रस्तुत पुस्तकांत राहिले असल्यास त्याबद्दल वाचकांची क्षमा मागून पुरें करतों

५३९ सदाशिव, पुणें<br>
मार्गशीर्ष शु. १५ शके १८५२<br>
ता. ५-१२-३०

सर्वांचा नम्र—<br>
ग. रा. साने.

---

# विद्वानांचें अभिप्राय.



१

रा. रा. गं. रा. साने, बी. ए. बी. टी. यांनीं लिहिलेलें " भारतवर्षाचा धार्मिक इतिहास " हें पुस्तक वाचून पाहिलें " कमला, " " भगवान् श्रीकृष्ण " " भारतीय संग्राम " " सायुज्य--सोपान " वगैरे सुंदर व उद्बोधक पुस्तकांचे कर्ते या नात्यानें रा. साने हे महाराष्ट्रांतील वाचकांस सुपरिचित आहेत. प्रस्तुत पुस्तक हें त्यांनीं लिहिलेल्या " भारत वर्षाच्या धार्मिक इतिहासा"चें पूर्वार्धरूप असून त्याचीं पृष्ठें २२०. आहेत आणि विवेचन ११ भागांत विभागलें आहे. अगदी वैदिक कालापासून तों महाराष्ट्रांतील साधुसंताचा भागवत संप्रदाय व श्रीसमर्थांचा महाराष्ट्र धर्म यांच्या प्रसाराच्या कालापर्यंत म्हणजे १७ व्या शतकापर्यंत आपल्या या प्रिय भारतवर्षांत धार्मिक कल्पनांचा उदय व विकास कसकसा होत गेला याचा सुसंगत इतिहास प्रस्तुत पुस्तकांत रा. साने यांनीं आटपशीर व आकर्षक रीतीनें ग्रथित केला आहे. विवेचनाच्या ओघानुसार रा. साने यांनीं आपल्या विधानांच्या पुष्ट्यर्थ ऋग्वेदादि ग्रंथांतील उज्वल, काव्यमय व उदात्तकल्पनापूर्ण उतारे आणि श्रीमद्भगवद्गीता, श्रीज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, श्रीसमर्थ रामदास, मोरोपंत,वगैरे महाराष्ट्रीय साधुसंत व कवी आणि अनेक पौर्वात्य व पाश्चिमात्य आधुनिक, संस्कृतज्ञ विद्वान्, पंडित संशोधक व इतिहासविवेचक यांचीं उद्बोधक व समर्पक अवतरणें विपुल पण मार्मिक योजकतेनें दिलीं आहेत. त्यांच्या योगानें विवेचनास साधार महत्व व रम्यता येऊन साधारण वाचकांस भारतवर्षांतील धार्मिक विकासाच्या इतिहासाचें संगतवार व सुबोध आकलन होण्याचें कामीं तीं फार उपयुक्त झालीं आहेत. शिवाय, रा. साने यांची स्वतःची भाषाशैलीही कसलेली व सहजसुंदर असल्यामुळें रुचिकर फळें कलाकुसरीच्या पात्रांत ठेवावीं, तसा सुयोग प्रस्तुत पुस्तकांत जुळून आला आहे. सारांश, आपल्या या प्राचीनतम व अतुल वैभवशाली अशा प्रिय भारतवर्षाचा सर्वांगीण पूर्वेतिहास--विशेषतः अखिल जगाच्या गुरुस्थानीं विराजमान असणाऱ्या अशा आमच्या आध्यात्मिक श्रेष्ठतेचा व उदात्त धार्मिक परंपरेचा--सुसंगत व साधार इति-

ह्रास कळण्याविषयीं साधारण जनतेस सध्या उत्कट जिज्ञासा जागृत झालेली दिसते; अशा वेळीं बाष्कळ लघुकथा किंवा स्त्रैण काव्यालाप इत्यादि थिल्लर लेखनाच्या घातुक मोहास बळी न पडतां रा. साने यांनीं खऱ्या बौद्धिक परिश्रम पूर्वक प्रस्तुतचें उद्बोधक व उपयुक्त पुस्तक लिहून महाराष्ट्रीय स्वबांधवांची व प्रिय मातृभाषेची अत्यंत समयोचित व महत्त्वाची सेवा बजावली आहे असें मला वाटतें. म्हणून मी रा. साने यांचे विशेष अभिनंदन करितों आणि त्यांचा " भा. धार्मिक इतिहासाचा " उत्तरार्ध प्रकाशित करण्याचा सुयोग त्यांना लवकरच लाभो अशी मी अंत:करणपूर्वक इच्छा व्यक्त करतों.

सोमवार, मार्गशीर्ष शुद्ध एकादशी, शके १८५२, पुणें. } श्री. नि. चापेकर

## २

रा. रा. गंगाधर रामचंद्र साने, बी. ए. बी. टी. यांनीं लिहिलेल्या ' भारतवर्षाचा धार्मिक इतिहास ' या पुस्तकाचीं कांहीं पृष्ठें मी मधून मधून वाचलीं. पुस्तकांतील प्रतिपाद्य विषय फार व्यापक व गहन आहे. वेदकालापासून तों रा. फडक्यांच्या अगदीं अलीकडील नवयुगधर्मावताराच्या पर्यंतच्या विशाल कालखंडांत व भूगोलप्रांतांत या पुस्तकानें संचार व विहार केलेला दिसतो. प्रस्तुत ग्रंथ साद्यन्त व लक्ष्यपूर्वक वाचण्यास लागणारी फुरसद व मनाची तयारी नसल्यामुळें यांत मुख्य विषयाचें विवेचन कसें झालें आहे हें अर्थात् मला सांगतां येत नाहीं तथापि बहुश्रुतता, प्रेमळपणा, लेखनाची पराकाष्ठेची हौस, प्रतिपाद्य विषयाशीं तादात्म्य, भाषेची नागमोडी कसरत व स्वमताविषयीं अभिनिवेश या गोष्टी पुस्तकाचीं कांहीं पानें ओझरतीं वाचलीं तरीं सहज लक्ष्यांत येण्यासारख्या आहेत. मराठी, संस्कृत व क्वचित् इंग्रजी अवतरणांची या पुस्तकांत इतकी गर्दी झालेली आहे कीं, मूळ विषय त्यांत गुरफटून गेलेला आहे ! परंतु हीं चहूंकडे प्रशस्तपणें विखुरलेलीं अवतरणें सुद्धां सहृदय वाचकांचें मनोरंजन करून त्यांस समग्र ग्रंथ वाचावयास लावतील व लेखकाच्या परिश्रमाचें योग्य कौतुक करून त्यास उत्तेजन देतील असा भरंवसा वाटता.

सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणें. ता. १ डिसेंबर १९३० } लक्ष्मणशास्त्री लेले.

# ३

वेदकालापासून तों तहत भक्तिमार्गाच्या महाराष्ट्रीय उत्कर्षापर्यंत सर्व मत-परिवर्तनांचा इतिहास या पुस्तकांत सुलभ रीतीनें दिला आहे. हा इतिहास फार थोडक्यांत दिला आहे हा या पुस्तकाचा विशेष होय. बारीक बारीक तपशिलानें भरलेले मतप्रदर्शनाचे खंड एकामागें एक वाचकांच्या हातीं येणें हें जसें अभ्यासाच्या खोलपणास जरूर तसें सर्व मतांतरांचें एकत्र प्रदर्शन लहानशा रूपानें त्याच्या हातीं येणें हेंही तुलनेस अवसर सांपडावा म्हणून जरूरच असतें. पण सामान्य वाचकाला सुद्धां अशा तऱ्हेचें पुस्तक हवेंच असतें; कारण आपल्या धर्ममतांतील वाढीचा व बदलाचा इतिहास ठोकळ रूपानें आपल्याला माहित व्हावा अशी त्याचीही इच्छा असते.

पण हें पुस्तक म्हणजे नुसती मतांची अनुक्रमवार नोंद नव्हे आहे. तीं तीं मतें बरोबर किंवा चूक याचीही थोडी थोडी चर्चा या ग्रंथांत आहे. यामुळें विशेष चोखंदळ नसलेल्या वाचकाला आपलें मत बनवावयास चांगली सोय झाली आहे. त्यांतही, विशेष मतभेदाचा प्रसंग आला असतां, आपलीच बुद्धि प्रमाण न मानितां, प्रसंगांतील अडचण लक्षांत घेऊन, ग्रंथकर्त्यानें इतर नामांकित लेखकांना मदतीसाठीं आवाहन केलें आहे. सर्व साधारणपणें वाचकांना ज्यांचीं मतें मान्य आहेत तेच हे लेखक असल्यामुळें मतभेदाच्या मुद्यावर ज्यास्त वेळ गुंजारव न करतां, वाचकाची बुद्धि पुढील पुढील प्रकरणाकडे जलदीनें निघून जाते व निकालाचीं मतें गोळा करीत आपण पुढें जात आहों असें त्यांस वाटत रहातें.

पुस्तकाची भाषा फार सुंदर आहे. संतवाङ्मयांतील किंवा शास्त्रांतील वचनें, आपल्या प्रतिपादनाच्या संगतींत, अवतरणरूपानें सहज लपेटून नेण्याचें कौशल्य रा. साने यांच्या लिहिण्यांत सर्वत्र प्रगट झालेलें आहे. भगवद्गीतेतील तत्त्वज्ञान व संतांची शिकवण यांतील जनमनास सर्वथा प्रिय असलेलीं प्रमेयें हींच रा. साने यांनाही पसंत असल्यानें त्या त्या प्रमेयाची कड घेऊन लिहितांना, त्यांच्या भाषेला चढणारा आवेश एकाद्या ठिकाणीं फटकळ वाटला तरी सरसहा मोठा मनोज्ञ वाटतो. तसेंच जातिभेद, शूद्रांचे अधिकार इ. संबंधानें संतांनीं प्रगट केलेले उदात्त विचार रा.

साने यांनीं केवळ आत्मीयतेच्या भावनेनें दिलें असल्यामुळें ते देतानाहीं त्यांच्या भाषेंत मोठा जिव्हाळा उत्पन्न झालेला आहे.

एकंदरीनें पहातां धर्मविचाराच्या इतिहासांत खोल शिरण्याची ज्याना जरूरी नाहीं अशा बहुजनसमाजाच्या हातीं देण्यास लायक असा ' धार्मिक इतिहास ' लिहिण्याची रा. साने यांची इच्छा पूर्ण सफळ झाली आहे असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं.

टिळक रोड, पुणें.
ता. १-१२-३०

श्रीपाद महादेव माटे.



# अनुक्रमणिका.





——०——

श्री. गं. रा. साने, बी. ए. बी. टी. कृत—

## 'माले'तून प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ | कमला ! ... ... ... | ॥।० |
| २ | भगवान् श्रीकृष्ण ! ( द्वितीयावृत्ति )... | १॥४ |
| ३ | भारतीय संग्राम ! ( द्वितीयावृत्ति ) ... | १॥४ |
| ४ | सायुज्यसोपान ! ... ... | २ |
| ५ | भारतवर्षाचा धार्मिक इतिहास ( पूर्वार्ध ) | २ |

## 'माले'शिवाय प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | मुलांचा मार्गदर्शक ... ... | ॥।० |
| ( २ ) | बाल्वीर अर्थात् धाडसी यशवंत... | ॥४ |
| ( ३ ) | बायकांची नवीं गाणीं ( भाग १ ला ) | ॥८ |

**सूचना**:—'माले'चीं सर्व पुस्तकें कायम वर्गणीदारांस ¾ किंमतीस मिळतात. ( ट. ख. निराळा. ) तरी १ रु. प्रवेश फी भरून आजच 'माले'चे कायम वर्गणीदार व्हा.

पत्रव्यवहारास पत्ता:—

**गं. रा. साने,**

५३९ सदाशिव, पुणें.

# भारतवर्षाचा
# धार्मिक इतिहास.

## भाग पहिला.

भारतवर्षाच्या इतिहासांतील पौराणिक कथांतील अत्यंत रम्य व उदात्त अशा कथांचें – रामचरित्र, महाभारत व कृष्णचरित्र ह्या तीन प्रसंगांचें पहिल्या खंडांत अवलोकन करून आपण आतां दुसऱ्या खंडाकडे वळत आहोंत. पहिला पौराणिक खंड ज्या मंगलमयाच्या कृपेनें पार पडला, त्याच्याच प्रसादानें हाही खंड पुरा होवो अशी त्या प्रेममयाजवळ आम्हां अनन्य प्रार्थना करतों.

पहिला खंड जितका रसाळ व प्रेमळ झाला आहे तितकाच हाही होईल अशी आम्हांस आशा आहे. कारण ह्या खंडांत आपल्या धर्माचें व वाङ्मयाचें जरी प्रथमपासूनचें सामान्य स्वरूप, त्यांत वेळोवेळीं पडलेले फरक आम्ही सांगणार आहोंत तरी ह्यांतही मुख्यत्वेंकरून मुख्य भर आम्ही भागवतधर्म, महाराष्ट्रधर्म इत्यादिकांवर देऊन त्यांच्या ध्वजा फडकावणाऱ्या संत-सज्जनांचीं चरित्रें आणि कर्तबगारांचें वर्णन करण्यावर देणार आहोंत व त्यांत होईल तितका प्रेमळपणा ओतणार आहोंत. तथापि पहिल्या खंडांत हृदयाचें काम अधिक होतें. ह्या खंडांत बुद्धीला रमविण्याचें कार्य कदाचित् अधिक करावें लागेल.

वास्तविक गेला खंड काय किंवा प्रस्तुत खंड काय काढण्याची – लिहिण्याची म्हणजे आमची विशेष योग्यता आहे असें नाहीं. तथापि परमेशाची सेवा व वाङ्मयसेवा होईल तितकी प्रत्येकानें करणें अवश्य आहे. विषय अनंत आहे, गहन आहे म्हणून स्वस्थ बसण्यानें कांहींच उपयोग नाहीं. कारण आकाशाचा अंत न कळूनही शक्त्यनुसार पक्षी आपापला मार्ग आक्रमीत असतात. आम्ही मनांत

योजलेल्या व लिहून घातलेल्या विषयावर म्हणजे आजपर्यंत कांहीं थोडीं पुस्तकें असतील असें नाहीं. आमच्याहून थोर अधिकाराच्या माणसाकडून असे प्रयत्न झाले नसतीलच असें नाहीं; पण "राजहंसाचें चालणें । होय जगीं श्लाघ्यवाणें । तरी काय इतरे जनें । चालणेंचि नाहीं ॥" ह्या प्रश्नास जें उत्तर तेंच येथेंही प्रस्तुत आहे. दुसरें असें कीं "अरे हें पाहिलेंचि पाहावें । वाचिलेंचि वाचावें । ऐकिलेंचि ऐकावें । पुनःपुन्हां ॥" असा दासांचा उपदेश ज्या विषयांसंबंधीं आहे त्यांपैकींच प्रस्तुतचा विषयही आहे अशी आमची प्रामाणिक समजूत असल्यामुळें "अरे हें लिहिलेंचि लिहावें" असें आम्ही म्हणतों! आतां ही गोष्ट खरी कीं, प्रकाशित ग्रंथांच्या निव्वळ नकला करून केव्हांही चालणार नाहीं–तें केवळ चर्वितचर्वण व कदाचित् व्यर्थ कालक्षेप होईल. पण ही जागृति प्रथमपासूनच आमच्या मनांत असल्यामुळें व आजपर्यंत लिहिल्या गेलेल्या ग्रंथांतून जितकी सोपी, सुलभ, चटकदार व एकत्रित अशी माहिती प्रस्तुत विषयावर पाहिजे होती तशी ती नाहीं असें आढळून आल्यामुळेंच आम्ही तरी या विषयास हात घातला आहे. "शास्त्रें फार अपार, जीवित तुझें अत्यल्प कीं मानवा" ही गोष्ट खरी पण असें म्हणून हात पाय जोडून स्वस्थ बसणें हेंही ठीक नव्हे. तर उलट अशा गहन व अनंत विषयासच आटपशीर व चटकदार करण्याचा प्रयत्न करून ती 'रससोय' भुकेल्या पण दुबळ्या जिवानां वाढणें, "करतळीं आवळा" असा तो विषय करणें हें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. वास्तविक "आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानं" असें कालिदासाप्रमाणेंच आम्हीही म्हणूं. "तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरं" किंवा "उद्बाहुरिव वामनः" अशी आमची स्थिति झाली आहे खरी पण आमचा लेखनाचा उद्देशच मुळीं प्रत्यक्ष किंवा परंपरेनें त्या जनार्दनाची सेवा करणें हा असल्यामुळें तो आम्हांस हात देऊन ह्या दुस्तर सागरांतून तरून नेईल अशी खाली वाटते.

वास्तवीक आम्ही जरी आमच्या सोयीसाठीं अथवा खरें म्हणजे वाचकांच्या सोयीसाठीं धार्मिक व वाङ्मयात्मक असा प्रस्तुत खंडांत इतिहास देणार आहोंत तरी राजकीय व सामाजिक या बाबतीशीं प्रस्तुत विषयाचा संबंध नाहीं असें नाहीं. किंबहुना थॉमसन् साहेबानीं आपल्या भगवत्गीतेच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें ह्यांचा फारच निकट संबंध आहे. तेव्हां जरी आम्ही शक्य तितकें ह्या दोन शाखांचें वेगळें प्रतिपादन करणार आहोंत तरी जातां जातां एकाद दुसरा शब्द आम्हांस त्याशीं निगडित् असणाऱ्या विषयावरही बोलावा लागेल. अस्तु.

भारतवर्षाच्या धार्मिक व वाङ्मयात्मक इतिहासास सुरवात करावयाची म्हणजे ती वेदकालापासूनच सुरवात केली पाहिजे. कारण वेदांच्या पेक्षां जुनें असें निदान भारतीय वाङ्मय तरी अद्याप कोणास उपलब्ध झालेलें नाहीं. आपल्या हिंदुस्थानास आर्यावर्त म्हणतात. हें नांव आर्य ह्या शब्दावरून बनलें आहे व हेच आर्य ह्या हिंदुस्थानाचे पहिले सुधारलेले रहिवासी होत. ह्यांच्या पूर्वी येथें भिल्ल, कोळी वगैरे रानटी लोकांची वसती होती. त्यांस दस्यु म्हणत. असो. तेव्हां धार्मिक इतिहासास देखील जो प्रारंभ करावयाचा तो देखील ह्या आर्यांच्या धार्मिक कल्पनापासूनच होय. वेदकाल, कै. लोकमान्य टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें बर्फप्रलयापूर्वी म्हणजे इ. स. पूर्वी ८००० वर्षाच्या मागें जातो. यासंबंधीं रा. केतकर, टीलसाहेब वगैरेंचीं मतें भिन्न आहेत. प्रथम सर्व लोकांचे पूर्वज उत्तरध्रुवाच्या आसपास राहात होते व बर्फप्रलयानंतर ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे ते गेले असें लोकमान्यादि विद्वानांचें मत आहे व भाषेंतील शब्दसाम्यावरून व आचार साम्यावरून ही गोष्ट ते सिद्धही करतात. जर्मन, ग्रीक, व विशेषेंकरून पारशांचा झेंदावेस्ता यांचें बरेंच साम्य आपल्या वेदांशीं जमतें. आर्य लोक प्रथम हिंदुस्थानांत येऊन पजाबांत प्रथम त्यांनीं वस्ती केली व हळू हळू गंगेच्या काठानें ते आपली वसाहत वाढवीत चालले असें म्हणतात.

वास्तविक "अनंता वै वेदाः" अशी ब्राह्मणांची समजूत आहे व त्यांत तथ्यही आहे. कारण हिमप्रलय, शिकंदराची स्वारी, खलीफ ओमारच्या चुलीला पेटवण, ह्युएनत्संगसारखे प्रवाशी, व मुसलमानांच्या स्वाऱ्या, ह्यांच्या तडाख्यांत किती ग्रंथ नष्ट झाले असतील कोणी सांगावें! परंतु हिमप्रलयाचे वेळींच जागे होऊन ब्राह्मणानीं जटापाठ, घनपाठ, पदपाठ, इत्यादि तऱ्हेनें वेद मुखोद्गत करून टाकून आज हजारों वर्षे ते टिकविले ह्याबद्दल स्वित्झरलंडचे केझीसाहेब किंवा लोकमान्य म्हणतात त्याप्रमाणें त्यांनां धन्यवाद द्यावे तितके थोडेच आहेत. अस्तु.

अशा वेदावरून धार्मिकदृष्ट्या विचार करतां आपणांस प्रथम विविध ऋषींनीं गायिलेलीं प्रेमळ स्तोत्रें पहावयास मिळतात. पंचमहाभूतांच्या बाल्यावस्थेंतील मानवी मनास अतर्क्य अशा लीला पाहून, त्या पंचमहाभूतांनांच देव मानून, त्यांची स्तुति करणारी, त्याचप्रमाणें उषःकालीन देखाव्याचें बहारीचें वर्णन देणारी, व सृष्टींतल्या साध्या गोष्टींनीं सुद्धां लहान मुलांप्रमाणें आश्चर्यचकित होणारी ती आद्यऋषीकवींची कविता पाहिली म्हणजे पंचमहाभूतांनीं दबकलेल्या पण त्यांतील

शिस्तीनें आनंदित झालेल्या आणि विविध देखाव्यांनीं रमलेल्या अशा त्या बाल-कवीच्या कल्पनेच्या काव्यविलासाच्या धाडसाचें खरोखर कौतुक करावेसें वाटतें. "तांबड्या गाईपासून पांढरें दूध कसें निघतें?" "विना आधार सूर्य आकाशांतून एवढा अफाट मार्ग कसा आक्रमण करतो?" "समुद्रास इतक्या नद्या मिळत असतांना तो वाढत कसा नाहीं?" इत्यादि अनेक गोष्टींचें कौतुक व आश्चर्य वेद-कालीन कवि करीत आहे.

प्रियवाचक! वरीलसारखे अत्यंत साध्या आश्चर्यांनीं भरलेले विचार – निसर्गा-वलोकनाची ही पहिली धडपड – वाचून आपण मनांतल्यामनांत कौतुकानें हंसत असाल नाहीं? पण तसें हसूं नका. कारण अठराव्या शतकांत होऊन गेलेला इंग्लंडचा प्रख्यात तत्त्ववेत्ता कार्लाईलसुद्धां उच्च प्रतीच्या पण तितक्याच आश्चर्यपूर्ण कौतुकानें "तुम्हास तुमचा उजवा हात मागें पुढें हलवितां येतो ही गोष्ट सुद्धां आश्चर्यकारक नाहीं काय?" असा प्रश्न विचारीत आहे, त्यांतील मर्म लक्षांत घ्या. अनंत महासागरावर निवांत अशा वेळीं उठणाऱ्या जललहरी पाहून प्रख्यात वर्डस्वर्थ कवि आश्चर्यचकित होत आहे हें लक्षांत ठेवा. किंबहुना, सृष्टींतले हरएक व्यापार व घडामोड पाहून, वायुलहरींनें हलणाऱ्या तृणाकडे पाहून एकादें मार्जारबालक जसें आश्चर्यानें त्याकडें पाहतें त्याचप्रमाणें सर्व कवी, तत्त्ववेत्ते व विचारी पुरुष आश्चर्य करीत असतात. "आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनं" हा श्लोक आपणांस हेंच सांगतो. सायन्सनीं इतके शोध लावले तरी शेवटीं या आश्चर्यांत कांहींच कमतरता झाली नाहीं. विष्णुशास्त्र्यांनीं आपल्या "मनुष्याचें आटोकाट ज्ञान" या निबंधांत म्हटल्याप्रमाणें इतकीं शास्त्रें शिकून मानवाच्या खऱ्या ज्ञानांत कितीशी भर पडली? **Gravity** सारखीं नुसतीं शास्त्रीय अभिधानें देऊन त्या आश्चर्याचा कितपत उलगडा झाला? खरोखर विचार करील व सूक्ष्मदृष्टीनें पाहील त्यास पदोपदीं व घरींदारीं आश्चर्यच आश्चर्य भरून राहिलें आहे असेंच दिसून येईल! असो.

ह्याप्रमाणें केवळ आश्चर्यच प्रकट करून हा कवि राहिला नाहीं तर पंचमहाभूतांचे पराक्रम पाहून तो त्यांसच देव मानूं लागला; व त्यांची सत्ता अबाधित व अप्रतिहत आहे, त्यांच्या मर्जीविरुद्ध कोणासही वागतां येणार नाहीं, यासाठीं त्यांना नानाविध स्तुतींनीं आणि यज्ञयागादिकांनीं प्रसन्न करून घेतलें पाहिजे असें

-त्यास वाटून त्याप्रमाणें त्यानें अग्नि, मरुत्, रुद्र, इंद्र, उषा, आदित्य, वरुण, सोम इत्यादि देवतांची प्रार्थना केली आहे, ती संगीतांत गायिली आहे, व त्यांना उद्देशून यज्ञयाग केले आहेत. प्रार्थनेंत व यज्ञांत अर्थात ( प्रथम प्रथम ) ऐहिक मागण्याच - संपत्तिवर्धन, पुत्रप्राप्ति, शत्रूंचा नाश, इ. इ. – आहेत. यांपैकीं वरील सर्व देवतांच्या केलेल्या प्रार्थना व त्यांच्या पराक्रमादिकांचीं वर्णनेंही ऋग्वेदांत आहेत. ह्याच बहुतेक प्रार्थना संगीताच्या चालीवर बसवलेल्या व सोमयज्ञाच्या वेळीं गायनास उपयोगी पडणाऱ्या अशा सुमारें १८०० सामवेदांत आहेत. भगवंतास भक्तियुक्त संगीत फार प्रिय आहे व म्हणूनच "वेदानां सामवेदोऽस्मि" असें त्यांनीं भ. गी. अ. १० येथें सामवेदास महत्त्व दिलें आहे. असो. यज्ञयागादिकांचे प्रसंगीं कराव्या लागणाऱ्या प्रार्थनांचा अर्थ, कांहीं चूक झाली असल्यास क्षमा मागण्याची तऱ्हा, व यज्ञयागांत वरदान मागण्याची पद्धत या सर्व गोष्टी यजुर्वेदांत आहेत. यांच्या मागून बऱ्याच काळानें अथर्ववेद झाला. पण त्यांत ऋग्वेदाप्रमाणें निसर्गसत्तेविषयीं उल्हासी प्रेम नसून त्यांतलि भूतप्रेतपिशाचादिकांबद्दलची भीति व त्यानां प्रसन्न करून जारणमारणादि प्रकार कसे करावेत इत्यादि माहिती आहे. खरे वेद म्हणजे पहिले तीनच व म्हणूनच " त्रैविद्या "च भगवंतांनांहि भगवद्गीतेंत सम्मत आहे.

वैदिक वाङ्मयाचा दुसरा हप्ता ब्राह्मण ग्रंथांत आपणास पहावयास मिळतो. याचाच शेवटचा शेवटचा भाग म्हणजे 'आरण्यक' व 'उपनिषदें' होत. ब्राह्मणांमध्यें दुसरें कांहीं नसून त्रैविद्येंत ज्या यज्ञयागादिकांच्या कविताबद्ध गोष्टी आहेत त्याशिवाय-या शुद्ध सुवर्णाबरोबर इतरही बऱ्याच बाबींची भेसळ त्यांत आहे. ब्रह्मन् या शब्दाचा अर्थ त्याकाळीं यज्ञ असा असल्यामुळें तत्संबंधींच प्रतिपादन ब्राह्मण ग्रंथांत असावें हें वाजवीच आहे. पण ह्याचाच शेवटचा भाग जो आरण्यक व उपनिषदें यांतील विचारसरणी पाहिली म्हणजे तत्कालीन मनस्थितींत व विचारांत जणू काय एकाएकीं पडलेलें अंतर पाहून मन आश्चर्यचकित होतें. आतांपर्यंतची केवळ बाह्य यज्ञयागास महत्त्व देण्याची प्रवृत्ति कुठें व आरण्यकांतील मानसिक यज्ञांचीं वर्णनें कुठें ? मनांनीं केलेला त्याग किंवा यज्ञ हा प्रत्यक्ष यज्ञाच्या किंवा त्यागाच्या तोडीचा आहे असें प्रतिपादणारें आरण्यक हें भावी भगवद्गीतेंतील " काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः " इत्यादि उपदेशाचेंच

सूतोवाच आहे असें म्हणण्यास काय हरकत आहे? व यापुढील उपनिषदें, बौद्धमत, सांख्यमत, भगवद्गीता इत्यादि गोष्टींत हाच बदललेला दृष्टीकोण आपल्या दृष्टीस पडतो. यावरून याच सुमारास प्रचंड विचारांची खळबळ व चालू परिस्थितीचा वीट हीं विचारी हृदयांत उठलीं असलीं पाहिजेत, असें उघड उघड अनुमान होतें व वस्तुस्थितीही तशीच होती. किंबहुना, खुद्द ऋग्वेदाच्या शेवटच्या शेवटच्या मंडलांतून "विश्वेदेवा" ची व "विश्वरूपा"ची जी व्याख्या आहे ती पाहिली असतांना ह्या दिशेनें विद्वानांच्या विचारांचा ओघ कसा प्रथमपासून वाहात आहे हें दिसून येणार आहे. " एकं सद् विप्रा बहुधा वदंति । अग्निं यमं मातरिश्वानं " हें खुद्द पहिल्या मंडलांतलि वचन, हा ओघ यांहूनही मागें नेतें. नासदीय सूक्तांतील निर्गुणब्रह्माचें वर्णन पहा, किंवा "आमचें खरें कोण समाधान करील? खरी वस्तुस्थिति काय बरें होती?" याप्रमाणें मनाचा थोडासा अनिश्चित भाव व्यक्त करीत दहाव्या मंडलांतील "सृष्टीच्या उत्पत्तीचें गीत" गाणाऱ्या कवीनें जगाच्या आदितत्त्वास हात घालण्याची केलेली बुद्धीची धडाडी पहा, त्यांत हीच गोष्ट आपणास दिसून येणार आहे. निरनिराळ्या देवांच्या पायावर लोळण घेण्यांत अर्थ नाहीं, या सर्व देवांचाहि देव व त्यांचा नियंता कोणी तरी एक असला पाहिजे, तेंच तत्त्व सृष्टीच्या बुडाशीं असून त्याची ओळख पटल्याशिवाय व त्यांत मनानें मुरल्याशिवाय खऱ्या शाश्वत सुखाचा ठेवा हातीं लागणें शक्य नाहीं, असें उत्तरोत्तर वाटून त्यासाठीं साहाजीकच विचारी मनाची तळमळ सुरू झाली. बाह्यजग व अंतर्जग व त्यांतील सुखें ह्यांतील महदंतर मनास अधिकाधिक दिसूं लागलें; व वृत्ति साहाजिकच अंतर्मुख झाली. खऱ्या सुखाची व खऱ्या तत्त्वाची जाणीव हृदयास पटली व खोट्या सुखाच्या व तत्त्वाच्या मागें आपण भ्रमिष्टासारखे इतके दिवस कसें लागलों याची शरम उत्पन्न होऊन मनाला भुलविणाऱ्या त्या खोट्या सुखावर व तें देणाऱ्या त्रैविद्येवर हल्ले सुरू झाले. बाह्य कर्मठपणाच्या डौलाला कवडीमोल लेखण्यापर्यंत मजल जाऊन पोहोंचली. खऱ्या सौख्य व तत्त्वचिंतनांत गढलेल्या तत्त्ववेत्त्याच्या हातापायांत ज्यावेळेस कर्मकांड जागोजाग बेड्या अडकवून त्याचा समाधिभंग करूं लागलें त्यावेळेस चित्तत्त्वाचें चिंतन करणाऱ्या त्या तत्त्ववेत्त्यानें साहाजिकच त्या बेड्या खाड्कन तोडून टाकल्या व निव्वळ बाह्यावडंबर म्हणजे "मिथ्याचार" किंवा थोतांड आहे असें त्यानें ठासून सांगितलें! व पुन्हां आपली दृष्टी अंतर्मुख करून त्या तत्त्वचिंतनांत तो निमग्न झाला. भौतिकशास्त्रांच्या हद्दीवर उभा

राहून थकला भागलेला बापडा स्पेन्सर तें तत्त्व "अज्ञेय" आहे असें म्हणून तेथूनच मागें फिरला; पण आमच्या आद्यऋषींची–तत्त्ववेत्त्याची–तडफ दांडगी ! त्या आद्यकारणाबद्दल तळमळ उत्पन्न होऊन "किं कारणं ब्रह्म कुतोस्मजाताः" इत्यादि शंका वरील "कालो प्रवृत्तिः" इत्यादि उत्तरानें समाधान न पावतां त्यांनीं आपल्या समाधीच्या "ध्यानयोगा"च्या जोरावर त्या तत्वाचें – 'सूत्रे मणिगणाइव" अशा विविधतेच्या बुडाशीं असणाऱ्या एकविधब्रह्माचें साक्षात् दर्शन घेतलें व त्या सच्चिदानंद स्वरूपांत तो तन्मय झाला.

पण ह्या एकविधब्रह्माची जाणीव नव्हती, विविध प्रतीकांची उपासना व यज्ञयाग सुरू होते त्या वेळचीही तत्कालीन ऋषींची धार्मिक प्रवृत्ति, दृढश्रद्धा व अलोट भक्ति आणि नितांत रम्य काव्यकल्पना व वर्णनशैली ह्या खरोखरच कोणाही कविहृदयाला डोलविणाऱ्याच आहेत, ( किंबहुना आजच्या विसाव्या शतकाच्या तोडीच्या आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं ) अर्थात ह्या काव्यकल्पनांचा उदय सुद्धां मूळच्या भक्तियुक्त व धार्मिक अंतःकरणांतून झालेला आहे हें विसरून चालावयाचें नाहीं. बार्थसाहेबासारखे मानव्याच्या इतिहासाकडे दुर्लक्ष करणारांना ह्यांतील मौज समजणार नाहीं; पण एरवीं (Geiger) जींजर साहेब म्हणतात त्याप्रमाणें प्रत्येकास येथें निसर्गाच्या मांडीवर खेळणाऱ्या नूतन मानवजातीच्या अभिनवजीविताचा इतिहास पाहावयास मिळत आहे. व केझीसाहेब म्हणतात कीं, "ऋग्वेदाचें महत्त्व किंवा सारसर्वस्व त्यांत ईश्वरी कल्पना व ईश्वराचा मनुष्याशीं संबंध या धार्मिक भावनेची व्यवस्थित होत जाणारी वाढ व सुधारणा दृष्टिगोचर होत आहे ती ह्यांतच आहे." तत्कालीन वर्णनपद्धतीचे आम्ही कांहीं मासले खालीं देत आहों त्यावरून आमच्या म्हणण्याची सत्यता पटण्यासारखी आहे. प्रथम खालील सातव्या मंडळांतील लढाईचें बहारदार वर्णन पहा –

"हातांत निशाण घेऊन योद्धे रणभूमीवर सरसावले आहेत, सुदास राजास रणांगणावर त्याच्या शत्रूंनीं वेढा घातलेला आहे, युद्धाची धुमश्चक्री माजलेली आहे; शत्रुमित्र ओळखत नाहीं; त्या लढाईच्या भीषणतेने मोठमोठ्या भटांचीही गाळण उडालेली आहे व हे इंद्र व वरुण देवांनो, तुमच्या मदतीसाठीं त्यांनीं आकाशाकडे डोळे लावले आहेत; पांढरे झगे घातलेले जटाजूटधारी तृत्सुऋषी सुदासाच्या सुटकेसाठीं इंद्रवरुणांच्या सहायाची प्रार्थना करीत रणभूमीवरून हिंडत आहेत; क्षणार्धांत त्या मदतीच्या – आत्मविश्वासाच्या जोरावर, दहा राजांनी वेढलेला सुदास

शत्रूची फळी फोडून पार झाला." तसेच ५ व्या मंडलांतील मरुतांचें घनगर्जिता-दिकांचें व पर्जन्याचें भयदरम्य वर्णन पहाः—

"हे घनगर्जिताचें दिव्य संगीत गाणारे दिव्य गायक (इंद्रधनुष्याचीं) सुवर्णवस्त्रा-भरणें घालून इंद्राच्या साहाय्यार्थ किंवा स्वतंत्र जलवृष्टी करण्यासाठीं आकाशांत मेघावर घसरून दशदिशा अंधकारित करीत आहेत; त्यांच्या गर्जनेनें व गडग-डाटानें व वादळी गायनानें नद्यांचे प्रांत निनादित होत आहेत; विद्युदाघातानें लहान थोर प्राणी घाबरून गेला आहे; चराचर विश्व हादरून जात आहे; मेघ-गर्जना आली, विजा चमकूं लागल्या, आकाश दुभंगलें व लवकरच मुसळधार पाऊस सुरू झाला. हे पर्जन्यदेवा! आपण आपली मेघरूपी पाण्याची पिशवी खाली तोंड करून ओतीत सर्वत्र फिरवा व त्यानें नद्या, नाले व तळीं भरून जाऊं देत." त्याच-प्रमाणें "एकाद्या विवाहेच्छु तरुणाप्रमाणें क्षणाक्षणाला विविध रंगानीं नटणारा सुंदर वदनाचा अग्निदेव" (मंडल १-१४३) व "आकाशाचें द्वार उघडीत, सुवर्ण रथांत बसून आलेली, सर्वांस ज्ञानसंपत्ति व आरोग्य ह्यांची खैरात करणारी, नर्तकीसारखी सजलेली, सौंदर्यपूर्ण वदनानें झळकणारी व आपल्या शुचिस्मितानें आनंदाचा प्रकाश फेकीत येणारी उषा सर्वांस जागृत करीत आहे" त्याचें पहिल्या व सातव्या मंडलांतील वर्णन रम्य नाहीं असें कोण म्हणेल?

पण ह्या सर्वांहून हृदयाला हलवून सोडणारा व ऐतिहासिक दृष्ट्या भावी भक्ति-प्रकर्षाचें बीज दाखविणारा प्रसंग म्हणजे सातव्या मंडलांतील वसिष्ठकृत वरुण-प्रार्थनेचा होय. शक्य असल्यास हा प्रसंग मुळांतूनच वाचून पहावा अशी आम्ही वाचकांस शिफारस करतों. तथापि साधारण वाचकांच्या सोयीसाठीं वरील प्रमा-णेंच आम्ही खालीं गोषवारा देत आहों तो त्यांनीं पहावा व नामदेव, तुकोबा, इत्यादिकांच्या भावी भक्तीचा उल्लास,प्रेम व तळमळ यांत कशी सूक्ष्मपणें प्रकट झाली आहे हें नीट ध्यानांत आणावें:—

वरुणभेटीची तळमळ लागलेले वसिष्ठऋषि म्हणतात:– "वरुणदेवाबरोबर मी कधीं बरें बोलेन? मी त्यांच्याशीं केंव्हां बरें तद्रूप होईन? माझ्यावर कोपलेले वरुणदेव माझी ही स्तुति केव्हां बरें ग्रहण करतील? व त्या सुखदात्याला मी केव्हां बरें डोळे भरून पाहीन? देवा! माझ्या हातून असें पाप तरी काय घडलें (कीं ज्यायोगें तुम्ही अजून दर्शन देत नाहीं)? (माझें पाप समजून घेण्यासाठीं) मी विद्वान

लोकांच्याकडे गेलों; पण सर्वांनीं मला एकच उत्तर दिलें कीं 'तुझ्यावर ह्या वरुणदेवाचाच राग झाला आहे; वरुणराज! (मी तुमचा सखा नां? मग) आपल्या सख्याला–मित्राला ठार मारण्यास तयार झालेत (कारण तुमच्या वियोगांत मी जगणें शक्यच नाहीं) असें माझ्या हातून पाप तरी काय घडलें तें तरी एकदां सांगा म्हणजे ताबडतोब प्रायश्चित घेऊन पश्चात्तप्त हृदयानें तुमच्या भेटीस मी धावतच येईन. (देवा! कदाचित आमच्या वाडवडिलांचे पातकाबद्दल आपण मला हें वियोगरज्जूनीं बांधून घालण्याचें शासन करीत असाल; पण वरुणराज! तुम्ही दीनदयाळ आहांत तेव्हां माझी आपणांस एवढीच विनंति आहे कीं) हे राजन् आमच्या पूर्वजांच्या व माझ्याहि पातकांची क्षमा कर! व (पापाच्या) दाव्यास बांधलेल्या (पण वरुणधेनूच्या स्तनपानासाठीं तळमळणाऱ्या) ह्या वसिष्ठवासराला ह्या दाव्यापासून मुक्त कर! देवा! आमच्या पातकाचें केवळ आम्हीच कारण आहोंत काय रे? दैवाची बलवत्तर शक्ति व (तिच्या पायींच कदाचित उत्पन्न होणारी) मद्य, राग, द्यूत व अज्ञानविमोह ह्या गोष्टी कांहींच का नव्हेंत? त्याचप्रमाणें व्यसनी आचाराचीं माणसें जवळ हिंडत असतात (त्यांचाहि परिणाम कांहींच होत नाहीं काय?) किंवा देवा! (ज्याच्या आज्ञेवाचून वृक्षाचें पानहि हालत नाहीं) तो देवच – आपणच (माझ्या) सन्निध (त्या वेळेस होतां ना?) नेहेमीं असतां ना? (मग पापाची जबाबदारी माझ्याकडे कशी बरें येते? "यथा नियुक्तोस्मि तथा करोमि" हेंच खरें नव्हे काय? 'एष हि एव असाधु कर्म कारयति तं यमधो निनीषति' हें खोटें आहे काय?) अहाहा! मी लवकरच निष्पाप होऊन एखादा (एकनिष्ठ) सेवक काय स्वामीची सेवा करीत असेल इतकी मी त्या वरुणदात्याची सेवाचाकरी करीन. हे वरुणदेवा! माझी ही प्रार्थना तुमच्या हृदयापर्यंत येऊन भिडो हीच माझी प्रार्थना व [सर्व देव – तुमच्यासारखे सर्व देव तुमच्या ह्या आम्हा एकनिष्ठ भक्तांचें सदां शिव–कल्याण करोत हीच माझी इच्छा आहे. पण वेड्या जीवा! वसिष्ठा! प्रथम त्या इंद्रसख्याची–वरुणाची (या कामीं तुला अनन्य प्रार्थना करायला नको काय? तर मग तशी) अत्यंत निर्मळ व प्रेमळ प्रार्थना कर पाहूं! (तुझ्या नेत्रांतून निर्मळ प्रेमाश्रूंचे पूर वाहूं देत व आनंदाचे रोमांच तुझ्या अंगावर उठूं देत.)] हाय! वरुणराज! तो प्रसंग–तो नितांत रमणीय प्रसंग इतक्यांतच विसरलांत काय? देवा! ज्यावेळेस आपण एका नौकेमध्यें बसून मौजेनें जलक्रीडा करण्यासाठीं समुद्रामध्यें त्या नौकेस हाकलली तो दिवस आपणांस आठवतो

ना? त्या वेळेस इतर नौका आपल्या नौकेभोंवतीं नाचत बागडत होत्या आणि आंदोलन पावणाऱ्या समुद्रवीचींच्या हिंदोळ्यावर झोके खाणाऱ्या-स्वेच्छ डुलणाऱ्या-नाचणाऱ्या आपल्या नौकेची ती शोभा कांहीं अवर्णनीयच दिसत होती. देवा! तें नितांत रम्य सख्य आज विसरलांत काय? त्या मैत्रीचा आज तुम्हांला विसर पडला काय? ती मैत्रीची खेळीमेळी देवा! कुठें हो सर्व गेली? हाय! वरुणराज! ती तुम्ही सर्व विसरून आज असें निष्ठुर झालांत ना? देवा? आपली दृढ मैत्री होती त्या वेळेंस तुमच्या त्या शोभिवंत समृद्ध घरांत मी कितींदां तरी येत असे! आणि आतांही एके काळीं तुमचा मित्र, बंधू, सखा आणि प्रेमस्थान असलेला व म्हणूनच तुमच्याशीं एकजीव झालेला हा वसिष्ठ पापाच्या चिखलानें लडबडलेल्या अंगानें केव्हांच भोग भोगणार नाहीं. (तर तुमच्या कृपामृतानें निर्धूतकल्मष होईन व मगच त्या भोग भोगण्याच्या गोष्टी करीन ही तुमच्या भक्ताची प्रतिज्ञाच समजा) वरुणदेवा! ह्या जड सृष्टीवर राहाणारे आम्ही मानव तुमची सदैव स्तुति करीत आहोंत तेव्हां ह्या पापांच्या पाशांतून आम्हांस मुक्त करा व सदैव आपली कृपादृष्टी आमच्यावर असूं द्या ह्यापेक्षां जास्त काय सांगावें."

प्रियवाचक! वरील वसिष्ठकृत वरुणप्रार्थनेचा उतारा आम्ही मुद्दामच सविस्तर दिला आहे. त्यावरून व तो वाचीत असतांना आमच्याप्रमाणेंच तुम्हासहि येथें "काहो देवा कांहीं न बोलाचि गोष्टी। कां मज हिंपुटी करीतसा" "कैंभाग्य ऐसा लाहता होईन। देखेन चरण विठोबाचे" इत्यादि तुकोबासारख्या भावी भक्तांची तळमळ, त्याचप्रमाणें "दैवं चैवात्र पंचमं" हा भावी भगवंतांचा सिद्धांत इ. गोष्टी दिसत नाहींत काय? त्याचप्रमाणें "साधीभोळी पण प्रेमळ अशी प्रार्थना मोठ्या थाटमाटाच्या पण भक्तिरहित प्रार्थनेहून श्रेष्ठ व अधिक ईश्वरग्राह्य आहे" या अर्थाचे वेदकालीन ऋषींचे अन्यत्र असलेले उद्गार "जळो वरील ते झळाळ" हे ज्ञानोबापासून सुरू झालेलें व खुद्द भगवंतांनीं प्रतिपादिलेलें एक मोठें तत्त्व सूक्ष्मपणें सांगत नाहीं काय? यावरून खऱ्या वेदांताचीं व भक्तीचीं बीजें आमच्या आर्यसंस्कृतींत किती खोलपासून पेरलेलीं आहेत याचा चांगलाच उलगडा होतो. अस्तु.

आतां पुन्हां क्षणभर वेदकालीन ऋषींच्या कवित्वशक्तीकडे वळावयाचें असल्यास वायूच्या विविध वहनादिकांचें पुढील वर्णन पहाः—

"तो पहा, ऐका! गिरीगव्हरांतून घोंघावणारा व वृक्षपर्णादिकांना तुडवीत सळसळ वाहाणारा वायु वहात आहे. पृथ्वीवरील रक्तवर्णधुळीचे लोट दशदिशांना

उधळीत तो आकाशाला भेटावयास जात आहे. आकाशाच्या विविध मार्गांतून वाहणारा हा वायु कधींच थांबत नाहीं, विसावा असा कधीं त्याला ठाऊकच नाहीं. हा कुठून बरें उत्पन्न झाला असावा? व कुठून बरें आला असावा? त्याचा शब्द तेवढा ऐकूं येतो; पण रूप दिसत नाहीं! कधी मंद, कधी जलद, असा मन मानेल तसा हा वाहतो. अशा या देवाला आम्ही चरुपुरोडाशादि हविर्भाग अर्पण करावे काय?"

तसेंच, गंभीररसाचें पुढील यमस्तुतीचें दहाव्या मंडलांतील स्मशानभूमीतील वर्णनहि हृदयामध्यें गांभीर्य उत्पन्न करणारें आहे. मृतमानवाचें प्रेत स्मशानभूमिकेंत आणलेलें आहे. जवळच त्याचा आप्त कवी बसून गांभीर्यपूर्ण बोलत आहेः–

"पापपुण्याची झडती घेऊन ज्याला त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणें स्वर्गादिकांत धाडणाऱ्या रविपुत्र यमधर्मराजाला, हें माझ्या हृदया, तूं प्रथम हविर्भाग अर्पण कर! हा आमचा परलोकींचा मार्ग प्रथम यमानें शोधून काढला – त्या मार्गानें प्रथम यमधर्म गेले व म्हणूनच त्यांच्यापासून तो कोणालाहि लपवून ठेवतां येत नाहीं. ज्या मार्गानें आमचे मृत पूर्वज गेले व त्यानें हजारों जीवमात्र जात आहेत तोच हा मार्ग!" इ. वाचक! हें वर्णन वाचून आपल्या हृदयांत गंभीर रसाच्या लाटा सुरू होत नाहींत काय? असो. तर याप्रमाणें विविध रसानें नटलेली अशी ती आद्यऋषिकवींची कविता पाहून कोणाहि मानवास कौतुक वाटणार आहे!

पण मागें सांगितल्याप्रमाणें अनेकत्वांतून एकत्वाकडे जाणारी विचारी हृदयांत खळबळ उठली, व त्यामुळें सृष्टीच्या बुडाशीं असणाऱ्या त्या चित्तत्त्वाचें चिंतन करणाऱ्या तत्त्ववेत्त्यांच्या हृदयांत तेंच दैवीतत्व स्फुरण पावून "एकं सद् विप्रा बहुधा वदंति । अग्निं यमं मातरिश्वानं" किंवा "नेह नानास्ति किंचन" अशा प्रकारची वाणी त्यांच्या मुखांतून शेंकडो वाक्यांनींबाहेर पडली, तींच उपनिषदें होत. "उपनिषद्" या शब्दाचा अर्थच मुळीं 'जवळ बसणें' म्हणजे प्रभूच्या–त्या चित्तत्वाच्या सान्निध्यांत राहणें असा आहे. पण प्रवृत्तिनिवृत्तींच्या लाटांचे हेलकावे अगदीं प्रथमपासून आजतागायत कसकसे बसत आले आहेत तेंच आपण पाहूं म्हणजे त्यानें धार्मिक व वाङ्मयात्मक इतिहासावर चांगलाच प्रकाश पडेल. मग त्यांतच कोठें आपणास नवीन तत्त्वाचा उठाव दिसल्यास त्याचाहि जातां जातां सविस्तर विचार करण्यास बरें पडेल, या कामीं श्रीयुत चिंतामणराव वैद्यांच्या "महाभारता"च्या उपसंहारांतलि शेवटचा भाग, तसेंच श्रीयुत फडके यांच्या

"वेदांत निदर्शना"चें पहिलें प्रकरण अथवा भाग " स्वामी विवेकानंदांचीं, पत्रें " इत्यादि गोष्टींचा आपणास फार उपयोग होणार आहे असो.

अगदी प्रथम, प्रवृत्तीचा उत्कर्ष आपणास दृष्टीस पडतो व तो साहजीकही आहे हें सामान्य माणसाच्या आयुष्याकडे क्षणभर दृष्टी दिल्यास आपणांस पट-णार आहे. जी एका माणसाची गोष्ट तीच समाजाची. उपजत निवृत्तीचे प्राणी जगांत फारच क्वचित् असतात, एका अर्थानें नसतातच म्हटलें तरी चालेल. प्रवृ-त्तीच्या अतिरेकावांचून निवृत्तीचा झटका येत नाहीं. विषयांचा वीट येण्यास सामान्यतः आधीं त्यांचें सेवन व्हावें लागतें. केवळ बुद्धिबळावर तो डाव जिंकणारे व एकदम फळास हात घालणारे प्राणी विरळा—समाज तर नाहींच. आणि त्यांत निसर्गानुक्रमाच्या दृष्टीनें वावगेंहि कांहीं नाहीं. तेव्हां " प्राचीन भारती आर्य प्रथम हिंदुस्थानांत आले त्यावेळीं त्यांची मानसिक स्थिति कशी होती हें ऋग्वे-दांतील अनेक ऋचांवरून चांगलें दिसून येतें. हे ऋग्वेद—कालीन आर्य ताज्या दमाचे व नव्या जोमाचे असून आनंदी, शूर आणि जगतांतील उपभोग्य वस्तूंचा योग्य उपभोग घेणारे होते. ते इंद्र, वरुण इत्यादि देवतांपाशीं सुंदर स्त्रिया, वीरपुत्र, आणि दमदार घोडे मागत. ते स्वतः सोमरस पीत आणि आपल्या प्रिय देवतांनांहि सोमरस पिण्यास आव्हान करीत. ते स्वतः मांस भक्षण करीत, आणि यज्ञांत पशु मारून देवतांस मांस अर्पण करीत. त्यांचें अंतिम साध्य स्वर्ग असून तोहि अशाच प्रकारचा म्हणजे सुख व ऐश्वर्य भोगण्याचें स्थान होता. " (म. उ. पान ८७०–७१) इतकेंच नव्हे तर तेंच स्वर्गसुख शाश्वत होय अशी त्यांची भ्रांत समजूत होती. प्रथमचे " स्मार्ताग्नि गरीबीचे होते. नंतर अग्निष्टोम, ऐतरेय ब्राह्मण, यांतील द्रव्यसहाय लागणारे, संपत्तिदर्शक यज्ञ सुरू झाले; वाजपेय, महाव्रत या यज्ञांत ऋत्विजांचे थाट दिसतात, त्यांना मंत्र म्हणतांना अंदोला-झोंपाळा—लागूं लागला ! " (वे. नि. पान १५). इतकेंच नव्हे तर, क्षत्रिय आणि वैश्य या जातींनीं नवीन मुलुख पादाक्रांत करण्याच्या व पैसे मिळविण्याच्या व्यापारांत आणि या कनकाच्या जोडीसच परमुलुखांतील व इतर हलक्या कामि-नींच्या सुखद (?) सहवासांत धार्मिक अंगाची सर्वच बाजू ब्राह्मणांवर टाकली. घरची पूजा, वेदपठण, यज्ञ, इत्यादि त्यांनींच करावें; लढतांना, पैसे मिळवितांना हत्या, अधर्म घडत, त्यांचें प्रक्षालन दानधर्म घेऊन करावें, अशी क्षत्रियवैश्यांना इच्छा होऊं लागली व म्हणून " ब्राह्मणांचा स्वाध्याय चालावा यासाठीं त्यांना

पैसे पुरवावे, त्यांना खूष करावें, म्हणजे आपण केलेल्या अधार्मिक वर्तनाबद्दल ते फारसे आपल्याला बोलणार नाहींत, असें या उभय वर्गाचे–व्यापारी आणि शिपाई यांचे–विचार सुरूं झाले" ( वे. नि. पान ३० ) व जे धर्मगुरु प्रथम त्यांच्या ताब्यांत असत त्यांनांच त्यांनीं आतां डोक्यावर घेतल्यामुळें जगाच्या स्वार्थीपणाच्या इतिहासाप्रमाणेंच ब्राह्मणांनींही मग त्याचा चांगलाच फायदा घेऊन "ऋत्विर्जिहि सर्वे यज्ञाः प्रतिष्ठिताः" म्हणजे ब्राह्मणांच्या वांचून यज्ञ होणारच नाहींत अशा गर्वाची भाषा ब्राह्मण बोलूं लागले ! अरेरे, अतिथि, पितर, विवाह व यज्ञ इत्यादिकांतून गाय, बैल, बोकड, घोडा, किंबहुना पुरुष अथवा नर इत्यादिकांची हिंसा करण्यास, व गाईबैलादिकांचें मांस खाऊन, ( श्रीयुत ता. ने. पांगळकृत जैनधर्म पान ४५ पहा ) सोमरसरूपी मदिरेनें तरर् होण्यास यथेच्छ उत्तेजन देणारे, ऐषआरामांत लोळून स्वर्गसुखाची वांच्छा धरणारे ते 'दुर्बुद्धि' ब्राह्मण यांनां खरे 'ब्राह्मण' कोण म्हणेल ? पण अशा रीतीनें केवळ ब्राह्मणच नव्हे तर त्यावेळचा सर्व त्रैवर्णिक समाजच प्रवृत्तीच्या परमावधीच्या टोंकाला गेला होता! यावेळच्या स्वतःच्या जिव्हालौल्यशमनार्थच म्हणण्यास हरकत नाहीं इतक्या परमावधीच्या अनागसजीवांच्या हिंसेकडे वाचकांनीं पूर्ण लक्ष द्यावें. कारण याच हिंसाप्रधानत्वामुळें त्रैविद्येवर पुढें भगवद्गीतेचे, गौतम-बुद्धाचे, व जैनधर्मीयांचे हल्ले चढलेले असून ते ज्ञानेश्वरापासून पुढेंहि आज-तागायत चालूं आहेत. तरीहि अजूनहि क्वचित् त्या यज्ञयागांची लंगडी तरफदारी करणारीं अलौकिक धाडसाची ( ! ) मंडळी निघावीत हें आश्चर्य नव्हे काय ? पण यांत आश्चर्य तरी कशाचें ? "पडलों तरी माझें नाक वर" म्हणणारी कांही हेकड मंडळी ही असायचीच असो. तेव्हां सांगण्याचा भाग असा कीं, याप्रमाणें त्यावेळची ब्राह्मण मंडळी 'चढेल' बनली होती ? व म्हणूनच गौतमबुद्धा-सारख्याचे हल्ले त्यांच्यावर सुरूं झाले. या ब्राह्मणांच्या चढेलपणावर, ते ज्या वेदांच्या जोरावर चढेल झाले होते त्या वेदांवर, वेदांतील हिंसामय यज्ञयागादि कर्मकांडावर, व जातिभेदावर हे हल्ले सुरू झाले. उपनिषदांची व भगवद्गीतेची भाषा आणि आपस्तंब सूत्र व मनुस्मृतीची भाषा यांची तुलना केल्यास आपणांस प्रो. टील साहेबांचें ब्राह्मणांच्या वर्चस्वासंबंधींचें म्हणणें पटणार आहे. ( न्या. तेलंगांची 'भगवद्गीतेची प्रस्तावना' पहा. ) 'पुण्यब्राह्मण' व 'भक्तराजर्षि' ह्यांना एकाच मालिकेंत घालणारी, इतकेंच नव्हे तर 'नराणांच नराधिपः'

म्हणून क्षत्रियांचा गौरव करणारी, तसेंच गुणकर्मावरून जाति ठरवून तिचीं कर्तव्यकर्मेंहि अगदीं मूलभूत गुणांतच सांगणारी गीता कुठें, व जन्मावरून जाती ठरवून ' वर्णानां ब्राह्मणो गुरुः ' म्हणून, त्यांनां अध्ययन-अध्यापनादि षट्कर्में सांगून अध्यापन, याजन व प्रतिग्रह यांस क्षत्रियास व वैश्यास बंदी करून त्यांवांचून अशक्य होणाऱ्या अध्ययन, यजन, व दान यांच्या उपदेशाची मात्र क्षत्रिय-वैश्यावर कुरघोडी करणारी आपस्तंबाची भाषा कुठें? अर्थात् या सर्वांचा निष्कर्ष ब्राह्मणांच्या व क्षत्रियवैश्यांच्या चढत्यावाढत्या नात्यासंबंधीं प्रो. टील साहेबांच्या खालील आंग्ल उताऱ्यावरून कळून येणार आहेः—

"Subject at first to the princes and nobles, dependent on them, they began by insinuating themselves into their favour and representing it as a religious duty to show protection and liberality towards them. Meanwhile they endeavoured to make themselves indispenible to them, gradually acquired the sole right to conduct public worship, and made themselves masters of instruction."—Outlines of the History of Ancient Religions.

वास्तविक ' वेदांत निर्देशन ' कारांनीं दाखविल्याप्रमाणें ही स्थिति सर्व देशांत व जशी धार्मिक तशी राजकीय बाबतींतही आहे. " आळसानीं किंवा कार्याच्या व्यापृतत्वासंबंधानें आपले हक्क घालवायचे आणि त्याबद्दल भांडणें काढायचीं ही स्थिति सगळीकडे दिसून येते " ( वे. नि. पा. ३० ) पण ही तऱ्हा एका दृष्टीनें चमत्कारिक नव्हे काय? कारण जगाच्या स्वार्थीपणाच्या इतिहासाच्या दृष्टीनें यांत नवल काय आहे! पण आम्ही वर जे यावर गीता-गौतमादिप्रमाणें हल्ला चढवून वाईट म्हटले तें ब्राह्मणांच्या उच्च संस्कृतीच्या दृष्टीनें म्हटलें. निदान ब्राह्मणांनीं तरी मानाच्या, गौरवाच्या, लोभाच्या, द्रव्याच्या, हक्काच्या, लालसेला बळी पडून आपला इतका अधःपात—हो अधःपातच नव्हे तर काय? —करून घ्यावयास नको होता! " आद्यऋषींचीं स्तोत्रें साधीं, प्रेमळ आहेत. त्यांच्याबरोबर यज्ञादिकर्में वाढलीं, व तीं वाढतां ढवातां प्रधान होऊन बसलीं... मंत्रापेक्षां तंत्राची प्रतिष्ठा वाढली! तेव्हां ( साहजिकच ) विद्वान लोकांच्या विचारानीं उचल घेतली. " ( वे. नि. ३२ ) असा हा इतिहास आहे.

# भाग दुसरा.

भगवद्गीतेची म्हणजेच भगवान् श्रीकृष्णाची उदारबुद्धी व आपस्तंबाची अनुदारवृत्ति वर सांगितलीच आहे. स्वामी विवेकानंदही आपल्या एका १८९५ सालच्या ' खाजगी पत्रां 'त म्हणतातः—

" भिक्षुकांनीं पक्कें लक्षांत ठेवावें कीं, हिंदुधर्मांत जीं जीं म्हणून उदात्त व सर्वमान्य तत्त्वें आहेत तीं तीं क्षत्रियांनींच पुढें आणिलीं आहेत, व त्यांचें त्यांनींच प्रत्यक्ष आचरण करून दाखविलें आहे. उपनिषदांचे कर्ते कोण होते? प्रभु श्रीरामचंद्र जातीनें कोण होते? भगवान् श्रीकृष्ण कोणच्या जातीचे होते? बुद्धाचा जन्म कोणत्या जातींत झाला होता? जैनांचे तीर्थंकर कोणत्या जातीचे होते? जेव्हां जेव्हां क्षत्रिय स्वतः ज्ञानवान् झाले, तेव्हां तेव्हां त्यांनीं तो मार्ग अगदी हीन शूद्रापर्यंत सर्वांना सारखा खुला करून दिला. उलटपक्षीं, ब्राह्मण ज्ञानवान् झाले तेव्हां त्यांनीं हे सर्व मार्ग बंद करण्याचें मात्र श्रेय घेतलें!" भगवान् ज्ञानेश्वरांचाही वेदासंबंधीं म्हणजेच त्यांच्या कर्त्या ब्राह्मणासंबंधीं असाच अभिप्राय आहे गीतेच्या अठराव्या अध्यायाच्या शेवटीं भगवद्गीतेची प्रशस्ति गाताना ज्ञानेश्वर म्हणतातः—

" वेदु संपन्नु होय ठाईं। परिकृपणु ऐसा आनु नाहीं। जे कानीं लागला तिहीं। वर्णांचियाची ॥ येरा भवव्यथा ठेलिया। स्त्रीशूद्रादिकां प्राणियां। अनवसरु मांडूनियां। राहिला आहे ॥ तरी मज पाहतां तें मागील उणें। फेडावया गीतापणें। वेदु वेठला भलेनेणें। सेव्य हो आवया ॥ ... यालागीं मागिल कुटी। म्याला वेदु गीतेच्या पोटीं। रिगाला आतां गोमटी। कीर्ति पातला ॥" —असो. तर अशा प्रकारची ही वैदिक काळची स्थिति होती फार प्राचीनकाळीं आर्यांचे परमपूज्य ऋषी या दोन्ही वृत्तींचा ( प्रवृत्ति निवृत्तींचा ) योग्य आश्रय करून वागत असत, असें त्यांच्या आश्रमव्यवस्थेवरून स्पष्ट दिसतें. दोन आश्रम प्रवृत्तीचे तर दोन निवृत्तीचे; " यौवने विषयैषिणाम् " तर " वार्द्धके मुनिवृत्तिनाम् " अशी त्यांची राहणी होती. पण ऋग्वेदकालाच्या अखेरीला प्रवृत्तीचें प्रस्थ माजलें. यज्ञयागादि क्रिया अत्यंत भानगडीच्या व खर्चाच्या झाल्या. यज्ञकर्म मोठ्या डामडौलानें करून स्वर्गसुख प्राप्त करून घ्यावें हीच ब्राह्मणक्षत्रियांनीं इतिकर्तव्यता मानली; आणि वाजपेय, राजसूय, अश्वमेध किंबहुना पुरुषमेध यांचें प्रस्थ

त्यांच्यांत माजलें! ( तेव्हां साहजीकच ) अशा वेळीं उपनिषदांचे उदात्त विचार सुरू झालें " असें रा. चिंतामणराव वैद्य म्हणतात तें योग्यच आहे. ( म. उ. पा. ८७३–७४ ) अर्थात् उपनिषदें, भगवद्गीता, बौद्धमत, इत्यादिकांतील विचार म्हणजे एकाच विचारसागराच्या विविध लाटा होत. ह्यांत कांहीं शंका नाहीं; त्यावेळीं जुन्या कर्मकांडाविरुद्ध जी विचारी हृदयांत खळबळ उठली होती अथवा सुरू झाली होती त्याचेंच प्रतिबिंब आपणास या उपनिषदादि विविधमतांतून पडलेलें पाहावयास मिळणार आहे. न्यायमूर्ति तेलंगांनीं आपल्या " भगवद्गीतेच्या प्रस्तावनें"त व " सनत्सुजाताच्या प्रस्तावनें"त असेच मननीय उद्गार काढले आहेत. पहिल्यांत ते म्हणतातः—

" Krishna does not on the whole throw the Vedas entirely overboards. He feels and expresses reverence for them. He says that the precepts of the Vedas are suitable to a certain class of people, of a certain intellectual and spiritual status so to say. But further they cannot claim anything more than this. He contends on the contrary that acting upon the ordinance of the Vedas is an obstacle to the attainment of the summum bonum. And the same is the opinion of the Upanishadas. The coincidence of opinions in the Upanishadas and those of Krishna in Bhagwatgita is striking and most note-worthy. Prof. Maxmuller uses the following eloquent language regarding the Upanishadas:—

" Lastly come the Upanishadas; and what is their object? To show the utter uselessness, nay the mischievousness of all ritual performances; to condemn every sacrificial act which has for its motive a desire or hope of reward; to deny, if not the existance, at least the exceptional and exalted character of the Devas; to teach that there is no hope of salvation and deliverance except by the individual self recognizing the universal self and finding rest. There where alone rest can be found. "

अर्थात् या उपनिषदांच्या वेदादिकांवरील हल्ल्याचा प्रतिध्वनि आपल्यास भगवद्गीतेंतही कसा ऐकूं येतो, हें पुढील श्लोकांवरून समजून येईलः—

" यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥ ४२ ॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥
त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥"
(भ. गी. अ. २)

" त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥
ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयी धर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥ "
(भ. गी. अ. ९)

"अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसं ॥ १२ ॥"
(भ. गी. अ. १७)

" कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥
अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥ "
(भ. गी. अ. ७)

" येऽप्यन्यदेवता भक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम ॥ २३ ॥

अहंहि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेवच ।
नतु मामभिजानंति तत्त्वेनातच्यवंति ते ।। २४ ।। ”
( भ. गी. अ. ९ )

“ अनन्यचेताः सततं यो मां स्मराति नित्यशः ।
तस्याहं सुलभःपार्थ नित्ययुक्तस्ययोगिनः ।। १४ ।।”
मामुपेत्यपुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ।। १५ ।।
आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ।। १६ ।।”
( भ. गी. अ. ८ )

“ अपिचेत् सुदुराचारो भजते मामन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितोहि सः ।। ३० ।।
मांहि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परागतिम् ।।३१।।
किं पुनर्ब्राम्हणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।। ३२ ।। ”
( भ. गी. अ. ९ ).

श्रीयुत तेलंगानीं वरील बहुतेक श्लोक प्रो. ‘मोक्षमूलरा’च्या उपनिषदासंबंधींच्या बोलांशीं ताडून पहावेत म्हणजे दोघांचाहि उद्देश जवळ जवळ एकच कसा आहे हें समजून येईल असें म्हटलेंच आहे. किंबहुना, कै. प्रो. डॉ. गुणे यांनींही भगवद्गीतेसंबंधीं शिकवितांना “ गीतेच्या प्रारंभींच नव्हे, तर ऐन मध्यावरसुद्धां जो कृष्णांनीं वेदांवर व वैदिकांवर सणसणीत हल्ला चढविला आहे त्याचें कारणच त्यावेळीं तशा विचारांची लाट उठली होती ” अशा अर्थाचे उद्गार काढल्याचें आम्हांस अद्याप स्मरतात. असो.

महाभारतांत ‘ सनत्सुजातीय ’ म्हणून एक भगवद्गीतेसारखेंच महत्त्वाचें प्रकरण आहे. त्याचेंही मत अथवा त्यांतील विचारही उपनिषदें व

भगवद्गीता ह्यांच्याशीं कसे जुळतात, व त्यांच्याप्रमाणेंच सनत्सुजातही वेदांची किंमत कशी यथायथाच समजत आहेत, व मोक्षाचा मार्ग कसा भिन्न प्रतिपादीत आहेत, हें न्यायमूर्ति तेलगांनीं त्याच्या प्रस्तावनेंत खालील-प्रमाणें मोठ्या सुंदर भाषेंत सांगितलें आहे:—

" The estimate of the value of Vedas implied in the सनत्सुजातीय appears to coincide with that in the Gita. The Vedas are not here cast aside as useless any more than they are in the Gita. But the सनत्सुजातीय seems certainly to join the भगवद्गीता in its protest against those men of extreme views, who could see nothing beyond the rites & ceremonies, taught in the Vedas. A study of the Vedas is indeed insisted on in sundry passages of the सनत्सुजातीय. But it is equally maintained that, the performance of the ceremonies, laid down in the Vedas, is not the true means of final emancipation. On all the points, we have opinions expressed in the सनत्सुजातीय which conclusively establish an identity of doctrine as between the Upanishadas & the भगवद्गीता on one side and the सनत्सुजातीय on the other. Lastly we have an explicit statement that the mere study of the Vedic texts avails nothing and that sin is not to be got rid of by one who merely ' studies the ऋक् and the 'यजुस्' texts and the सामवेद. "

ह्यावरून रा. तेलंग शेवटचा सिद्धांत सांगतात कीं,

" The सनत्सुजातीय forms part of that same movement in the religious history of ancient India, of which Gita is another embodiment, and may be treated as a work merely contemporary with the भगवद्गीता and occupying generally the same point of view. "

ह्यानंतर शाक्यमुनी गौतमबुद्धांच्या मतांची व भगवद्गीतेच्या मतांची तुलना करून पहातां, तीही अशीच बहारीची आहे, असें आपणास कळून येणार आहे. अर्थात् ती आपण त्या. तेलंगांच्याच शब्दांत ऐकूं या म्हणजे ' वेदांचा अधिकार ' व ' जातिभेद ' ह्या विषयांवर श्रीकृष्णाची व बुद्धाची चळवळ ह्या एकाच विचारसागराच्या लाटा असून त्यांनीं चालू धर्माची इमारत कशी खिळखिळी करून सोडली होती, हें आपणांस कळून येईल. रा. तेलंग म्हणतात, " The main points on which Buddha's protest against Brahmanism rests, seem to be the true authority of the Vedas and the true view of the differences of caste. Well now, on both these points the Gita, while it does not go the whole length which Buddha goes, itself embodies a protest against the views current about the time of its composition. The Gita does not, like Buddhism, absolutely reject the Vedas, but it shelves them. The Gita does not totally root out castes. It places caste on a less untenable basis......... The Gita and Buddhism were alike the outward manifestation of one & the same spiritual upheaval which shook to its centre the current religion, the Gita being the earliar and less thorough-going form of it. " हीच गोष्ट निराळ्या शब्दांत व कांहीं निराळ्या अर्थानीं ते खालीलप्रमाणें पुनः पुन्हां सांगतातः—

" The fact that, though strictly orthodox, the auther of the Gita still undermines the authority, as unwisely venerated, of the Vedic revelation; and the further fact that, in doing this, he is doing what others also had done before him or about his time; go, in my opinion, a considerable way towards fortifying the results ( about 'the position of the Gita in

regard to the great reform of Sakya Muni'). To me Buddhism is perfectly inteteigible as one outcome of that play of thought on high spiritual topics, which in its other, and as we may say, less thorough-going manifestation we see in the Upanishadas and the Gita. Compare that line of movement with that of Raja Ramamohan Roy and Babu Keshav Chandrasen. .........The points of dissent iu olden times were pretty nearly the same as now. The ultimate motive power—a sense of dissatisfaction in its integrity with what had come down from old times encrusted with the corruptions of the years—was also identical. In this view, the old system of Gita, Upanishadas, and Buddhistic philosophy constitute a regular progression .......The Upanishadas with the Gita and the precepts of Buddha appear to be the successive embodiments of the spiritual thought of the age, as it became more and more dissatisfied with the system of mere ceremonial then dominant."— असो. तर याप्रमाणें तत्कालीन चालू असलेल्या तंत्रप्रधान यज्ञांच्याविरुद्ध उपनिषदें, गीता व बुद्धमत ह्या एकामागून एक उठलेल्या पण एकाच विचारसागराच्या लाटा होत असा न्या. तेलंगांच्यावरील लेखनाचा थोडक्यांत निष्कर्ष असून तो योग्यच आहे असें विचारी जनांस पटणार आहे. पण त्याचबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, उपनिषदें, भगवद्गीता व बुद्धमत ह्या एकाच विचाराच्या लहरी असल्या तरी या प्रत्येकाचा अंतर्गत जोर व सुधारणेसंबंधीं विचारसरणी, तसेंच जुन्याचा वीट येऊन बाहेर पडणारे उद्गार हे सारखेच—अगदीं तंतोतंत जुळणारे—नव्हते. त्यांतही मवाळ जहाल असा भेद होता हें आपणांस खालील विवेचनावरून दिसून येणार आहे. तेव्हां तिघांचाहि साकल्येंकरून विचार करून अथवा झाल्यावर आतां आपण त्या प्रत्येकाच्या शिकवणीकडे व विचारसरणीकडे वळूं या. कारण

तिन्हीही गोष्टी भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासांत क्रांतिकारक असून अत्यंत महत्वाच्या आहेत. असो.

तर याप्रमाणें वळून पहातां जुन्या कर्मठ कर्मकांडावर व स्वर्गसुखासाठीं हपापलेल्या आणि म्हणूनच खऱ्या आत्मसुखास पारख्या झालेल्या त्याच्या वृत्तीवर प्रथम हल्ला उपनिषदांनीं चढविला. इमर्सननें म्हटल्याप्रमाणें " Every man is God playing the fool " ही गोष्ट त्या औपनिषत्कालीन विचार करणाऱ्यांना दिसून आली व याप्रमाणें सकल-सुखाचा शांतिनिधि प्रत्येकाच्या हृदयांत वसला असतांना स्वर्गसंसाराकडे व यज्ञयागांकडे धांव घेणाऱ्या त्या अज्ञानी कर्मठजीवांची त्यांना कींव आली, हसूं आलें, सात्विक संतापही आला व " न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवति । आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ॥ " ( बृहदारण्य ॥ ४।५ ॥ ) म्हणजे सर्व सुखाचें स्थान ' अस्ति भाति प्रिय ' असा आत्मा आहे यासाठीं " तुझें आहे तुजपाशीं । परी तूं जागा चुकलासी । " या तुकोक्तीप्रमाणें त्या कस्तुरीमृगासारखें उगाच नानात्वांत हिंडूं नका; कारण " मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ।" ( बृहदारण्य ४।२।१९॥ ) म्हणजे भेदभावाच्या भुतांनीं झपाटलेल्या जीवाची जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कल्पांतींही सुटका होणार नाहीं असें त्यांनीं ठासून सांगितलें. तसेंच, " न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति । हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥" या भागवतांतील वचनाप्रमाणें कामाची शांति विषयोपभोगानें कधींच होणार नाहीं, किंबहुना, "यत्पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः । नालमेकस्य तत्सर्वं इति मत्वा शमं व्रजेत् ॥ " या स्मृत्युक्तिप्रमाणें सर्व जगसुद्धां ह्या जीवाला उपभोगाला पुरें पडणार नाहीं व त्याची शांति कधींच होणार नाहीं असें जाणून ह्या कामाग्नींत ज्या विषयोपभोगांची किंवा त्यांच्या इच्छेची घृताहुति आपण सारखी सोडीत असतो तीच तोडून टाका, ' कार्लाईल ' नें Sartor Resartus मध्यें म्हटल्याप्रमाणें " Make thy claim of wages a zero" असें करा म्हणजे "then, thou hast the world under thy feet. " असा चमत्कार तुमच्या दृष्टीस पडेल; कारण ' न मागे तयाची रमा होय दासी ' असें म्हटलेंच आहे; तेव्हां "वैराग्य-भाग्यसारिखें दुसरें भाग्य नाहीं " किंवा " परमार्थी तो राज्यधारी ।

परमार्थ नाहीं तो भिकारी।" ही दासोक्तिच खरी आहे असें तुमच्या प्रत्ययास येईल; व यासाठीं 'साधनचतुष्टया'च्या जोरावर जेव्हां लागेल तेव्हां संन्यास घेऊन—("यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्।" श्रुति)— "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" अशा त्या ब्रह्माच्या चिंतनांत विलीन व्हा, असा त्यांचा शेवटचा उदात्त उपदेश आहे. प्रिय वाचक! या औपनिषदिक विचारांचा व उपदेशाचा व तत्पूर्वीच्या हपापलेल्या पूर्वमीमांसेचा विचार केला म्हणजे खरोखरच हॅम्लेटप्रमाणें "हें चित्र पहा व हें चित्र पहा!" असें उद्गार आपल्या तोंडून अगदीं सहज बाहेर पडतात! जगाचा खोल विचार व अभ्यास करून काढलेलीं विचाररत्नेंच त्यांत आपणांस सर्वत्र विखुरलेलीं दृष्टीस पडतात. असें हे उदात्त वाङ्मय आहे! आत्म्याचा विसर पडूं देऊं नका, त्यावर देहाचा मिथ्या अध्यास करूं नका, नाहींतर, "कनकभूषणसंग्रहणोचितो यदि मणिस्त्रपुणि प्रणिधीयते। न स विरौति न चापिहि शोभते भवति योजयितुर्वचनीयता॥" ह्या प्रसिद्ध सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें त्यांत तुमचेंच हसूं होणार आहे, यासाठीं आत्मानात्मविवेक करून तें जीवब्रह्मैक्याचें अपार सुख धुंडाळा व त्यासाठीं जरूर तर सर्व संगपरित्याग करून संन्याससुद्धां घ्या असा एकच एक उपनिषदांचा पुनः पुन्हा उपदेश आहे. पण अत्यंत धडाडीनें जुन्या कर्मठांच्या कर्मकांडावर हल्ला चढवून खऱ्या सुखाचा मार्ग दाखविणाऱ्या या सुधारणावादी उपनिषदांच्या उपदेशाचाही—इतर सर्व सुधारकांच्या उपदेशाप्रमाणेंच—अतिरेक केला जाऊन त्यास भलतेंच विपरीत स्वरूप प्राप्त झालें व 'जरूर तर आजसुद्धां संन्यास घ्या' ह्यांतील 'संन्यास घ्या' एवढेंच शब्द उचलून जो उठला तो संन्यास घेऊं लागला—त्याकामीं विवेक राहिला नाहीं; व गांवांतली वस्ती मोडून अरण्यांत होऊं लागली! एवढाच फरक झाला. "कित्येक वैदिक ऋचांतून क्वचित् असणारें निवृत्तीचें बीज भारती आर्य हिंदुस्थानांत आल्यावर गंगासरस्वतींच्या दरम्यानच्या ब्रह्मभूमींत मोठ्या वृक्षरूपास पोंचून त्यास औपनिषत्विचाररूपी अत्यंत मनोहर व रसभरीत फळें आलीं. आणि सर्व विश्व नश्वर आहे, किंबहुना स्वर्गहि नश्वर आहे, असें त्यांच्या निदर्शनास येऊन तप आणि अरण्यवास यांची त्यांस गोडी लागली. यज्ञाचा मार्ग त्यांनीं सोडला नाहीं, पण यज्ञाच्या बरोबरीला तप

नेऊन ठेविलें. स्वर्गापेक्षा मोक्ष हाच परम पुरुषार्थ आहे असें ते मानूं लागले. सर्व सृष्टि यज्ञ करीत आहे, प्रजापतिही यज्ञ करीत आहे, असें ते म्हणत. आतां सर्व सृष्टि आणि प्रजापति, इंद्रसुद्धां तप करीत आहेत अशी त्यांची भावना झाली. सर्व उपभोग्य वस्तूंचा त्याग करुन सर्व कर्मांचा संन्यास करणें हाच मोक्षाचा उपाय त्यांस दिसूं लागला. कोणत्याही वस्तूची इच्छा करणें म्हणजेच दरिद्रीपणा कबूल करणें आहे व कशाचीही इच्छा नसणें हीच ऐश्वर्याची परमावधि होय, असें ते म्हणूं लागले. सारांश, संसार सोडून अरण्यांत जाऊन शमप्रधानबुद्धीनें अकाम स्थितींत राहणें हें मनुष्याचें परम कर्तव्य होय असें वेदांती तत्त्ववेत्त्यांस वाटूं लागलें. आशिष्ठ, द्रढिष्ठ, व बलिष्ठ अशा सार्वभौमाला जे सुख त्याच्या सहस्रपट सुख अकामहत श्रोत्रियाला, असा त्यांचा निश्चय झाला... सारांश, मंत्रकाळीं कर्मवाद्यांची प्रवृत्तिपरायणता कळसास गेली, तर उपनिषदांच्याकाळीं निवृत्तिवाद्यांची निवृत्तिपरायणता कळसास जाऊं लागली. " ( म. उ..पा. ८७१) व " कित्येक लोक कर्म बिलकुल न करतां " पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरंति " ह्या बृहदारण्यकोक्तीप्रमाणें संसार सोडून अरण्यांत जावें असें म्हणूं लागले " ( म. उ. पा. ८७० ) इतकेंच नव्हे तर, " हळुहळूं ही निवृत्तिवृत्तिही दुसरीकडे कळसास गेली. उठला तो वनांत जाऊन तप करूं लागला. पाहिजे त्यानें पाहिजे त्या स्थितींत संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानाचा मार्ग सुधारावा असें होऊं लागलें " ( म. उ. पा. ८७४ ) अर्थात् यांत मागचा पुढचा पोंच राहिला नाहीं. " संन्यासही पाहिजे तेव्हां क्षणिक वैराग्यानें किंवा मनाच्या कमजोरपणानें घ्यावयाचा नाहीं तर अंगीं पूर्ण वैराग्य बाणलें असतां व जगताच्या नश्वरत्वाची पूर्ण जाणीव चित्तांत बिंबली असतां घ्यावयाचा आहे " ( म. उ. पा. ८७४) इतका उमज सामान्य लोकांस राहिला नाहीं, व हजारों लोक केवळ ही संन्यासाची वावटळ उठली होती म्हणूनच केवळ संन्यासी झाले. पण अशा अविवेकाचा परिणाम ' अविवेकः परमापदां पदं' या वचनाप्रमाणें जो व्हावयाचा तोच झाला. "यज्ञयागादिकाच्या कडकडीत बंधनांना कंटाळलेल्या विद्वान लोकांनीं केलेली ज्ञानयोगाची मांडणी कालांतरानें विस्कळित होऊं लागली...मधल्या दर्जाचे लोक मुखानें ह्या मतांचा उच्चार करतात पण कृतीनें निराळा प्रकार होऊं

लागतो. " ( वे नि. पा. ९ ) व " उठला सुटला क्षणभर टिकणाऱ्या वैराग्यानें संन्यास घेऊन अरण्याश्रय करूं लागेल तर शहरांतील गर्दी मोडून अरण्यांत गर्दी होईल, किंबहुना समाजाचें नुकसान होऊन समाजांत अनीति माजेल ! अशी स्थिती खरोखरच पुढें बौद्धांच्या भरमराटीच्या वेळीं झाली, आणि जंगलांतील विहार शहरासारखे मोठे होऊन दुराचारी भिक्षूंनीं आणि संन्यासिनींनीं भरून गेले, किंबहुना ते शहरवजा विहार अनीतीचें माहेरघर बनले. " ( म. उ. पा. ८७४–७५ ). युरोपांतला रोमनकॅथॉलिक धर्माचा इतिहास हेंच सांगत आहे. " हजारों पुरुष व स्त्रिया संसार सोडून मंक्स व नन्स म्हणजे जोगी व जोगिणी होऊं लागल्या ! ( पण ) कालगतीनें हें निवृत्तीचें स्वरूप केवळ पोकळ झालें. खरी विषयपराङ्मुखता नाहींशीं होऊन दर्शनी मात्र राहिली आणि अनेक प्रकारचे अनाचार त्यांच्यांत चालूं झाले ! " (म. उ. पा.८७३). अर्थात आपल्याकडेहि खुद्द औपनिषत्कालींसुद्धां त्या उपदेशाचा अतिरेक करणाऱ्यांच्या बाबतींत तीच स्थिती झाली असली पाहिजे ह्यांत शंका नाहीं. आणि म्हणूनच, " कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारःस उच्यते ॥" असें झणझणीत अंजन भगवंताना ह्या भरंगळलेल्या लोकांच्या डोळ्यांत पुढें घालावें लागलें आहे. असो. पण प्रवृत्तिनिवृत्तिच्या आंदोळ्याबरोबर किंवा आंदोळ्यावर हेलकावे खाणारांच्या बाबतींत असें हें चालायचेंच. " प्रत्येक गोष्टीस मध्यबिंदु आहे व त्यांतच राहून मनुष्यास परमगति मिळूं शकते " असें चिंतामणराव वैद्य म्हणतात तें खरें आहे. ( म. उ. पा. ८७५ ) पण त्यांनींच म्हटल्याप्रमाणें " कोणताही देश उन्नतीच्या परमोच्च बिंदूंत कायमचा राहूं शकत नाहीं. चक्राच्या गतींत जसें उच्च बिंदूला पोंचल्यावर खालच्या दिशेकडे जाणें अपरिहार्य आहे, तसा हा उच्चनीचगतीचा प्रकार जगतांत सारखा चालूं राहणारच." ( म. उ. पा. ८६६ ) हेंहि पण तितकेंच खरें आहे. किंबहूना 'जगांतील प्रवृत्तिनिवृत्तींच्या आंदोलना'चा विहंगम विचार करून त्यांनीं हेंच दाखवून दिलें आहे. ( पहा–म. उ. पा. ८७१ ते–८७६ ) अर्थात् जे देशाच्या बाबतींत लागूं तेंच त्यांतील समाजाच्या, धर्माच्या, सुधारणेच्या, व विविध मतांच्याही बाबतींत खरेंच असणार हें उघड आहे. पण म्हणून—असें हें होणारच किंवा चालणारच म्हणून—

त्याकामीं सुधारणेचा यत्न करूं नये, मनुष्याच्या वृत्तिला प्रवृत्तिनिवृत्तिच्या मध्यबिंदूंत राखण्याचा आपणाकडून होईल तितका यत्न करूं नये असें होत नाहीं. कारण त्यानें झाल्यास फायदाच होतो व लोक असन्मार्गापासून बचावून सन्मार्गास लागतात. तेव्हां ल्यूथरसारख्या महात्म्यांनीं जें युरोपांत काम केलें तेंच व त्याहून किती तरी दिव्य व उज्ज्वल कार्य भगवंतांनीं आपल्या दिव्य व अमोघ अशा उपदेशानें केलें आहे. तें इतकें कीं त्यांचा तो उज्ज्वल उपदेश ज्या गीतेच्या दिव्य रत्नमजूषेंत सांठविला आहे तिचा मान:—त्या अवघ्या ७०० श्लोकांची योग्यता प्रस्थानत्रयींत सामावली जाऊन, भगवद्गीता हें ब्रह्मविद्येचें दुसरें उपनिषद् व जोरदार कर्मयोगाचें एक अद्वितीय शास्त्र होऊन राहिलें आहे. अशा त्या गीतेच्या दिव्य प्रासादतुल्य भव्य इमारतीकडे वळण्यापूर्वीं त्याच सुमारांस समाजांत चालूं असणाऱ्या इतर कांहीं मतांचा आपण आधीं थोडक्यांत विचार करूं. कारण वेद, व वेदांताप्रमाणें त्या मतांचाहि उल्लेख भगवद्गीतेंत आपणांस आढळणार आहे. असो.

---

# भाग तिसरा



पैकीं पहिलें मत म्हणजे चार्वाकाचें. "ह्या मताचा उत्पादक देवगुरु बृहस्पति होता असें म्हणतात; त्यानें दैत्यांचा पराजय व्हावा या हेतूनें, त्यांची मति भ्रष्ट करण्याकरितां हें मत काढलें अशी दंतकथा आहे" ( वे. नि. पा. ३५ ) आणि ह्या कथेंतहि खोल अर्थ आहे. एकतर हें मत मति भ्रष्टविण्यासाठीं व भ्रष्टविणारें आहे म्हणजेच मुळांत चुकीचें व मूर्खपणाचें आहे, व तें दैत्यांच्या साठीं काढलें गेलें व त्या रूपानें त्यांचा पराभव साधला यावरूनच त्याचा अंगिकार दैत्यप्रकृतीचे व "आसुरसंपत्ति"चे लोकच फक्त करतात व ते शेवटीं दैत्याप्रमाणेंच नाश पावतात हा व इतका खोल अर्थ वरील दंतकथेंत आहे. त्या दैत्यांचा किंवा असुरप्रकृतीच्या मानवांचा नाश कसा होतो हे गीतेचा सोळावा अध्याय सांगतच आहे. पण साडेतीन घटकांच्या राज्यानें शेफारून जाणारे हे शिरजोर

कसे उन्मत्तासारखे बडबडत व आचरत असतात त्याचेंहि वर्णन भगवंतांनीं " असौ मया हतः शत्रुः " वगैरे श्लोकांतून चांगलें केलें आहे. " ब्राह्मणकालच्या यज्ञस्तोमानें, कर्मठ लोकांच्या आढ्यतेनें, जेथें तेथें अडवणूक होऊं लागली. उपनिषदांतील उच्च विचार समजण्याइतकी बुद्धि नसणाऱ्या लोकांचें समाधान होईना. " ( वे. नि. पा. ३५ ) तेव्हां " वेद बिद सब झूट है, कसचा देव अन् कसचा धर्म; खावें, प्यावें, मजा मारावी खास ! कारण एकदां ह्या देहाची तीन चिमटी राख झाली म्हणजे तो परत मिळेल काय ? वेद आणि वेदांत हे सगळे पौरुषहीनांचें काम आहे. आणि वेदांचें कर्मकांड तर उघडउघड ब्राह्मणांची लबाडी. स्वतःचें पोट भरण्यासाठीं ह्या भंगटांनीं कांहीं तरी भारूड रचलें आहे झालें ! " अशाप्रकारें सर्वच मानसिक उन्नतिचा चित्रपट उधळून देऊन, किंबहुना, त्यास शिव्या देऊन, केवळ शारीरिक नीच सुखांत व पशुवृत्तींत गुंगणारे व भलतीकडेच वाहवलेलें चार्वाकमत पुढें सरसावलें ! "बृहस्पतिसूत्राचा बहुतेक नायनाट झाला तथापि त्यांतील कांहीं वचनें अद्याप शिल्लक आहेत, ती माधवानें संकलित केलीं आहेत; त्यावरून यांनाच शून्यवादी, लोकायतिक, सौगत, क्षपणक, इत्यादि नांवें लावलेलीं आढळतात. " ( वे. नि. पा. ३६ ) त्या सूत्रांपैकीं कांहीं खालीं देत आहे त्यावरून वाचकांनाही ह्या दुसऱ्यास भंगड म्हणणाऱ्या पण स्वतःच भंगड असलेल्या लोकांच्या पाखंडी मताची थोडीशी कल्पना येईल. ते म्हणतातः—

" अग्निहोत्रं त्रयोवेदास्त्रिदंडं भस्मगुंठनं ।
बुद्धिपौरुषहीनानां जीविकेति बृहस्पतिः ॥ १ ॥ "
" ततश्चजीवनोपायो ब्राह्मणैर्विहितास्त्विह ।
मृतानां प्रेतकार्याणि नत्वन्यद्विद्यते कचित् ॥ २ ॥ "
" यावज्जीवं सुख जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् ।
भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥ ३ ॥ "
" त्रयोवेदस्य कर्तारः भण्डधूर्तनिशाचराः ॥ ४ ॥ "
" निहितस्य पशोर्यज्ञे स्वर्गप्राप्तिर्यदिष्यते ।
स्वपिता यजमानेन किंन्न तस्माद्धि हन्यते ? ॥ ५ ॥ " इ.

थोडक्यांत म्हणजे " देह हाचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ती पाखंड्याची " या तुकोक्तीप्रमाणें त्यांचीं मतें होती. आणि त्यांतही एखाद्या वचनांतून क्वचित् सत्याचा अंश नव्हता असेंहि नाहीं. पण त्यांचें तें वचन म्हणजे धीर गंभीर विचार करून किंवा सदयतेनें प्रेरित होऊन त्यांच्या मुखांतून बाहेर पडलें आहे असें नव्हें, तर केवळ जुन्या अथवा प्रचलित मतांची टर उडवायची, व सर्वच उधळून देऊन पशुवत् आचरणांत निमग्न व्हायचें ह्या हेतूनें त्यांनीं तें उच्चारलेलें आहे, आणि म्हणूनच त्याला त्या दृष्टीनें तितकी किंमत देतां येत नाहीं. अर्थात् केवळ शरीरसुखावर बसविलेल्या ह्या भारतवर्षीय एपिक्यूरसच्या मतांचा परिणाम नीतिभ्रष्टता हा झाला असें प्रो. मॅक्सम्युलरसाहेबही खालील आंग्लशब्दांत म्हणतातः—

" The chief character of the चार्वाक system was practical rather than metaphysical, teaching utilitarianism and crude hedonism in the most out-spoken way " ( P. 133 " Six Systems of Indian plilosophy"). साहजीकच 'प्रथम गोड पण अंतीं कडू' अशा ह्या मताचा टिकाव शेवटपर्यंत लागणें शक्यच नव्हतें. तेव्हां " असल्या विचारानें समाजाचें बंधन सुटणार हें पाहून तसल्याच विचाराचें निराळें रूप पुढें आलें. " ( वे. नि. पा. ३७ ) तेंच ' सांख्यमत ' होय. तेव्हां आतां ह्या सांख्यमताचा आपण जरा सविस्तर विचार करूं. कारण हें मत अत्यंत महत्त्वाचें व विचारी असून त्याचा पगडा भगवद्गीतेवर व महाभारतावर चांगलाच बसलेला आपणांस दिसणार आहे. असो.

याप्रमाणें सांख्यमताचा विचार करतां आपणांस प्रथम हें दिसून येतें कीं हें मत कांहीं अगदींच नवीन नसून त्यांची उपनिषदांसही थोडी बहुत माहिती किंवा कल्पना होती. उदाहरणार्थ ' श्वेताश्वतरोपनिषदां'त "नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् । तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यं ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥६।१३॥" असा सांख्ययोगाचा निर्देश केलेला आहे. तसाच दुसऱ्या किरकोळ ठिकाणींहि तो आहे. तसेंच मैत्रायणी उपनिषदांत ( ५–२ ) त्रिगुणांचा भाग आहे.

असो. असें जरी आहे तरी सांख्यतत्त्वज्ञान फार प्राचीन होय यांत शंका नाहीं. किंबहुना, सर्वांत जुनें तत्त्वज्ञान कपिलाचें आहे असें (शांति० अ० ३५०) यांत स्पष्ट सांगितलेलें आहे. तसेंच "सिद्धानां कपिलो मुनिः" ह्या भगवदुक्तींतही हाच अर्थ अभिप्रेत आहे. पण किती जरी जुनें झालें तरी उपनिषत्कालांतील वेदांतमतानंतरचें तें आहे हें उघड आहे. कारण " उपनिषत् सिद्धान्तांत एक तत्त्व प्रतिपादन केलेलें आहे; परंतु कपिलानें दोन तत्त्वें प्रतिपादन केलीं. असा येथून सांख्यांचा आणि वेदान्ताचा प्रारंभापासूनच विरोध उत्पन्न झाला. " ( म. उ. पा. ७६५ ). पण असें असूनही "कपिल हा विष्णु किंवा ईश, किंवा ब्रह्मा यांचाच अवतार आहे किंवा यांचीच विभूति आहे असें ( महाभारतानीं ) मानलें आहे. ( अर्थात् ) महाभारतकाळीं कपिलाविषयीं अत्यंत पुज्यबुद्धि होती असें यावरून स्पष्ट दिसतें." ( म. उ. पा. ७६४ ) भगवद्गीतेनेंही " सिद्धांना कपिलो मुनिः " म्हणजे " कपिल ही माझीच विभूति आहे असें तूं जाण " असेंच सांगितलें आहे. व तीच समजूत ज्ञानेश्वरापर्यंत कायम होती असें दिसतें. कारण ज्ञानेश्वर हाच भगवंतांचा अथवा महाभारताचा भाव सांगून " जयाचिये भाटिवेलागीं । मी कपिल जाहलों " तो " प्रकृति पुरुष विभागु । परिसें सांगों ॥ " असेंच ज्ञानेश्वरींच्या तेराव्या अध्यायांत म्हणत आहेत. पण इतकें म्हणूनही शेवटीं त्या द्वैती तत्त्वज्ञानाला अद्वैत तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें खालची पायरीच येतें हें ज्ञानेश्वरांच्या आणि म्हणूनच खुद्द भगवंतांच्या खालील उद्गारांवरून समजून येईल:—

" येऱ्हवीं आघवेचि आत्मा । हें सांगो जरी वीरोत्तमा । परी तुझिया मनोधर्मा । मिळेल ना ॥ म्हणोनि एकचि संचलें । चतुर्धा आम्ही केलें । जे अदळपण देखिलें । तुझिये प्रज्ञे ॥ पैं बाळ जैं जेवविजें । तैं घांसु विसाठायीं कीजे । तैसें एकचि हें चतुर्ध्याजें । कथिलें तुज ॥...आणि ऐसेनही पार्था । जरी हा अभिप्रावो तुज होता । नये तरी हे व्यवस्था । एकवेळ सांगो ॥ आतां चौठायीं न करूं । एकही म्हणोनि न सरूं । आत्मानात्मया धरूं । सरिसा पाडू ॥ " असें म्हणून ' प्रकृति पुरुषविभागु ' सांगण्यास भगवान् प्रवृत्त झाले आहेत. पण लहान बालकाच्या पुढ्यांत असलेल्या भाताचे २० भाग केले काय किंवा दोन भाग किंवा चार भाग केलें काय, ते करायचे म्हणजे सर्व भाताचा एकच

गोळा किंवा घांस त्याला घेववत नाहीं म्हणून करायचे. तसेंच तत्त्वज्ञानांतही आहे. ' प्रज्ञेचें अदळपण ' ज्यांचे ठायीं असतें त्यांच्यासाठीं ही 'विभागा'ची व्यवस्था करावी लागते. किंबहुना असेंच तत्त्ववेत्ते त्या एकाच ब्रह्माचे-" सर्वं खल्विदं ब्रह्म " अशा त्या सर्वत्र संचलेल्या व " अर्जुना जियेठायीं । न सरे द्वैताची वही । " अशा आद्यंतीं एकच-एक असलेल्या परब्रह्माचे—दोन,चार,असे 'विभाग' करीत असतात. केवळ सामान्य 'मनोधर्मास मिळणार नाहीं' म्हणूनच श्रीकृष्ण मातेला त्या ब्रह्मोदनाचे इतके घांस करावे लागले. कारण आपण सर्व ' बाळ ' आहोंत पण बाल्यावस्था ही कांहीं तत्त्वज्ञानांत श्रेष्ठावस्था नव्हे. म्हणजच त्यासाठीं केलेले विभाग हे खरे नव्हेत. आणि म्हणूनच खुद्द भगवंतांच्याच आधारें कपिलाचेंहि शास्त्र खालच्याच् पायरीचें होय असें आम्ही वर म्हटलें. असो. पण असें द्वैती तत्त्वज्ञान असूनही तें फारच उच्च प्रतीचें आहे हे त्याच्या खालील मतांवरून दिसून येणार आहे:—

" प्रकृति आणि पुरुष हे भिन्न आहेत हें त्यांचे पहिले ( मुख्य ) मत. प्रकृतिपुरुषांच्या भिन्नपणाच्या ज्ञानापासून मोक्ष होतो हें दुसरें. प्रकृतिपासून सर्व जडसृष्टि उत्पन्न झाली हें तिसरें, आणि हीं तत्त्वें चोवीस आहेत हें त्यांचें चौथें मत. सर्वसृष्टींत जें नानाप्रकारचें भिन्नत्व दिसतें त्याचें कारण त्रिगुण होत हें पाचवें मत. याप्रमाणें सांख्यांच्या मताचा विस्तार महाभारतकाळापर्यंत झालेला दिसतो " ( म. उ. पा. ७७३ ). भगवद्गीतेंतला अनुक्रम याहून थोडा भिन्न व उच्चप्रकारचा आहे. तो असा:—

जगतांत प्रकृति आणि पुरुष हे दोन ( अनादि ) पदार्थ आहेत आणि ते केव्हांहि एक होऊं शकत नाहींत, असें त्याचें पहिलें मुख्य मत होतें. शांतिपर्व अ. ३१८ यात हीच गोष्ट स्पष्ट सांगितली आहे. दुसरें मत म्हणजे पुरुष प्रकृतिहून भिन्न आहे एवढेंच नव्हे तर तो केवळ द्रष्टा आहे. त्याला कोणतेच प्रकृतिचे क्रिया किंवा गुण लागत नाहींत. पुढें "आत्म्याचें अमरत्व व निष्क्रियत्व हें कपिलाच्या मताचें तिसरें अंग होतें असें भगवद्गीतेवरून दिसतें. यांत सांख्यांचें व वेदांत्यांचें एक मत आहे. तसेंच गीतेंतील सांख्यांच्या मताची चौथी बाब म्हटली म्हणजे ज्ञान ही होय. पुरुष प्रकृतिहून निराळा आहे, सर्व क्रिया व सुखदुःख प्रकृतिच्या ठिकाणीं

आहेत असें ज्ञान पुरुषाला झालें म्हणजे पुरुषाला मोक्ष आहे, असा सांख्यांचा सिद्धान्त भगवद्गीतेंत स्पष्ट सांगितला आहे. हेंहि मत वेदान्तासारखेंच; मात्र ज्ञानाचा प्रकार निराळा. म्हणजे एकांत द्वैत ज्ञान व दुसऱ्यांत अद्वैत ज्ञान. ( शेवटीं ) सांख्यांचें पांचवें मत फार प्राचीन काळापासून त्रिगुणांचें होय. ( तेंहि गीतेंत आलें आहे. ) हे गुण प्रकृतीच्या ठिकाणीं असतात आणि पुरुष प्रकृतींत राहून प्रकृतिपासून उत्पन्न झालेल्या या गुणांचा उपभोग घेतो, असें गीतेच्या तेराव्या अध्यायांत सांगितलेलें आहे. " ( म. उ. :पा. ७६६–६७ ). असो. वरील विवेचनावरून वाचकांस सांख्यांच्या ठळक मतांची व तत्वांची सामान्य माहिती व त्यांच्या आणि वेदांत्यांच्या मतांतील ऐक्य व भिन्नपणा अथवा सादृश्य आणि वैसादृश्य हें लक्षांत आलेंच असेल. आतां " यं संन्यासमितिप्राहुर्योगं तं विद्धि पांडव " या भगवदुक्तींत सांख्यांचा आणि संन्यासाचा अभेद दाखविला आहे. परंतु संन्यासमार्गी लोक वेदांती असत, धर्मशास्त्राप्रमाणें संन्यास घेणारे लोक सांख्य नसत अशी कल्पना सुलभाजनक संवादावरून होते. धर्मध्वज जनक हा पंचशिखाचा ( सांख्यमताचार्यांपैकीं एकाचा ) शिष्य असून त्यानें संन्यास घेतला नव्हता व संन्यास न घेतां राज्य करीत असतांही त्याचें नैष्कर्म्य कायम होतें असें त्यानें—" त्रिदंडादिषु यद्यस्ति मोक्षो ज्ञानेन कस्यचित् । छत्रादिषु कथं न स्यात्तुल्यहेतौ परिग्रहे ॥ " ( शां. अ. ३२०–४२ )–ह्यांत म्हटलें आहे. पण सुलभेनें या मताचें खंडन करून संसारत्यागाशिवाय मोक्ष नाहीं, संन्यास घेतल्याशिवाय खटाटोप अर्थात् मनाची व्यग्रता बंद होणें शक्य नाहीं, असें सांगितलें आहे. ती स्वतः यतिधर्म पाळणारी होती. यावरून भगवद्गीतेच्या काळीं सांख्य हे जरी वैदिक मार्गीच संन्यासी होते असें मानलें—( पण तसेंच मानण्याचें कारण नाहीं हें आम्ही पुढें दाखविणार आहोंत )—तरी महाभारतकाळीं सांख्यमत संन्यास अथवा वेदांतमताहून भिन्नच होतें. अर्थातच हळुहळूं पुढें त्यांचा पूर्ण विरोध येऊन बादरायणाच्या वेदान्तसूत्राच्यावेळीं सांख्यांचें खंडनच वेदांत्यांस करावें लागलें " ( म. उ. पा. ७७४ ) हें उघड आहे. दुसरीही एक गोम अथवा कमीपणा ह्यांत–ह्या सांख्यमतांत होता व तो म्हणजे त्यांचें अनीश्वरवादित्व होय. प्रकृतिहून भिन्न असणारा पुरुष तोच

ईश्वर होय—" जीवोब्रह्मैवनापरः "—हें त्यांनीं ठरविलें नाहीं. प्रकृतिला लटकी मानून केवळ एकाच परब्रह्माचें अद्वैतीं प्रतिपादन तर त्यांत नाहींच. उलट " प्रकृतिं पुरुषं चैव विद्धयनादि उभावपि " ह्याप्रमाणें दोन्हीही गोष्टी खऱ्याच आहेत असें द्वैतमतच त्यांत स्पष्ट आहे—पण त्या द्वैतमतांतहीं पुढील रामानुजमध्वादिकांप्रमाणें ईश्वर मानला नाहीं हीच त्यांची मोठी गोम अथवा चूक आहे. " सांख्यमताप्रमाणें हा पुरुष ईश्वर आहे हें त्यांनीं ठरविलें नाहीं...सांख्य प्रारंभापासूनच निरीश्वरवादी असावेत असें महाभारतांतील कित्येक वचनांवरून दिसतें. शांतिपर्व अध्याय ३०० यांत प्रारंभीं योग आणि सांख्य यांच्यांतील मतभेद सांगतांना असें म्हटलें आहे कीं, " योगमतवादी आपल्या पक्षाबद्दल असें कारण पुढें आणतात कीं, जगाला ईश्वर म्हणून कोणी असलाच पाहिजे. त्याशिवाय जीवाला मुक्ति कशी मिळेल ? पण सांख्यमतापैकीं पूर्ण विचार करणारे ब्राह्मण आपल्या मताच्या पुष्टयर्थ असें म्हणतात कीं, जीवाच्या ठिकाणीं विषयांबद्दल वैराग्य बाणलें असतां देहत्यागानंतर तो उघडच मुक्तीला जातो. त्याला दुसरा मार्ग नाहीं. " येथील मूळांतलें संस्कृत श्लोक असे आहेतः—

" सांख्याः सांख्यं प्रशंसंति योगा योगं द्विजातयः । अनीश्वरः कथं मुच्येत् इत्येवं शत्रुकर्दन ॥ ३ ॥ विज्ञायेह गतीः सर्वा विरक्तो विषयेषु यः । ऊर्ध्वं स देहात्सुव्यक्तं विमुच्योदिति नान्यथा ॥ ५ ॥ " असो. याप्रमाणें उभयपक्षाचा मतभेद येथें सांगितलेला आहे. अर्थात् सांख्य निरीश्वरवादी आहेत ही गोष्ट महाभारतकाळींही सिद्ध होती. बहुधा कपिलानें पुरुषाशिवाय निराळा ईश्वर मानलेला नाहीं असें दिसतें. " (म. उ. पा. ७६५–६६ ). पण केवळ त्याच्या इतर उदात्त तत्त्वज्ञानामुळें त्याच्याविषयीं साहजीकच अत्यंत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली व म्हणूनच त्यास प्रत्यक्ष ईश्वरावतार मानण्यापर्यंत व प्रत्येक ठिकाणीं त्याच्या तत्त्वज्ञानांस आस्तिक तत्त्वज्ञानांत जागा देण्यापर्यंत महाभारताची मजल गेलेली आहे. किंबहुना, महाभारताच्या ( १२–१२–६७ ) येथें " सांख्यासारखें शास्त्र नाहीं " असें प्रशंसापर निघालेले उद्गारही सांख्यांची छाप त्याकाळीं किती बसली होती हेंच दाखवितात. अशी छाप सर्वच मोठ्या तत्त्ववेत्त्यांची त्या त्या काळीं बसत असते, व त्यांतही सर्व समाज हदरून सोडणारा एखादा तसाच महात्मा प्रकट झाल्यास, " यद्यद्विभूतिमत्सत्वं

श्रीमदूर्जितमेव वा। तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंशसंभवम्॥'' या भगवद्वचनाप्रमाणें त्या व्यक्तीस समाज 'ईश्वरावतार' म्हणून डोक्यावर घेऊन नाचूं लागतो. पण ह्यांत हिंदुधर्माचें उदारमतवादित्व व व्यापक स्वरूपच दृष्टीस पडतें. अत्यंत घेण्यासारखी गोष्ट सांगणारा प्रत्यक्ष शत्रू असला तरी त्यालाही मान देण्याची, प्रसंगीं त्यास देवसुद्धां मानण्याची त्याची तयारी असतें. कारण श्रीयुत अच्युतराव कोल्हटकर यांनीं सर्वधर्मपरिषद नामक एक श्रुतिबोधाचा संक्रांतीचा अंक काढला होता त्यांत त्यानीं म्हटल्याप्रमाणें, "हिंदुधर्म हा व्यक्तीचा नाहीं, तर तत्त्वांचा आहे. प्रामाणिकपणें प्रतिपादिलेल्या सर्व तत्त्वांचा त्यांत समावेश झाला आहे." कारण भगवद्गीतेंतच असणाऱ्या व तेथून सुरूं झालेल्या "संभवामि युगे युगे" ह्या अवतार कल्पनेप्रमाणें महाभारताच्या शांतिपर्व अ. ३३९ यांत दिलेल्या दशावतारांत महात्मा गौतमाची गणना नाहीं. या नारायणीयाख्यानांत "हंसः कूर्मश्च मत्स्यश्च प्रादुर्भावा द्विजोत्तम। वराहो नारसिंहश्च वामनो राम एव च॥ रामोदाशरथिश्चैव सात्वतो कल्किरेवच॥" हे दहा अवतार दिले आहेत. पण "या दहा अवतारांत बुद्धाचा प्रवेश नाहीं...हल्लीं लोकांत प्रसिद्ध असलेले अवतार बहुतेक हेच असून प्रारंभीं हंस आहे तो मात्र निराळा आहे आणि त्याच्याऐवजीं नववा बुद्ध झाला आहे." (म. उ. पा. ८०९). तेव्हां असें हें चालायचेंच. पण अवतार झाला म्हणून त्याचें सर्वच सांगणें खरें, असला दुराग्रह हिंदुधर्मांत नाहीं. तो जो अवतार मानला जातो तो त्याच्या मतांतील ग्राह्यांशासाठीं व त्यांनीं बजावलेल्या अलौकिक व उदात्त कामगिरीसाठीं होय, हें उघड आहे. आणि म्हणूनच बुद्धास प्रथम अवतार मानणाऱ्या देशांतच त्याच्या मतांची फार दिवस चलती न होतां शेवटीं त्यास हिमालयाच्या पलीकडे हांकलून देण्यांत आलें. तेंच भगवान श्रीकृष्णाची उपासना आज हजारो वर्षें या आर्यावर्तांतील सर्व आबालवृद्ध व आचांडाल जनता करीत असून त्याच्या 'गोड' गोविंद नामांत तल्लीन होऊन राहिली आहे. "आणि यापुढेंहि भगवद्गीतेच्या दिव्य उपदेशानें मोहित होऊन" ती त्यास तशीच पूजित राहणार ह्यांतही तिळमात्र शंका नाहीं. हें असें कां झालें, बुद्धाचा पराजय कां झाला व श्रीकृष्णाची महतीच कां टिकून राहिली, इत्यादि हकीकत पुढें ओघाओघानें येणारच आहे. प्रस्तुत सांगण्याचा मुद्दा एवढाच कीं, ह्या-

प्रमाणें प्रत्यक्ष ईश्वरावतार मानलें किंवा त्याच्या उदात्त तत्त्वज्ञानाची छाप कांहीं काळ जनतेवर बसली तरी त्यांत—त्या तत्वज्ञानांत—जर एखादें मोठें व्यंग असलें तर तें मत सदा विजयी राहणें केव्हांच शक्य नाहीं. त्याला तशीच अलौकिक प्रतिभा, हतोटी, व शहामत लागत असते. ती सर्वांतच नसते. म्हणून व्यक्तिनिष्ठ नसून तत्वनिष्ठ असलेला आमचा समाज व धर्म ग्राह्यांश असेल तेवढा घेऊन त्यास आत्मसात् करील व त्याज्यांश उकिरड्यांवर फेंकून देईल ! खुद्द कपिलाच्या अथवा सांख्यांच्या बाबतींत तेंच झालें. तें कसें झालें तें आतां आपण पाहूं.

वर सांगितलेंच आहे कीं, सांख्यांचे निरीश्वरवादित्व ही एक त्यांच्या मतांत मोठी गोम अथवा चूक होती म्हणून. आणि हीच चूक त्यांना पुढें भोंवली आहे. कारण " यापुढें सांख्यांचे जे सिद्धांत झाले त्यांचें वेदांत्यांनीं नेहमीं खंडनच केलेलें आहे. महाभारतानंतर भारती—आर्य—आस्तिक तत्त्वज्ञानांत सांख्यास जागा मिळाली नाहीं. त्यांचें मत निरीश्वर असल्यानें हा प्रकार साहजिक झाला. या दोषाच्या परिहारासाठीं सांख्यसूत्रें अर्वाचीन काळीं तयार झालीं. त्यांत सांख्यांस सेश्वर बनविलें आहे हें प्रसिद्ध आहे. " ( म. उ. पा. ७७३ ) असा हा इतिहास आहे. आणि तरीही आमचे श्रीयुत तात्या नेमिनाथ पांगळ आपल्या ' जैनधर्म ' नामक पुस्तकाच्या ४१ ते ४३ पानापर्यंत " कपिलासारख्यांनीं आमच्याप्रमाणेंच ईश्वर मानला नाहीं; मग त्यांना तुम्ही नास्तिक म्हणत नाहीं. आणि आम्हांलाच कां म्हणतां ? " असा अट्टाहास चालविला आहे. पण " सांख्या निरीश्वराः केचित् " यावरून कपिलास निरीश्वरवादीही मानलें आहे हें तेच कबूल करतात. मग निरीश्वरवादी व नास्तिक ह्यांत कांहीं अंतर आहे कीं काय ? अर्थात कपिल ज्या अर्थानें नास्तिक गणला गेला त्याच अर्थानें जैनही नास्तिक गणले जावेत ह्यांत काय आश्चर्य ? आणि ह्यांत 'पक्षपात' तरी कसला ? असो. मतांचाच विचार करतां कपिलांचें मत जैनाप्रमाणेंच होतें, अथवा खरें म्हणजे जैनांचें कपिलाप्रमाणें होतें. कारण ऐतिहासिक अनुक्रमाप्रमाणें पाहिल्यास " युगादि नायक जैनतीर्थंकर भगवान ऋषभदेव यांनीं जी सृष्टिकर्तृत्वमीमांसा केली तिचाच अनुवाद कपिलानें केलेला आहे " ( जैन धर्म पा. ४३ ) असें नसून कपिलमताचा अनुवादच ऋषभदेवांनीं केला हें उघड आहे. दुसरी एक चूक

रा. पांगळांनीं केली आहे व ती म्हणजे, " कपिलादिक ब्राह्मणधर्मप्रति-पादक महर्षींचें मत म्हणजेच हिंदुधर्म " अशी त्यांची वेडगळ समजूत झालेली दिसते. ( " जैनधर्म " पान ४१ पहा ). तेव्हां हिंदुधर्मही ईश्वरास सृष्टीचा विधाता मानीत नाहीं म्हणून तोही नास्तिकच म्हटला पाहिजे असा त्यांचा म्हणण्याचा रोख. पण ही त्यांची चूक आहे. हिंदु-धर्मांत निरनिराळ्या प्रकारचे तत्त्ववेत्ते निरनिराळीं मतें प्रतिपादून गेले; पण त्यांतून कोणची मतें टिकून राहिलीं, कोणच्या मतांचा अखेर विजय झाला हें पाहिले पाहिजे, व त्यावरूनच हिंदुधर्म कोणचा हें ठरविलें पाहिजे, हें उघड आहे. पण एवढी साधीही गोष्ट त्यांस न दिसून ते भलत्याच भ्रमाच्या रानांत शिरले आहेत. यासाठीं त्यांनीं पुन्हां एकदां अधिक आस्थापूर्वक हिंदुधर्माचा अभ्यास करावा म्हणजे त्यांस सर्व गोष्टी नीट कळून येतील अशी आमची त्यांस प्रेमाची सूचना आहे. इथें आम्ही त्यांस इतकेंच सांगतों कीं, हिंदुधर्म हा नास्तिक नसून पूर्ण आस्तिक आहे. असो. तेव्हां सांगण्याचा भाग असा कीं, कपिल हा नास्तिक होता, व हेंच त्याचें मत त्याला पुढें नडलेलें आहे. " ईश्वरासिद्धेः । " ( सांख्य० अ. १ सूत्र ९२ ) किंवा "प्रमाणाभावान्न तत्सिद्धिः । " (सांख्य० ५–१०) असल्याप्रकारानें कपिल ईश्वर मानीत नाहीं. प्रत्यक्ष आणि अनुमान एवढीं दोनच प्रमाणें सत्यज्ञानप्राप्तीचीं साधनें होत अशी त्याची समजूत आहे तीच चूक आहे. अॅडेलंगसाहेब हा कपिलाचा नास्तिकपणा खालील शब्दांत स्पष्ट करतातः—

"The system of Kapila leads directly to fatalism and mediately to atheism......Kapila denies the existence of God who governs the World. He argues that there is no proof of one by simple perception; nor to be de-duced from sensation by inference or induction, the only means he admits of obatining true knowledge," etc. ( P. 154 Historical Sketch of Sanskrit Literature. From German by Adelung ). असो. पण सांख्यांनाही शेवटीं अर्धवट ऐक्याची कबूली द्यावी लागली. " असे हे आत्मे अनेक आहेत, व ते एकाचेच अंश आहेत, येवढ्या गोष्टीला कबुली देऊन पुढें सांख्य गप्प

बसतात. या नानात्वाचें मूळ वेद प्रामाण्य धरून ओळखावें असें अर्धवट बोलून सांख्य एकत्वाची टाळाटाळ करतात. " ( वे. नि. पा. ३८ ) यावरून त्या ऐक्याचा अंधुक प्रकाश त्यांच्या हृदयावर पडत चालला होता असें दिसते. प्राणापानादि पंच प्राणांच्यावरून डेव्हिडसाहेब म्हणतात:— "These inventions denote that Kapila had a dim idea or perception of the fact that there are vital forces at work in the human system more subtle than inanimate matter." etc. असो. पण एकंदरींत ईश्वराची टाळाटाळच सांख्यांनीं केली आहे. "त्या ईश्वराला पुढें आणल्यावांचून चालण्यासारखें आहे. मग उगीच त्याबद्दल वाद करण्यांत वेळ कां घालवितां अशी सांख्याची एक कोटी आहे " ( वे. नि. पा. ३८ ) पण ती अर्थात् उपनिषदांचें व वेदांताचे उच्चतत्वज्ञान न समजणाऱ्या, पण त्याजबरोबर जुन्या कर्मकांडाच्या कटकटीस कंटाळलेल्या, व म्हणूनच वेदवेदांतास पार झुगारून देऊन 'crude hedonism' शिकवणाऱ्या चार्वाकामागें जाणाऱ्या जनतेस चुचकारून ताळ्यावर आणण्यासाठीं होय. अर्थात् कांहीं त्यांच्या तंत्रानें तर कांहीं आपलें असें तडजोडीचें धोरण त्यांनीं स्वीकारलें. "ईश्वरावांचून रोजचा व्यवहार अडत नाहीं. तेव्हां त्याचा वादच सोडून द्या." पण पुरुषप्रकृति तर मानाल ? "ईश्वर नाहीं म्हणण्यांतच काय अधिक आहे ? प्रत्यक्ष आणि अनुमान ही प्रमाणें कबूल आहेत, त्यांच्या कसोटीला उतरेल तेवढें घेण्याला तर कांहीं हरकत नाहीं ? ......व्यवहारांत देवावांचून अडत नाहीं तरीं त्या समजुतीला समूळ फांटा देऊं नका, आपण करूं ते होण्यासारखें आहे, मग असला अनीतीचा पाया कां घालतां ? " अशाप्रकारची ही तडजोडीची भाषा सांख्यांनीं वापरली व ती त्यावेळेस योग्यच होती. "लोकांना आळा घालण्याकरतां केलेल्या प्रयत्नांत कपिल म्हणा किंवा हे सांख्यमतवाले म्हणा, ह्यांनीं मोटा दूरदर्शीपणा दाखविला " ( वे. नि. ३८ ) ह्यांत कांहीं शंका नाहीं. आणि म्हणूनच "हें मत कांहीं वेळ पटलें असावें. परंतु ( शेवटीं ) ह्यांत ईश्वराची हेळसांडच असल्यामुळें लोकांचें अखेरीस समाधान होईना. पूजन करण्याची इच्छा मनुष्याला स्वाभाविक असते. विशेष विचाराशिवाय ह्याच्यापुढें गति जात नाहीं. ह्याकारणानें सेश्वरसांख्य

किंवा योगमार्ग निघाला. " ( वे. नि. ४० ) अशा रीतीनें सांख्यमतास उतरती कळा लागली. थोडक्यांत म्हणजे " देवाची, सगुणदेवाची भक्ति, पूजा वगैरे ज्यांत नाहीं तो धर्म साधारण जनानां कायमचा मान्य होत नाहीं हें तत्त्व बहुतेक ठरल्यासारखें झालें आहे. " ( वे. नि. ७९ ) हें जें श्रीयुत फडके बौद्धधर्मासंबंधीं पुढें म्हणतात तें सांख्यमतासही येथें लागूं पडण्यासारखें आहे. तेव्हां आतां " सेश्वरसांख्य किंवा योगमार्ग " कडे आतां आपणांस वळलें पाहिजे. पण तत्पूर्वी ह्या निरीश्वर सांख्यासंबंधी एक शेवटची महत्त्वाची गोष्ट सांगून आपण त्यांची रजा घेऊं.

" वेदांतील यज्ञयागादिकांत होणाऱ्या अनागस प्राण्यांच्या हत्येकडे वाचकांनीं लक्ष द्यावें; कारण ह्यामुळेंच त्या वेदांवर पुढें उपनिषदादिकांचे हल्ले चढलेले आहेत " असें आम्ही मागें सांगितलेले वाचकांस आठवत असेलच. त्यानंतर उपनिषदांनीं स्वर्गपर अशा कामात्म्यांची कशी हाजिरी घेतली तें आम्ही मागें दिलेंच आहे.भगवद्गीतेचे त्याबाबतींतले उतारेही आम्ही तिथेंच वाचकांस सादर केले आहेत. गौतमाच्या हल्ल्याची सामान्यरूपरेषाही उपनिषद, गीता, व बौद्धधर्म ह्या एकाच विचारसागराच्या तीन विविध लाटा कशा आहेत हें सांगताना दिलीच आहे. त्यानंतर त्यापैकीं प्रत्येकाच्या स्वतंत्रविचाराकडे वळून उपनिषदांचें म्हणणें आम्ही सांगितलें व नंतर गीतेकडे व गौतमाकडे वळण्यापूर्वी त्याचसुमारास चालू असणाऱ्या महत्त्वाच्या मतांचा प्रथम थोडासा वाचकांस परिचय करून देण्याचें ठरवून त्याप्रमाणें आम्ही चार्वाक व सांख्यमत येथवर सांगितलें. पैकीं चार्वाकानें वेदांविरुद्ध, तत्कर्त्या ब्राह्मणांविरुद्ध, यज्ञयागांविरुद्ध व खुद्द ब्रह्मज्ञानाविरुद्ध कशी बंडाळी माजविली होती व " असलीं मतें जेव्हां निघाली तेव्हां वैदिक आणि वेदांती सगळ्यांचीच गडबड" कशी "उडाली" (वे नि. ३६) हें आपण मागें पाहिलेंच आहे.संगमावर जाऊन क्षणांत बाप्तिस्मा घेऊन ख्रिस्ती होऊन लगेच प्रायश्चित्तानें परत हिंदुधर्मांत येऊन दोहोंच्याहि बाह्य संस्कारांत कांहींच अर्थ नाहीं हें दोघांच्याहि नाकावर टिच्चून सांगणाऱ्या रा.गोपाळराव जोशांचाच हा कांहींसा प्रकार,पण त्यांतही सत्य नव्हतें असें नाहीं. उदाहरणार्थ, "स्वर्गाकरतां तुम्ही यज्ञ करतांना ? आणि यज्ञांत मारलेल्या पशूला स्वर्ग मिळतोना ? तर मग " स्वपिता यजमानेन किन्न तस्माद्धि हन्यते ? " ह्या चार्वाकाच्या सडेतोड प्रश्नास कोण काय

उत्तर देणार ? अर्थात् वैदिक गडबडले यांत कांहीं नवल नाहीं. कारण ' सबसे जीव प्यारा. ' पण तितकाच तो त्या बापड्या गरीब पशूलाही प्यारा नाहीं काय ? मग त्याची हत्या करणें हा निर्दयपणा नव्हे काय ? हा ह्यांत गर्भित अर्थ आहे. एवढेंच कीं तो चारगट लोकांच्या तोंडून आला आहे. पण हीच विचारसरणी पुढें कपिलांनीं व बुद्धांनीं स्वीकारली आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तेव्हां वेदांच्या ह्या हिंसाप्रधानत्वाबद्दल " नास्ति को वेदनिंदकः ? " ही रा. पांगळांची कोटी ( जैन धर्म पा. ४८ ) योग्यच आहे. कारण उपनिषदांपासून आजतागायत तेंच व्रत सर्व तत्ववेत्त्यांनीं व साधुसंतांनीं छातीठोक उदात्तपणानें धरलें आहे. " यज्ञयागाचा काल निदान पूर्वकालीं होता तसा पुन्हां येणें शक्य दिसत नाहीं. त्या कर्मठपणाला डावेपणा आला होता, तो ह्या मराठी कवींनीं बहुतेक संपुष्टांत आणला आणि त्याची डाळ पुन्हां केव्हांही शिजूं नये अशी तजवीज केली. " ( वे. नि. ७४ ) असें रा. फडके आपल्या मराठी भाषेच्या व साधुसंतांच्या कामगिरीच्या अखेरीस म्हणतात तें खरें आहे. तेव्हां सांगण्याचा भाग असा कीं, ह्या वेदाविरुद्ध हल्ल्यांत कपिलानेंहि आपला भाग घेतला असून " शांतिपर्व अ. २६८ यांत गाईचा व कपिलाचा संवाद कल्पिलेला आहे. प्राचीन वेदविहीन ( विहित ? ) यज्ञांत गवालंभ होत असे, तेव्हां ब्रह्मनिष्ठा संपादन करणाऱ्या व सत्ययुक्त बुद्धीचा लाभ झालेल्या कपिलाला राग येऊन " आहारे वेद ! " असें तो म्हणाला आणि हिंसायुक्त धर्माला प्रामाण्य नाहीं असें त्याचें स्पष्ट मत त्यानें सांगितलें. ( भाषांतर पु. ६ पान ५६३ ) अर्थात् वेदाविरुद्ध कपिलाचें मत... असलें पाहिजे ही गोष्ट आपल्यास ( येथें ) स्पष्टपणें दिसते. " ( म. उ. पा. ७६४–५ ). असो.

आतां आपण योगाकडे वळूं. हा योगमार्ग निघण्याचें कारण वर रा. फडके यांच्या शब्दांत दिलेंच आहे. पण " ह्या कारणानें सेश्वरसांख्य किंवा योगमार्ग निघाला " ( वे. नि. ४० ) या त्यांच्या वाक्यावरून दोन्हीं मार्गांत फरक फक्त ईश्वर मानण्यांत आहे, बाकी दोन्ही मार्ग एकच आहेत अशी त्यांची समजूत आहेसें दिसतें. पण हा फरक केवळ ईश्वर मानण्यापुरताच नसून इतरही कित्येक बाबतींत तो आहे, हें लक्षांत ठेविलें

पाहिजे. यासंबंधांत अमेरिकेच्या हॉप्किन्ससाहेबांचे खालील उद्गार वाचनीय आहेत. ते म्हणतात:—

" The distinctive mark of the Yoga ( Gita 3, 3 ) is, if we translate it in the natural original sense, application to work as opposed to application to understanding; in other words, the Yoga laid stress on religious practice, the Sankhya on knowledge. Both the systems could be regarded as identical only by insisting on the objective of each. Both systems gave emancipation, therefore they were one. But one was that of pure science or knowledge, the other was that of pious work ( Yoga, tapas ) added to this science, a practical divergence that existed quite apart from the question whether the goal was really the same.........They could not unite, for the true Sankhya did not teach Brahmanism but Kevalatwam or absolute seperation of the individual spirit from everything else, an अस्तित्वम् केवलम् or existence apart from all, not apart in ब्रह्मन्. "

" The epic itself teaches that the greatest difference between the two systems is that the Sankhya does not believe in a personal God while God is the supreme belief of the Yogin.......There is the practical difference between the austerities of the two systems. It cannot be supposed that the "knowledge-philosopher " admitted as much tapas as did the Yogin, whose practical discipline was almost wholly a " razor-edged path " of austerity ( Compare XII 221, 4 and XII 233, 23 ). The difference between

"the Sankhya and Yoga" as admitted and explained in the late passage XII 237,29ff is mainly a practica one, in that " the सांख्य keeps aloof from objects o sense, controls the senses, and is alike to all creatures friendly to all, indifferent to all things . ( सर्वभूतसुहृन्मैत्र समलोष्टाश्मकांचनः a standing epithet ), injures no creature and so attains Brahman " whereas the Yogin i released "who, transcending supernatural power cease ( from activity )." The Yoga is deseribed in one verse " योगैश्वर्यमतिक्रान्तो यो निष्क्रामति मुच्यते" 237,40. असो. वरील उताऱ्याचें तात्पर्य इतकेंच आहे कीं, सांख्य हे अनीश्वरवादी असून केवळ ज्ञानानें—आत्म्याच्या स्वतंत्रतेच्या अथवा अलिप्ततेच्या ज्ञानानें व थोड्याबहुत तपानें निष्क्रिय राहून मुक्त होऊं पाहतात तर योगी परमेश्वर मानून त्याच्या ध्यानांत गुंगण्यासाठीं सर्वैश्वर्याच्या पलिकडे जाऊन प्रत्यक्ष खडतर योगसाधन करीत असतात, असा हा दुहेरी किंवा तिहेरी फरक आहे. अजून एक फरक म्हणजे " समाधीचा अभ्यास करण्याला जातिनिर्बंध आड येत नाहीं. वर्णाश्रम भेदाची, स्त्री शुद्र वगैरे अधिकाराची त्यांत पंचाईत नाहीं. ब्राह्मणाच्या वर्चस्वाला ह्यांत प्रतिष्ठा नाहीं. गायत्रीमंत्रानें सगर्भ प्राणायाम अधिकार असल्यास करा, किंवा एरवीं अमंत्रक प्राणायाम करण्यांतही कांहीं गौणपणा नाहीं. योगाच्या यमनियमादि अष्टांगांत यज्ञाची, नित्य-नैमित्तिक कर्माची, ज्ञानाची, कशाचीच उठाठेव नाहीं." (वे. नि. ४०) पण " ह्यांतही ब्राह्मणांनीं आपला पाय पुढें ढकललाच. संन्यास घेण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणांनाच आहे, हा निर्बंध कायम राहिला. " ( वे. नि. ४०).हॉप्किन्स साहेबांनींही 'low castes' ना हा योग शिकवितां येतो, पण त्याची बौद्धिक शाखा फक्त उच्चवर्णाच्या स्नातकांनाच शिकवावी असा स्पष्ट निर्बंध असल्याचें लिहिलें आहे. असो.

या योगमार्गाची आत्मिक उन्नतीची मूलभूत उपपत्ति व त्याचे कांहीं नियम वगैरे आपण थोडक्यांत पाहूं. " दुःखाचा परिहार होण्याची एकच युक्ति म्हणजे इच्छांचा नाश करणें होय. एका इंग्रजी ग्रंथकारानें म्हटल्या-प्रमाणें इच्छेची दोरी तोडून टाकली म्हणजे आत्म्याचें विमान आकाशांत

चढेल !...योग सिद्धान्ताचा मुख्य मुद्दा हाच आहे....मन जर आपल्या इच्छांपासून परावृत्त होईल, अर्थात् तें जर स्वस्थ बसेल तर आत्मा आपल्या संपूर्ण तेजानें प्रकाशेल. योगावरील पतंजलीच्या सूत्रांचें पहिलें सूत्र, योग म्हणजे मनाचें स्वस्थ बसविणें, असें आहे. * हें कर्म फार कठिण आहे आणि योगतत्वज्ञानाचा प्रयत्न यमनियमासनादि सांगून त्याकडेच आहे." (म. उ. पा. ७३४). "अर्थात् समाधींत ध्यान परमेश्वराचें करावें असेंच न्यूप्लेटोनिस्टसप्रमाणें त्यांचेहि मत आहे." (म. उ. पा. ७३५). "याशिवाय नीतिपालन, अहिंसाव्रत, शक्य तितकें विनिद्रत्व हेंही त्यांनीं पाळलें पाहिजे. याप्रमाणें यमनियम पाळून, विकल्परहित स्वस्थ व सत्त्वस्थ मनानें व अंतर्मुख इंद्रियें करून काष्ठलोष्ठाप्रमाणें योगी बसला असतां 'जसा मेघांमध्यें एकदम विजेचा प्रकाश पडतो त्याप्रमाणें एकदम प्रकाश पडेल व त्या ज्योतिच्या ध्यानाचीच बळकटी साधण्याचा यत्न करतां करतां योग्यास अखेर मोक्ष प्राप्त होईल." (म. उ.पा. ७३६, ७३५)ह्या सर्व सांगण्याचें सारांशरूप प्रतिबिंब खालील 'भीष्मस्तवराजां'तील श्लोकांत पडलें आहेः—

"यं विनिद्रा जितश्वासाः सत्त्वस्थाः संयतेंद्रियाः। ज्योतिः पश्यंति युञ्जानाः तस्मै योगात्मने नमः ॥"— असो.

पण ही झाली पुष्कळशी हटयोगाची स्थिती. याहून वरच्या दर्जाचा व म्हणूनच शेवटीं सर्वांत खरा असा राजयोगच होय. आणि आचार्यांच्या अपरोक्षानुभूतिमध्यें राजयोगाच्या दिलेल्या व्याख्यांतून खालील वेंचक व्याख्या वाचकांनीं वाचल्यावर त्यांचीही आमच्याप्रमाणेंच या बाबतींत खात्री पटेल. ऐका आचार्य काय म्हणतात तेंः—

"आदावंतेच मध्ये च जनो यस्मिन्न विद्यते। येनेदं सततं व्याप्तं स देशो विजनः स्मृतः॥ दृष्टीं ज्ञानमयीं कृत्वा पश्येद्ब्रह्ममयं जगत्। सा दृष्टिः परमोदारा न नासाग्रावलोकिनी॥ निषेधनं प्रपंचस्य रेचकाख्यः समीरणः।

---

* टीपः—[ "अर्जुना समत्वचित्ताचें। तेंचि सार जाण योगाचें"
—ज्ञानेश्वर.

"मन हें चंचल झालें एकाठायीं। तया उणें काई निजसुखा?॥" असें तुकोबाही म्हणतात.]

अहमेवास्मीति या वृत्तिः पूरको वायुरीरितः ॥ ततस्तदवृत्तिनैश्चल्यं कुंभकः प्राणसंयमः ॥ यत्रयत्र मनो याति ब्रह्मणस्तत्र दर्शनं । मनसो धारणं चैव धारणा सा परा मता ॥ " इ. हीं आचार्यांचीं वचनें संस्कृत असूनही सामान्य जनांस कळतील इतक्या तीं सोप्या भाषेंत लिहिलीं आहेत. असो.

याशिवाय " Yoga as Deistic and Bramhaistic " ह्या ' हेडिंग ' खालीं हॉप्किन्स साहेबांनीं, ' बल, ऐश्वर्य, प्रभुत्व, अदभुत-शक्तिमत्व यासाठीं झटणाऱ्या पूर्वीच्या " one-leg " म्हणजे एका पायावर तपाचरण करणाऱ्या योग्यांचा व तदनंतर ह्याच वस्तूंच्या आधारें सायुज्यसोपान चढून जाऊन केवळ ब्रह्माची इच्छा करणाऱ्या अलीकडील अथवा उत्तरकालीन योग्यांचा उल्लेख करून, दोघेही ' अपुनर्भवकाम' असले तरी एक वरील विविध मोहिनींच्या संसृतिपाशांत झपाटला जाई तर दुसरा " योगैश्वर्यमतिक्रान्तो " ह्या वर दिलेल्या श्लोकांत म्हटल्या-प्रमाणें त्याचा गोष्टींच्या पायऱ्या करून ब्रह्मांत विलीन होण्याची इच्छा धरी यावरून उघडच "The Brahmaistic Yogi is an advance on the deistic Yogi " म्हणजे दुसऱ्या योग्याची पायरी पाहिल्याच्या पुढची आहे असा निष्कर्ष सांगितला आहे, तो बरोबर आहे.

पण ह्याही मताची विशेष चलती होऊं शकेना. कारण राजयोग बोलायला सोपा असला तरी तो ज्ञानयोगाइतकाच काठिण आहे, व " वाचा वदे परी करणें कठिण । इंद्रिया आधीन झालों देवा ! " असेंच उद्गार बहुतेकांना बहुत काळ काढावे लागतात. आणि मन व इंद्रियें हीं सामान्य हटयोग्यासही किती जेरीस आणीत असतात हें त्यांचें त्यांसच ठाऊक ! पण ही अंतरसृष्टिची तरी गोष्ट आहे. पण बाह्यसृष्टींतला योगाच्या अष्टांगांचा काय थोडाथोडका खटाटोप आहे ! त्या गोष्टी बोलायला सोप्या आहेत; पण प्रत्यक्ष तो मार्ग " क्षुरस्य धारा " प्रमाणें " निशित " च आहे ! आणि अशीही ' सुळावरची पोळी ' सगळ्यांनाच कशी खातां येणार ? असला कंटकपणा सगळ्यानाच कुठला येणार ? देहपीडनाचें व अभ्यासाचें कष्ट देहाला होऊं लागले ते सामान्य लोकांना झेंपणें शक्य नव्हतें. याशिवाय नुकतीच वर सांगितलेली योगैश्वर्यांच्या झपाटण्याची स्थितीही कायमचें सुख देणें शक्यच नव्हतें. रा. फडके म्हणतात, " अष्ट-

सिद्धींच्या पाठीस लागतांना प्रथम बरें वाटलें. योगसामर्थ्याचा उपयोग संसार वाढाविण्याकडे होऊं लागला. अद्वैतमार्गाची जी शांति, व समाधान-वृत्ति ती एका बाजूस राहिली." ( वे नि. ४० ) याशिवाय, " त्या मार्गांतल्या लोकांच्या देखरेखीखालीं अभ्यास करावयाचें सोडून कांहीं लोकांनीं अडदांडपणा केला, त्याचा परिणाम वाईट झाला. कष्ट करून खात्रीनें यशप्राप्ति होते असा नेम लागेना." ( वे. वि. ४० ) याप्रमाणें विविधकारणांनीं या मताची चलती—त्यांत सर्वजातींचा, व सर्व वर्णांचा, स्त्रीशूद्रांचा समावेश करण्यास त्याची तयारी असूनही त्याची चलती-होऊं शकली नाहीं. आणि त्यास मुख्य कारण म्हणजे त्यामार्गांतील कठिणपणा हेंच होय. भगवान्ही गीतेच्या १२ व्या अध्यायांत " क्लेशोधिकतरस्तेषा-मव्यक्तासक्तचेतसाम् । अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥" (श्लो.५) असेच उद्गार काढीत असून ज्ञानेश्वरांनींही वरील सर्व संकटांचा व त्रासाचा उल्लेख त्याश्लोकांवरील आपल्या बहारदार ओव्यांच्या भाष्यांत खालील-प्रमाणें केला आहे:—

" तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें । आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ कामक्रोधांचे विलग । उठावती अनेग । आणि शून्येंसि आंग । झुंजवावें कीं ॥ तहानें तहानाचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी । अहोरात्र वावी । ममावा वारा ॥ शीत वेढावें । उष्ण पांघुरावें । वृष्टीचिया असावें । घराआंतु ॥ किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा । भातारेंविण करावा । तो हा योगु ॥ एथ स्वामीचें काज । ना बापिकें व्याज । परि मरणेंसि झुंज । नित्य नवें ॥ ऐसें मृत्युहूनि तिख । कां घोटें कढत विख । डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ?॥ पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें । तैं पोट भरणें कीं भरणें । शुद्धी नेणें ॥ म्हणौनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तया दुःखाचाचि शेलवांटा । भागा आला ॥ "

असो. तेव्हां या मताची विशेष चलती न होण्याचें मुख्य कारण हाच " दुःखाचा शेलवांटा " होय ह्यांत शंका नाहीं. वास्तविक, पूर्वींच्या वैदिक कर्मकांडावर, त्यांतील हिंसाप्रधान यज्ञयागांवर, त्यांतील जाति-भेदावर, आणि ब्राह्मणांच्या वरचढपणावर वेदांत किंवा औपनिषदिक

तत्त्वज्ञानाच्या वेळेपासून जी हल्ल्याची लाट सुरू झाली होती तिला ह्याहि मार्गानें थोडाबहुत हातभार लावला व आपल्या प्रयत्नाची त्यांत शक्य तितकी भर घातली; आणि ही योगमार्गाची कामगिरी धार्मिक प्रगतीच्या ऐतिहासिक दृष्ट्या लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ह्यांत शंका नाहीं. पण आतांच सांगितलेल्या त्या मार्गाच्या काठिन्यामुळें त्याची व्हावी तशी प्रगति साहजिकच झाली नाहीं व लोक पुन्हां असंतुष्ट राहिले ते राहिलेच. किंबहुना, एक ठाम मत नसल्यामुळें, सर्व बाजूंनीं सुखाचा मार्ग दाखविणारी कोणचीच दिशा नसल्यामुळें, लोकांची स्थिती ह्यावेळीं निर्नायकासारखी झाली व जो जें सांगेल त्याप्रमाणें करांत सुटावें अशी त्यांची स्थिती झाली. " ज्याला जो विचार सुचेल तो तो बोलूं लागला. वाजसनीय संहितेंत मिश्र जातींबद्दल खेद प्रदर्शित केला आहे. आर्यलोक अनार्यांच्या मुलींशीं लग्नें करूं लागले. शंतनु राजानें अनार्य कोळ्याची मुलगी योजनगंधासुगंधा हिला मागणी घातली....भारतांत अशा पुष्कळ कथा आहेत. भीमाचें हिडिंबेशीं, अर्जुनाचें नागकन्या उलूपीशीं, अशीं लग्नें लागलीं. शांतिपर्वामध्यें कोल्हा व गिधाड यांच्या उपदेशाची गोष्ट भीष्मानें सांगितली आहे. त्यावरून जनसमाजाच्या मनोवृत्तीचा अदमास केला तर क्षणोक्षणीं त्यांचीं मतें पालटत होतीं असें दिसतें. जसा सांगणारा भेटेल त्याच्यामागें धांवायला मंडळी तयार होती, असें त्या रूपकाचें तात्पर्य आहे. मेलेलें प्रेत दहन करावें असें कोणी सांगितलें कीं तयारी लोकांची, पुरावें म्हटलें कीं त्यालाही रुकार, उघड्या जागीं फेंकून द्या म्हटलें कीं त्यालाही कोणाची हरकत नाहीं. ही बंडाची पूर्वस्थिति होय. शास्ता, अधिकारी, सत्ताधीश नाहींसा झाल्यामुळें लोक सैरावैरा झाले. "(वे. नि. ४१) अर्थात् यावेळीं भगवद्गीतेनें बजावलेल्या अलौकिक कामगिरीचें वर्णन व माहिती पुढील भागांत सांगण्याचें आश्वासन देऊन आपण आतां ह्याच सुमारास असलेल्या " धर्माचरण मोक्षप्रद आहे " ह्या पंथाचा किंवा मताचा थोडासा विचार करूं.

धर्माचरणावरच केवळ भर देऊन त्यानेंच मोक्षप्राप्तिही होईल असें सांगणारा विशिष्ट पंथ कदाचित् यावेळीं नसेल. पण तसा विचार करणारे मात्र लोक खात्रीनें असले पाहिजेत आणि म्हणूनच "दैवी संपद् विमोक्षाय" असा भगवंताना त्याचा पुढें निर्देश व समावेश गीतेंत करून घ्यावा लागला. अर्थात्

गीतेनंतर येणाऱ्या गौतमबुद्धानें नीत्याचरणावरील भराचें तत्व नवीन काढलें असें नसून तसा विचार करणारी मंडळी पूर्वींही होती हें उघड आहे. किंबहुना, रामायणभारताच्या कथांचा अवतारच त्यासाठीं आहे. खरें खरें धर्माचरण वाटतें तितकें सोपें नसून योग्याला अरण्यांत राहून मन आवरण्याचा जितका त्रास त्याच्या शतपट त्रास संसाराच्या व्यामोहांत राहून मन धर्माचरणापासून विचलित न होऊं देण्यांत आहे. अशा व्यक्ति हाताच्या बोटांवरच मोजाव्या लागतील. राम, धर्म, भीष्म, दशरथ, कृष्ण, इत्यादिकांचीं चरित्रें हेंच सांगतात. "धर्मं चरामि सुश्रोणि न धर्मफलकारण: । धर्म वाणिज्यकोहीनो जघन्यो धर्मवादिनाम् ॥" अशा तऱ्हेचें उत्तर द्यायला 'धर्मा'सारखेंच छातिठोक हृदय पाहिजे. महर्षी व्यासांचाही उपदेश हाच आहे. 'धर्माचें आचरण करा. धर्म कधींहि सोडूं नका.' असें महाभारत सबंध लक्ष ग्रंथभर पदोपदीं सांगत आहे. प्रारंभीं "धर्मे मतिर्भवतु वः सततोत्थितानाम् ।" असें सांगितलें आहे तर शेवटीं भारतसावित्रींत, "न जातु कामान्न भयान्न लोभात् धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः । धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यः तस्य हेतुस्त्वनित्यः ॥" असा व्यवहारनीतिनिपुण व्यास बाहु उभारून सर्व जगास महाभारतांत उपदेश करीत आहेत. असा हा धर्म म्हणजे तरी काय ? शांतिपर्व अ. १०९–३० ह्या श्लोकांत धर्माचें तात्पर्य अथवा धर्म कोणचा तें थोडक्यांत पण बहारीनें सांगितलें आहे. तो श्लोक असाः—

"यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्यस्तस्मिंस्तथा वर्तितव्यं स धर्मः।
मायाचारो मायया बाधितव्यः साध्वाचारः साधुना प्रत्युपेयः ॥"

अर्थात् हें लक्षण नेहमींसुद्धां चालूं शकणारें असलें तरी अपवादप्रसंगांतील धर्माचा थोडक्यांत निष्कर्ष यांत येत असून खऱ्या धर्माच्या एर्वीच्या आठ अंगांकडे आपण आतां वळूं. धर्माचे दोन माग, एक वरिष्ठ व एक खालचा, असे पडतात ही गोष्ट महाभारतांत सांगितलेली आढळते. यांतलि पहिल्या भागांत यज्ञ, वेदाध्ययन, दान, आणि तप, हीं येत असून वरच्या—वरिष्ठ वर्गांत सत्य, क्षमा, इंद्रियदम, व निर्लोभता, हीं येतात. असा हा धर्माचा अष्टविध मार्ग आहे. महाभारतकार वनपर्वांत म्हणतातः—

" इज्याध्ययनदानानि तपः सत्यं क्षमा दमः ।
अलोभ इति मार्गोऽयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ॥" (वनपर्व अ. २)
" तत्र पूर्वश्चतुर्वर्गः पितृयाणपथे स्थितः ।
उत्तरो देवयानस्तु सद्भिराचरितः सदा ॥ "

ह्या दुसऱ्या श्लोकावरून उघडच धर्माचे कर्ममार्ग व नीतिमार्ग असे दोन भाग पडत असून पहिला भाग कमी दर्जाचा असून दुसरा वरिष्ठ दर्जाचा आहे असें स्पष्ट दाखविलें आहे. यांतील कर्ममार्गाच्या भागांतील धर्मकृत्यें करणारे लोक हल्लीं सुद्धां पुष्कळ असतील. परंतु हे धर्मकृत्य करणारें लोक पितृयाणानें चंद्रलोकाप्रत किंवा स्वर्गाप्रत जाऊन तेथून पुनरावृत्ति पावतील असें सूचित केलें आहे, आणि धर्माचरणाचा दुसरा वरिष्ठ दर्जाचा मार्ग, कीं ज्यास आपण हल्लीं नीतिमार्ग म्हणतो, तो आचरणारे गृहस्थ देवयानानें ब्रह्मलोकास जाऊन तेथून परत येणार नाहींत असें दर्शविलें आहे. पूर्वी नीतीचा समावेश धर्माच्या पोटांतच होत होता, हीहि गोष्ट येथें लक्षांत ठेवली पाहिजे. किंबहुना, धर्माला नीतिवांचून शोभा नाहीं, धर्माचा कर्ममार्ग नीतिमार्गावांचून विशोभित दिसतो व पुनरावृत्ति करविणारा आहे, इतकेंच नव्हे तर केवळ कर्ममार्गावर भर देऊन त्याचें दांभिक आचरण माजवून, खाजगी रीतीनें अनीतिकर्दमांत जर प्राणी लोळत राहील तर, " तुका म्हणे ऐसे किती नरका गेले, पुढें जाती " ह्या तुकोक्तिप्रमाणें किंवा "पतंति नरकेऽशुचौ" ह्या भगवदुक्तीप्रमाणें तो नरकाचाच अधिकारी बनेल यांत शंका नाहीं. तसेंच पहिल्या भागाचें दंभासाठीं आचरण करतां येईल; पण दुसरा मार्ग महात्म्यावांचून इतरांस साधणें शक्य नाहीं—त्यांचे दांभिक आचरण फार वेळ करतां येणें व टिकणें शक्य नाहीं. उद्योगपर्वांत म्हटलेंच आहे:–

" अत्र पूर्वश्चतुर्वर्गो दंभार्थमपि सेव्यते ।
उत्तरस्तु चतुर्वर्गो नामहात्मसु तिष्ठति ॥–"

असो. अशाप्रकारचा हा धर्ममार्ग आहे आणि त्याचें आचरण करणारा निःसंशय मोक्षाला जाईल असें भारतकारांचें मत आहे. या मार्गांतही " इज्याध्ययनदानानि " हीं पितृयाणमार्गें नेऊन पुनरावृत्तींत पाडणारीं आहेत, निदान त्याप्रमाणेंच केवळ वागणारा पुनरावृत्त्या भोगीत

राहतो असें सांगून यज्ञयाग, तप, व वेदाध्ययन म्हणजेच मोक्ष असें सांगणाऱ्या वैदिक व इतर कर्मठांवर ह्यानें चांगलाच हल्ला चढविला आहे. तसेंच ह्याधर्मांपैकीं उच्चमार्गाचें आचरण कोणच्याहि वर्गाच्या, आश्रमाच्या, किंवा जातीच्या माणसानें करावें व मुक्त होऊन जावें असें सांगून, ह्या मार्गानें आपलें उदारमतवादित्वहि सिद्ध केलें असून जातिभेदाचा नक्षा चांगलाच उतरला आहे. अर्थात् अशा ह्या परंपरेच्या जोरावर भगवद्गीतेनें केवढें अलौकिक कार्य केलें, सर्व मार्गांचा समन्वय, त्यांतील दोष किंवा व्यंगें काढून टाकून, कसा केला, कोणकोणचे स्वतंत्र मार्ग प्रतिपादिले, गीतेचें महत्व काय, व तिची कीर्ति अजरामर होण्याचें कारण काय, इत्यादि गोष्टींकडे आतां आपण वळूं.

---

# भाग ४ था.



वेद, वेदांत, चार्वाक, सांख्य, योग, व धर्म किंवा नीति, इतकीं मतें भगवद्गीतेपूर्वी प्रचलीत होतीं. त्या प्रत्येकांतील दोषांचा थोडक्यांत नामनिर्देश करून, त्याचा त्याग गीतेनें कसा केला व ग्राह्यांश कसा घेतला, व सर्वांच्या जणों समन्वयानें एक नवीनच इमारत Golden Mean सारखी कशी उभी केली, भगवंतांनीं कोणकोणच्या गोष्टींवर हल्ले चढवून स्वताचें असें कोणचें विशेष मत व कोणचा मार्ग त्यांत प्रतिपादिला, व अशा गीतेची थोरवी काय आहे व ती अद्याप टिकून राहण्याचें कारण काय, इत्यादि गोष्टी आपणांस आतां पहावयाच्या आहेत. गीतेच्या कालाचाहि शेवटीं थोडक्यांत विचार करूं. तर प्रथम आपण गीतेची महती पाहूं या.

श्रीमद्‌भगवद्गीतेची महती फार मोठी आहे. "ही हिंदुधर्माची लांब पल्ल्याची तोफ असून ती आपल्या तत्त्वज्ञानानें सर्व जगास जिंकूं पहात आहे." अशा अर्थाचे उद्गार श्रीयुत चिंतामणराव वैद्यांनीं आपल्या कृष्णचरित्राचें प्रारंभीं काढले आहेत ते अगदीं योग्य आहेत यांत शंका नाहीं. प्रस्थानत्रयीमध्यें तिची गणना केली जात असून, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, वामनपंडित, दासोपंत, लोकमान्य टिळक, यासारख्यांनीं तिच्या-

वर स्वतंत्र व सविस्तर भाष्यें रचावींत अशाच योग्यतेची ती आहे हें तिच्याकडे वरवर पहाणारास ही समजून येणार आहे. तिची ती साधी पण जोरदार वाणी हृदयांत घुसणारी व ठसणारी आहे! श्रीयुत न्या. तेलंगानां तिच्यांत " पतंजलीच्या योगशास्त्राप्रमाणें कोणच्याही एका विषयाची किंवा मताची व्यवस्थित मांडणी दिसत नसून जो विषय जसा उद्‌भवला तसें त्यावर तिनें प्रसंगोपात्त मत दिलें आहे व सत्य प्रतिपादनापेक्षां सत्यशोधनाची धडपडच त्यांत उपनिषदाप्रमाणें जागोंजाग दिसत आहे. " ( " An Introduction to Bhagwadgita " पहा ) व याकामीं प्रो. मोक्षमूलरांचें मत उपनिषदासंबंधीं तसेंच आहे असें सांगून "यावरून ती जुन्या उपनिषदांच्या समूहांत चांगली शोभते" असें तें शेवटीं म्हणतात. ( त्यांची " भगवद्गीतेची प्रस्तावना " पहा. ) पण प्रो. मॅक्समुल्लरांनीं " Yet, all leading in one direction " असेंच शेवटीं उपनिषदांबद्दल उद्गार काढले आहेत. न्या. तेलंगांनीं मात्र तसें गीतेबद्दल कांहींच म्हटलें नाहीं. उलट " न मे द्वेष्योस्ति न प्रियः " व "भक्तिमान् स च मे प्रियः " आणि " तानहं द्विषतः क्रूरान् " यासारख्या वचनांतून केवळ वरवर भासणारा विरोधच त्यांस खरा वाटत असून त्याचा त्यांनीं फार बाऊ केला आहे. ( " भगवद्गीतेची प्रस्तावना " पहा ). पण पूर्वींच्या सर्व मतांचा समन्वय करून श्रीकृष्णांनीं कर्मयोग व भक्तिमार्ग अधिक सांगितला ह्या दृष्टीनें त्या ग्रंथाकडे पाहिलें किंवा ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे न्या. तेलंगांच्या तत्संबंधींच्या कल्पना कशा पोकळ आहेत हें तेव्हांच समजून येईल. त्यापेक्षां चिंतामणराव वैद्यांचेंच गीतेसंबंधीं खालील वर्णन हृदयास अधिक पटतें. ते म्हणतातः—

" भगवद्गीतेंत कोणच्याहि प्रकारचा विसदृश जोड दिसत नाहीं असें आमचें मत आहे. भाषेच्या दृष्टीनें, कवित्वाच्या दृष्टीनें, विषयांच्या दिव्य प्रतिपादनाच्या दृष्टीनें, किंवा उत्तम छंदोरचनेच्या दृष्टीनें, भगवद्गीता एकाच अत्युदात्त कवित्वशक्तीच्या पुरुषानें तयार केली आहे असेंच अनुमान करावे लागतें. भगवद्गीतेंतील अनुष्टुप छंदाचें माधुर्य फारच वरिष्ठ दर्जाचें आहे....असें हॉपकिन्सनेंच दाखविलें आहे....त्याचप्रमाणें विषयाच्या प्रतिपादनांत कोठें विरोधही दिसून येत नाहीं. किंबहुना, सर्वच विषय सारख्याच दिव्य कल्पनाशक्तीनें वर्णिले असून यांत महातत्त्वज्ञानात्मक

खोल विचार प्रगल्भ व प्रसादयुक्त वाणीनें केलेला आहे. यासाठीं भगवद्गीता हा समग्र ग्रंथ एकाच बुद्धिमान् कवीच्या डोक्यांतून निघाला असून तो ताजमहालाच्या अप्रतीम इमारतीप्रमाणें सुंदर, सुबद्ध आणि विशाल कल्पनेनें भरलेला आपल्यासमोर उभा राहतो. त्यांत कोठें जोड, किंवा सांधा, किंवा मागाहून रचलेला भाग दिसत नाहीं. त्याची एकंदर भव्य आकृति किंवा बारीक कुसरींचें सुंदर भाग एकाच प्रतिभेंतून निघालेले आहेत. " न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह" हा त्याचा पाया आहे, विश्वरूप दर्शन हा त्याचा मध्य आहे, आणि "करिष्ये वचनं तव" हा त्याचा कळस आहे ! सांख्य, योग, वेदांत आणि भक्ति ह्या त्याच्या चार बाजवा आणि चार कोपऱ्यांचे मनोरे आहेत, आणि कर्मयोग हा त्याचा मुख्य मधला मनोरा आहे. निरनिराळ्या चार तत्त्वज्ञानांचीं अक्षरें चारी संगमरवरी भिंतीवर रंगीत संगमरवरी दगडांनींच खोदलीं आहेत आणि यांच्या चारी दरवाजांच्या आंत गाभाऱ्यांत परब्रह्म साठविलें आहे ! याप्रमाणें या दिव्य तत्त्वज्ञानात्मक दिव्य ग्रंथाचें अलौकिक सौंदर्य आपणास थक्क करून सोडतें. असो. तर या गीतोत्तमांत कोठेंही विसदृश भर किंवा बदसूर आपल्यास दिसत नाहीं. त्याच्या उदात्त कल्पनेस न साजणारे किंवा न जुळणारे असे विचार कोठेंच नाहींत; किंवा भाषा अगर कल्पना कमी रम्य अथवा कमी गंभीर अमुक ठिकाणीं आहे असेंहि म्हणतां येत नाहीं. " ( म. उ. पा. ८३२ ते ८३४ ).

भगवद्गीतेच्या सुबद्ध एकत्वाचें किती हें सुंदर व सुश्लिष्ट वर्णन ! हें वाचून पाहिल्यावर—" We have there the results of free thought exercised on different subjects of great moment unfettered by the exigencies of any foregone conclusions or of any fully developed theory "—अशा तऱ्हेचे न्यायमूर्ति तेलंगांचे तिच्यावरील आरोप मग ' न्याय्य ' वाटतात काय ? असो. " सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनंदनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥" ह्या श्लोकांतही गीता हें उपनिषदांचें सार आहे असें सांगून तिच्या सुबद्ध एकत्वाचेंच वर्णन आहे ! ज्ञानेश्वरांनींही त्या श्लोकाचें, " तैसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें । दुभिनलीं जगापरतें । श्रीकृष्णराय ॥ " असें थोडक्यांत सार देऊन, " गीता जाणा हे

वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभूची ॥ " असें सांगितलें आहे. व म्हणूनच, " जें श्रवणें पाठें अर्थें । गीता नेदी मोक्षा अरौतें । जैसा समर्थ दाता कोणातें । नास्ति न म्हणे ॥ " अशी तिची फलश्रुति त्यांनीं सांगितली आहे, ती अर्थात्, " अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः । ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः॥" ह्या भगवंतांच्या श्लोकाच्या आधारेंच सांगितली आहे " कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया । श्लोक नव्हती बाह्या । पसरु कां जो ॥ " अशाप्रकारची थोर योग्यता गीतेची असून तिच्यांतील सर्वच श्लोक सारख्याच बिनमोल किंमतीचे आहेत असे ज्ञानेश्वरही खालील ओव्यांतून सांगतात:—

" ऐशिया शतें सात श्लोकां । परी आगळा येक येका । आतां कोण वेगळिका । वानावा पां ! ॥ दीपा आगिलु मागिलु । सूर्य धाकुटा वडीलु । अमृतसिंधु खोलु । उथळु कायसा ! ॥ तैसे पहिले सरते । श्लोका म्हणावे गीते । जुनींनवीं पारिजातें । आहाती काई ! ॥ " इ. असो.

अशाप्रकारच्या या गीतोत्तमाचे कर्ते गायक " यस्य निश्वसितं वेदाः" असे पुराण-पुरुषोत्तम भगवान् श्रीकृष्ण होते—"हा वेदार्थसागरु । जया निद्रिताचा घोरु । तो स्वयें श्रीसर्वेश्वरु । प्रत्यक्ष अनुवादला ॥ " असें ज्ञानेश्वरही आपणास सांगतात. त्या भगवंतांनीं आपल्या आसपास व सभोंवार पाहिलें तों ह्या प्रकरणाच्या प्रारंभीं सांगितलेल्या विविधमतांचा बुजबुजाट " नानामतांचा गलबला । " त्यांच्या दृष्टीस पडला व "शास्त्रांचा बाजार भरला । " आहे असें त्यांस दिसून आलें ! प्रवृत्तिनिवृत्तिच्या आंदोलनांत धार्मिक वावर्तांत प्रवृत्तिनिवृत्तिच्या कळसाला लोक जाऊन पोंचले होते असें त्यास आढळून आलें. " मोक्षाचें साधन सनत्सुजातीय आख्यानांत संसार सोडून अरण्यांत जाऊन निष्क्रिय बनून परमेश्वराचें चिंतन करणें हेंच ठरविलें आहे. वेदान्त, सांख्य व योग यांचा मोक्षमार्ग बहुधा हाच आहे. " ( म. उ. प. ७५१ ) ' संसार किं कांतार ?' असा प्रश्न केला असतां दुसऱ्याच्याच बाजूनें बहुतेकांची मतें पडत होतीं. त्यांतही क्वचित् — " कस्यैषा वाग्भवेत्सत्या नास्ति मोक्षो गृहादिति । " ( शां. अ. २६९–१० ) अशातऱ्हेचे उद्गार निघत नसत असें नाहीं. पण " एकंदर याबाबतींत भिन्न भिन्न मतांचा विचार करतां महाभारतकाळीं गृहांत राहून मोक्ष मिळत नाहीं असें मत ग्राह्य करण्याकडे अधिक कल दिसतो "

( म. उ. पा. ७५२ ). याचें प्रसिद्ध उदाहरण म्हणजे– " सुलभाजनक-संवाद " होय. तो आम्ही मागें दिलेला वाचकांना आठवत असेलच. असो. तर " चार्वाकाशिवाय सर्व निरनिराळ्या मतांचें आचार्य जगतांत दुःख भरलें आहे असें एकवाक्यतेनें मानतात आणि यामुळेंच संसार सोडून देऊन कोणत्यातरी प्रकारानें अलिप्त होण्याचा उपदेश ते करतात. सांख्य-मतवादी असोत किंवा योगी असोत, वेदांती असोत किंवा नैय्यायिक असोत, बौद्ध असोत किंवा जैन असोत, त्यासर्वांच्या मनावर हेंच एकसारखें आरुढ झालेलें आहे कीं या जगतांतील सुखें केवळ दिखाऊ आहेत; आणि जगतांतील वैभव क्षणभंगुर आहे. बुद्धाला रोगी, म्हातारा, व मृत अशीं तीन माणसें पाहूनच तीव्र वैराग्याचा झटका आला. त्याच्या मनांत भरलेल्या जगतांतील संपूर्ण वस्तूंच्या द्वेषाचा भडका होण्यास एवढीच ठिणगी पुरेशी झाली, व हें जग जन्म, मृत्यु, जरा, व्याधि, अशा दुःखांनीं भरलेलें आहे अशी तीव्र भावना होऊन तो संसार सोडून निघून गेला. मोक्षधर्माच्या शांतिपर्वांतील पहिल्या अध्यायांत ह्याच वैराग्यकारी विषयाचें प्रतिपादन आहे...इंद्रियांचा संसर्ग विषयापासून तोडल्याशिवाय मुक्ति नाहीं असें योगीही म्हणतात. सांख्यांच्या मतानेंही प्रकृति-पुरुष–विवेक झाला पाहिजे, आणि हाच संसाराचा एका प्रकारानें त्याग आहे. संसार त्यागावर बौद्धांचा आणि जैनांचा तर पूर्ण कटाक्ष होता; आणि त्यानीं याचसाठीं भिक्षु संघाची संस्था स्थापन केली, व बौद्ध आणि जैन भिक्षु पुढें याचसाठीं प्रसिद्धीस आले. " (म. उ. पा. ७५२–५३ तेव्हां). "कोणत्याही कारणानें असो, पण भारतीय प्राचीन आर्यतत्त्वज्ञान्यांचा कल संसार दुःखमय आहे असेंच मानण्याकडे आहे, यांत संशय नाहीं. " ( म. उ. पा. ७५४ ) भगवंतांचा या बाबतींतला अभिप्राय अर्थात् वरील सर्व मतांशीं, म्हणजे 'संसार दुःखमय आहे व त्यांतील सुखें क्षणभंगुर आहेत' ह्या सिद्धान्ताशीं जुळताच आहे. कारण तो सिद्धान्तच तितका सत्य आहे. तेव्हां सत्याचा परित्याग प्रत्यक्ष परमेश्वर झाला तरी तो कसा करणार ? किंबहुना, तसा तो करील तर तो परमेश्वरच नव्हे. कारण " सत्य तेंचि परब्रह्म " असें मुक्तेश्वर आपणांस सांगत आहेत. असो. तर भगवंतांनींही " अनित्यमसुखं लोकं इमं प्राप्य भजस्व माम् " ह्या ओळींत " हा मृत्युलोक अनित्य व असुख आहे म्हणजे क्षणभंगुर व

दुःखदायी आहे यासाठीं तूं माझी भक्ति कर " असेंच सांगितलें आहे. ज्ञानेश्वरानींही " म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं । काय सुखनिद्रा अंथरुणीं । इंगळाच्या ? ॥ " इत्यादि ओव्यांतून हीच गोष्ट–हाच प्रभूंचा अभिप्राय–अधिक खुलवून सांगितला आहे. अर्थात् वरील सिद्धान्ताचे बाबतींत सर्वांचें मतैक्य आहे हें येथवर सिद्ध झालें. पण त्यावर उपाय काय ? त्या दुःखमय संसारांतून ' मुक्तिच्या वाटे ' स लागण्यास कोणचा मार्ग आहे किंवा त्यासाठीं काय करावें ? या बाबतींत किंवा या प्रश्नांवर मात्र पूर्वींच्या बहुतेक तत्वज्ञान्यांची व या पुढील बुद्धजैनादि मंडळींची विचारी तुकडी एका बाजूस, व भगवान् श्रीकृष्ण व त्यासारखे विचारी तत्त्ववेत्ते दुसऱ्या बाजूस असा हा लढा आहे. आणि येथेंच भगवंताचें विशेषत्व व मतप्रतिपादनांतील अतुल शौर्य आणि निधडी छाती दिसून येत आहे ! पहिल्या तुकडीचा यावरील तोडगा किंवा उपाय म्हणजे " अर्थातच संसारांतील पुनर्जन्माच्या फेऱ्यांतून सुटून जाण्याचा सरळ व एकच उपाय म्हटला म्हणजे संसारत्याग होय, असें त्यांचें मत होणें साहजीक आहे " ( म. उ. पा. ७५४ ) पण भगवंतांचें या बाबतीतलें मत निराळें आहे,व तें उलट बाजूच्या म्याडपणावर मात करणारें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एकाचा उपदेश संसार सोडून द्या, षड्रिपूपासून व त्यांच्या विषयापासून दूर पळा, तर दुसऱ्याचा उपदेश " पद्मापत्रमिवांभसि " असें, " जैसें जळींचें जळीं न शिवे । कमल पत्र ॥ " असें रहा, व इंद्रियरूप आडदांड घोड्याला कबज्यांत आणून, त्यांशीं झगडून त्यावर लीलेनें मांड टाका व " कूर्मांगा "-प्रमाणें "तैसीं इंद्रियें आपैसीं होती । जयाचें म्हणितलें करिती ।" अशा ' स्थित प्रज्ञा'ची स्थिती अंगीं बाणवून घ्या ! यांतून कोणचा उपदेश अधिक तडफीचा व वीरश्रीचा आहे हें एकादें मूलही सांगूं शकेल. थॉमसन्साहेबीह आपल्या " भगवद्गीतेच्या प्रस्तावने"त हीच गोष्ट सांगतातः–

" The ज्ञानयोग or school of पतंजली enjoins the avoidance of temptation. The कर्मयोग or school of भगवद्गीता enjoins the combating of temptation. Both teach that the world is evil and that its influence, which

tends to obstruct devotion, must be destroyed. The one says, " Avoid the world, " the other more courageously bids us to meet it with a well-armed faith and a wellfortified heart, the difference between them is the same as that between the monk and the priest of modern days, and our author has justly appreciated the superiority of the latter " (Page CIX Introduction to Bhagwatgita by J. Cockburn Thomson). असो. श्रीयुत चिंतामणराव वैद्यही त्या भगवंतांच्या दणदणीत मताला उचलून धरतांना म्हणतातः—

" परंतु सर्वच तत्त्वज्ञानी अशा प्रकारचे भ्याड, संसारास भिऊन पळून जाणारे नव्हते. कांहीं असे धीट, जोरदार, बुद्धिवान् लोक उत्पन्न होणें आर्यांच्या इतिहासांत आश्चर्यकारक नाहीं, कीं ज्यांनीं सामान्य लोकमत-प्रवाहाच्या विरुद्ध जाऊन संसारांत राहणें व धर्मानें व नीतीनें आचरण करणें हेंहि मोक्षाचें कारण आहे असें प्रतिपादन करावें. अशा थोड्या तत्त्वज्ञान्यांपैकीं श्रीकृष्ण हा अग्रणी होता व त्यानें आपलें हें स्वतंत्र मत मुख्यतः भगवद्गीतेमध्यें प्रतिपादन केलें आहे,...तें असें कीं, मोक्षमार्ग, निष्क्रियत्व किंवा संन्यास, हा जितका निश्चित किंवा भरंवशाचा आहे तितकाच स्वधर्मानें, न्यायानें, निष्कामबुद्धीनें म्हणजे फलत्यागबुद्धीनें कर्म करणें हाही मोक्षाचा निश्चित व भरंवशाचा मार्ग आहे. " (म. उ. पा. ७५४ ). हा मार्ग फक्त गीतेनेंच सांगितला नसून व्यासवाल्मीकीनीं हीच गोष्ट आपल्या जगन्मान्य राष्ट्रीय ग्रंथांतून—रामायणमहाभारतांतून—विविध उदात्त पात्रांच्या द्वारें सिद्ध केली आहे व " न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः " असें व्यास बाहेर उभारून सर्व जगास कसें सांगत आहेत तें आपण मागें पाहिलेंच आहे. " भगवद्गीतेमध्येंहि या विषयाचा विचार अप्रतीम रीतीनें केलेला असून सज्जनांचे सद्गुण कोणचे असतात, हें वर्णन केलेलें आहे. " ( म. उ. पा. ७५६ ) ते सद्गुण अर्थात् " अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः" इत्यादि गीतेच्या १६ व्या अध्यायांत सांगितलें• असून त्यास 'दैवीसंपत्ति' म्हटलें आहे व " दैवी संपद्विमोक्षाय " ( भवति ) असें सांगितलें

आहे. म्हणजे हे दैवी गुण, हे सव्वीस दैवी गुण म्हणजे " मोक्षचक्रवर्तीचे अग्रहार "च होत ह्यांत कांहीं संशय नाहीं. " कीं गुणकुसुमांची माळा । हे घेऊनि मुक्तिबाळा । वैराग्यनिरपेक्षाचा गळा । गिंवसीत असे ।। कीं सव्विसें गुणज्योति । इहीं उजळूनि आरती । गीता आत्मया निजपती । नीरांजना आली ।। " ह्या बहारीच्या ओव्यांतूनही अशा दैवी गुणांनीं नटलेला मनुष्य " निर्विण्ण सागराच्या गंगे" त नाहून मोक्षतटावर जाऊन बेधडक उभा राहतो—मुक्त होऊन जातो, हेंच ज्ञानोबांना विविधरूपकद्वारें सांगावयाचें आहे. अस्तु.

याच ठिकाणीं ह्या नीतिच्या मार्गासंबंधीं आपण अजून थोडासा विचार करूं या. पूर्वीच्या यासंबंधींच्या ग्रंथांतून धर्माच्या पोटांतच नीतीचा समावेश होत असून ईश्वरावर अचल श्रद्धा किंवा निष्ठा यांही गुणांचा अंतर्भाव त्यांतच होत होता अशी आमची समजूत आहे. कारण व्यासवाल्मीकींनीं जीं उदात्त चरित्रें अथवा चित्रें आपणापुढें रेखाटली आहेत, त्यांतील प्रत्येक चित्रांतील व्यक्तीच्या ठायीं असणाऱ्या नीतिच्या कपाळीं धर्माचा अथवा ईश्वरीनिष्ठेचा सौभाग्यकुंकुमतिलक झळकतांना आपणांस दिसतो. कारण " भगवंताच्या अधिष्ठाना"शिवाय कोणचीही " चळवळ "—मग ती अंतर्जगांतली असो वा बाह्यजगांतली असो—तितकी जोरदार वठत नाहीं, किंबहुना, त्यावांचून ती प्रसंगीं लटपटून जाते असें समर्थ आपणांस चक्क सांगत आहेत. प्रकृतिपुरुषाच्या विवेकाचें ज्ञानगांभीर्य असो, अथवा " हें विश्वाचि माझें घर । " इतक्या पल्ल्यापर्यंत आधुनिक " पुष्कळांचें पुष्कळ हित " वाद्यांची मजल जाऊन पोंचलेली असो, शेवटीं त्या सर्वांवर " आणि याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था ।" असली, किंवा " त्याहीवरी भजनशीळु । माझ्याठायीं ।।" तो असला तरच भगवंताना तो 'पढियंता' होतो व ते त्याला 'माथा मुकुट करण्यास' तयार होतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. म्हणजे विश्वकुटुंबीवृत्ति बाणूनही एखाद्याची ईश्वराचें ठायीं दृढ श्रद्धा नसण्याचाही संभव आहे, " ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि असे निखिळु । असें होऊनही तो प्रभूच्याठायीं 'भजनशीळु' नसण्याचाही संभव आहे हें वरील उद्गारावरून उघड होत आहे. आणि असें जर असेल, त्या प्रभूची भक्ति अथवा निष्ठा जर हृदयांत ठसलेली नसेल तर तें ' कांतहीनेचें

कुंकुम सेंदुर ' करण्यासारखें होणार आहे हेंच भगवंतांना येथें दाखवा-वयाचें आहे. तेराव्या अध्यायांतील " अमानित्वमदंभित्वं " इत्यादि ज्ञानलक्षणांतही " मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी " असें एक लक्षण भगवान् सांगतात तें यासाठींच. तर " नीति ही धर्माची अर्धांगी आहे " ह्या एकाच बिनमोल वाक्यांत " नीतिशास्त्र-प्रवेश " कर्त्या रा. रा. वामन मल्हार जोशांनीं जो सखोल अर्थ ओतला आहे तो प्रत्येक वाचकांनीं लक्षांत ठेवावा, व धर्मावांचूनची नीति कुंकुमरहित स्त्रीसारखी विशोभित व बलहीन असते व तेंच नीतीच्या कपाळीं जर धर्माचा कुंकुमतिलक असेल तर सौभाग्यवती रमणीप्रमाणें ती सुंदर व बलवान् दिसते—असते— व राहते, व अशाच ' पातिव्रतांच्या वार्ध-क्यानें ' ज्ञानोबासारख्या संतांना ' गंगापय असळल्या ' सारखा शुद्धानंद होत असतो हें ध्यानीं आणावें. असो. तर भगवंतांनीं या नीतिमार्गाच्या भावी कथेकडे लक्ष देऊनच " भक्तिमान्मेप्रियोनरः " किंवा " भक्ति-मान्यः स मे प्रियः" असे तिच्याच जोडीला १२ व्या अध्यायांत जागोजाग उद्गार काढले आहेत. आमच्या वरील विधानाच्या सत्यताप्रीत्यर्थ आम्ही बौद्ध धर्माचाच दाखला वाचकांच्या डोळ्यापुढें ठेवतो. ईश्वर व आत्मा, यांचेंहि अस्तित्व नाकारणाऱ्या व केवळ कडकडीत नैतिक आचरणावर, शुद्ध पावि-त्र्यावर व दयेचा परिघ होईल तितका विस्तृत करून आचांडाल सर्वांवर प्रेम करण्यावर—किंबहुना, "हें विश्वाचि माझें घर" असें मानण्यावर भर देण्यास सांगणाऱ्या बौद्धधर्माची स्थिति पुढें काय झाली ? " स्वतः बुद्ध शांत, गंभीर, श्रद्धाळू, निश्चयी व सदय होता. " ( वे. नि. ५१ ) पण पुढें काय ? त्यानें मारलेल्या ' मारा ' बरोबरच्या लढाया सर्वांनाच कशा मारतां येणार ? " बुद्धानंतर त्याचा सर्व कारभार पुस्तकांतून ऐकावयाचा राहिला. प्रत्यक्ष कृतींत तो तसा उतरण्याचें सोपें नव्हतें. आणि संत, संतिणी जमतां जमतां मठांत दुराचरणाला सुरवात झाली. व बुद्ध व्यक्ति नाहींशी होतांच ह्या नवीन धर्माचा डोलारा विस्कळीत झाला " ( वे. नि. ५१ ) व लवकरच कोसळून पडला. तोच आज हिंदुधर्म, आर्यधर्म, वेदांतधर्म, भागवतधर्म, आज शेंकडोशें वर्षे टिकून आणि तगून आहे, याचें कारण काय बरें ? एक चित्र असें कां झालें व दुसरें तसें कां निघालें ? तर एकांत नीतीच्या कपाळीं ईश्वरभक्तीचा कुंकुमतिलक नव्हता, व तो

घुसऱ्यांत होता हेंच याचें उत्तर नाहीं काय ? तेव्हां " शील व चारित्र्य येवढ्यानें भागत नाहीं. धर्माला काव्य लागत असतें." ( वे. नि. पा. ७९ ) तें काव्य बौद्ध धर्मांत नव्हतें व श्रीकृष्णाच्या धर्मांत आहे व म्हणूनच एकाला लवकरच जन्मभूमींतून प्रयाण करावें लागलें, ( किंबहुना तो गेला तेथेंहि त्याचें स्वरूप बरेंच बदललें गेलें ) व दुसरा त्याच जन्मभूमींत आपल्या समग्र तेजानें पहिल्याच्याहि आधींपासून तळपत राहिला आहे. असो. यावरून वाचकांनीं काय तो बोध घ्यावा. आतां आपण परत, " नातरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धि । निवडिलें निरवधि । नवनीत हें ।। " ह्या ज्ञानेशसंस्तुत अशा गीतेकडे पुनश्च वळून तिनें तत्पूर्वीच्या व तत्कालीन मतांचा कसकसा समाचार घेतला तें आतां आपण पाहूं या.

पहिलें मत वेदांचें. यज्ञयागादि कर्में करून स्वर्गप्राप्तिचें अक्षय्य ( ? ) सुख प्राप्त करून घ्यावें, मग त्यांत पशुहत्या झाली तरी हरकत नाहीं. अशी त्यावेळच्या याज्ञिकांची समजूत होती. सर्व सृष्टि यज्ञ करीत आहे, प्रजापतिही यज्ञ करीत आहे, असें ते म्हणत असत. "सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः । अनेन प्रसविष्यध्वमेषवोस्त्विष्टकामधुक् ।। देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः । परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ।। " इत्यादि भगवद्गीतेच्या ३ ऱ्या अध्यायांतील श्लोकांतून त्या याज्ञिकांच्या समजुतीचें चांगलें प्रतिबिंब पडलें आहे; आणि म्हणून वैदिक यज्ञयागादिकांवर हल्ले चढवणाऱ्या गीतेंत हें मागून कोणीतरी घुसडून दिलें असावें असें कित्येकांचे मत आहे. उदाहरणार्थ कै. डॉ. गुणे यांचें असेंच मत होतें हें आम्हांस ठाऊक आहे. पण कर्मयोगार्थ अवतरलेल्या ३ ऱ्या अध्यायांत आलेल्या या ' यज्ञ ' शब्दानें व त्याच्या परंपरेनें बिचकून जाण्याचें कारण नाहीं, हें त्यावरील ज्ञानेश्वराची टीका वाचणारांस तेव्हांच कळून येईल. ' यज्ञ ' म्हणजे ' स्वधर्म ' किंवा स्वतांचें नियत कर्म असा त्यांनीं चक्क अर्थ लावला आहे व तो तृतीयाध्यायाच्या विषयास धरूनच आहे हें कोणासही पटणार आहे. कारण " नियतं कुरु कर्म त्वं " असें त्यापूर्वीच्या श्लोकांतच म्हणणारे भगवान् उगाच मध्येंच वैदिक यज्ञाचें स्तोम माजवितील, किंवा यज्ञांतल्या धुरानें पाऊस पडतो असल्या खुळचट कल्पना करतील, हें संभवनीय दिसत नाहीं. किंबहुना त्यांचा निषेधच ते

येथेंहि दाखवीत आहेत हें खालील ज्ञानेश्वरांच्या ओंव्यावरून स्पष्ट होणार आहे; प्रजापति प्रजाला म्हणतो:—

" तुम्हां वर्णविशेषवशें । आम्ही हा स्वधर्मुचि विहिला असे । यातें उपासा, मग आपैसें । पुरती काम ॥ तुम्ही व्रतनियमु न करावे । शरीरातें न पीडावें । दुरि केंहि न वचावें । तीर्थासि गा ॥ योगादिकें सोधनें । साकांक्ष आराधनें । मंत्रयंत्र विधानें । झणीं करा ॥ देवतांतरा न भजावें । हें सर्वथा कांहीं न करावें । तुम्ही स्वधर्मयज्ञीं यजावें । अनायासें ॥ अहेतुक चित्तें । अनुष्ठापा यातें । पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ तैसा स्वधर्मरूप मखु । हाचि सेव्यु तुम्हा एकु । ऐसें सत्यलोकनायकु । बोलता जाहला ॥ " वाचक ! जो जो आपण ही टीका काळजीपूर्वक वाचाल तो तों यांत श्रीकृष्णांचें कर्मयोगाचें दणदणीत मत, वेदापासून योगापर्यंत सर्व मतें बाजूस सारून, कसें जोरानें पुढें आलें आहे व येत आहे हेंच दिसणार आहे ! तथापि अग्नींत हवन करूं नये, तपाचरण करूं नये, असें भगवंताचें म्हणणें नाहीं. उलट:—

" यज्ञोदानं तपःकर्म न त्याज्यं कार्यमेवतत् । यज्ञोदानं तपश्चैव पावनानि मनीषिणां ॥ " असेंच त्यांचें मत असल्याचें तें आपणांस गीतेच्या १८ व्या अध्यायांत सांगत आहेत, पणः—

" एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानिच । कर्तव्याणीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ " अशी त्यांनीं एक मेख मारून ठेवली आहे. याच मेखेमुळें, याच 'असंगा'च्या आणि फलत्यागाच्या तत्वामुळें पूर्वीच्या गारगोटीचा हिरा, किंवा कोळशाचे माणिक बनवलें गेलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण " कृपणाः फलहेतवः " असें त्यांचें ठासून सांगणें आहे. अर्थात् अतिरेकाला जाऊन भलतीकडेच भरंगळलेल्या मतांना परत खेंचून आणून मध्यबिंदूवर स्थिर करायचें हें जें भगवंतांचें उद्दिष्ट तें त्यांनीं यांत उत्तमप्रकारें साधलें आहे. वैदिकांच्या यज्ञयागांवर व त्यांच्या स्वर्गपर इच्छेवर प्रभूंनीं उपनिषदांच्याप्रमाणेंच जो दणदणीत हल्ला चढविला त्यासंबंधींचे उतारे व त्याकामीं दोघांचें ऐकमत्य कसें आहे तें आम्ही मागें सांगितलेंच आहे. अर्थात् दाढा पाडलेला सर्प जसा निर्विष व म्हणूनच त्रास देण्यास अक्षम बनतो, इतकेंच नव्हे, तर उलट गारुड्याच्या पुंगी-

बर वाटेल तसें नाचून डोलून लोकांचें मनोरंजनच करतो, त्याचप्रमाणें ह्या पवित्रभूत यज्ञयागांची स्थिती होणार आहे. कारण अग्नि हें देवाचें— परमेश्वराचें—पवित्र मुख आहे व त्यांत शुद्धांतःकरणानें परमेश्वरांस स्मरून " ओंतत्सत् " ह्या शब्दांचा मनोभावानें उच्चार करून आहुति टाकल्यास तिच्यासारखी पवित्र व मोक्षदात्री तीच आहे हें वेदांताला व त्यांतील यज्ञयागाला अविचारानें अजिबात उडवून देणारांनीं पूर्ण लक्षांत ठेवावें. भगवान् श्रीकृष्ण सतराव्या अध्यायांत ह्या मोक्षमार्गी मुमुक्षूंच्या यज्ञविधानाचें बहारीनें वर्णन करतातः—

" ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ।। २३ ।।
तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ।। २४ ।।" इत्यादि.

" ॐ तत्सत् " ह्या शब्दाची, ह्या मंत्राची, ह्या जपाची, ह्या नामाची किंमत फार मोठी आहे ! स्वामी रामतीर्थांनींही आपल्या एका व्याख्यानांत ती विशद करून सांगितली आहे, व त्या नामाचें पावित्र्य, नव्हे, मोक्षदातृत्व सिद्ध केलें आहे. ज्ञानेश्वरांनींही त्याचें वर्णन, त्या ॐकार प्रणवाचें वर्णन— " सर्व मंत्रांचा राजा " ह्या शब्दांनींच केलें आहे, व ते म्हणतातः—

" एवं ॐ तत्सदाकार । ब्रह्मनाम हें त्रिप्रकार । हें फुल तुरंबी सुंदर । उपनिषदांचें ।। येणेंसि गा होऊनि एक । जें कर्म चालें सात्त्विक । तें कैवल्यातें पाइक । घरींचें करी ।। " असा हा परब्रह्माच्या नामाचा महिमा आहे. अजून त्याचा महिमा पाहिजे असल्यास खालील ज्ञानेश्वरांच्या सुंदर ओंव्या पहाः—

" पैं सृष्टीचिया उपक्रमा—। पूर्वी गा वीरोत्तमा । वेडा ऐसा ब्रह्मा । एकला होता ।। मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टीहि करूं न शके । तो थोरु केला एकें । नामें जेणें ।। " असें हें नाम असून ह्या नामाच्या अनुष्ठानानेंच ब्रह्मदेवास सृष्ट्युत्पत्तीची शक्ति प्राप्त झाली आहे असें ज्ञाने-

श्वर म्हणतात तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आतां " तें अनादि परब्रह्म। जे जगदादिविश्रामधाम। " " तें कीर अनाम अजाति " हें खरें; पण " परि अविद्यावर्गाचिये गती। माजि वोळखावया श्रुति। खूण केली॥" इतकेंच. पण, ह्याची काय जरूर आहे—अनाम ईश्वरास नाम देण्याची अशी खूण करण्याची जरूर काय? असें म्हणाल तर ज्ञानेश्वर आपल्या सुंदर ओव्यांनीं आपलें पुढीलप्रमाणें समाधान करीत आहेत:—" उपजालिया-बाळकासी। नांव नाहीं तयापासीं। ठेविलेनि नांवेसी। ओ देत उठी॥" त्याचप्रमाणें, " कष्टले संसाराशिणें। जे देवो येती गाऱ्हाणें। तया ओ दे नामें जेणें। तो संकेतु हा॥ ब्रह्माचा अबोला फिटावा। अद्वैतत्वें तो भेटावा। ऐसा मंत्रु देखिला कणवा। वेदें बापें॥ मग दाविलेनि जेणें एकें। ब्रह्म आळाविलें कवतिकें। मागा असत ठाके। पुढां उभें॥" असा हा मंत्र आहे. अर्थात् अशा मंत्राचा योग्य विनियोग करून कोणचीही क्रिया केली असतां ती परब्रह्मास पावलीच पाहिजे. किंबहुना, तिच्या कर्त्यासही मग ती उद्धरून नेऊन त्या मूळ स्वरूपांत घातल्यावांचून सोडणार नाहीं, एवढें सामर्थ्य ह्या मंत्रांत आहे. ज्ञानेश्वर म्हणतात:—

ॐ तत्सत् ऐसें। हें बोलणें तेथ नेतसे। जेथूनि कां हें प्रकाशे। दृश्यजात॥" बोला, वाचक! याहून तुम्हांस तरी काय अधिक पाहिजे? मग अशा मंत्राच्या जोरावर चालणाऱ्या यज्ञयागादि क्रियांना तुम्ही वाईट म्हणणार काय? शक्यच नाहीं. आणि म्हणूनच भगवंतांनीं त्यांतील व्यभिचारी वासनेचें विष काढून टाकून त्या शुद्ध विनिर्मल यज्ञयागादिकांची स्तुति करून आत्मशुद्ध्यर्थ तिचा उपयोग आहे म्हणून त्यांस—अशा शुद्ध यज्ञक्रियांस आपल्या मतांत मिळवून घेतलें! अस्तु. पण यावरून त्या यज्ञयागांतील दुष्ट हिंसेची आम्ही तरफदारी करतो किंवा भगवान् करीत असतील अशी कोणाची समजूत असेल तर तिच्यासारखी मोठी चूक दुसरी होणार नाहीं. कारण, तेराव्या अध्यायांत सांगितलेल्या ज्ञानलक्षणां-तील " अहिंसा " ह्या पदावर व्याख्यान करतांना " साक्षात् विष्णु " असे ज्ञानेश्वर भगवान् भगवंतांचें हृद्गत—सखोल हृद्गत जर " पेस्जि

नुसची हिंसा । तेथ उगवेल काय अहिंसा ? । परि नवल बापा विवसा । या याज्ञिकांचा ॥ " या शब्दांनीं व अशाच इतर झणझणीत ओव्यांनीं विशद करीत आहेत तर तेच भगवान् श्रीकृष्ण यज्ञांतील हिंसेला सम्मति देतील—आनंदानें अनुमति देतील ही गोष्ट युक्तिजुक्तीस तरी पटते काय ? अर्थात् ती मुळींच संभवनीय नाहीं. "ब्रह्मचर्यमहिंसाच शारीरं तप उच्यते" याप्रमाणें सतराव्या अध्यायांत अहिंसेला शारीर तपांत नेऊन बसविणारे भगवान् त्याच्याच उलट असणाऱ्या हिंसेला कशी बरें आनंदानें सम्मति देतील ? " भूतमात्राचेनि नांवें । तृणही नासुडावें । किंबहुना, सांडावें । छेदभेद ॥ " याप्रमाणें त्या अहिंसेचें रूप वानणाऱ्या देवांनीं हिंसेला सम्मति देणें शक्य तरी आहे काय ? अर्थात् अहिंसामताचा टेंभा दुसऱ्यांनीं आम्हाला कांहीं अगदींच नव्यानें सांगायला नको आहे. " अहिंसामत उपनिषदांत आहे. ' अहिंसन् सर्वभूतानि अन्यत्र तीर्थेभ्यः ' असा छांदोग्याचा आदेश आहे " ( म. उ. ८८४ ) पण पांडवांना राजसूय व अश्वमेध यज्ञ करण्यास भगवंतांनीं प्रतिबंध केला नाहीं याचें कारण " त्या काळीं यज्ञयागांचें पूर्ण प्राबल्य होतें; अशा काळीं यज्ञांतलिही हिंसा वर्ज करावी असा त्यानें उपदेश केला नाहीं याचें आश्चर्य वाटावयास नको. " ( म. उ. ८८४ ) अर्थात् कोणच्याहि गोष्टीच्या अतिरेकाला आळा घालायचा म्हणजे तो जरूर तर असाच पायरीपायरीनें घालावा लागतो. पण ' टेंपरन्स असोशिएशन 'च्या मेंबरच्या हृदयांतलें खरें मत दारू 'टेंपरेटली'सुद्धां प्यावी असें नसून ती अजिबात पिऊंच नये असेंच असतें हें काय सांगायला पाहिजे ? तसेंच बहुभार्याकत्व व परींनीं व विषयोपभोगांनीं भरलेला स्वर्ग आपल्या धर्मांत गोंवणाऱ्या महंमद पैगंबराला जर " आमच्या दृष्टीनें ज्या कांहीं गोष्टी अनर्थमूल, पापें वाटतात, त्या गोष्टींचा त्यानें ( महंमदानें ) निषेध केला नाहीं, त्यांच्याकडे कानाडोळा केला, असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. अरबस्थानामध्यें अनेक पिढ्या तसल्या ( विषयलोलुपतेच्या ) गोष्टी प्रचारांत होत्या; त्या एकदम त्याला नाहींशा करतां येईनात म्हणून त्यानें त्या गोष्टींना होईल तितके प्रतिबंध, अडथळे चोहोंबाजूंनीं घालण्याचा प्रयत्न केला आहे " म्हणून जर कार्लाईल निर्दोषी समजतो(The Hero as Prophet by Carlyle पहा) तर मग केवळ निरुपायास्तव, अनेक अटी घालून एकादद्दुसऱ्या यज्ञांतली

हिंसा श्रीकृष्णांनीं चालू दिली म्हणून तोच तेवढा कसा त्याकामीं दोषी ठरतो बरें? ज्याप्रमाणें महंमदाची किंवा टेंपरन्स असोशिएशनच्या चालकांची खरीखरी इच्छा निराळीच असली पाहिजे हें त्यांच्या इतर शिकवणीवरून म्हणतां येईल तीच गोष्ट श्रीकृष्णाचे बाबतींतही खरी आहे. " महंमदी धर्मांतील विषयभराबद्दल पुष्कळ टीकाकारांनीं झोड उठविली आहे; पण ती गोष्ट अन्यायाची, विपरीत आहे " ( वे. नि. पा. ६७–६८ ) हेच शब्द श्रीकृष्णाचे बाबतींतही जर कोणी त्यांच्यावर टीकाच करूं लागेल तर–लागू पडतील. उलट " The message of the Prophet is a message of humanity and freedom to the whole race of man " म्हणून सिस्टर निवेदिताबाई जशा आपल्या " Web of Indian life " नामक पुस्तकाच्या २३४ पानावर महंमदाची स्तुति करतात तशीच बुद्धापूर्वी व जैनापूर्वींचें अहिंसामताचे प्रचारक व प्रवर्तक म्हणून श्रीकृष्णांचीहि स्तुति करणें वाजवी होणार आहे. शिवाय दुसरीहि एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे, व ती म्हणजे पांडव क्षत्रिय होते व त्यांना जगांत निर्माल्यवत् पडून न राहतां खरें खरें जगायचें होते. अर्थात त्या कामीं श्रीकृष्णांच्या मनांत कोणचे अथवा कशा प्रकारचे विचार घोळत असले पाहिजेत हे स्वामी विवेकानंदांच्या खालील उद्गारावरून समजून येणार आहे:—

" जगांत जर आम्हांला जगावयाचें आहे तर राजसगुणांचीहि वाढ आम्हीं केली पाहिजे. पण ती मांसाहाराशिवाय कशी होणार? अशोक राजानें कायदा करून लक्षावधि जीव वांचविले हें खरें; पण त्याबरोबरच हजारों वर्षें चालत आलेल्या दुसऱ्या प्रकारच्या यातनांच्या उत्पत्तीचीहि त्याचवेळीं सोय झाली नाहीं काय? कांहीं बकऱ्यांच्या हत्येमुळें पदरीं येणारें पातक व स्वताच्या अंगांत कुवत नसल्यामुळें प्रसंगीं स्वताच्या बायकोचीहि अब्रू रक्षण करतां येऊं नये अथवा पोटच्या पोरांच्या तोंडातला घास दुसरा जबरीनें उडवून नेत असतां त्याला प्रतिबंध करण्याचें सामर्थ्य नसावें ही स्थिती, या दोहोंपैकीं आपणांस काय पसंत पडतें? यांत आतां कोणतें पातक कोणत्याहून मोठें आहे? फारच झालें तर ज्यांना सात्विक गुणांची वाढ अवश्यक आहे, अशावरच्या जातीपैकीं

काहींनीं मांस खाऊं नये म्हणजे झालें. पण मांसाशन करूं नये अशी जबरदस्ती एकसहा सुरूं करणें म्हणजे राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या नाशास आपण होऊन बोलावणें पाठविणें आहे. ( " स्वा. वि. पत्रें " पान ६८ ) अर्थात् राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं, मानवी हक्कांच्या रक्षणासाठीं " यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते । हत्वापि स इमान् लोकान्न हंति न निबध्यते ॥ " अशी शिकवण शिकविणाऱ्या व खऱ्या कर्मयोगाची हातोटी सांगणाऱ्या श्रीकृष्णांनीं पांडवासारख्या क्षत्रिय वीरांना सरसहा मांसाशनाची बंदी करूं नये हें ठीकच नव्हे काय ? "क्षत्रिय मांस खातात म्हणून भिक्षुक त्यांच्या नांवानें खडे फोडतात....अरे, ईश्वर इतका कां मूर्ख आहे असें तुम्हांला वाटतें, कीं, मांसाच्या एका तुकड्यानें त्याच्या करुणेचा झरा सर्व एकदम आटून जाईल ! आणि तसें होत असेलच तर असला क्षुद्र ईश्वरच आम्हांला नको !" ( " स्वा. वि. पत्रें ." पा. ३८ ). तसेंच खुद्द रामकृष्ण परमहंस हे देवीच्या नांवानें त्यांना मांसाचे पदार्थ भक्तिपूर्वक दिल्यास ते ग्रहण करीत ( " स्वा. वि. पत्रें " पा. ६८ ), खुद्द गौतमबुद्ध—अहिंसेचा जगांतला अत्यंत थोर प्रचारक—डुकराच्या मांसाच्या अत्यशनानें मेला ही गोष्ट, व विवेकानंदासारख्या साधूंना—" From me no danger be to aught that lives " म्हणणाऱ्या साधूंनाही—मांसाशन बिनदिक्कत चालें, हें पाहिलें म्हणजे मति गुंग होऊन जाते, बुद्धि मागें सरते व लेखणी पुढें काम करित नाहीं. पण जें जसें झालें तसेंच घेऊन आपणांस पुढें चाललें पाहिजे. आमचें स्वताचें मत या बाबतींत जैनांच्या मतांप्रमाणें—अर्थात् त्यातला हास्यास्पद अतिरेक वर्ज्य करून—आहे व त्यांच्या जैनाचार्यांप्रमाणेंच आम्हीही खालील प्रमाणें त्यांच्याच श्लोकांत म्हणून प्रस्तुत मुद्याचा समारोप करतों कीं,

" विचरति गिरिराजो जायते शीतलाग्नि—
स्तरति पयसि शैलः स्याच्छशी तीव्रतेजः ।
उदयति दिशि भानुः पश्चिमायां कदाचित्
न तु भवति कदाचिज्जीवघातेन धर्मः ॥ "

( " श्रीयुत ता. ने. पांगळकृत जैनधर्म " पान ४७ )

अर्थात् " हिंसायुक्त यज्ञाच्या विरुद्ध श्रीकृष्णाच्या कालानंतर हळू हळू लोकमत वाढूं लागलें " ( म. उ. पा. ८८५ ) हीच गोष्ट खरी. श्रीकृष्णांनीं आपल्या उपदेशांत ह्या भावी अहिंसेच्या जोरदार मताकडे व हल्ल्याकडे लक्ष देऊन अहिंसेचेंही तत्त्व गोंवलें आहे. व " त्यांनीं लहानपणींच इंद्राचा यज्ञ करण्याऐवजीं गिरियज्ञ करा असा गोपांना उपदेश केला होता हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. " ( म. उ. पा. ८८४ ). पण मोठेपणीं आपल्या आसपास घडणाऱ्या हजारों यज्ञयागांच्या चटकेच्या तडाक्यांतून त्याला पांडवाना अजिबात वाचवितां येईना व त्यासाठीं ते दोषी कसे ठरूं शकत नाहींत? तसेंच इतरही त्यांच्या मनांत कोणचे विचार आले असतील, तेहि आम्ही वर सांगितलेंच आहे. पण ते दोषी नसले तरी, एक घडाडीचे सुधारक या नात्यानें त्यांची या बाबतींतली—या अहिंसामताचे बाबतींतली—कामगिरी मवाळच ठरते, व तें अहिंसामत आपण हिंदुलोक बौद्ध व जैन यांच्यापासूनच पुष्कळसे शिकलों आहों अशी प्रांजळ कबुली व स्पष्ट अभिप्राय द्यायला आम्हांला कोणतीच हरकत वाटत नाहीं. ज्ञानेश्वरांनीं आपल्या ओंव्यांतून प्रभूंचें हृद्गत सांगितलें असेल. पण ज्या प्रभूंचें म्हणून त्यांनीं हृद्गत सांगितलें ते त्या कामीं मवाळच होते—कारण बौद्ध किंवा जैनाइतकेंच तीव्रमत त्यांचें असतें तर त्यांना, त्यांच्या आज्ञा शिरसावंद्य मानणाऱ्या पांडवांना, सहज बंदी करतां आली असती, पण ती त्यांनीं केली नाहीं व म्हणूनच ते या बाबतींत मवाळच ठरतात—व खुद्द ज्ञानेश्वरांच्या वाणींत जी इतकी अहिंसा चमकत आहे त्याला पुष्कळसें कारण म्हणजे ही बौद्ध व जैन यांची शिकवणच होय, असें आम्हांस वाटतें. पण त्यांच्याच काय, बौद्ध व जैनानंतरच्या प्रत्येक कवीच्या उक्तींत याबद्दल तसेंच ओज असून, सरतेशेवटीं बुद्धाला, त्याच्या ह्या दणदणीत अहिंसामताच्या विजयाबद्दल व विजयामुळें, लोकांनीं शेवटीं डोक्यावर घेऊन नाचविलें आहे, ईश्वरावतार म्हणून स्तविलें आहे, व जयदेवासारख्या कवींनीं "गीतगोविंद" सारख्या काव्यांतून त्याच्या कामगिरीचें उदात्त वर्णन करून त्यास अजरामर करून टाकलें आहे, असा हा इतिहास आहे. असो. आतां आपण परत गीतेकडे वळूं या.

यज्ञयागांच्या हिंसाप्रधान व काम्य क्रिया त्यावेळीं प्राबल्यांत असून प्रवृत्तिच्या अतिरेकाच्या टोकाला गेल्या होत्या. व म्हणूनच भगवंतांना

याकामीं त्यांना मागें खेचून आणून, नीट सरळ मार्गास लावून मध्यबिंदु-वर स्थिर करावें लागलें, व एकंदर कर्मयोगाच्याच उपदेशास प्रभु गीतेंत अथपासून इतिपर्यंत प्रवृत्त झालेले असल्यामुळें यज्ञच काय पण दान, तप, इत्यादि कोणत्याही विहित क्रिया "संगं त्यक्त्वा फलानि च " कराव्याच कराव्या " हा चांग निरोपु माझा ॥ " हेंच त्यांचें अखेरपर्यंत सांगणें व मत आहे, किंबहुना, अत्यंत जाज्वल्य कर्मोपदेश हा गीतेचा एक बिनमोल विशेष आहे, श्रीकृष्णाची एक अलौकिक कामगिरी आहे. कारण वैदिक जसे त्यावेळीं प्रवृत्तिच्या प्रबल टोकास धांवले होते व म्हणूनच भरंगळले होते, तसेंच वेदांतीही निवृत्तिच्या अतिरेकास जाऊन तप, संन्यास, (सर्वकर्म)त्याग, इत्यादिकांच्या गोष्टी बोलूं लागले होते. कांहीं अंशीं सांख्यांची व योग्यांचीही अशींच मतें होतीं. तेव्हां तप म्हणजे काय, संन्यास कशास म्हणतात, सर्वकर्मत्याग शक्य आहे काय, नसल्यास मग त्याग कशाचा करावा, म्हणजेच त्यागाची खरी व्याख्या काय, इत्यादि गोष्टींचा विचार करणें भगवंतास भागच होतें, याकामीं संन्यास, सांख्य, तप, इत्यादिकांची योग्यता भगवान् जाणून होते, व त्यानेंहि मोक्ष मिळेल एथपर्यंतसुद्धां कबुली देणें त्यांना भागच होतें. कारण तीं तीं मतेंही तितकींच जोरदार होतीं, व त्यांचें निवृत्तिपर तत्त्वज्ञानांतील सत्यही नाका-रतां येणें शक्य नव्हतें. तेव्हां " संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।" किंवा " यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते । " अशी तर कबुली त्यांना सुरवातलाा द्यावीच लागली. किंबहुना—"यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव " किंवा " सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः । एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥" इतका अभेद मानण्या-पर्यंत—अर्थात् तात्त्विकदृष्ट्या ते एकच आहेत असें सांगण्यापर्यंत—प्रभूंची मजल गेलेली आहे, व ती योग्यच आहे. कारण सर्वांचें अंतिम ध्येय एकच म्हणजे मोक्षच—आहे ह्यांत कांहीं शंका नाहीं, व ह्या अर्थानें त्या सर्व मार्गांत अभेदच आहे. " तेव्हां भगवद्गीतेच्या काळीं सांख्य हे वैदिक मार्गींच संन्यासी होते " ( म. उ. पा. ७७४ ) असें 'मानण्या'चेंच कारण नाहीं असें आम्हीं मागें म्हटलें आहे तें यासाठींच. त्यांचें ऐक्य जें गीतेला दाखवावयाचें आहे तें व्यावहारिक नसून पारमार्थिक अथवा ध्येयाच्या दृष्टीनें दाखवावयाचें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. नाहींतर

व्यावहारिकदृष्ट्या सांख्य हे संन्यास घेणारे नसत तर उलट धर्मध्वज जनकाप्रमाणें, "त्रिदंडादिषु यद्यस्ति मोक्षो ज्ञानेन कस्यचित् । छत्रादिषु कथं न स्यात्तुल्यहेतौ परिग्रहे ॥ " असाच वाद घालणारे व सात्विक अट्टाहास करणारे होते. आणि म्हणूनच—" तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ॥ " म्हणणाऱ्या भगवंतांनीं सांख्यमताला इतकें उचलून धरलें आहे. अस्तु.

तथापि, संन्यास, त्याग, तप, इत्यादिकांच्या कल्पना श्रीकृष्णाच्या—कर्मयोगप्रतिपादक भगवंतांच्या—कांहीं निराळ्याच आहेत व सर्वकर्मसंन्यास होणें अशक्य आहे, व तें नुसते थोतांड आहे, असें म्हणण्यापर्यंत त्यांची घडाडी जाऊन पोहोंचली आहे. ती कशी ती आतां आपण क्रमाक्रमानें पाहूं:—

भगवद्गीतेचा अटरावा अध्याय याकामीं आपणांस फार उपयोगी पडणार आहे. त्याच्या प्रारंभींच अर्जुनानें—

" संन्यासस्य महाबाहो तत्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥१॥ "

असा स्पष्ट सवाल भगवंताना पुन्हां एकदां टाकला आहे. व त्यावर भगवंतांचें उत्तरहि ऐकण्यासारखें आहे. ते म्हणतातः—

" काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥ "

अर्थात् संन्यास म्हणजे सर्वकर्मसंन्यास नव्हे, तर काम्यकर्मांचा संन्यास होय, व त्याग म्हणजे सर्वकर्मांचा त्याग नव्हे, तर सर्व कर्मांच्या—अर्थात् राहिलेल्या नित्यनैमित्तिक कर्मांच्या—फलांचा त्याग म्हणजेच त्याग होय असें भगवान् म्हणतात; व ज्ञानेश्वरांनींही तेंच भगवंतांचें म्हणणें आपल्या सुंदर दृष्टांतयुक्त ओंव्यांनीं खुलवून सांगून, याप्रमाणें सर्व ' कर्मजात निमालिया ' ' आत्मज्ञात गिंवसित ' कसें ' अपैसें ये ' तें सांगितलें आहे. ते म्हणतातः—

"हा संन्यासु जै संभवे । तै काम्य बाधूं न पवे । निषिद्ध तंव स्वभावें । निषेधें गेलें ॥ आणि नित्यादिक जे असे । तें येणें फळत्यागें नासे । शिर लोटलीया जैसें । येर आंग ॥ मग सस्य फळपाकांत । तैसें निमा-

क्रिया कर्मजात । आत्मज्ञान गिंवसित । आपैसें ये ॥ ''—असो. पण ही नित्यनैमित्तिक सत्कर्में जरूर केलीच पाहिजेत, कारण तीं चित्तशुद्धीला कारण होतात—'पावनानि मनीषिणां' आहेत, व जोंवर निरिच्छवृत्ति बनली नाहीं, नैष्कर्म्यवृत्ति खरी बाणली नाहीं, आत्मज्ञानाचें दार्ढ्य, आत्मतृप्ति व आत्मसंतुष्टता हीं जोंवर प्राप्त झालीं नाहींत तोंवर कर्मांचा त्याग करणें हें मौर्ख्य आहे, किंबहुना, नैष्कर्म्यावस्थेंत पोंचलेला ज्ञानीही जर प्रकृतिच्या जोरानें कर्में करतो, तर देह आहे तोंवर कर्में करीत नाहीं किंवा करणार नाहीं हें बोलणें म्हणजे शुद्ध बरळणें आहे, असें भगवान् म्हणतात. मग सामान्यजनांनीं तर राहोच पण ज्ञान्यांनीही कर्मयोगाचें आचरण करणें उचित नव्हे काय ? पण त्या ज्ञान्यांची गोष्ट घटकाभर बाजूस ठेवली तरी बाकीच्यांची काय वाट ? त्या ब्रह्मपदावर जाऊन बसण्यास वेदांती किंवा सांख्य हे ज्ञानाच्या जोरावर भुर्कन भरारी मारून जातील. पण मुंगीच्या पावलांनीं चालणाऱ्या इतर जीवमात्रांनीं काय करावें ? अर्थात भगवंतांनीं भक्तिमार्ग हा जसा एक त्यांसाठीं प्रतिपादिला तसाच कर्ममार्ग—कर्मयोगमार्गही एक प्रतिपादिला आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. भगवंतांचें हें म्हणणें सर्व भगवद्गीतेभर पसरलेलें असल्यामुळें त्याचा अधिक विस्तार न करतां त्यांचे कांहीं तत्संबंधी श्लोक व ज्ञानेश्वरांची थोडीशी टीका देऊन आम्ही हा मुद्दा संपवितों. भगवान् म्हणतातः—

'' न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
नच संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥
नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥
नियतं कुरु कर्म त्वं कर्मज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥
तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥ ''

(भ. गी. अ. ३)

ह्याशिवाय ह्या कर्मयोगानेंच जनकादिकांना कशी सिद्धि मिळाली व खुद्द भगवान्‌ही कसें कर्मयोगाचे जळजळीत आचरणकर्ते आहेत तें देवानीं अर्जुनाला सांगितलें आहे. तसेंच १८ व्या अध्यायांत देव म्हणतात:—

“ एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥
नियतस्य तु संन्यासः कर्मणः नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥
नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥ ”

या सर्व विषयांवर व श्लोकांवर ज्ञानेश्वरांचें भाष्यही फार सुंदर आहे. परंतु विस्तारभयास्तव त्यातून कांहीं थोडक्याच वेंचक शेलक्या ओंव्या देतों:—

“ कीं प्राप्त कर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होइजे । हें अर्जुना वांया बोलिजे । मूर्खपणें ॥ देखें विहितकर्म जेतुलें । तें सगळें जरी वोसंडिलें । तरी स्वभाव काय निमाले । इंद्रियांचे ? ॥ हें न ठकेचि जरी कांहीं । तरी सांडिलें तें कायी ? । म्हणोनि कर्मत्यागु नाहीं । प्रकृतिमंता ॥ उचलिलें वायुवशें । चळे शुष्कपत्र जैसें । निचेष्ट आकाशें । परिभ्रमे ॥ तैसें प्रकृति-आधारें । कर्मेंद्रियविकारें । नैष्कर्मीहि व्यापारे । निरंतर ॥ म्हणऊनि संगु जंव प्रकृतिचा । तंव त्यागु न घडे कर्माचा । ऐसियाही करूं म्हणती । तयांचा । आग्रहोचि उरे ! ॥ म्हणोनि जें जें उचित । आणि अवसरें करूनि प्राप्त । तें कर्म हेतुरहित । आचरे तूं ॥ देखें अनुक्रमाधारें । स्वधर्मु जो आचरे । तो मोक्षु तेणें व्यापारें । निश्चित पावे ॥ ”

( भ. गी. अ. ३ ).

“ आणि हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची । खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ! ॥ मृत्तिकेचा वीट्टु । घेऊनि काय करील घटु ? । केउते तंतु पटु । सांडील तो ? ॥ तैसा शरीराचेनि आभासें । नांदतु जंव असे । तंव कर्मत्यागाचें पिसें । काइसें तरी ? ॥ या शरीराचेनि मिसकें । कर्म लागलें असिकें । जिता मेलिया न ठाके । इया रीती ॥ जे श्वासो-

श्वासवरी । होय निजेलियाहि वरी । कांहीं न करणेंचि परी । होती जयाची ! ॥ ”

( अध्याय १८ )

अर्थात् कर्मफलाचा त्यागी तोच खरा त्यागी होय:—

“ म्हणोनि इया परी जगीं । कर्मे त्यजी तो महात्यागी । येर मूर्छने नांव रोगीं । विसांवा जैसा ! ॥”

असो. अशाप्रकारच्या या कर्मयोगप्रतिपादनाला अर्थात् सांख्य-मताचा भगवंतांना फारच उपयोग झाला आहे. सांख्यांच्या त्रिगुणांचा अंगिकार करून भगवान् स्पष्ट म्हणतात कीं:—

“ न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः ॥ ”

अर्थात् ह्या त्रिगुणांनीं सर्व प्राणीमात्रच नव्हे तर त्यांचें सुख, त्यांची बुद्धि, त्यांची धृति, त्यांची मति, त्यांचा आहार, त्यांचें कर्म हें, किंबहुना, सर्वच गोष्टी म्हणजे सर्व ब्रह्मांड कसें व्यापलें आहे व त्रिगुणगुणमयी माया-रूप ‘ कोल्हाटीण ’ ह्या विश्वाचा खेळ कसा खेळते आहे* हें पाहण्याची मोठी मौज आहे. कर्तेपणा प्रकृतिकडे व आपण केवळ द्रष्टे आहोंत हें जाणल्यावर किंबहुना “ अहंकारं तथा कर्ता ” इत्यादि “ पंचैतानि कार-णानि सर्वकर्मणां सिद्धये ” सांख्यांच्याकडून कळली म्हणजे, अहंकर्तृ-त्वाचा गर्व कुठें राहिला ? व मग त्यांच्या फळांची तरी आशा कशाला राहील ? अर्थात् याप्रमाणें अहंकाररहित, फलाशारहित व द्रष्टेपणानें केवळ ईश्वराज्ञा म्हणून कर्तव्यासाठीं कर्तव्यकर्म केलें कीं तेंच—तें स्वधर्म-कर्मच मोक्षाला नेणारें आहे, असें भगवंतांचें निश्चयपूर्वक सांगणें आहे.

“ स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते पराम् ” कारण स्वकर्म वरील-प्रमाणें योग्य रीतीनें करणें ही त्या प्रभूची पूजाच होय—‘ अभ्यर्चना ’ होय. इतकेंच नव्हे तर त्या परमेश्वराचे मनोगतांतल्या इच्छेची खूणच पाळणें होय. मग याप्रमाणें केल्यावर तो परमात्मा दूर आहे काय ?:—

“ अगा जयाचें विहित । तें ईश्वराचें मनोगत । म्हणोनि केलिया

* टीप—“त्रिगुणगुणमाया । आली कोल्हाटिण खेळाया”–एकनाथ.

निभ्रांत। सांपडेचि तो ॥ म्हणोनि विहित क्रिया केली। नव्हे, तयाची खूण पाळली। जयापासोनि का आली। आकारा भूतें ॥ तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा। पूजा केली होय अपारा। तोषालागीं !॥"

(ज्ञानेश्वरी अ. १८)

अर्थात् याप्रमाणें संतुष्ट झालेला तो परमात्मा जगन्निवास मग मोक्षच देईल हें काय सांगायला पाहिजे ? असो.

पण कर्तव्यकर्माचें आचरण अधिक जोरदारपणानें होण्यास परमेश्वराचें अधिष्ठान, जीवात्म्यैकभावना, व ईश्वराज्ञा आणि ईश्वरार्पणबुद्धि हीं जरूर पाहिजेत. व तीं खऱ्या कर्मयोग्याचे ठायीं असतातही. "धर्मं चरामि सुश्रोणि न धर्मफलकारणात्" ह्याप्रमाणें धर्मासाठींच धर्माचरण करणारे धर्मराजांनीं उत्तर दिलें, कारण त्यांची निष्ठा त्याधर्माचे ठायीं व ती करण्यास सांगणाऱ्या प्रभूचे ठिकाणीं तितकीच दृढ होती. तीच गोष्ट ह्या:कर्तव्यकर्माचें बाबतींतही लागू आहे. निर्लोभ, निर्व्याज, असें प्रेमासाठींच प्रभूवर प्रेम करणारे प्रभूचें भक्तच "सुखदु:खे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ" अशाप्रकारचे छातीठोक कर्तव्यकर्म बजावूं शकतील. कारण प्रभूच्या प्रेमापुढें व प्रभूच्या कार्यापुढें त्याना देहाचीही पर्वा नसते ! पण अर्थात् ह्याला: जगत्कारणकर्ता असा प्रभू मानला पाहिजे. ही उणीव सांख्यामध्यें होती व म्हणूनच सांख्यांचें खंडन पुढें झालेलें आहे. सर्व मतांचा समन्वय करावयास बसलेल्या प्रभूनीं ही उणीव काढून टाकली, व क्षराक्षरांहून पलीकडे असूनही "यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥" असा उत्तम पुरुष अथवा पुरुषोत्तम मानलेला आहे. सांख्य हे द्वैती होते व निरीश्वरवादीही होते. त्यांना पुरुषाहून वेगळा ईश्वरच ठाऊक नाहीं अथवा मान्य नाहीं. वेदांती–व वेदांताला अनुसरणारी व उपनिषद्रूपधेनूचें दुग्ध सर्व जगास देणारी गीता–हीं अद्वैती व सेश्वरवादी आहेत. त्यांची उडी आणि भरारी सांख्यांच्या फार पुढें आहे. सांख्यांना ती समजली नाहीं–तितकी आकलनशक्ति त्यांचेठायीं नव्हती––म्हणून ते मागें पडले. सांख्यांच्या पुरुषप्रकृतीला दोघांनाही भगवंतांनी प्रकृतिमध्येंच घातलें आहे:–

"भूमिरापो नलोवायुः खंमनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् " ॥ ५ ॥
( भ. गी. अ. ७ ).

याप्रमाणें सांख्यांच्या प्रकृतिपुरुषाला अपरा व परा किंवा गौणी व श्रेष्ठा प्रकृतीमध्यें घालून भगवान् शेवटीं म्हणतात कीं, पण ह्या माझ्याच प्रकृति ना? अर्थात् "अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥" इतकेंच नव्हे तर हाच अर्थ ते—

" मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥
ये चैव सात्विकाभावा राजसास्तामसाश्चये ।
मत्त एवेति तान्विद्धि " ह्यांत आणीत आहेत.

अर्थात त्रिगुणगुणमयी माया अथवा तिनें नटलेलें जग हें प्रभूचेंच अपररूप आहे. पण ह्या बाह्यरूपाला चकून अंतर्वस्तु चुकली कीं डाव हुकला हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! अस्तु. असा हा ऐक्याचा व त्यांतल्या लीलांचा खेळ आहे. तो बोलावा व सांगावा तितका थोडाच आहे. एकीकडे परमेश्वर, एकीकडे प्रकृति, " आपण कोण चोर । आणिला मध्यें ? " कारण आपण वेगळें नाहींच. " जीवो ब्रह्मैव नापरः " अशी ही मौज आहे. ती नीट समजली, उमजली, व पचनीं पडली कीं मग निरहंकार, निष्कामवृत्तीनें व ईश्वरार्पण बुद्धीनें, ईश्वराचा हुकूम म्हणून धडाडीनें कोणचेंहि कार्य झालेंच पाहिजे ! आतां ह्या कर्तव्यकर्माच्या आचरणाच्या प्रसंगांत नानाप्रकारचे सुखदुःखाचे प्रसंग येणारच; पण त्यावेळेस चित्तवृत्ति बिलकुल ढळूं न देतां धडाडीनें कार्यच करीत राहण्यास " अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें " हें प्राप्त झालें पाहिजे. म्हणून भगवंतांनीं स्थिरचित्तकारी पण अकष्टप्रद अशीं कांहीं योगाचीं सूत्रेंहि गीतेच्या ६ व्या अध्यायांत सांगितलीं आहेत. महाभारतांत ज्याप्रमाणें योग्याच्या अधिक कष्टदायक क्रिया, ऋद्धिसिद्धि, किंवा दर्शनें वर्णिलीं आहेत तशीं इथें बिलकुल नाहींत. मात्र " यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणाऽपि विचाल्यते ॥ " अशी स्थिति योग्याला प्राप्त होऊं शकते. अर्थात् याहून अधिक काय

पाहिजे ? " मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः । आगमापायिनोऽनित्यास्तान् तितिक्षस्व भारत ॥ " असें म्हणणाऱ्या प्रभूस याहून अधिक काय पाहिजे ? कारण–"यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ । समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥" असें तेंच आपणांस सांगतात. असो.

यानंतर या कर्तव्यकर्माच्या झगड्यांत प्राणावरही बेतण्याचा संभव असतो. म्हणजे वेळीं स्वताचा जीव द्यावा लागतो किंवा दुसऱ्याचा घ्यावा लागतो. अशावेळीं आत्म्याच्या अमरत्वाचें ज्ञान फार अवश्यक आहे. हा प्रसंग भगवद्गीतेंत अर्थात् प्रथमच आला आहे. म्हणून द्वितीयाध्यायांत प्रथम हेंच वेदांत्यांचें व सांख्यांचें ज्ञान घेतलें आहे. देव म्हणतातः–

" देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥
अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥
नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥
देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि " ॥ ३० ॥

असो. पण या सर्व मतांचा, वेद, वेदांत, सांख्य, योग, किंबहुना, भक्ति या सर्व मार्गांचा उपयोग शेवटीं कर्मयोगाच्या जळजळीत आचरणासाठीं किंवा आचरणाकडेच करावा असेंच शेवटीं भगवंतांचें गीतेंत सांगणें आहे. कारण विश्वाचा संसार चालावा, विश्वचक्र फिरत राहावें अशी त्याचीच इच्छा आहे, व तुम्ही नाहीं म्हणलात तरी प्रकृति–अगदीं तुमची प्रकृति सुद्धां तें फिरविल्यावांचून राहणार नाहीं व राहातही नाहीं ! मग उगाच तिच्या उलट जाईन म्हणण्यांत अर्थ काय राहिला ? त्यापेक्षां तेंच नीट कर्माचरण करून—

" कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणिच कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ "

असा धन्यवाद देवाकडून मिळविणें चांगलें नव्हे ! असो. याठिकाणीं हेंहि सांगितलें पाहिजे कीं, वरील सर्व मतांपैकीं एक वेदांच्या कर्मकांडाखेरीज बाकीच्या सर्व मार्गांनीं मनुष्यास मुक्ति प्राप्त होते हें भगवंतांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे. भगवद्गीतेच्या ६।७।८।९।१२।१३।१४ १५।१६ या अध्यायांतून वरील सर्व मार्ग व नीतीचा मार्ग यांचा विचार झाला असून वेदांत, सांख्य, योग, भक्ति व नीति या मार्गांनें मनुष्य ईश्वराप्रत जातो असें प्रभूंचें प्रांजल सांगणें आहे. पण या सर्वांनाहि जर प्रकृतीचा फेरा चुकत नाहीं, व तिच्या चक्रावर जर सर्व देहांच्या—अगदीं नैष्कर्म्यांच्याहि—क्रिया चालू आहेत तर, कर्मत्यागाच्या वल्गना फोल नव्हेत काय ? हेंच त्यांचें पुनः पुनः विचारणें आहे. आणि जर ही बडबड वृथा आहे, तर ज्ञान्यानेंसुद्धां लोकांना मार्ग दाखविण्यासाठीं कर्माचरण कां करूं नये ? असें तें विचारतात. बाकी "लोकेस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ । ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥" ह्या श्लोकावरील ज्ञानेश्वरांच्या टीकेवरून तरी सांख्यांच्या ज्ञानयोगाला ते अधिक महत्त्व देतात असें दिसतें. आणि एका दृष्टीनें जरी तसें असलें तरी त्यांनींही कर्मेंच करावींत—न करणारे दुराग्रही, गांवढे, मूर्ख होत इत्यादि प्रभूंच्या बोलांवरून व इतरहि उदात्त उपदेशावरून ते शेवटीं कर्मयोगाचीच तरफदारी करणारे आहेत हें उघड होतें. तसेंच सहाव्या अध्यायांतील योगाच्या बाबतींतही शेवटीं श्रेष्ठ योग्यासंबंधीं बोलतांना "आत्मौपम्येन सर्वत्र समंपश्यति योऽर्जुन" इत्यादि त्यांच्या उद्गारांवरून हटयोग व राजयोग, किंवा सगुणयोग व निर्गुणयोग हाही त्यांना माहीत असून त्यांतील उच्चयोग त्यांनीं अखेरीस दाखविला आहे हें उघड होतें. व तो वाचतांना शंकराचार्यांच्या अपरोक्षानुभूतींतील मार्गें दिलेल्या श्लोकांची आठवण होते. असो.

याशिवाय भगवंतांनीं उपदेशिलेल्या भक्तिमार्गाचा येथें स्वतंत्र विचार करणें जरूर आहे; कारण जसा कर्मयोग हा त्यांचा विशेष आहे तसेंच भक्तिमार्ग हीही एक त्यांची अद्वितीय, अमूल्य व अलौकिक कामगिरी आहे. तत्संबंधींचें वर्णन आपण श्री. वैद्यांच्या तोंडूनच ऐकूं:—

" भक्तिमार्गाचा अथवा भागवतधर्माचा प्रथम उपदेष्टा श्रीकृष्ण आहे

असें आमचें मत आहे...संन्यास, योग किंवा यज्ञादि कर्मे हीं साधनें सर्वांस सुलभ व मोकळीं नाहींत. यज्ञयाग हजारों रुपयांच्या खर्चाशिवाय किंवा शास्त्राच्या सूक्ष्म ज्ञानाशिवाय होऊं शकत नाहींत. तसेंच संन्यास व योग बुद्धिवानाशिवाय आणि निग्रहवानाशिवाय इतरांस प्राप्य नाहींत. तेव्हां द्रव्यहीन, बुद्धिहीन, संसारांत मग्न झालेल्या जीवास कांहीं तरणोपाय आहे कीं नाहीं हा प्रश्न त्यावेळीं विशेष रीतीनें लोकांपुढें उभा होता. भारती आर्य हिंदुस्थानांत आले त्यावेळीं त्यांच्यांत तीन वर्ण होते. हिंदुस्थानांत आर्यांची, विशेषतः चंद्रवंशी क्षत्रियांची वस्ती सर्व ठिकाणीं पसरली, तेव्हां चौथा शूद्रवर्ण त्यांच्यांत येऊन मिळाला. याशिवाय अनेक मिश्रवर्णही उत्पन्न झाले. बहुतेक वैश्य कृषि करूं लागल्यानें वेदांपासून व शिक्षणापासून हळूहळू दुरावले. स्त्रिया सर्व वर्णांच्या होऊं लागल्यानें त्याही पुष्कळशा अशिक्षितच राहिल्या. अशा प्रचंड जनसमूहास यज्ञ, संन्यास, अथवा योग, हे मार्ग साहजीक बंद झाले. आणि हे लोक मोक्षास जाण्यास योग्य नाहींत असें मत विशेषतः ब्राह्मणक्षत्रियांत प्रचलित होऊं लागलें. श्रीकृष्णाची सामान्य जनसमूहावर विलक्षण प्रीति होती...त्याचें आयुष्य लहानपणीं स्त्रिया, वैश्य, व शूद्र यांतच गेलें होतें, व हे लोक देवावर निःसीम, निर्हेतुक प्रेम कसें करतात, हें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें होतें; तेव्हां अशा स्थितींत भक्तिमार्गानें स्त्रिया, वैश्य, व शूद्र किंबहुना चांडाल परमगतीला जातील असें त्यानें भगवद्गीतेंत स्पष्ट सांगितलें यांत नवल काय ? पुण्यब्राह्मण व भक्तराजर्षि या दोन कोट्या त्यावेळीं समाजांत निराळ्या दिसत होत्या. एक संन्यास किंवा तप यांचें अभिमानी तर दुसरे अश्वमेधादि मोठमोठ्या यज्ञांचें अभिमानी होते. हेच मोक्षास जातील, इतर जाणार नाहींत अशी त्यांची समजूत होती. हे लोक ईश्वरभक्तीनें परमगतीला जातीलच, पण—" स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परांगतिम् " असें श्रीकृष्णानें छाती ठोकून सांगितलें." (म. उ. पा. ८७७–८७९). अर्थात् यांत भगवंतांचा त्या लोकांबद्दल उदात्त कळवळाच दृष्टीस पडतो. व इतर सर्व मार्ग बाजूस सारून हाच मार्ग कां विशेष फोंफावला व उत्कर्ष पावला हेंहि त्यानें उघडच होत आहे. सामान्य बावळट दिसणाऱ्या लंगोट्या मावळ्यांचे ठायींचें शिवबाला जशी एकनिष्ठ भक्ति दिसून आली व त्यांतच जसे तानाजीसारखे वीर त्यानें निर्माण केले त्याप्र-

माणेंच या साध्या लोकांतून सुद्धां भक्तीचें दार्ढ्य असतें हें दाखवून त्यांतूनच चोखामेळा, सांवता, सेना, गोरा, नामा, तुका, शेखमहंमद, इत्यादि कित्येक भक्तरत्नें त्यांनीं निर्माण करून दाखवलीं. "मांहि पार्थ व्यपाश्रित्य" इत्यादि श्लोकांवरील ज्ञानेश्वरांची टीकाही फारच बहारीची आहे. ती विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. पण ती वाचकांनीं जरूर मुळांतूनच वाचावी अशी आमची त्यांस आग्रहाची शिफारस आहे. असो. याप्रमाणें हा भगवद्गीतेचा इतिहास असून त्याचा समारोप आपण श्रीयुत चिं. वि. वैद्यांच्या शब्दांच्या सारांशांत करूं:—

"वैदिक कर्माभिमान्यांची कर्मनिष्ठा, सांख्यांची ज्ञाननिष्ठा, योगाभिमान्यांचा चित्तनिरोध, आणि वेदांत्यांचा संन्यास हें सर्व त्यानें मान्य केलें. पण इतिकर्तव्यता काय ती हीच असें जें प्रत्येक मत प्रतिप्रादित होतें त्याचा त्यानें निषेध केला. कारण कर्म सुटणें किंवा सोडणें अशक्य आहे असा श्रीकृष्णाचा सिद्धान्त आहे, व कर्म अगदीं सोडून देणें अशक्य आहे ही गोष्ट त्यानें जगताच्या निदर्शनास चांगली आणून दिली. म्हणून वरीलपैकीं त्या त्या मतास योग्य महत्त्व देऊन सर्वांचा समन्वय करून त्यानें त्यांचा उपयोग आपल्या नव्या कर्तव्यसिद्धांताकडे केला. सारांश, वेद, वेदांत, सांख्य, योग, यांस योग्य सन्मान देऊन त्यांचा आपसांतील वाद किंवा आपलीच शेखी मिरविण्याचा प्रयत्न मिटवून प्रवृत्ति निवृत्तिरूप किंवा निवृत्ति प्रवृत्तिरूप कशी करावी व कर्तव्य कसें बजवावें हें त्यानें भगवद्गीतेंत सांगितलें. कर्म सिद्धीस जाईल किं नाहीं या विचारानें मन डगमगूं न देतां, आपलें कर्तव्यकर्म परमेश्वरावर भरंवसा ठेवून परमेश्वराच्या इच्छेनें मी करीत आहे आणि तें त्यालाच अर्पण करतों अशा भावनेनें करावें हा कर्तव्यसिद्धान्त अत्यंत उदात्त असून आजपर्यंत श्रीकृष्णावांचून दुसऱ्या कोणत्याही तत्त्ववेत्त्यानें उपदेशिला नाहीं असें म्हटलें असतां चालेल. तसेंच धर्म व नीति यांस अनुसरून—सदाचरणयुक्त गार्हस्थ्य संन्यासाइतकेंच मोक्षप्रद आहे, ही दैवी संपत्ति मोक्षासच नेणारी आहे, असें त्यानें आपलें मत स्पष्ट नमूद केलें...धर्माच्या बाबतींतही संन्यास व त्याग यांच्या खऱ्या व्याख्या सांगितल्या. तसेंच तप म्हणजे शरीरांतील भूतग्रामांचें हट्टानें कर्षण करून आत्म्यासही सर्वप्रकारें नाडणें नव्हे, तर योग्यनियमांनीं युक्त असे गुरुशुश्रूषादि शारीरिक, सत्यभाषणादि वाचिक, व प्रसादशांति

इत्यादि मानसिक तप होय असें त्यांनीं बजावून सांगितलें...ब्रह्मज्ञानाच्या बाबतींत सुष्टांचा कैवारी आणि दुष्टांचें शासन करणारा अशा ईश्वरी अवताराचे अथवा सगुण ब्रह्माचें सनातन व अव्यक्त ब्रह्माच्या अविरोधानें प्रतिपादन केलें. तसेंच आचांडालोद्धाराचें भक्तिमार्गाचें मत त्यानें बेधडक जगासमोर मांडलें. तत्त्वज्ञानाचें बाबतींत सर्व मतांचा समन्वय भक्तिमार्गाशीं केला. सर्वांत मुख्य गोष्ट ही कीं, श्रीकृष्णानें आर्य व आर्येतर यांस सारख्या प्रेमानें वागवून सर्वांस ईश्वर भक्तीचा मोकळा व सुलभ मार्ग दाखवून दिला." ( म. उ. पा. ८७६।७७।८१।९१।९२।९३ ) आणि हेंच त्याची महती आजवर टिकून रहाण्याचें कारण होय.

असो. या गीतोत्तमांतून बाहेर पडायचें आमच्या जिवावर येत आहे, पण पुढील हकीकतीच्या व भागांच्या कथनाकडे लक्ष देऊन तसें करणें आम्हांस भाग आहे, त्याला उपाय नाहीं. तथापि अशा ह्या गीतोत्तमाची सर्वांनीं असकृत् आवर्तनें करावीत, त्याचें मनन, अभ्यास, व निदिध्यास सतत चालवावा म्हणजे सर्वांचें सर्वप्रकारें ऐहिक व पारलौकिक कल्याण निःसंशय होईल असें सांगून व त्या गीतगायक भगवंताला अनन्य प्रणाम करून आपण पुढें जाऊं या.

भगवद्गीतेनंतर बौद्धांचा व जैनांचा हल्ला जुन्या वैदिक धर्मावर झाला हें आपणांस ठाऊकच आहे. बुद्धाला फुटून निघायला दोन कारणें विशेष झालीं. एक तर वैदिक यज्ञांतील हिंसा, व दुसरें जुन्या धर्मांतला जातिभेद. शिवाय कर्मठांचा चढेल कर्माभिमान व आपण हेच काय ते मोक्षास जाऊं ही भावनाही बुद्धाला चीड आणण्यास कारण झाली. पैकीं "स्त्रियो-वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यांति परांगतिम्" म्हणून भगवंतांनीं त्या कर्मठ व हट्टी ब्राह्मणक्षत्रियांचा गर्व कसा जिरविला तें आपण वर पाहिलेंच आहे. वैदिक यज्ञांतली हिंसा बंद करण्याचें बाबतींत मात्र त्याची कामगिरी वठावी तितकी जोरदार वठली नाहीं. तसेंच जातिभेद जरी जन्मजात नसला तरी गुणकर्मांवर बसवून ज्यानें त्यानें स्वजातिप्रमाणें कर्तव्य करावें म्हणून जातिभेदाची थोडीशी तरी छान त्यांत राहून गेलीच, निदान बुद्धासारख्या तीव्र मताच्या माणसाला ती खपणें शक्यच नव्हतें. "तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ" म्हणणारे भगवान् "Strictly Or-

thodox " नसले तरी तितके तडफीचे सुधारक त्या बाबतींत नव्हते असें म्हणणें भाग आहे. स्वामी विवेकानंद म्हणतातः—

" समष्टीच्या कल्याणाकरितां म्हणून व्यष्टीचे सारे वैयक्तिक हक्क समूळ बुडवून अथवा नियमांनी कायमचे जखडून टाकल्याचे परिणाम काय होतात, याचें आमचा सांप्रतचा समाज हें उत्तम उदाहरण आहे. आमच्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या मागें जन्मापासूनच शास्त्र हात धुवून पाठीस लागतें. त्यानें जन्मावें शास्त्राप्रमाणें, खाणें, पिणें, निजणें, बसणें, उठणें अथवा हजामत करविणें तीसुद्धां सशास्त्र झाली पाहिजे! एवढेंच नव्हें तर त्याला मरणें असेल तेव्हां त्यानें शास्त्राधाराप्रमाणेंच मेलें पाहिजे...... याचा परिणाम असा झाला कीं, वैयक्तिक हक्क बुडतां बुडतां ते इतके साफ बुडाले कीं त्याबरोबरच प्रत्येक व्यक्तीच्या स्वत्वासही कायमचा समाधि मिळाला. सर्व गोष्टी केवळ यांत्रिक रितीनें होत असतात; त्यांत व्यक्तीच्या स्वतंत्र कर्तबगारीस वाव असा कोठेंच नाहीं." (वि. पत्रें पा. ७९।८०) द्रोणाचार्य एकलव्याचा आंगठा तोडतात, राम शूद्रकाला शासन करतात, रामेश्वर भट्टासारखे व मंबाजी बुवासारखे तुकारामाचा छळ करतात व पंढरपुरचे बडवे चोखामेळ्याला नाना प्रकारे गांजतात ह्याचा अर्थ काय? ह्या सर्व गोष्टी काय दाखवितात? स्वामिजी पुढें म्हणतात:—

" केवळ नियमबद्ध चालणें, शास्त्राची रेषा केव्हांही उल्लंघन न करणें हेंच जर पुण्यकारक म्हटलें, तर एखाद्या झाडापेक्षां जास्त गुणवान आणि आगगाडीपेक्षां जास्त पुण्यवान असा एक तरी प्राणी मला दाखवा बरें! सृष्टीचा कायदा उल्लंघन केलेला असा एकही धोंडा अस्तित्वांत नाहीं." (स्वा. वि. पत्रे पान ८१) बुद्धाला जी चीड आली ती याचीच. असो. तसेंच दुसरीकडे स्वामी म्हणतातः—

" तुमच्या पूर्वजांनीं आत्म्याला सर्व स्वातंत्र्य दिलें, आणि त्यामुळें धर्माची वाढ झाली. त्यांनीं शरिराला पूर्ण पारतंत्र्यांत ठेवलें त्यामुळें समाजाची वाढ खुंटली." (स्वा. वि. प. पा. ४८) " सर्व सृष्टि ईश्वरस्वरूप आहे, हा आमचा सिद्धांत; पण व्यवहारांत पहावें तो कोण भेदभाव! केवळ परसेवेकरतां जगावें, हें तत्त्व पहिल्यानें हिंदुस्तानांतच जन्मास आलें, आणि व्यवहारांत पहावें तर आम्ही त्याला नित्य मूठमाती

देण्यास तयार ! " ( स्वा. वि. प. पा. ६० ). आतां " यथाधर्ममधर्मंच कार्यं चाकार्यमेव च । " ' ज्ञायते ' अशी सात्त्विक मति असून तिच्याही अनुरोधानें पाहिजे तर चालावें, "शुनिचैव श्वपाके च पंडिताः समदार्शिनः।"किंवा "सर्वभूतहिते रताः" हाच मनुष्यत्वाचा उच्चतम नमुना होय. भक्तिमार्गांत तर स्त्री, शूद्र, चांडाळादि सर्वच उद्धरून जाऊं शकतात, तसेंच जातिभेद व यज्ञयाग यांस अजिबात उडवून दिलें नाहीं तरी यज्ञावर बराच हल्ला करून वेदाना कमी योग्यतेवर आणून बसविणें, व जातिभेदाचीं बंधनें जरी समूळ उपटलीं नसलीं, 'totally root out caste' केलें नाहीं तरी ' he placed caste on a less untenable basis ' म्हणजे कृष्णांनीं तीं तितकीं करकचून बांधलेलीं नव्हतीं असें न्यायमूर्ति तेलंगासारख्यांनींही कबूल केलें आहे. पण त्यानंतरच्या आपस्तंब सूत्रांनीं व मनुस्मृतींनीं चीड येण्याइतकें वरील गोष्टींत निर्बंध घातल्यामुळें बुद्धासारख्याला शेवटीं त्यांतून फुटून निघून वेगळे होणेंच भाग पडलें. त्याची ती स्वतंत्र धडाचीची कर्तबगारी आपण आतां पुढील भागांत पाहूं. भगवद्गीतेचा, भारताचा, व भारतीय युद्धाचा काळ एकच असल्यामुळें, महाभारताचा विचार करतानांच त्या काळासंबंधीं आपण त्याचवेळीं बोलूं. चला तर वाचक, आतां बुद्धाची धडाडाची कामगिरी पहाण्यास चला !

---

# भाग ५ वा.



आतां आपणांस महात्मा गौतमबुद्धाच्या शिकवणीचा आणि त्याच्या बौद्धधर्माचा विचार करावयाचा आहे. हा शाक्यसिंह यशोधन नामक राजपित्याच्या पोटीं जन्मास आला. येशू ख्रिस्ताप्रमाणेंच त्याचें घराणें किंवा वंश विशेष कोणाला ठाऊक नव्हता. कपिलवस्तुनगरींत जन्मास आलेला हा राजपुत्र इतर राजपुत्रांप्रमाणेंच २९ वर्षें वयाचा होईपर्यंत वाढला–खेळला–व हंसला. त्याच्या बापाचा तो अत्यंत लाडका असल्यामुळें त्यानें त्यास अत्यंत सुखांत ठेवलें होतें. एका अत्यंत रम्य प्रासादांत गौतमाची–ह्या भावी धर्मप्रसारकाची–तरुण मूर्ति आपल्या अत्यंत प्रियतम

भार्येबरोबर आनंदानें कालक्रमणा करीत होती. पण मागे सांगितल्या-प्रमाणें एक रोगी, एक वृद्ध व एक मृत अशा तीन मानवांचें दर्शन तशाहि स्थितींत आणि बंदोबस्तांत त्यास होणें अपरिहार्य होतें. आणि गौतमा-सारख्या भावनाप्रधान जीवांना याहून अधिक काय पाहिजे ? " शुचीनाम् श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते । " अशा योगभ्रष्टावस्थेतल्या जीवांना राजवाड्याच्या अत्यंत उच्च गच्चीवर जरी नेऊन बसविलें किंवा सात महालांच्या आंत जरी सर्व सुखांत ठेविलें तरी " तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकं । यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ।।" ह्या भगवदुक्तीप्रमाणें आधींच वैराग्याची दारू ठासलेल्या त्यांच्या हृदयाला वरीलसारख्या देखा-व्याची एखादी ठिणगीही बस् होते. एके दिवशीं रात्रीं गौतम आपल्या प्रियभार्येसह आनंदांत निजला असतां, वरील देखाव्यांच्या चित्रांनीं सर्व मानवी जात व्यापलेली आहे व ती आपणांस उद्धारासाठीं अत्यंत करुण वाणीनें बोलवीत आहे असें गौतमास स्पष्ट ऐकूं आलें—भास झाला—व तो खडबडून जागा झाला व " आलों, भिऊं नकोस, " म्हणून त्यानें आश्वासन देऊन, आपल्या निद्रिस्त भार्येकडे व बालकाकडे शेवटचा प्रेमळ दृष्टिपात टाकून गौतमाची तरुण, तेजस्वी, पण वैराग्य-पूर्ण मूर्ति राजप्रासादाच्या बाहेर पडली ती कायमचीच पडली. सर्व जग—केवळ मानवी जातच नव्हे, तर सर्व जग—तापत्रयाच्या अग्नींत भाजून निघत आहे व तो ताप होईल तितका कमी करणें हें प्रत्येक मानवाचें कर्तव्य आहे, असा त्याचा ठाम सिद्धान्त झाला. " तपश्चर्येचीं हजार वर्षें व परोपकाराचा एक दिवस हीं सारख्याच योग्यतेचीं आहेत " असें त्यानें ठासून सांगितलें. त्यानेंही देहदंड, तप, योगाभ्यास केला नाहीं असें नाहीं. पण इतकें करूनही त्याच्या चित्ताची शांति होईना. ह्यावेळीं दुर्जय मनोवृत्तींच्या बरोबर—माराबरोबर—त्यास पुष्कळच झगडावें लागलें. " रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग " ही तुकोबांची मावी युक्ति त्यास प्रत्ययास आली, आणि हा झगडा जिंकल्यावांचून तरणोपाय नाहीं असें त्यास दिसून आलें, व त्याप्रमाणें तो त्यांनीं जिंकलाही. पण याप्रमाणें झगडा जिंकल्यावर पुढें काय ? व्यक्तिच्या बाबतींत व समाजाच्या बाबतींत त्याचे सिद्धान्त खालील प्रमाणें झाले:—

" गौतमबुद्धानें पुष्कळ दिवस तपश्चर्या करून आणि मनाशीं विचार करून असें ठरविलें कीं, हीं सर्व शास्त्रें आणि योगाभ्यासादि देहदंड उपयोगाचे नाहींत; उपनिषदांतल्यासारखे विचार तर फारच थोड्यांना समजण्यासारखे आहेत. त्याचा असा सिद्धान्त झाला होता कीं, मोक्ष मिळविण्याचें मुख्य साधन नीतीचें आचरण होय. त्याला चांगली प्रकृति ठेवावी, आशा जिंकावी, आपलें शरीर आणि मन शुचिर्भूत ठेवावें, आणि दयेचा परिघ अत्यंत विस्तृत करावा; त्यायोगानें मानवहृदयाची उन्नति करावी, आणि सर्व प्राणिमात्रांच्या जीवाला जपण्याची बुद्धि ठेवावी. त्याच्या धर्मांत सर्वांना थारा मिळे; श्रीमंत, भिकारी, विद्वान, अज्ञानी, कोणालाही ना नव्हती. हा धर्म पवित्रतेचा, आत्मशुद्धीचा आहे; म्हणजे आत्म्याची शुद्धि करा, दुर्गुणापासून दूर पळा, आणि सन्मार्गानें वागा हे त्याचे मुख्य तीन निर्बंध होते " ( बॉंबे गॅझेट ४ जून १८९५ ). इतकेंच नव्हे तर त्याचा धर्म अत्यंत सदयतेचा होता. " मनुष्यानें आपली आपण अंतर्दृष्टी केली पाहिजे ह्या त्याच्या मतानें लोकांना फार धीर येई; भीरु, अज्ञानी, लोकांना दहशत घालण्याकडे त्या बुद्धधर्माची प्रवृत्ति नव्हती. ह्या मताचें वास्तविक व निकट साम्य म्हटलें तर ' श्रद्धेनें सर्व कांहीं साधेल ' ह्या सेंटपॉलच्या मताशीं येईल. " (—ऱ्हाइस डेव्हिड यांची हिबर्ट लेक्चर्स पान १३६ ) तत्त्वज्ञानविषयकमतांच्या दृष्टीनें पाहिल्यास बुद्धानें विशेष अशी कांहींच प्रगति केली नाहीं. किंबहुना, " बुद्धानें तर सांख्ययोग वगैरेंतील सिद्धान्तापेक्षां चार्वाकांच्या मतांचेंच जास्त अनुकरण केलें. " ( वे. नि. पा. ४४ ) " ब्राह्मणांचा सर्व भर ऋषिप्रणीत वेदांवर, ते अपौरुषेय किंवा ईश्वरप्रणीत, तेव्हां ईश्वर आणि वेद दोन्हीला झुगारून दिल्याशिवाय ब्राह्मणांची पिरपिर चुकावयाची नाहीं; हें चार्वाकाचें मत होतेंच; पण त्यांत सद्वर्तनावर पाणी सोडलें होतें. त्या चुकीची बुद्धानें दुरुस्ती केली. " ( वे. नि. पा. ४८ ). अर्थात् "त्याच्या उपदेशाची मुख्य भर नीतिमत्तेवर होती व लोकांकडे त्याचा अतीशय ओढा होता. " ( वे. नि. पा. ४४ ). प्रो. मॅक्समुल्लरही म्हणतातः—

" Budha's glory consists not in having discovered new truths of metephysics but in having emphasised the ethical aspect of the upanishadas, at the time

when exclusive attention to dry forms and cumbrous rituals had robbed the Hindu religion of its life." ("Six Systems of Indian Philosophy" P.135) अर्थात् " Budhism was the child-the product of Hinduism." असें मि० ऱ्हाइस डेव्हिडसाहेब म्हणतात तें खरें आहे.

"स्वामी विवेकानंदांच्या खाजगी पत्रां"चें सूक्ष्म वाचन करणारास त्यांत बुद्धमतांतील सदयता, जातिभेदाविरुद्ध हल्ला, व आचांडाल उन्नतीची कळकळ दिसून येणार आहे. किंबहुना, यावेळीं भगवान गौतमबुद्धांची मूर्ति त्यांच्या मनश्चक्षूंपुढें सारखी उभी असावी असें उघड दिसतें. यासाठीं त्या पत्रांतून कांहीं वेंचक भाग आम्ही खालीं देतों; म्हणजे त्यायोगें बुद्ध-मताची कल्पनाही वाचकांस बरीचशी येणार आहे. स्वामीजी म्हणतात:-

" हिंदुधर्म व त्याचेंच प्रत्यक्ष स्वरूप जो बौद्धधर्म त्याचा आचार आपण जारीनें सुरू केला पाहिजे. आपल्या कार्याच्या पावित्र्याबद्दल अंतः-करणांत पूर्ण विश्वास, ईश्वरी साहाय्याबद्दल पूर्ण विश्वास व दरिद्री विपद्-ग्रस्त बांधवांस मुक्त करण्याकरितां पाहिजे तें करण्याची अलोट छाती अस-णारीं माणसें आम्हांला आज हवीं आहेत. आजपर्यंत हलक्या जातीचे म्हणून तुडविले गेलेल्या आपल्या बांधवांस त्यांच्या स्थितींतून मुक्त करणें, त्यांना सर्व प्रकारची मदत करणें, व सर्वत्र समभाव उत्पन्न करणें, हेंच ज्यांचें ब्रीद, अशीं माणसें आज आम्हांला हवीं आहेत.......

ज्यांनीं माझा उपहास केला त्यांच्याबद्दल मला मुळींच द्वेषबुद्धि नाहीं. तीं तर बुद्धिमत्तेंत अद्याप लहान मुलें आहेत ! लोकांनीं मोठे व शहाणे म्हटलें म्हणून खरें मोठेपण व शहाणपण प्राप्त होत नसतें. यांच्या स्वतःच्या उंचीवरून दिसणाऱ्या क्षितिजापलीकडे यांना जग ठाऊक नसतें. ....

हजारों वर्षें जुलमाखालीं भरडून निःसत्त्व, दरिद्री व कलाहीन झालेल्या आमच्याच बांधवांनीं फोडलेल्या टाहोनें यांची झोंपमोड होत नाहीं.... प्रत्यक्ष परमेश्वराचींच अनंत स्वरूपें, पण हजारों वर्षांच्या जुलमी रीतींनीं तीं आज भारवाहक जनावरें कशीं बनलीं आहेत, व त्यांना जीवसुद्धां नकोसा कां झाला आहे, याचा विचारसुद्धां या थोर म्हणविणाऱ्या व्यक्तींस शिवत नाहीं ! ज्यांनीं असल्या उपायांचें चिंतन करावें त्यांनीं असल्या क्षुद्रकीटकांच्या बडबडीकडे लक्ष देऊं नये, हेंच बरें !

सर्व समतेचें तत्त्व ज्यांत शिकविलें आहे, असा धर्म हिंदुधर्माशिवाय पृथ्वीच्या पाठीवर दुसरा एकही नाहीं! पण गरीब बिचाऱ्या मागसलेल्या वर्गावर एकसहा जुलूम करणारा धर्मही हिंदुधर्माशिवाय दुसरा नाहीं! बाबारे! यांत धर्माचा दोष नाहीं. तर धर्माच्या नांवाखालीं ज्यांनीं जुलूम करणारीं रूढिरूप शस्त्रास्त्रें निर्माण केलीं त्या भोंदूंचाच हा सगळा प्रताप आहे! असो. धीर सोडूं नको. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' या भगवंताच्या वाक्याचें स्मरण कर आणि कामासाठीं कंबर बांध. मला तर सारा जन्म हेंच काम करण्याची आज्ञा झाली आहे.....

जर कदाचित् भुकेनें व थंडीनें या देहाचा येथेंच पात झाला तर हिंदुस्थानच्या माझ्या तरुण मित्रांनों! मी तुमच्याकरितां एक वारसदारी मागें ठेवीन. गरीब, दुबळे, निराश्रित व जुलमांखालीं चेंगरलेल्या माझ्या बांधवांच्या सुखास तुम्ही आपलीं जीवितें वहा, हीच माझी तैनात. जा! या क्षणीं त्या पार्थसारथ्याच्या मंदिरास जा आणि माझा वारसा चालविण्याची शपथ वहा. म्हणजे तो अशरणांचा शरण, ज्यानें गोकुळांत गोपाळांची पाठ राखिली, जो अतिशूद्र गूहकाला निर्भरालिंगन देण्यास कचरला नाहीं, ज्यानें बुद्धावतारी वेश्येच्या आमंत्रणाचा प्रसन्नतापूर्वक स्वीकार करून तिचा उद्धार केला, ज्यानें समाजांतील अत्यंत तुच्छ समजल्या जाणाऱ्या भक्तांसाठीं अवतार घेतले,... तो भगवान् श्रीकृष्ण तुमचें साहाय्य करील...

हें एका दिवसाचें काम नाहीं. हा मार्ग चोहोंकडे कांट्याकुट्यांनीं खच्चून भरला आहे, पण भिऊं नका!... तुमच्या पाठीवर तो पार्थसारथी सायुध उभा आहे हें विसरूं नका. तर मग घ्या देवाचें नांव, आणि हजारों वर्षे सांचलेल्या पापांच्या या पर्वतप्राय राशीस द्या आग लावून, म्हणजे ती जळून खाक होईल! पण पुन्हां एकदां सांगतों कीं, बड्या लोकांच्या मदतीची अपेक्षा करूं नका, आणि गारठलेल्या अंतःकरणानें केलेल्या त्या वर्तमानपत्रांतील टीकांना भीक घालूं नका! ऊन, पाऊस, भूक, तहान, फार काय हा देहसुद्धां आपला म्हणूं नका! तो परमेश्वराच्या कार्यास अर्पण करा." (पत्र ४ थें.).

" हिंदुधर्मतत्वांचा आणि जातिनिर्बंधाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं.

समाजघटनेची क्रिया चालू असतां निरनिराळ्या वेळीं सोयीस्कर वाटलेल्या चाली प्रचारांत आल्या, व त्याच बळावत जाऊन त्याना धार्मिक बाह्य स्वरूप आलें आहे. भिक्षुकवर्गानें कितीही ओरड केली, तरी खऱ्या तात्त्विक हिंदुधर्माचा व जातिबंधनाचा संबंध सिद्ध होऊं शकतच नाहीं. जातिभेदानेंहि एकवेळ कार्य केलें आहे. पण तो आतां प्रेतवत् झाला असल्यामुळें त्याला अग्नि देणेंच इष्ट आहे! कारण आतां तो सडूं लागून त्याला घाण येऊं लागली आहे. तेव्हां त्याचें लवकरच दहन करावें हें बरें नाहीं काय? आणि हें करण्याचा उत्तम उपाय म्हणजे वेदांतधर्माचा प्रसार करून हिंदुस्थानांतील सर्व वर्गांस ' आपण कोण आहों ' याची जाणीव उत्पन्न करून देणें; हा होय...कोणतेंहि कृत्रिम निर्बंध समाजाला नेहेमीं घातकच होत असतात. समाजाची स्वतंत्रता व स्वावलंबन नष्ट झालें, कीं, ताबडतोब तो समाज कुजूं लागतो. तेव्हां या दडपणाचा नायनाट करण्यास प्रथम लागलें पाहिजे...पण अशा मार्गांत पडणारांनीं मोठें नांव,मोठी कीर्ति, प्राप्त करून घेण्याची इच्छासुद्धां बाळगूं नये !...गरीबांबद्दल खरी कळकळ, खालीं पडलेल्यास हात देऊन उभें करण्याची खरी इच्छा, व पवित्र वर्तन, हींच या तयारीचीं पूर्व अंगें होत...आपण अकिंचन आहोंत हा विचार-ही मनांत आणूं नको. पैशालाहि असाध्य अशा पुष्कळ गोष्टी केवळ पावित्र्याच्या जोरावर सिद्ध करतां येतात. " ( पत्र ५ वें ).

" चंद्रमौळी घरांतून आढळणारे, शेतांत व इतर हलकीं कामें करतांना आढळणारे लोक हेच आपलें खरें राष्ट्र होय, हें पक्कें लक्ष्यांत ठेव. राष्ट्रोन्नतीच्या गप्पा ठोकणारांनीं आजवर या वर्गाची अवहेलनाच केली आहे...राष्ट्राचें जीवित विधवापुनर्विवाहासारख्या क्षुद्र गोष्टींवर अवलंबून नसते, एवढेंच माझें म्हणणें आहे. खालच्या वर्गाची स्थिति हीच सर्व राष्ट्राच्या खऱ्या स्थितीची द्योतक आहे. त्या वर्गाच्या सांप्रतच्या स्थितींतून उद्धार होईल असे यत्न हवे आहेत...गरीबांचा, पतितांचा उद्धार हीच आपल्या निशाणाची खूण. " ( पत्र ६ वें ).

" प्रत्येक मनुष्यप्राणी म्हणजे ईश्वराचीच प्रतिमा होय, हें आमचें मूलतत्त्व आहे. सूर्य जरी एकच असला तरी निरनिराळ्या उपाधींनीं तो जसा निरनिराळा भासतो तद्वतच मनुष्याच्या आंतील ज्ञानज्योतिवरील पटलांचें ज्या ज्या मानानें उच्चाटण झालें असेल त्या त्या मानानें ती

त्याच्या कृतींत प्रतिबिंबित होत असते; पण यामुळें मूलस्वरूपाच्या अभेदतेंत प्रत्यवाय येऊं शकत नाहीं. तुम्ही कोणतीही सुधारणा घ्या, ती ह्याच मूलभूत तत्त्वास धरून चालेल तरच ती यशस्वी होईल...सर्व वेदांचें सार या वरील एक तत्वांतच आहे. अर्थात् या दृष्टीनें प्रत्येक मनुष्याचें इतर मनुष्याशीं काय कर्तव्य आहे, हें उघड होतें. उच्च स्थितींतील मनुष्यानें नीच स्थितींतील अज्ञ बांधवांचा द्वेष करणें, अथवा त्याला हेटाळणें, हें महापातक होय. कारण पहिल्याइतकाच दुसराही ईश्वराचीच प्रतिमा आहे...यावरून जातिभेदादि रूढींचें धर्मदृष्ट्या केव्हांही मंडन होणें शक्य नाहीं. किंबहुना, हिंदुधर्माचा म्हणजे वेददर्शनादिकांचा सगळा रोख उलट असले सर्व कृत्रिम भेद नष्ट करून अभेद स्थापण्याकडेच आहे....तेव्हां धर्माच्या नांवानें घेतलेली हीं खोटीं पांघरुणें प्रथम फेंकून द्या, व खऱ्या धर्मानें वागूं लागा, म्हणजे सर्व कांहीं आपोआप नीट होईल मनुष्य मात्रांत सदैव असणाऱ्या ज्ञानज्योतिभोंवतालचें आवरण निघून जाऊन तिचा प्रकाश फांकणें, याचें नांव शिक्षण. तसेंच मनुष्यमात्रांत सदैव वास करणाऱ्या ईश्वरत्वाभोंवतालचें आवरण निघून जाऊन त्याचें ईश्वरत्व त्याच्या कृतींत प्रतिबिंबित होणें, याचें नांव धर्म....तेव्हां भटाभिक्षुकांस धर्माच्या नांवाखालीं असला सांवळागोंधळ घालण्याचा काय अधिकार पोंचतों याचा तूंच विचार कर. (पत्र ७ वें).

" आपल्या कामाला स्वार्थत्यागी तरुणांचा एक संघ बनविला पाहिजे. स्वार्थत्यागावांचून जगांत कशालाही सिद्धि नाहीं हें विसरूं नका. लोक शिव्या देतात कीं ओंव्या गातात हें पाहण्याचें आपलें काम नव्हे ! अशा स्वार्थत्यागी संघांत ईश्वरी तेजाचा वास असतो. चला तर, जागे व्हा ! रात्र संपून अरुणाची आरक्त प्रभा फांकूं लागली आहे. लवकरच भरतीस सुरवात होईल. मग तिच्यापुढें उभें राहण्याची ताकद कोणासही नाहीं....सध्यां सर्वतोपरी दीन झालेल्या भरतभूमींत सुखाचा दिवस लवकरच उगवणार, हें पूर्वींच ठरलें गेलें आहे.—अगदीं म्हारापोरांपर्यंत, थेट गरीबाच्या झोंपडीपर्यंत, आपणांस या ज्ञानाचा प्रसार करावयाचा आहे. मात्र लक्षांत ठेवा कीं, आपणांहून हा कोणी मोठा आहे अशा प्रकारची कल्पना तुमच्याबद्दल या आपल्या अशरण बांधवांस न होईल अशी खबरदारी घ्या." (पत्र ८ वें.)

"माझी आतां एकच इच्छा उरली आहे. धाय मोकलून रडणाऱ्या माझ्या हज़ारों विधवाभगिनींचें दुःखाश्रुमार्जन करण्यास व भुकेनें पटापट प्राण सोडणाऱ्या माझ्या लेंकरांच्या मुखांत अन्नाचा ऐक तरी घांस पडेसा करण्यास एखादा राजरस्ता शोधून काढण्याची माझी इच्छा तृप्त झाली नाहीं व नष्टहि झाली नाहीं. हिंदुधर्मांतील तत्त्वें कितीहि उच्च असलीं व वेदांतपट कितीही सूक्ष्म विणलेला असला, तरी जोपर्यंत तीं तत्त्वें वागणुकींत प्रत्यक्ष उतरत नाहींत व दुःखविमोचनाचा आपला कार्यभाग करीत नाहींत तोंपर्यंत तीं तत्त्वें जन्मास आलीं काय आणि न आलीं काय, माझ्या दृष्टीनें त्यांची किंमत सारखीच आहे! नुसता पुस्तकी धर्म तो धर्मच नव्हे....

तुम्हांला ईश्वराची भेट हवी आहेना? तर मग भुकेनें मरणाऱ्या या हजारों चालत्याबोलत्या ईश्वरांची सेवा करा, म्हणजे तो परमात्मा तुम्हांला खास भेटेल. अरे, गंगेच्या पाण्यांत नुसत्या बुड्या मारून काय फायदा? ईश्वर गंगेंत बुडी मारून बसला नाहीं! या चालत्या बोलत्या ईश्वरांची प्रथम खरी भक्ति करा. त्यांच्याबद्दल आदर व प्रेम वाटलें पाहिजे, म्हणजे खऱ्या प्रेमांतलें अफाट सामर्थ्य तुम्हांला पटेल. खऱ्या प्रेमाचा उमाळा अजिंक्य आहे व खऱ्या स्वार्थत्यागास आड येण्याची कोणाची छाती नाहीं. भरतभूमीला आज असल्या मुलांची जरूरी आहे.. ज्यांचा आवाज लोकांच्या कानांवर कधींही गेला नाहीं, असे किती तरी बुद्ध आजवर होऊन गेले आहेत व पुढेंहि होतील......एखादा मिशनरी हिंदुस्थानांत आला तर तुम्ही त्याच्याशीं कसें वागता बरें! म्लेंच्छ म्लेंच्छ म्हणून त्याला तुम्ही शिवतसुद्धां नाहीं! मला खास वाटतें कीं ज्या दिवशीं ह्या म्लेंच्छशब्दाची उत्पत्ति झाली, त्याच दिवशीं हिंदुस्थानच्या विनाशकालाला सुरवात झाली! माणुसघाणेपणा कधींहि मनांत शिरूं देऊं नको. बाबांरे! वेदांततत्त्वें तोंडानें बोलणें फार सोपें असतें, पण प्रसंग पडला म्हणजे त्याचें अंशतः सुद्धां पालन करणें जड जातें!" (पत्र ११ वें).

"खरें प्रेम, खरी कळकळ, व धीर या तीन अजब वस्तूंच्या जोरावर हवी ती सिद्धी मिळवितां येते...परोपकार हेंच जगणें व वाढणें. सध्यां तुझ्या भोंवतीं दिसणाऱ्या माणसांत शेंकडा नव्वद मेलेले लोक आहेत—माणसासारखीं दिसणारीं पिशाचें आहेत. माझ्या बाळांनो, तुमच्या अंतः-

करणांत दुसऱ्याबद्दल थोडी तरी खरी कळकळ बाळगा—त्यानें वेडे होऊन जा...तुम्हांला अडचणीची भीति वाटतें काय ? थांबा जरा वाट पहा, म्हणजे याच तारका कांहीं वेळांनीं तुमच्या पायाखालीं येतील. ही फलप्राप्ति पैशानें, जगाच्या जयजयकारानें कीर्तीनें किंवा विद्वत्तेनेंहि होत नसते ! ही प्राप्ति फक्त एका प्रकारानें होणार आहे. हें शुद्ध दान पर्वतप्राय अडचणींचा चुरा करून टाकील.

...आमच्या पूर्वजांनीं धर्मासंबंधीं पूर्ण मोकळीक ठेवली होती, आणि त्याचा परिणाम आज सर्व जगाला प्रकाश देणाऱ्या धर्माची निष्पत्ति हा होय. पण समाजघटनेकडे पाहिलें तर त्याच्या पायांत मात्र त्यांनीं भल्या मोठमोठ्या बेड्या घालून ठेवल्या आणि त्याचा परिणाम काय, तर आजन्म दास्य !

सर्व वाढीला पहिली अवश्यक गोष्ट म्हणजे स्वातंत्र्य...हानिकारक रूढींची शृंखला अडकवून दुसऱ्यांना गुलाम करणारे स्वतः स्वतंत्र राहण्यास योग्य आहेत काय ?

रूढीच्या दास्यपंकांत लोळणाऱ्या गुलामांनो ! तुम्हांला स्वातंत्र्य कशाला हवें ? आणखी नवे गुलाम करण्याकरतां होय ?

आपल्याशिवाय जगांत दुसरीं कोणीं माणसें राहतात ही गोष्टसुद्धां आज दोन हजार वर्षांपूर्वींच ते विसरले आहेत ! ”

( पत्र १२ वें. )

“...आम्हापाशीं वेदान्तासारखीं सर्वव्यापी व सुंदर तत्त्वरत्नें आहेत, पण...तीं कुलुपांत आहेत व त्यांच्या किल्ल्या हरवल्यामुळें तीं कृतींत कोठेंच दिसत नाहींत. सर्व सृष्टि ईश्वरस्वरूप आहे हा आमचा सिद्धान्त; पण व्यवहारांत पहावें तर कोण भेदभाव ! केवळ परसेवेकरतां जगावें हें तत्त्व पहिल्यानें हिंदुस्थानांतच जन्मास आलें; पण व्यवहारांत पहावें तर आम्ही त्याला नित्य मूठमाती देण्यास तयार ! आम्हांला स्वतःशिवाय कांहींच दिसेनासें झालें आहे !......अहाहा ! या जीवितांतील सर्व भोगाचा त्याग करून केवळ संन्यासवृत्तीनें क्षणक्षणां खालींखालीं जाणाऱ्या आपल्या बांधवांच्या उद्धारार्थ हात पुढें करणारे योगी व योगिनी, बिचाऱ्या हिंदुस्थाना ! तुझ्या कधींतरी नजरेस पडतील काय ? अगदीं

हिंदुतऱ्हेनें वागून चांडालांच्यासुद्धां घरीं जाऊन त्यांची सेवा करण्यास तयार अशीं कितीतरी स्त्रीपुरुषें आज पाश्चात्य देशांत आहेत. पण इकडे अशी तयारी कितीकांची आहे ? " ( पत्र १३ वें. )

" ज्या ज्ञानानें मुक्ति मिळेल त्याच ज्ञानानें तुमचा संसार सुखाचा होईल हें निश्चयात्मक समजा. संसारांतले अनेक कष्टसुद्धां ह्याच ज्ञानाभावामुळें उद्भवतात......या जिवात्म्यांत जी अनुपम चैतन्यशक्ति अदृश्य स्थितींत वास करीत आहे, तीस जागृत करून ती तेजोमय होईल—स्वयंप्रकाश होईल असें करावयाचें आहे. अत्यंत क्षुद्र कीटकापासून तों पूर्ण पुरुषापर्यंत सर्वांत हें चैतन्य मूळ एकाच स्वरूपाचें आहे, हा आमचा सिद्धान्त आहे; फरकाचें कारण जागृतीचें कमीअधिक प्रमाण होय. अवकाश व संधि मिळेल त्याप्रमाणें हा मूळ ज्ञानज्योतीवरील पडदा हळुहळू दूर होत जातो. तेव्हां आतां आम्हाला हें जागृतीचें ज्ञानदान करीत दारोदार हिंडलें पाहिजे. " ( पत्र १४ वें ).

" वैतागानें मोक्षाची इच्छा म्हणजे मृगजलानें तहान भागवूं पहाण्यासारखें आहे. परमात्म्याखेरीज दुसरें कशाचेंहि चिंतन न करणें म्हणजेच वैराग्य होय...... हे शर्मन् ! ज्या वैराग्यानें सर्व दृश्य विषम स्थिति सम होतात, संसारदुःखाचें निवारण होतें,... ज्ञानसूर्याची प्रभा फांकते, व तृणापासून ब्रह्मापर्यंत सर्व पदार्थ एकरूप आहेत असा अनुभव येतो, तें खरें वैराग्य ! "... ( पत्र १६ वें. )

" मनुष्याच्या बुद्धिवर्धनास पूर्ण अवकाश व मोकळीक मिळाली असतां त्याच्याहातून क्वचित् घडणारे प्रमादही नुसत्या यांत्रिक पद्धतीनें झालेल्या शुद्ध आचरणापेक्षां ज्यास्त श्रेयस्कर होतील, असें मला वाटतें. अर्थात् या यांत्रिक शास्त्रनियमांच्या शृंखला जर नसत्या तर... जेथली भूमि साऱ्या पृथ्वीला ज्ञानाचें दान करणारी खाण व्हावी तेंच राष्ट्र सांप्रत गुलामांचें राष्ट्र व तीं भूमि मूर्खपणाची जन्मदात्री अशी प्रसिद्धि झाली असती काय ?... ज्यांचा साराजन्म गुलामगिरींत गेला, ज्यांना आपण मनुष्य आहों कीं दुसरे कोणी प्राणी आहों याचेंही भान नाहीसें झालें, दुसऱ्यांच्या लाथा खाण्यांतच ज्याना जन्माचें सार्थक वाटतें, दुसऱ्यांच्या ओंजळीनें पाणी पिण्यांतच जे भूषण मानतात, असल्या मानवजातिकलंकांनीं स्वार्थत्याग

ह्या नुसता शब्दही तोंडानें उच्चारूं नये ! जबरदस्तीच्या व माणुसकी विसरून केलेल्या गोष्टीस स्वार्थत्याग म्हणणारे तुमच्यासारखे शहाणे साऱ्या जगांत तुम्हीच. ज्या बुद्धानें साऱ्या जगाच्या कल्याणाकरितां राज्यावर लाथ मारिली, स्वत्व बुडवून टाकलें, स्वार्थत्यागाचा कळस केला, त्याच्याच जोडीस बसण्याची योग्यता तुमची काय ? अहाहा ! तुमच्या सुंदर चालीरीती पाहून तर तुमच्यावरून लिंबलोणच करावेसें वाटतें. विधवांना जबरदस्तीनें संन्यास देऊन शिष्यापेक्षां शंकराचार्यच जास्त बनविण्याचा कारखाना काढल्यावर ज्ञानास काय वाण ? पैशास खंडीभर ज्ञान ! लहान लहान पोरांची हाडें भरडून स्वार्थत्यागी मनुष्यें उत्पन्न करणाऱ्या गिरण्या सुरूं केल्यावर सारेच कर्णाचे अवतार निपजणार ! मग हिंदुस्थानांत सारेच दाते आणि घ्यायला कोणीच नाहीं असा दिवस लवकरच खचित उगवणार ! हरहर ! कोण दशा ही !...ज्यांनीं सारा जन्म कंदमुळें भक्षून ज्ञानसंचय करावा व लोककल्याणार्थच जगांत संचार करावा असे ते खरे स्वार्थत्यागी व स्वतंत्र वृत्तीचे पुण्यशील महात्मे कोणीकडे, आणि वीतभर खळगींत कांटे भरण्याकरितां गुलामगिरींत पुढें सरसावण्याकरितां अहमहमिका करणारे सांप्रतचे भिकारी कोणीकडे !...निदान एकातरी दीन बांधवाचें खरें कल्याण करीन एवढीच बुद्धि सांप्रत तुम्हां ब्राह्मणांमध्यें प्रत्येकास होईल तरी बस् होणार आहे...आधीं मोठेपणा असला तर लीनतेची शोभा आहे. आधीं श्रीमंत व्हा, मग लक्ष्मी चंचल म्हणून पाहिजे तर तिचा त्याग करा म्हणजे त्या त्यागास कांहीं महत्त्व येईल. आशाजनक परिस्थितींतच वैराग्याचें खरें तेज फांकत असतें. " ( पत्र १८ वें ).

अरेरे ह्या दुबळ्या लोकांबद्दल आम्हाला काय वाटतें याचा नुसता विचारसुद्धां अंगावर शहारे आणतो. ... त्यांनीं कितीही कष्ट केले, हाडांची काडें केलीं, तरी गरीबांच्या, नीच स्थितींतल्या लोकांच्या, पापी जनांच्या स्थितींत काडीइतका तरी फरक पडण्याची आज आशा आहे काय ?......दुष्ट चालीरीतींनीं दुष्ट झालेल्या समाजानें आज सतत त्यांना खालींखालीं दाबण्याचाच प्रयत्न चालविला आहे ... ... कांहीं विचारी लोकांनीं या सर्व अनर्थांचें कारण हिंदुधर्माशीं जोडलें. ... .........

...पण मित्रा ! तूं पक्कें लक्षांत ठेव कीं, यांत धर्माचा मुळींच दोष

नाहीं. उलट ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' असेंच हिंदुधर्म सांगत आहे. या अनर्थांचीं कारणें म्हणशील तर हिंदुधर्मांतील तत्त्वांस व्यावहारिक स्वरूप देण्यांत झालेली हयगय, व खऱ्या सहानुभूतीची व प्रेमाची उणीव हीं होत. परमेश्वरानें एकवेळ बुद्धरूपानें या भूमींत अवतीर्ण होऊन प्रेमाचें स्वरूप कसें असावें तें तुम्हांला स्वतः आचरून दाखविलें. अत्यंत दरिद्री, अत्यंत विपद्ग्रस्त व अत्यंत पापी, अशा लोकांशींसुद्धां तुमची वागणूक कशी असावी हें शिकविलें; परंतु या शिक्षकाकडे तुम्ही पाठ फिरविलीत. तुम्ही कान असून बहिरे व डोळे असून आंधळे बनला. ज्यू लोकांनीं खिस्तगुरूचा उपहास केल्यामुळें ते शापग्रस्त होत्साते पृथ्वीभर भटकून त्यांना कोठेंच थारा नाहींसा झाला, तद्वतच अशा अनेक महात्म्यांचा तुम्ही उपमर्द करून सांप्रतची कर्मदशा आपणांवर ओढवून घेतली आहे. वाटेल त्यानें यावें व वाटेल त्या रीतीनें तुम्हांला वागवावें, अशी तुमची अवस्था तुम्ही आपल्या हातानेंच करून घेतली आहे. अरे पाषाणहृदयांनों ! तुम्ही आजवर जो जुलूम केला त्यामुळेंच आतां तुम्ही गुलाम झालां आहां, हें तुम्हांला कळत नाहीं. जुलूम आणि गुलामगिरी हीं एकमेकांचीं सख्खीं भावंडें असून तीं नेहमीं सहचर असतात हें तुम्हांला कळत नाहीं ! " ( पत्र ४ थें ).

असो. हे उतारे देतां देतां बरेच लांबले. तथापि त्या सर्वांतून महात्मा गौतमबुद्धाचीं मतें जागजागीं प्रतिबिंबित झालेलीं वाचकांच्या दृष्टीस पडणार आहेत व म्हणूनच ते इतके विस्तरशः दिले. असो. गौतमाला कोणकोणत्या गोष्टींची चीड आली, व त्याचा सात्त्विक संताप कोणच्या बाबतींत व्यक्त झाला तें आम्ही वर सांगितलेंच आहे. आपल्या भूतदयेचा परिघ अत्यंत विस्तृत केला पाहिजे ही त्याची शिकवण होती. अर्थात् त्यास यज्ञादिकार्यांत होणारी हिंसा रुचणें शक्यच नव्हतें. " पशुच मारायचा मग एखादा वाघ किंवा सिंह धरून त्याचा यज्ञ कां करीत नाहीं ? पण तसें करायला गेलात तर तुमचाच आर्धी यज्ञ व्हायची वेळ येईल. तेव्हां " अजापुत्रं बलिं दद्यात् देवो दुर्बलघातकः " या न्यायानें तुम्ही बिचाऱ्या गाई, बैल, बोकड, घोडे, यासारख्या गरीब व अनागस जीवांस बळी द्यावेत हें तुमच्या निष्ठुर जिव्हालौल्याच्या दृष्टीनें ठीकच आहे. पण ही निर्घृणतेची सीमा व परमावधि नव्हे काय ? " असा त्यानें यज्ञ-

त्यागांवर दणदणीत हल्ला चढविला व " अहिंसा परमोधर्मः " ह्या मताची ध्वजा फडकाविली. अशोकासारख्या राजाचा आश्रय ह्या धर्मास मिळाल्यामुळें गरीब बिचाऱ्या हजारों बोकडांचे व पशूंचे जीव वांचले. गौतमबुद्धाच्या या दणदणीत हल्ल्यानें आधींच भगवंतांनीं तयार करून ठेवलेल्या भूमींत अहिंसेचें बीज पक्कें रुजलें व त्याचा उत्तरोत्तर सुंदर वृक्ष बनला. " व्यासप्रणीत महाभारताच्या शांतिपर्वांत मेधावी नांवाच्या ब्राह्मणाचा विद्वान, सुशिक्षित मुलगा आपल्या बापास धर्ममार्गाचें स्वरूप विचारीत आहे. त्यास त्याचे पित्यानें अग्निहोत्रादि कर्म करण्यांत धर्म आहे असें सांगितल्यावर तो मुलगा म्हणतोः—" पशुयज्ञैः कथं हिंस्रैर्मादृशो यष्टुमर्हति ? " कारण—" तातैतद् बहुशोभ्यस्तं जन्मजन्मांतरेष्वपि । त्रयीधर्ममधर्माढ्यं न सम्यक्प्रतिभाति मे ॥ " ( अ. १७५ ) याप्रमाणें त्याबद्दूनें वैदिक हिंसेची व त्रैविद्येची अयोग्यता प्रत्ययास आणून दिलेली आहे. त्याचप्रमाणें—

" अहिंसार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतं ।
यः स्यादहिंसासंयुक्तः स धर्म इति निश्चयः ॥ "

—( शांतिपर्व अ. १७९ )

" प्राणिघातात्तु यो धर्ममीहते मूढमानसः ।
स वांछति सुधावृष्टिं कृष्णाहिमुखकोटरात् ॥ "

—( मोक्षधर्मवर्णन )

" देवोपहारव्याजेन यज्ञव्याजेन योऽथवा ।
घ्नन्ति जंतून् गताघृण्णा घोरां ते यांति दुर्गतिम् ॥ "

इत्यादि उद्गारही अहिंसाधर्माचे पोषक असून " योगभाष्य पाद २, सूत्र १३, तथा पाद ४, सूत्र १, यांत स्पष्टपणें व्यासांनीं यज्ञास अशुद्ध दर्शविलें आहे " ( रा. पांगळकृत—" जैनधर्म " पा. ४८ ) या सर्वांचें कारण म्हणजे हिंसाधर्माचा लोप होणाऱ्या व अहिंसाधर्माचा प्रभाव असणाऱ्या काळांत हे महाभारतादि ग्रंथ लिहिले गेले व अर्थात् त्या विजयी मताची छाप त्यावर बसली हेंच होय. किंबहुना, ह्या अहिंसेचें मत आपण बौद्धांच्या व जैनांच्यापासूनच पुष्कळसें शिकलों यांत शंका

नाहीं असें आम्ही वर म्हटलेंच आहे. बुद्ध आधीं झाला कीं जैन आधीं झाले. याबद्दल लोकमान्य व फडके यांचा मतभेद आहे. पण मताच्या प्रगतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें बुद्धानंतर जैन झाले असावेत असें वाटतें. पण तें कांहीं असलें तरी दोघेही अहिंसामतप्रतिपादक या नात्यानें प्रसिद्ध असून त्यांच्यापासूनच आपण अहिंसा शिकलों यांत शंका नाहीं. ' गीतगोविंद ' कर्त्या जयदेवकवीनें " यज्ञांत होणाऱ्या अनन्वित हिंसेचा कळवळा येऊन (त्या गरीब व नाहक चुरडल्या जाणाऱ्या जीवांची तरफदारी करून ) यज्ञविधाननिंदनार्थ बुद्धशरीर धारण करणाऱ्या गोविंदा, तुझा जयजयकार असो " असेंच गौतमाचें अवतारप्रयोजनकार्य गौरवानें सांगितलें आहे. लो. टिळकही म्हणतातः—

" पूर्वी यज्ञयागांत भयंकर हिंसा होत होती ती बंद झाली याचें कारण जैनधर्माचा ब्राह्मणधर्मावर पगडा हेंच होय. जैन व ब्राह्मण या दोन धर्मांत तंट्याचें कारण मूळ हिंसाच होती, व ती नष्ट होऊन ब्राह्मणांस व हिंदुधर्मास जैनधर्मानें अहिंसाधर्मप्रवर्तक बनविलें आहे. ब्राह्मण व हिंदुधर्मांत मांसभक्षण व मदिरापान बंद आहे याचें कारण जैनधर्माचा प्रताप आहे" इ. (श्री. पांगळकृत 'जैनधर्म' पा. ५२) ता. १३।१२।४ चा ' केसरी ' ही म्हणतो कीं, " शंकराचार्यांनीं जैनांचें अहिंसामत स्वीकारूनच जैनधर्मावर छाप बसविली...पूर्वी जैन व ब्राह्मण मोठ्या आनंदानें परस्परांचा धर्म स्वीकारीत होते...सारांश, जैनधर्म व वैदिकधर्म हे एकाच शरीराचे दोन भाग आहेत " इ. ( श्री. पांगळकृत 'जै. ध.' पा. ५२ ). हेच लोकमान्यांचे व केसरीचे शब्द बौद्धधर्मासही बरोबर लागू पडतील. या अहिंसामताचे ग्रहण हिंदूंनीं अथवा ब्राह्मणांनीं इतकें केलें कीं, तें अगदी कळसास नेऊन भिडविलें. याबाबतींत सोलापूरच्या श्री. शेट हिराचंद नेमचंदांनीं रा. वासुदेव गोविंद आपटे यांनीं जैनांवर अहिंसामताच्या केलेल्या अतिरेकाच्या आरोपाचें खंडन चांगलें केलें आहे. ( श्री. पांगळकृत ' जैनधर्म ' पा. ७०–७१–७२ पहा ).

पण अहिंसेचें विशुद्धस्वरूपच रेखाटावयाचें तर ज्ञानेश्वरांनीं वर्णिलेलें १३ व्या अध्यायांतील स्वरूपच हृदयास निःसंशय डोलविणारें आहे यांत शंका नाहीं. व त्याच्या प्रतिपादनापूर्वी आधीं इतर मतांची हजेरी घेतांना खुद्द

जैनधर्मांतील ' वस्त्रगाळ जलप्राशनाच्या ' रीतीवरही– " एकीं धर्माचिया वाहणीं । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळणीं । जीव मेले ॥" याप्रमाणें त्यांनीं जो हल्ला चढविला आहे तोहि मग योग्यच वाटतो. असो. तेव्हां अशा ह्या अहिंसेच्या अतिरेकाची तरफदारी करावी तितकी थोडीच आहे. उपरिनिर्दिष्ट सोलापूरच्या शेट हिराचंदांनीं ती खालीलप्रमाणें फारच सुंदर रीतीनें केलेली आहे; ते म्हणतातः––

" परंतु हा अहिंसेचा अतिरेक अथवा क्षमेचा अतिरेक हे दैवी गुण आहेत. ते परमेश्वराचें सान्निध्य मिळवून देणारे आहेत. आणि म्हणूनच श्रीकृष्णानीं अर्जुनाला हे दैवी गुण अंगीं आणण्याचा उपदेश केला आहे. तुकारामाला मंबाजीबुवांनीं टोले मारले ते सहन करून मंबाजीबावाच्या हाताला कोठें लागलें असल्यास तें विचारण्यासाठीं तुकारामबावा मंबाजीबावांच्या घरीं जातात, हा तरी अतिरेकच. रामदासांच्या शिष्यांनीं शेतकऱ्याचे ऊंस खाल्याबद्दल शेतकरी रामदासांच्या पाठीवर उसाचे टोले लगावतो व रामदासस्वामी ते सहन करतात, इतकेंच नव्हे, तर शिवाजीमहाराजाला हें वर्तमान कळल्यावर शिवाजीमहाराज त्या शेतकऱ्याला काय शिक्षा करूं असें रामदासस्वामींला विचारतात तेव्हां रामदासस्वामी त्या शेतकऱ्याला शिक्षा सांगण्याचें बाजूला ठेवून उलट त्याला तें शेत वंशपरंपरा बक्षीस करून द्या म्हणून सांगतात ! हा अहिंसेचा अथवा क्षमेचा अतिरेक नव्हे काय ? परंतु असा अतिरेक करणारीं माणसें कितीतरी थोडीं असतात. त्यांच्या ह्या अतिरेकाबद्दल त्यांस दोष न देतां सर्व लोक त्यांची तारीफ करतात, त्यांचे गुणानुवाद गातात, आणि त्यांच्या पायां पडतात ! " (श्री. पांगळकृत–"जैनधर्म"–पा. ७२) अर्थात् याच अहिंसेच्या अतिरेकाच्या टोंकाला जैन व बौद्ध साधूंनींही धांवण्याचा यत्न केला असल्यास त्यांत वावगें कांहींच नाहीं हें उघड आहे. असो. तर ह्याच अहिंसामताच्या जोरावर गौतमबुद्धानें हिंसाप्रधान यज्ञांचें स्तोम माजविणाऱ्या कर्मठ याज्ञिकांशीं जागोजाग झगडा केला व असल्या हिंसाप्रधान त्रैविद्येला व ती प्रसवणाऱ्या परमेश्वरालाही त्यांनीं जेव्हां पार उडवून लावलें व त्याच्या ओजस्वी वाणीनें जेव्हां शेंकडो–नव्हे, हजारो लोक बौद्धधर्माचा स्वीकार करूं लागले तेव्हां पराभूत वैदिकांची, किंबहुना, सर्वच ब्राह्मणांची घाबरगुंडी उडाली व त्याच्या अजिंक्य व दुर्दम्य मतांस जेव्हां त्यांनीं आत्मसात्

करून घेऊन त्यास ईश्वरावतार मानला तेव्हांच ह्या बुद्धमताच्या वावटळीचा जोर थांबला !

याच वावटळीनें जुन्या धर्मातला दुसराही एक केरकचरा वाहून नेला, आकाशाच्या अनंत उदरांत भिरकावून दिला; व तो म्हणजे जातिभेदाचा होय. " वंशभेदाचा अभिमान हा नरकमूलक आहे ." असें गौतमानें ठांसून सांगितलें. " ब्राह्मणाचें रक्त तांबडें, व महाराचें काळें असें आपणांस आढळतें काय ? किंवा आईच्या उदरांतून बाहेर पडणाऱ्या ब्राह्मणाच्या गळ्यांत जन्मतःच जानवें अडकलेलें असतें काय ? " असा गौतमाचा सवाल आहे. त्यास अर्थात् ' नाहीं ' असेंच उत्तर देणें भाग आहे. "तर मग हा भेदाभेद कां ? हा वंशाचा नरकमूलक अभिमान कां ? ही इतर जातींबद्दल बेपर्वाई कां?" गौतम पुढें विचारतो. " जन्मना जायते शूद्रः " व "संस्कारात् द्विज उच्यते" हें खरेंना ? मग कांहींजणानांच तेवढे ते संस्कार कां ? व बाकीच्या गरीब बापड्यांना कां नाहींत ?त्यापेक्षां हा भेदाभेदच समूळ काढून टाकून चित्तशुद्धि हीच कसोटी, व हीच खूण ठरविण्यास काय हरकत आहे ? " अशातऱ्हेचे गौतमाचे कडकडीत व धडाडीचे विचार होते. इतकेंच नव्हे,तर त्याचा प्रत्यक्ष आचार तसा होता. मागेंच म्हटल्याप्रमाणें त्याच्या मठांत लहान—थोर, गरीब—श्रीमंत, पुण्यवान्—पापी, महार—ब्राह्मण, सर्वांनाच सारखी येण्याची मुभा असून त्याची एकच एक अट असेल तर वृत्ति अंतर्मुख करून चित्तशुद्धि करा, व दुर्गुणांपासून दूर पळून सद्गुणांना जवळ करा, म्हणजे तुम्ही मुक्तच आहांत, असा त्याचा कळकळीचा उपदेश होता. जेसुस् ख्राइस्टप्रमाणें गौतमाचेंहि बोलणें मनमोहक, देखावा, स्वरूप, छाप बसण्यासारखें, व उपदेशाची मुख्य भरही नीतिमत्तेवरच होती. दोघांचाही लोकांकडे अतीशय ओढा होता.व म्हणूनच लोकांच्या कळवळ्याचे बोल दोघांच्याही मतांत दिसून येतात. असो. "बुद्धाचें भाषण मोहक असल्यामुळें त्याची तेव्हाच छाप बसे. त्याच्या बोलण्याचा गैरविश्वास वाटत नसे.त्याच्या म्हणण्याची-मताची फारशी कोणी चौकशी केली नाहीं. बुद्ध हा जातीनें क्षत्रिय असून इतर लोकांच्या जातीची वगैरे चौकशी न करतां जो येईल त्याला आपल्या धर्मात घेतो, एवढ्यावरच लोक भुलून गेले. बुद्धाच्या मठांत कोणाला यावयाचें असलें तर त्याच्या वर्तनासंबंधानें थोडीबहुत चौकशी होई, याशिवाय बुद्ध होण्याला

कांहीं अडचण नव्हती, पूर्ण मोकळीक होती. बायकांना सुद्धां मठद्वार खुलें होतें." (वे. नि. पा. ४७–४८). अशाप्रकारचा हा विश्वव्यापक धर्म असून त्याचें मठद्वार सर्वांना सदा सारखेंच खुलें ठेवण्यांत आलें होतें. सर्व मनुष्यप्राणी–जीवमात्र तेथून सारखा असून त्यांत मूलतः उच्चनीच भाव नाहीं, व प्रत्येकानें उत्कृष्ट नीत्याचरण करावें म्हणजे तो उद्धरून जाईल असें गौतमाचें सांगणें होतें. त्यासाठीं "मारबरोबर युद्ध करावें लागलें, त्याची हकीकत बुद्ध स्वतः सांगत असे, व त्याचा परिणाम ऐकणारावर तेव्हांच होई." (वे. नि. पा. ४८) तसेंच— "What can be more beautiful than the account of Budha's conversion and sudden conviction that all earthly things were vanity?" (P. 294 E. Wilson in the Sacred Books of the East) असें विल्सन साहेब विचारीत आहेत तेंहि योग्यच आहे. असो. अशाप्रकारचा हा बुद्धाचा विश्वव्यापक धर्म असून वेदांतपटांत विणलेल्या उत्तमोत्तम तत्त्वांची खरीखरी व्यावहारिक अम्मलबजावणी करण्यास व हल्लींच्या खिस्ती मिशनऱ्यांप्रमाणें आचांडाळ सर्वांची शाब्दिकच नव्हे तर कायिकही सेवा करण्यास तो सदैव तत्पर असे. दयेच्या अत्यंत विस्तृत अशा परीघांत पतितोद्धाराची व विश्वप्रेमाची केवढी जगडव्याळ कामगिरी सांठविली असते अथवा असं शकते हें बुद्धानें दाखवून दिलें. आणि खरोखरच आज जर आपल्या देशाला कशाची वाण असेल तर ह्याच व्यावहारिक वेदांताची! स्वामी विवेकानंदांची त्याकामीं असणारी तळमळीचीं "खाजगीं पत्रें" याचसाठीं आम्ही वर इतकीं विस्तृतपणें उध्दृत केलीं आहेत. कारण त्यांनींच जागोजाग दाखविल्याप्रमाणें खुद्द गौतमाची कामगिरी त्याच नमुन्याची होती. पण 'ह्या उपदेशाकडे आम्ही पाठ फिरविली' आणि म्हणूनच सांप्रतचीं गुलामगिरीचीं खडतर दुःखें आम्ही आपल्या स्वकर्मानेंच भोगीत आहोंत. महात्मा गांधी— गौतमबुद्धाचे आजच्या विसाव्या शतकांतले अवतार—ही हेंच सांगत आहेत कीं, दुसऱ्यांना गुलाम करणाऱ्यांच्या कपाळीं गुलामगिरीच यायची. असो, तर ह्या मुद्याचा समारोप आम्ही स्वामी रामतीर्थांच्या उज्ज्वल वाणींतच करतों म्हणजे झालें. ते म्हणतातः—

"आतां हा आळस झाडून टाका व अद्वैत सिद्धान्ताचें प्रत्यक्ष आच

रण करून दाखवा. नाहींतर प्रळयकाळपर्यंत असेंच साऱ्या जगाच्या उप-हासास पात्र व्हा ! " अस्तु.

भगवद्गीतेनें इतकी कामगिरी बजावली असतांहि गौतम फुटून बाजूस निघाला तेव्हां त्याच्या धर्माला "हिंदुधर्माचें बंडखोर पोर" असेंहि कोणी-कोणी नामाभिधान देतात. पण श्री. फडके म्हणतातः—

" भगवद्गीतेनें बरीच कामगिरी केली. पण तेवढयानें असमाधानाचें मुख्य बीज कायमच राहिलें. सामान्य समूहाला चुचकारून कर्मठ आणि वेदांती ह्या दोघांच्याही मार्गानें जाण्याची शक्ति किंवा इच्छा नसलेल्या लोकांना ईश्वरोपासना हाच मार्ग दाखविण्यांत आला. तथापि त्यांतही जातिभेदाची छान होतीच; तिचा प्रकार-कारण थोडें निराळें दाखविण्यांत आलें, एवढेंच; परमेश्वराचें ज्ञान करून घेऊन, आत्यंतिक साध्यावर लक्ष ठेऊन अखेर जातिधर्माला योग्य तेंच कर्म करविण्याचा कटाक्ष गीतेमध्यें आहे. त्यामुळें थोड्याशा लोकांचें समाधान झालें तरी एकंदर समुद्रांत उठलेल्या लाटा नाहींशा झाल्या नाहींत......कर्मठपणाविरुद्ध चळवळ होऊन ज्ञानी लोकांनीं उच्चतम मार्ग काढला होता तरी मध्यम प्रतीतल्या लोकांची स्थिरस्थावर झाली नाहीं...लोकसमाजाचें मन पहिल्या चालु धर्मावर खूष नव्हतें......त्यामुळें बुद्धाला अखेर निराळें फुटणें भाग झालें. " ( वे. नि. पान ४१–४३ ) प्रो. मॅक्समुल्लरांच्या शब्दांत सांगायचें तर—" निःसत्व तंत्र आणि यज्ञकर्मांचें अवडंबर यांवर विशेष भिस्त पडल्याकारणानें हिंदुधर्माला जडत्व आलें होतें. त्यामुळें बुद्धाला फुटायला फावलें. " ( P. 145 Six systems of Indian Philosophy by Prof. Max Muller ) रा. फडके म्हणतातः—

" मनोजय, आत्मज्ञान, व्यवहारचातुर्य, प्रत्येक जीवावर पडलेली स्वोन्नतीची जबाबदारी, परोपकारबुद्धि, भूतदया, धैर्य, आणि कार्यनिश्चय, ह्या गोष्टी गीतेमध्यें प्रमुखत्वानें मांडल्या आहेत. भगवद्गीतेनेंहि बरेंच काम केलें. मागील मतांची एकवाक्यता घालून कर्मयोगाची प्रशस्ति गीतेनें गायिली...तथापि संस्कृत भाषा सार्वत्रिक लोकांची नसल्यामुळें व्हावा तसा उपयोग झाला नाहीं " ( वे. नि. पा. ४३।४१।४३ ), महाभारतांतील यक्षप्रश्नांतील " श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्ना नैकोमुनिर्यस्य-

वचः प्रमाणम् । धर्मस्य तत्वं निहितं गुहायां महाजनो येन गतःस पंथाः ॥" ह्या प्रसिद्ध श्लोकांत वर्णिलेल्या ह्या " असल्या स्थितीचा मेळ घालण्याचे प्रयत्न झाले तरी समाजाच्या अंतर्यामींची खळबळ निवाली नव्हती. " ( वे. नि. पा. ४६ ) आणि म्हणूनच गौतमानें फुटून निघून समाज-सागराच्या क्षुब्ध लाटा शक्य तितक्या शांत करण्याचा आपल्या शांत, ओजस्वी, व दयाशील वाणीनें प्रयत्न केला, व त्यांत त्याला अपरंपार यश आलें. गौतमाला इतकें यश येण्याचीं कारणें—त्याचें स्वतःचें मोहकत्व त्याचें लोकोत्तर चरित्र, त्यानें केलेला जातिभेदनिर्मूलनाचा यत्न, व त्यास मिळालेला राजाश्रय, हींच होत यांत शंका नाहीं. वुइल्सनसाहेब म्हणतातः— " बुद्धाच्या धर्माचें कनफ्यूशसपेक्षां ख्रिस्तीधर्माशीं अधिक साम्य येईल. त्यामध्यें श्रमण, यति होणें आणि देहदंडादिकांचा अभ्यास करून मन जिंकणें यांची सांगड आहे. व्यक्तीच्या वर्तनाचे व्यावहारिक नियम त्यांत घातले असून त्याच्याशीं जुळणारे उच्च विचारही त्यांतःगोवले आहेत. शिवाय, त्या धर्मांत ही एक विशेष महत्वाची गोष्ट आहे कीं, त्या धर्मसंस्थापकाचें, गौतमाचें मनमोहक आणि अम्दुत चरित्र हें एक त्या धर्माचें प्रधान पुस्तक आहे." (" The sacred Books of the East" Universiy Edition–P.293 ). " बुद्ध स्वतः शांत, गंभीर, श्रद्धाळु, निश्चयी, सदय होता. त्याचें भाषण, त्याचें स्वरूप, त्याच्या वर्तनाची कीर्ति, त्यानें केलेला स्वार्थत्याग ह्याचा परिणाव लोकसमूहावर लोहचुंबकाप्रमाणें होई. पक्षपाताचा अभाव, मनोजय, विचार आणि व्यक्तिस्वातंत्र्य हीं अर्हतांचीं लक्षणें व मतें पाहून यज्ञयागादि कर्मांना अनधिकारी आणि वेदांत समजण्याइतकी बुद्धि नसलेल्या लोकांना त्यांत प्रथम सुख वाटलें." ( वे. नि. पा ५१।५२ ) डॉ. पॉलडयूसन साहेब म्हणतातः—" हिंदुस्थानांत बुद्धधर्माचा प्रसार होण्याचें मुख्य कारण बुद्धव्यक्तीचा मोह व त्यानें केलेला जाति मोडण्याचा उपक्रम हें होय. " ( The success of Buddhism in India was due in part to the over whelming personality of its founder, in part to the breaking down of Caste prejudices. P. 37. Outlines of Indian Philosophy by Dr. Paul Deussen). तसेंच " बुद्धाचा

उदय होण्याला अनुकूल राजकीय स्थिति प्राप्त झाली. पाटलीपुत्र येथील बिंबिसार नांवाच्या राजावर देवदत्त ब्राह्मणाचा पगडा होता. परंतु राजकुमार अजातशत्रूनें राज्यतृष्णेनें बापाचा खून केला किंवा करविला, आणि त्यामुळें वावटळ उठेल ती टाळण्याकरितां तो धर्मांतराच्या पांघरुणांत लपला. तो बुद्ध झाला आणि बापाच्या वेळची सर्व मंडळी त्यानें कामावरून दूर केली; त्याच्या हेतूला हें धर्माचें आयतेंच निमित्त सांपडलें आणि त्यामुळें बुद्धधर्माला निराळें जोरदार स्वरूप प्राप्त झालें " (वे. नि. पा. ४६ ) हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. असो. " बुद्धाच्या मठस्थापनेमुळें जातिभेद पुष्कळ मोडला. बुद्धाचें काय म्हणणें आहे हेंच प्रथम कळलें नाहीं. त्यामुळें ब्राह्मणधर्माभिमानी लोकांना त्याची फारशी भीति वाटली नाहीं. ( परंतु पुढें ) त्याला राजाश्रय मिळाला आणि त्याचे भिक्षु धर्मोपदेशक गांवोगांव हिंडूं लागले. रस्त्यानें ते जाऊं लागले म्हणजे त्यांच्यामागें हजारों लोकांच्या झुंडी जात. लोक भराभर मठदीक्षा घेऊन त्यांना मिळूं लागले. तेव्हां त्यांचें खरें स्वरूप ब्राह्मणांच्या लक्षांत आले " ( वे. नि. पा. ५० ) व सर्वांचीच घाबरगुंडी उडाली. " कांहीं काल पावेतों बुद्धाच्या शिष्यांचाही जिकडे तिकडे जयजयकार झाला. उत्तर हिंदुस्थानांत आणि विशेषतः गंगा व यमुना ह्या नद्यांच्या मधील प्रदेशांत ह्या धर्माची फार भरभराट झाली. " ( वे. नि. पा. ५२ ). अशाप्रकारें जवळ जवळ एक हजार वर्षे हिंदुस्थानांत हा धर्म गाजला. कारण " हल्लीं प्रचलित मताप्रमाणें इ. स. पूर्वी सहाव्या शतकांत बुद्ध झाला असें ठरलें आहे, " (वे. नि. पा. ४६ ) व " खिस्त शकाच्या ५ शतकापर्यंत बुद्धधर्माची चलती उत्तर हिंदुस्थानांत होती " ( वे. नि. पा. ५२ ) असें श्री. फडकेंच आपणांस सांगत आहेत.

पण असाहि बुद्धधर्म शेवटीं हिंदुस्थानांतून बहुतेक हद्दपार झाला व त्याला चीन, जपानसारख्या देशांचा आश्रय करावा लागला, व तिथेंहि त्याचें मूळचें स्वरूप पुष्कळच बदललेलें आहे. तेव्हां अशा ह्या बुद्धधर्माच्या ऱ्हासाच्या कारणांची मीमांसा आपण मागें एकदोनदां केलीच आहे. पण इथेंहि त्याचा एकदां पुन्हां थोडक्यांत विचार करून आपण ह्या धर्माची रजा घेऊं.

ह्या ऱ्हासाच्या कारणांची मीमांसा श्रीयुत फडके यांनीं आपल्या 'वेदांत-निदर्शनां'त जागजागीं चांगली केली आहे. ते म्हणतातः—" बुद्धाच्या पराजयाचीं कारणें उपजतच त्याच्याबरोबर होतीं. त्याची सर्व भिस्त वर्तनावर, तत्वविचाराचा भाग त्या बुद्धमतांत फारसा नाहीं म्हटलें तरी चालेल. निर्वाण म्हणजे काय याची स्पष्ट कल्पना स्वतः बुद्धालासुद्ध सांगतां आली नाहीं. देव म्हणजे कांहीं निराळे नव्हेत.ते तुमच्या आमच्या-सारखे मनुष्यच. मनुष्यांतले सर्व दोष काढून टाकले, आणि त्यांचे सद्गुणाची मर्यादा वाढविली, कीं ईश्वर झाला. हें बुद्धाचें बोलणें प्रथम टीक दिसलें. पण पुढें येवढ्यानें समाधान होईना. हीच पाहिली चूक बुद्धधर्माची झाली. बुद्धधर्मांत ईश्वर तर मुळींच नाहीं. त्यामुळें भक्तीला मार्ग नाहीं, पण ज्ञानाची सुद्धां फारशी उटाठेव त्यांत नाहीं. बौद्धमतांत ईश्वर तर नाहींच, पण त्याला आत्माही कबूल नाहीं. " –( वे. नि. पा. ५० ) तसेंच त्याच्या जाति मोडण्याच्या सपाट्यांत काय मजा झाली ती मि. गर्डलस्टन-साहेबांच्या खालील सार्वत्रिक विधानावरून कळून येणार आहेः—

" It must not be forgotten that men are differently constituted; some lean more upon the external, ceremonial, and traditional side of religion and others more upon the personal and spiritual aspects. " ( P. 80. How to study the Bible ) अर्थात् हा पोंच बुद्धाला राहिला नाहीं. " व्यक्ति तितक्या प्रकृति असतात; कुणाला सगुण रूपाची पूजा रुचते, कुणी निर्गुणाचा भोक्ता असतो. कुणी बाह्योपचार व देवा-दिकांच्या अवतारकथांत रमतो, तर कुणास तत्त्वज्ञानाची आवड असते " ही गोष्ट बुद्ध विसरला, हेंच वरील साहेबांस अप्रत्यक्षपणें दाखवावयाचें आहे. बरें तत्त्वज्ञानाच्या बाबतींत त्यांनीं कांहीं क्रांति केली म्हणावें तर तसेंहि नाहीं. " वेदांतल्या गोष्टी अपुऱ्या पडतात, आणि त्याच्यावर ऐट मारणारे ब्राह्मण तेवढेच ईश्वराच्या प्रेमांतले असें कांहीं नाहीं, हा काय तो बुद्धाचा कटाक्ष. " ( वे. नि. पा. ४९ ) आणि त्याचा तेवढ्यापुरता उपयोग झालाही. तसेंच त्याच्या जातिभेदांवरील हल्ल्याचाहि उपयोग झाला. पण त्यानें पूर्वींच्या ज्ञानमार्गावर किंवा अद्वैतमार्गावर परिणाम व्हावा असें त्यांत काय होतें ? रा. फडके म्हणतातः—

ह्या बुद्धबंडाचा अद्वैतमतावर किंवा ज्ञानमार्गावर कांहींच परिणाम झाला नाहीं, आणि तसा परिणाम होण्यासारखें ज्ञान त्या पंथांत नव्हतेंहि. पावलोंपावलीं कर्ममार्गाची अडवणूक होत असे, आणि जेथें तेथें जातिभेद नडवीत होता, त्याच्यावर बुद्धाचा हल्ला होता, व त्याचा परिणाम तेवढ्यापुरता झालाही. श्रमणदीक्षा घेऊन मठांत शिरल्यावर जातिभेदाला ठिकाण नव्हता. पण अद्वैतांतसुद्धां ज्ञानाच्या बलानें ब्रह्मरूपाची ओळख पटल्यावर, सर्व ब्रह्ममय झाल्यावर जातिभेद रहात नाहीं, येवढेंच नव्हे तर दुसरा कोणचाहि भेद रहात नाहीं" (वे. नि. पा. ७९) आणि आमच्या-मतें खराखरा भेदभावाचा अभाव तेव्हांच होऊं शकेल व तोच खरा होईल. पण ज्या धर्माला ईश्वरच माहीत नाहीं त्यानें कृत्रिम भेदभाव मोडण्याचा यत्न करून संन्यासीसंन्यासिनींचे तांडे कितीही निर्माण केले तरी त्याचा शेवटीं अधःपात झालाच पाहिजे. तीच स्थिती बुद्धधर्माची झाली. चित्तविक्षेपरूप मारशत्रूला जिंकण्याचें काम सोपें नाहीं. जातिभेद नाहीं म्हणून सबगोलंकार करून कार्य साधत नसतें. सर्वांचीच नीतिमत्ता व संस्कृति सारखी नसते. विश्वामित्राला राजर्षि व ब्रह्मर्षि हीं पदें प्राप्त करून घेण्यास किती कष्ट पडले याचा इतिहास विसरून कसें चालेल ? साहजीकच ज्या नीतिच्या कपाळीं ईश्वरी भावाचा कुंकुमतिलक नाहीं, व ज्या ऐक्यभावनेच्या मुळाशीं ईश्वरी साक्षात्काराचें दिव्यतेज नाहीं, ती नीतिची व ऐक्यभावनेची कल्पना कृत्रिम असून केव्हांतरी गडगडलीच पाहिजे. बुद्धधर्माच्या मठांची तीच स्थिती झाली. " संत, संतिणी वगैरे सर्व प्रकार, एकंकार, बरोबरीचें नातें, हें प्रथम बरें वाटलें. " पण आतांच वर सांगितलेल्या कारणानें "संतसंतिणी जमतांजमतां मठांत दुराचरणाला सुरवात झाली" (वे. नि. पा. ५१) व लवकरच बुद्धाचे विहार म्हणजे अनीतीचे माहेरघर अशी स्थिती होण्यास तरी हेंच कारण. साहजीकच खुद्द " बुद्ध व्यक्ति नाहींशी होतांच ह्या नवीन धर्माचा डोला विस्कळित झाला " व कोसळून पडला ह्यांत आश्चर्य काय ? स्वामी विवेकानंदांना गौतमबुद्धाचीं कित्येक तत्वें मान्य असलीं तरी ते त्याचे अंधभक्त नव्हते. त्यांना ही गौतमाची चूक उघड-उघड दिसून आलेली आहे. ते म्हणतात:—

" थेट बुद्धापासून तों राजा राममोहन रायापर्यंत सर्वांनीं हीच चूक

केली आहे. जातिबंधनाची उत्पत्ति तात्त्विक हिंदुधर्मापासूनच झाली आहे असा त्यांचा समज झाला. तेव्हां हिंदुधर्माचीच इमारत कोसळून पाडली तर जातिभेद समूळच उपटल्यासारखा होईल, असा सिद्धान्त बांधून त्यांनीं 'मूले कुठारः' या न्यायाचें अवलंबन केलें. पण या सुधारणेच्या कामांत सुधारक म्हणून ज्यांनीं आधाडी मारण्याचा यत्न केला, त्यांनीं प्रत्यक्ष हिंदुधर्मावरच जेव्हां आघात करण्यास सुरवात केली तेव्हां त्यांचा तो प्रयत्न सपशेल फसला. कारण, दगडाची भिंत पाडण्याकरितां मस्तकाचा उपयोग केला तर परिणाम काय होईल तें दिसतेंच आहे!" (स्वा. वि. खा. प. पा. २८।२९). तसेंच ते अन्यत्र म्हणतातः—

"कांहीं विचारी लोकांच्या लक्षांत ही (गुलामगिरीची) गोष्ट कांहीं वर्षांपूर्वींच आली होती. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या सर्व अनर्थांचें कारण त्यांनीं हिंदुधर्माशीं जोडलें. त्यांना असें वाटलें कीं, हिंदुधर्माचा-जो आज जगांतील सर्व धर्मांत मोटा धर्म आहे—लय होणें हाच एक आमची स्थिति सुधारण्याचा उपाय आहे. पण मित्रा! तूं पक्कें लक्षांत ठेव कीं, यांत धर्माचा मुळींच वांक नाहीं. उलट 'सर्वं खल्विदं ब्रह्म' असेंच हिंदुधर्म सांगत आहे." (वि. पत्रें पा. २१) तसेंच ते अजून म्हणतातः-

"हिंदुस्थानांतील धर्माचा उच्छेद झाल्याखेरीज तेथें सुधारणा होणार नाहीं असें जें तेथील पहिल्या सुधारकांस वाटलें, तीच त्यांची मोटी चूक झाली. याचें कारण इतकेंच कीं, त्यांच्यापैकीं बहुधा कोणीहि हिंदुधर्म-तत्त्वांचा आस्थेनें अभ्यास केला नव्हता, व सर्व धर्मांची जी प्रत्यक्ष जननी त्या हिंदुधर्मांतील खरें रहस्य जाणण्याला जें शिक्षण अवश्य आहे तें त्यांपैकीं एकालाहि प्राप्त झालें नव्हतें. आपली सध्याची स्थिती सुधारण्यास आपला धर्म सोडावयास नको, असें मी पुन्हां स्पष्टपणें सांगतों. किंबहुना, आपल्या धर्माची ओळख बुजाल्यामुळेंच आपणांस ही दशा आली आहे, असें मी म्हणतों" (वि. पत्रें पा. ४९). असो. तर याप्रमाणें गौतमाची खुद्द हिंदुधर्मावरच हल्ला करण्यांत चूक झाली व दगडाच्या भिंतीवर आपटल्या जाणाऱ्या मस्तकाप्रमाणें त्याच्या धर्माच्या लवकरच ठिकऱ्या-ठिकऱ्या उडाल्या. उघडच आहे. असला धर्म लोकांना फार दिवस आवडणें शक्यच नव्हतें. "देवाची, सगुण देवाची भक्ति, पूजा वगैरे ज्यांत नाहीं, तो धर्म साधारण जनांना कायमचा मान्य होत नाहीं हें तत्व बहु-

तेक ठरल्यासारखें झालें आहे, आणि त्यायोगानेंच बुद्धधर्म लवकर लयाला गेला. शील व चारित्र्य येवढ्यानें भागत नाहीं, धर्माला काव्य लागत असतें." ( वे. नि. पा. ७९ ) असें जें श्रीयुत फडके म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. साहजीकच "Buddhism declined for the most part, because people no longer cared for it, and not because it was suppressed by force" म्हणजे "बौद्धांचा छळ झाल्यामुळें तो धर्म बुडाला असें नाहीं, तर लोकांतच त्या धर्माची आस्था नाहीशी झाली म्हणून त्या धर्माला उतरती कळा लागली." असें जें "इंपेरिअल गॅझेटिअर ऑफ इंडियां" त व्हाल्यूम २ पान २९९ येथें म्हटलें आहे तें केव्हांही खरेंच आहे. कारण बुद्धानें त्रैविद्येवर चढविलेले हल्ले, जातिभेदाचा दाखविलेला अभाव, व मुक्तिमार्गाचें द्वार सरांस सगळ्यांना मोकळें आहे हा धरलेला अट्टाहास, तसेंच त्याचा नीतिच्या आचरणावरील व आत्मशुद्धीवरील भर, ह्या सर्व गोष्टी भगवद्गीतेंत असून वेदांततत्त्वज्ञानाचें अलोट दिव्य ज्ञान आणि आचांडाल सर्वांना उद्धरून नेणारा सगुणस्वरूपाच्या भक्तिचा मार्ग हे दोन तेजस्वी हिरे त्या भगवद्गीतेच्या दिव्य ग्रंथांत अधिक असल्यामुळें, त्यापुढें बुद्धधर्माचें तेज फार वेळ न पडावें व भगवंतांचा भागवत व अद्वैततत्त्वज्ञानात्मक हिंदुधर्मच अखेर विजयी व्हावा हें किती साहजीक आहे बरें ! असो. पण अशाहि बुद्धापासून व त्याच्या बुद्धधर्मापासून आपणांस कांहींच फायदा झाला नाहीं, असें समजणें मात्र चुकीचें होईल. तेव्हां तें थोडक्यांत सांगून आपण याची रजा घेऊं. त्याचा सविस्तर विचार मागें केलाच आहे. पहिला फायदा म्हणजे, अहिंसामताचा होय. दुसरा फायदा जातिभेदाचीं बंधनें समूळ तोडलीं नाहींत तरी बरींच ढिलीं करून तत्त्वज्ञान सर्वांस मिळेलसें करणें याची तीव्र जाणीव, म्हणजेच वेदांतमतें प्रत्यक्ष कृतींत उतरविण्याची व्यावहारिक धडपड आपण केली पाहिजे हें त्यानें स्वताच्या उदाहरणानें पटवून दिलें. अर्थात् त्याच्यातल्या —त्याच्या धर्मांतल्या—उपरिनिर्दिष्ट दोषांचा त्याग करून, ही त्याची शिकवण पुढील धर्मप्रवर्तकांनीं व विशेषतः महाराष्ट्रीयसाधुसंतांनीं कशी अनुसरली व शिगेस नेऊन भिडविली तें ओघाओघानें कळणारच आहे. प्रवृत्तिनिवृत्तिच्या आंदोलनांत वेदकालीन लोक प्रवृत्तिच्या टोकास, तर

उपनिषद्कालीन निवृत्तिच्या टोकास, गीतेच्या काळीं या लंबकास स्थिर करण्याचा यत्न, तर सनत्सुजातादि इतर प्रकरणांतून व बुद्ध, महावीर, इत्यादिकांच्या उपदेशांतून पुन्हां निवृत्तिवृत्तिचा उठाव झाला. कारण तत्पूर्वीचा समाज प्रवृत्तिच्या टोकाला गेला होता. श्रीयुत चिंतामणराव वैद्य म्हणतात:—

"श्रीकृष्णानें एकांतिक निवृत्तिचा व एकांतिक प्रवृत्तिचा निषेध केला आणि लोकांस मध्यवर्ति बिंदूवर आणण्याचा यत्न केला. पण श्रीकृष्णाच्या ह्या दिव्य उपदेशाचाही कालक्रमानें विपर्यास झाला हें सांगणें नकोच. शेंकडों वर्षांच्या अवधींत श्रीकृष्णाच्या या उपदेशाचा भलताच अर्थ समजला जाऊन प्रवृत्तिकडे वळलेला समाज घड्याळाच्या लंबकाप्रमाणें प्रवृत्तिच्या परमावधीला गेला. असें जाणें अपरिहार्यच होतें. श्रीकृष्णानंतरच्या हजार दोन हजार वर्षांच्या काळांत जनसमाजांत प्रवृत्तिचें प्राबल्य इतकें माजलें कीं, कृष्णभक्ति किंवा भागवत मत म्हणजे सुखोपभोगाचें साधनच आहे, असें लोकांस वाटूं लागलें. जगतांतील भौतिक सुखें भोगणें हीच मनुष्याची इतिकर्तव्यता वाटूं लागली. पूर्वी उपनिषदांच्या निवृत्तीचें बंड वाढूं लागलें होतें, व वेदांत, सांख्य, व योग यांच्या भ्रांत कल्पनांनीं संसारत्याग हेंच आयुष्याचें इतिकर्तव्य असें जें लोक मानूं लागले होते, त्याला तें बंड मोडून, श्रीकृष्णानें आपल्या दिव्य उपदेशानें आळा घातला. पण वर म्हटल्याप्रमाणें त्याचाहि विपर्यास होऊन प्रवृत्तिकडे झुकलेला समाज त्याच्या टोकाला जाऊन जेव्हां त्यांतच गुंगला व रंगला तेव्हां अर्थात्च समाज पुन्हां निवृत्तिकडे वळला आणि बुद्ध, महावीर इत्यादि धर्मोपदेशक उत्पन्न होऊन त्यांचें निवृत्तिपर मत लोकांत पसरूं लागलें. पण हळुहळूं कालावधीनें जनसमाज दुसऱ्या बाजूनें निवृत्तिच्या परमावधीस गेला आणि हजारों बौद्ध आणि जैन भिक्षु आणि भिक्षुकिणी यांनीं गच्च भरलेले शहर-वजा झालेले विहार अनीतीचें माहेरघर बनले. साहाजिकच समाज उलट खाऊन पुन्हां प्रवृत्तिकडे वळला" (म. उ. पा. ८७५). पण त्याचा इतिहास पुढें सांगायचें आधीं, याच सुमारास झालेल्या महाभारतासारख्या आर्यांच्या दिव्य राष्ट्रीय ग्रंथाचा विचार करून तसेंच नंतर जैनधर्माचाहि थोडक्यांत इतिहास पाहून मगच तिकडे वळावें हें बरें.

———

# भाग ६ वा.



महाभारत केव्हां तयार झालें? अर्थात् " गौतमबुद्धाचा व जैन-धर्मीयांचा दणदणीत हल्ला ब्राह्मणांवर व त्यांच्या जुन्या कर्मठ धर्मावर जेव्हां जारीनें सुरू झाला व त्यापायीं त्यांची वाताहात. उडते कीं काय अशी स्थिती प्राप्त झाली तेव्हां, " हेंच ह्याचें सरळ उत्तर आहे. श्री. चिंतामणराव वैद्य आपल्या "The Mahabharat—a Criticism" नामक आंग्लपुस्तकांत हीच गोष्ट पुढीलप्रमाणें सुंदर रितीनें सांगतात:—

" The reason why the Mahabharat was recast and turned into a धर्मग्रंथ, a स्मृति, is that Buddhism and Jainism ( about 500 B. C. ) had assumed an offensive appearance and were threatening to be powerful rivals of the Orthodox Aryan Religion. Owing to this very growing evil the Brahmin teachers probably thonght it necessary to bring together all the floating materials, for the preaching of their religion, into one focus, and hence we have the spectacle of a vast didactic work raised on the foundation of the legend of the Bharat war. Dharma and its preachers, the Brahmins, appear to have been in danger and so adherence to धर्म and obedience to Brahmins is constantly insisted upon throughout the महाभारत. Here is the clue to the fact that the Mahabharat is constantly Dharmaic and tells of the sanctity of its exponents."

अर्थात् महाभारत केव्हां तयार झालें? या प्रश्नाच्या वरील थोडक्यांत केलेल्या विवेचनांतच तें कां तयार झालें, मूळ भारताचें महाभारत कां केलें गेलें, याचेंहि सविस्तर कारण—एकच एक मुख्य कारण—सांगितलें गेलें आहे. आणि श्रीयुत वैद्यांच्या वरील उताऱ्यांतील पहिल्याच ओळी-

वरून दृष्टि फिरविल्याबरोबर महाभारत हा कांहीं मूळचा ग्रंथ नव्हे, तो recast म्हणजे पुनर्लिखित आहे हेंहि पण आंग्लभाषाभिज्ञ वाचकांस कळून आलेंच असेल. पण आहे हा ग्रंथ एकाच हातीं लिहिला गेला नाहीं हें कशावरून ? अशी कोणाची शंका असेल तर त्यालाही पुढील-प्रमाणें उत्तर आहे:—

उपरिनिर्दिष्ट वैद्यांच्या पुस्तकांतल्या पहिल्याच भागांत श्रयुत वैद्य म्हणतातः—

" That the Mahabharat in its present form is the second amplification of an originally much smaller work nobody can consistently deny. Vyas, the author of the original work taught it, as it is said in the work itself, to 5 pupils one of whom was वैशंपायन. Vaishampayan recited the work before the king जनमेजय at the time of the सर्पसत्र performed by him. Then again the amplified Bharat was recited by सौति before शौनक at his twelve years' sacrifice, and there are some questions and answers between शौनक and सौति. These cannot be in the original. We are therefore compelled to admit that सौति or someone else who heard his recitation amplified the original work a second time. That the work has three editions can be proved by other statements also still preserved somehow in the महाभारत......that the work is supposed to have three beginnings ( 1 ) with उपरिचर ( 2 ) अस्तिक ( 3 ) and with the word मनु. The original work was probably in its nature a history and not a didactic work. The name given by Vyas is 'जय' ("जयोनामेतिहासोऽयं".)

In the chapter preceeding the 63rd chapter......a praise of the महाभारत and some facts about its composi-

tion are given by वैशंपायन which clearly shows that these 62 chapters in the आदिपर्व are later additions made by either वैशंपायन or सौति.

The second edition is the edition of वैशंपायन who was one of the 5 व्यासा's pupils who were taught it. There is a statement in the Bharat itself that each one of these five pupils published a different edition of Bharat. This is an express authority for us to hold that वैशंपायन almost recast the whole, and brought ont his own Version. Ashwalayan's enumerating all these five Rishis as भारताचार्यांs or the editiors of Bharat shows that वैशंपायन and his co-pupils' works first came to be called भारत. The extent of वैशंपायन's भारत appears to have been 24000 verses.

Third edition was of सौति. That सौति did recast or elaborate the work of Vaishampayan can be proved from his own lips.—" अस्मिन्स्तु मानुषे लोके वैशंपायन उक्तवान्। एकं शतसहस्रं तु मयोक्तं वै निबोधत ॥ Adi. 1-107. The Sauti's edition begins with the word मनु......Sauti adds preface, an introduction, and the table of contents......Sauti probably gave the name of महाभारत first, on account of its greatness and weight.

The number of पर्वांs as they are enumerated in the आदिपर्व chap. I. certainly exceeds 100 and this is itself sufficient to show that the भारत of वैशंपायन was amplified by सौति ( For Vaishampayan's edition contained 100 Parvas ).

To summarize: the present Mahabharat is, as it were, a reduction of व्यासा's historical poem called

'Triumph' edited by वैशंपायन as भारत, and reprinted or reissued by सौति with notes and additions and with an introduction and a table of contents prefixed to it."

वरील उतारा आम्ही मुद्दामच इतका सविस्तर दिला आहे. कारण महाभारत हा एकहाती ग्रंथ नाहीं, ह्याशिवाय कितीतरी महत्त्वाच्या गोष्टी अगदीं जातांजातां त्याच्याच सिद्धीसाठीं रा. वैद्यांनीं सांगितल्या आहेत. त्याचा थोडक्यांत सारांश असा कीं, "मूळ भारत व्यासांचें.त्यास त्यांनीं 'जय'-नामा इतिहास असें म्हटलें आहे. तसेंच तो त्यानीं वैशंपायनादि आपल्या पांच शिष्यांना सांगितला, तो वैशंपायनानें जनमेजयाला सर्पसत्राचे वेळीं सांगितला. व सौतीनें शौनकाला द्वादशवार्षिक यज्ञाचे वेळीं सांगितला. व्यासांच्या त्या पांची शिष्यांनीं पांच प्रती वेगळ्या लिहिल्या असा खुद्द भारतांतच उल्लेख आहे. आदिपर्वाच्या ६३ व्या अध्यायाच्या पूर्वी प्रारंभास महाभारत ग्रंथाची स्तुति वगैरे आहे. यावरून व उपरिचर नामानें तो अध्याय सुरु होत आहे, यावरून पूर्वीचें ६२ अध्याय वैशंपायनाचे किंवा सौतीचे असले पाहिजेत. वरील पांची शिष्यांना आश्वलायन 'भारताचार्य' ही पदवी देत आहे तीही सहेतुक आहे. व खुद्द सौति आपल्या 'मनु'शब्दप्रारब्ध अशा ग्रंथांत आदिपर्वाच्या पहिल्या अध्यायांतील १०७ व्या श्लोकांत 'पूर्वी वैशंपायनानें हा ग्रंथ सांगितला; आतां माझा एक लाख ग्रंथ ऐका' असें चक्क म्हणत आहे. बरें, वैशंपायनानें आपल्या ग्रंथांत दिलेलीं पर्वें केवळ शंभरच आहेत. पण आदिपर्वप्रथमाध्यायांत सांगितलेली पर्वांची संख्या १०० वर जात. यावरून उघडच होत आहे कीं,वैशंपायनाचें भारत सौतिनें वाढविलें असलें पाहिजे." असो. या बाबतींत अमेरिकेच्या हॉपकिन्स साहेबांचें "The great Epic of India" नामक महाभारतावरील पुस्तकही वाचनीय आहे. त्याच्या पांचव्या प्रकरणांत हॉपकिन्ससाहेब म्हणतातः—

"Its philosophical sections reflect varied schools and contradictory systems.......Its metre precludes the probability of its having been written by one poet or even by several poets of the same era. It appears to be a heterogeneous collection of strings

wound about a nucleus almost lost sight of. The nucleus however is a story. " अर्थात् 'विविध व विरोधी तत्वज्ञानात्मक भागानें व गोष्टीनें आणि विविध वृत्तप्रकारावरून प्रस्तुत ग्रंथ एकहाती मानतां येत नाहीं ' हेंच हॉपकिन्ससाहेबांस वरील उताऱ्यांत सांगावयाचें आहे. तसेंच ते पुढें म्हणतातः—

" The original Bharat was only a quarter of its present size. Then, as later, the different elements were still distinguished and the poem was not regarded as wholly a स्मृति or instruction-book ( धर्मग्रंथ ) but as an artistic poem, काव्य per se. So the pseudo-epic vaunts its over-literary finish—शब्दे चार्थे च हेतौच एषा प्रथमसर्गजा ( सरस्वती ) XII—336,36. " म्हणजे मूळ भारत हें काव्यग्रंथ समजले जाऊन सध्याच्या १/४ होतें असें वरील साहेब म्हणत आहेत तें खरें आहे हें आपण रा. वैद्यांच्या विवेचनांवरूनही पाहिलें आहे. याशियाय महाभारतांत येणाऱ्या परस्परविरोधी कथा वृत्तांत, इ. वरूनही हीच गोष्ट सिद्ध होणार आहे. कारण 'महाभारत' हें काय आहे ? असा प्रश्न केल्यास ती एक विविध व विरोधी कथांची कंथा आहे,असेंच म्हणणें भाग पडतें. मूळची एक गोष्ट आहे, ती चांगली आहे. पण त्यांतच 'मूळ पंचनायकांस एकाच भार्येचे पति करणें, त्यांतल्याच एकाला—अर्जुनाला आपलें ब्रह्मचर्य व्रत मोडून मणिपूरच्या चित्रांगदेच्याच नव्हे, तर उलुपीसारख्या नागकन्येच्याही गळ्यांत मिठ्या मारावयास लावणें, भीमाचें हिडिंबेशीं, शंतनूचें कोळ्याच्या पोरीशीं, अशीं लग्नें दाखविणें, अहिंसामताची अनिश्चितता असून एकीकडे यज्ञांतल्या हिंसेविरुद्ध प्रतिपादन तर दुसरीकडे प्रत्यक्ष नरमेधाच्या उपदेशापर्यंतहि मजल गेलेली असणें, इत्यादि सर्व प्रकारावरून महाभारत हें एका हातीं लिहिलें गेलें नाहीं, त्यावेळची परिस्थिती निर्नायकवत् व शास्त्याचा अभाव दाखविणारी होती-( हें आपण मागें भीष्मानीं सांगितलेल्या गोष्टींत पाहिलेंच आहे )—व गौतमबुद्धाच्या अहिंसेच्या हल्ल्यानें त्या मतास अर्धवट उचलून धरण्याचा यत्न त्यांत झाला आहे, पण एकंदरींत कोणच्याहि माशानें यावें व त्याच्या जाळ्यांत

घुसावे असाच प्रकार फार होता' असें हॉपकिन्स साहेबांनीं चक्क दाखविलें आहे. ते म्हणतातः—

" There is scarcely an attempt to smooth away ( any, save ) the most glaring inconsistencies. There are the grossest incongruities in the Epic the character of which is encyclopedic–all is fish that comes to the net. Tale is added to tale, doctrine to doctrine, without much regard to the effect produced by the juxtaposition. As an example of the grossest inconsistency there is the Arjuna's Vow–story I 214. ( 2 ) Further example is that of the mention of 18 द्वीपाs and seven द्वीपाs in VII 70, 15 & 21......

Although historically the polyandry was no in common thing on the borders of Brahmynic civilization and as such the Pandus having no Brahmic standing and being evidently people from without the pale of that civilization, may naturally indulge in it, still explained otherwise, it remains an inexplicable mystary why polyandry that was condemned was permitted to be indulged in by the heroes that were to be set up as models......There is an impossibility of supposing that the same plan of moral teaching is carried out, not only in the tales of meat–eating, but in the orthodox teaching that meat may be eaten at a sacrifice and in the strict vegeterian diet even at sacrifices which is insisted upon in the अहिंसा doctrine of the later epic. The whole teaching of the अहिंसा doctrine in XII, 338, 4 is opposed not only to the formal codes and to the practice of the epic heroes, but also to the formal

teaching of the epic itself which says expressly यज्ञेषु संस्कृतं मांसं उपभुंजन्न दुष्यति XIII 163, 43. Animal sacrifices are inveighed against in one part of the epic and praised in another ( III 30, etc. ) Even human sacrifices are not only mentioned but also enjoined on the model heroes. XIV, 3, 6, 8. There is again the contradiction on the point of hunting and meat-eating of the hunted quarry. And thus the fact is betrayed that the whole अहिंसा received from Buddhism and half accepted is a late modification of the practice of the model heroes, who disregard the real अहिंसा." असो. याशिवाय हॉपकिन्ससाहेब प्रस्तुत ग्रंथाची ओळख करून देतांना आपल्या पुस्तकाच्या १ ल्या प्रकरणांत आपणांस सांगतातः—

"The Mahabharat alludes commonly to all parts of Vedic literature. That it cites words from the holy text (श्रुति) is of historical moment to learn when it is remembered that in other places even women and slaves are exhorted to hear the recital of the epic." म्हणजे 'वैदिक वाङ्मयाचे उतारे व विशेषतः श्रुतीचे शब्द महाभारतांत आहेत हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. कारण, स्त्री-शूद्रादिकांनी-सुद्धां महाभारत ऐकावें असा त्याच ग्रंथांत अन्यत्र आदेश व उपदेश आहे. तेव्हां ऐतिहासिक दृष्ट्या हें महत्वाचें आहे' असें प्रस्तुत साहेब म्हणतात तें योग्यच आहे. कारण वेदाचे व श्रुतीचे शब्द स्त्रीशूद्रादिकांनी ऐकूं नयेत अशीच पूर्वीची शिकवण, नव्हे, आज्ञा होती. "वेदु संपन्नु होय ठायीं । परि कृपणु ऐसा आन नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥" ह्या ज्ञानोक्तींत हीच गोष्ट सांगितलेली आहे हें आपण मागें पाहिलेंच आहे. अर्थात् गौतमासारख्याचे हल्ले सुरुं झाल्यामुळें विरकळित झालेल्या समाजाला पुनश्च एकत्र बांधण्याची धडपड यांत दिसून येत आहे हें उघड आहे. इतकेंच नव्हे, तर खुद्द भगवंतांनीं भक्तिमार्गांत स्त्रीशूद्रादिकसुद्धां कसें उद्धरून जातील तें सांगितलेलें आपणांस ठाऊकच आहे. आणि गीता

ही गौतमाच्या आर्धींची आहे असें जरी एकमत असलें, तरी ती गौतमाच्या मागूनची असण्याचाहा संभव आहे असा दुसराही एक तर्क ऱ्या. तेलंगांनीं तेथेंच नमूद केलेला आहे, हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. ते म्हणतात कीं, " Either the Gita and Buddhism were alike the outward manifestation of one and the same spiritual upheaval which shook to the centre the current religion, the Gita being the earlier, and less thorough going form of it; or Buddhism having already begun to tell upon Brahminism, the Gita was an attempt to bolster it up, so to say, at its least weak points, the weaker ones being altogether abandoned. " ("An introduction to Bhagwatgita ").

याशिवाय मधला मार्ग म्हणून रा. फडके सुचवितात—"सारांश, बुद्धमतासारख्या बावटळीची कांहीं पूर्वचिन्हें दृष्टीस पडल्यामुळें आपल्या पक्षाची स्थिरस्थावर करण्याची खटपट गीतेंत आहे " ( वे. नि. पा. ९ । १० ) पण ह्या खटपटीचा कसा फारसा उपयोग झाला नाहीं, त्याला कारणें काय, बुद्धाला अखेर फुटून कां निघावें लागलें, त्याच्या धर्माची कांहीं काळ कशी भरभराट झाली व शेवटीं तो कसा व कां हिंदुस्थानांतून बहुंशीं अस्तास गेला, इत्यादि गोष्टी आपण मागें पाहिल्याच आहेत. अस्तु.

याशिवाय " पूर्वी सर्व वेद एकच कसें होते, व कृतयुगांत चार किंवा तीन वेदांचें पठन करणारे ब्राह्मण कसें होतें " इत्यादि कथा सांगून, तसेंच " उपवेद एकूण आयुर्वेद, धनुर्वेद, व गांधर्ववेद असे तीन होते. पैकीं वैद्यकीय ज्ञान महाभारतांत बरेंच असलें तरी आयुर्वेदाबद्दल फारशी माहिती त्यांत कशी साहजीकच नाहीं; धनुर्वेद म्हणजे इष्वस्त्र हा मात्र चार प्रकारचा असून तो क्षत्रियांना वेदाध्ययनाहूनही अधिक महत्त्वाचा कसा होता; व गांधर्ववेदाध्ययनांत गायनवादननर्तनाचा समावेश असून त्याच्या कर्त्याचा मान भरतमुनीकडे न देतां महाभारतांत तो नारदाकडे कसा दिला आहे;" इत्यादि हकीकत त्यांनीं पुढें सांगितली आहे. नंतर ज्योतिषशास्त्रज्ञानाच्या तत्कालीन आश्चर्यकारक ज्ञानानें दिपून जाऊन हॉपकिन्ससाहेब पुढें म्हणतातः—

" Astronomical similes are not infrequent in the epic. Thus Arjuna storms about " like Mars in his orbit." The most surprising astronomical statement in the epic is to the effect that stars are really very large and only appear small on account of the distance. "दीपवद्विप्रकृष्टत्वात्तनूनि सुमहान्त्यपि ( तारारूपाणि )." III 42,34, " म्हणजे " ज्योतिषांतील उपमा महाभारतांत पुष्कळच आहेत. उदाहरणार्थ, अर्जुनाच्या रणभूमिवरील चौफेर गमनाची मंगळाच्या गतीशीं त्यांत तुलना केली आहे. व आश्चर्याची गोष्ट म्हणजे, तारे हे सूर्यासारखेच मोठे असून केवळ दूर अंतरामुळें लहान दिसतात हें विधान होय." ( ३, ४२, ३४, ) असें ते म्हणतात. तसेंच " गीतेंत आलेला ब्रह्मसूत्राचा उल्लेख बहुतेक वेदसूत्रांबद्दल म्हणजेच सामान्यतः वेदांबद्दल असावा " असें म्हणून व " ललितकला ही कांहीं केवळ स्त्रीयांचीच त्यावेळीं वारसदारी नव्हती असें १३।१८।३८ व १३, १०४, १४९ यावरून दिसतें" असें सांगून ते पुढें धर्मशास्त्र—मानवधर्मशास्त्र ह्या—विषयाकडे वळले आहेत. ते म्हणतातः—

" Manu is not referred to much and admitted as authority in the earlier part of the epic III, 159, 29; he is only a name to conjure with, that is all. But from XII ( 336, 39–45 ) onwards he is admitted to be an authority. Again, more important is the fact that, references to Manu's laws in the early books are seldom verifiable in our present code, while references in the didactic epic more often than not corrospond to passages in the extant text......A Manava-Dharma Shastra must from the evidence be regarded as older than the later epic, but later than the early epic." म्हणजे, " महाभारताच्या पाहिल्या अर्धांत मनुचें इतकेसें महात्म्य नसून बाराव्या पर्वापासून पुढेंच तो प्रमाणभूत मानला जाऊं लागला. यावरून मनूचें मानवधर्मशास्त्र ह्या दोहींच्या दरम्यान अधिकारारूढ झालें असलें

पाहिजे " असें हॉपिकिन्ससाहेब वरील उताऱ्यांत थोडक्यांत पण सुंदर रितीनें दाखवून देत आहेत. असो.

यानंतर "महाभारताच्या गीता, अनुगीता, व शांति, इत्यादि भागांतून बृहदारण्यक, छांदोग्य, ऐतरेय, कौशीतकी, श्वेताश्वतर, कठ, मैत्रेय, इत्यादि उपनिषदांच्या मतांची, उपमांची, व शब्दांची सुद्धां प्रतिबिंबें व कधीं कधीं तर नकला सुद्धां कशा झाल्या आहेत, तसेंच सांख्ययोगादिमतें व आश्वलायन गृह्यसूत्रांनाही कसा सहानुभूतिपूर्वक आसरा त्यांत मिळाला आहे " ते त्यांनीं सांगितलें आहे. नाट्यशास्त्रासंबंधीं ते म्हणतातः—

" The conclusion seems inevitable that the technical Natak with it's विदूषक etc. that is the drama in its full form was unknown to the epic proper. There are however many words and expressions that show that there might be at least pantomime. For example, stars are said to be रंगाव्रियः XII 36, 20. *cf.* III 30, 23. But even अभिनय......is not mentioned in the epic proper under that name and no technical dramatic term is found anywhere else.....The हरिवंश however has not only अभिनय but even the dramatic representation of the great Ramayan poem with विदूषक etc. "

"मूळभारतांत संपूर्ण नाटकाची स्पष्ट कल्पना दिसत नसून ती हरिवंशांत मात्र आहे " असें हॉपकिन्सचें वरील उताऱ्यांत थोडक्यांत म्हणणें आहे. यानंतर दैववादाकडे वळून त्यासंबंधींच्या मतांची अनिश्चितता अथवा तिचें प्रतिबिंब महाभारतांत कसें पडलें आहे तें त्यानीं दाखवून दिलें आहे. ते म्हणतातः—

" The Gita says the deed causes the deed; but the deed has another creator, Fate, Time. Fate, or 'what will be, will be' is the cause. " " Sorrow lies in thinking 'I am responsible;' for I do that which the ordainers ordained when I was born. "...In other

places the same Fate that is elsewhere made responsible is scorned—" दैवं क्लीब उपासते." "Only eunuchs worship Fate;" and " there is no Fate, all depends on one's own nature." XII 139, 82; 291, 13."

म्हणजे " दैवं चैवात्र पंचमं " म्हणून गीतेनें कार्याची जबाबदारी व कर्तृत्व दैवाच्या माथीं मारलें तर दुसरीकडे महाभारत दैव हा दुबळ्यांची देवपूजा आहे असें चक्क म्हणत आहे " असा याचा अर्थ आहे. असो. अशाप्रकारें परस्परविरुद्ध व विविधमतांचें प्रतिबिंब महाभारतांत आपणांस दिसून येतें असें हॉपाकिन्स साहेब म्हणत आहेत.याशिवाय "मूळ कथानकाबरोबरच राजांच्या वंशावळींचें व त्यांतील राजांच्या गुणांचें वर्णन करणारे "हे दास सूत बंदी ह्यांहीं आम्हा नृपांसि वानावें," ह्या शल्योक्तिप्रमाणें नृपकुलांचें वर्णन आपल्यां सप्ततंत्री वीणेच्या मधुर सार्थांत करणारे सूत, मागध, वैतालिक, आख्यानशील, असे भाटही त्यावेळीं होते, तसेंच, ऋग्वेदाचें इतकें महत्व असूनहि " वेदानां सामवेदोऽस्मि " व तत्वज्ञानांत " सिद्धानां कापिलो मुनिः " ह्या भगवदुक्ति, भारतीकथा ही कोणा एका वर्गाचीच वारसदारी कशी नाहीं हेंच दाखवितात" असेंहि हॉपाकिन्स साहेब आपणांस सांगत आहेत तें खरें नाहीं असें कोण म्हणेल ? त्याचप्रमाणें:—

" The Mahabharat is not only a Veda, it is so important a Veda that to read it is to dispense with the need of reading other Vedas."

म्हणजे " भारतं पंचमो वेदः " आहे इतकेंच नव्हे तर त्याच्या वाचनानें इतर वेदवाचनाची जरूरच राहत नाहीं इतका तो महत्त्वाचा ग्रंथ समजला जात असे " असें ते म्हणतात तेंहि खरें आहे. असो.

आतां आपण महाभारतांतील शिवपूजा व विष्णुपूजा ह्याकडे वळूं या. यासंबंधांत श्रीयुत वैद्यांच्या " Mahabharat—a Criticism " ह्या ग्रंथांतील "The Vaishnavit element in Mahabharat" हा भाग वाचनीय आहे. शक्य तर तो मूळांतूनच वाचावा अशी आमची वाचकांस शिफारस आहे. आपण महाभारत केव्हां व कां तयार केलें गेलें

हा प्रश्न मागें पाहिलाच आहे. त्याचा संबंध येथेंहि पोहोंचत आहे. व्यास हे श्रीकृष्णास विष्णूचा अवतार मानीत असल्यामुळें ते विष्णुभक्त होते व श्रीकृष्णाची स्तुति त्यांनीं पुष्कळच केली आहे. तथापि ते अंध कृष्णभक्त नव्हते. मौसलपर्वांत खुद्द कृष्णाच्या भार्याहि पंचनदप्रांतातल्या भिल्ल कोळ्यांच्या बरोबर पळून गेल्याचें वर्णन, व दुर्योधनवधप्रसंगीं दुर्योधनाचें तोंडीं घातलेल्या शब्दांनीं देवांनीं आकाशांतून त्यावर पुष्पवृष्टि केल्याचें वर्णन, हीच गोष्ट दाखवितात. असो. याप्रमाणें व्यासांच्यापासून सुरू झालेली विष्णुभक्ति वैशंपायनाच्या वेळीं मात्र कळसास पोंचलेली आपणास दृष्टीस पडते. श्री. वैद्य म्हणतातः—

" Vaishampayan was probably a more pronounced follower of Vaishnavit creed than व्यास, for his भारत is recognised by वैष्णवाs to have the same sanctity as the वेदाs themselves. The inclusion of the Bhagwadgita and Vishnu Sahasranama in the Bharat is probably the chief reason why it is held in so much reverence by the वैष्णवाs " भगवद्गीता व विष्णुसहस्रनाम ह्यामुळेंच वैष्णवांच्या ह्यावर विशेष उड्या पडतात हें उघड आहे. पण भीष्मस्तवराज, गजेंद्रमोक्ष व अनुस्मृति हींही प्रकरणें चटकदार असून ह्या ३ व पहिल्या २ अशा ५ गोष्टी म्हणजे भारतांतील पांच वैष्णवधर्मीय दिव्य रत्नें आहेत ह्यांत तिळमात्र शंका नाहीं.

पण सौतिच्या वेळेस काय स्थिती होती! त्यावेळीं गौतमाचे व जैनांचे हल्ले धडाधड जुन्या धर्मावर सुरू झाले होते. व त्याच सुमारास हळुहळु शिवपूजाही मूळ धर्मांत प्रस्थापित झालेली असल्यामुळें शैवांचा आणि वैष्णवांचा झगडा लागू नये, त्या झगड्याच्या आगीची ह्या बाह्य आगींत भर पडूं नये, व आपसांतल्या कलहाचा 'अस्तनींतला निखारा' अस्तनींतच आंतल्या आंत विझून जावा यासाठीं साहजीकच " शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः " अशाप्रकारचे उद्गार त्यास जागोजाग वदावे व वदवावे लागले. आणि हीच धडपड त्याच्या महाभारतांत दृष्टीस पडते. श्रीयुत वैद्य म्हणतातः—

" But the worship of शिव was as firmly established in the days of Megasthenis as the worship of Vishnu, and सौति, who was concerned with the defence of the whole orthodox religion, as it then existed, against Buddhism, had to introduce episodes and anecdotes in glorification of शिव also. If the भारत of Vaishampayan was distinctly Vaishnavit, it appears to us that the Mahabharat of सौति is distinctly non-sectarian. It is this unifying spirit which makes it dear to all the Hindus and which is the charm of this vast work from a philosophical point of view. And all creeds alike claim it as their sacred book. "

अर्थात् " हरिहरा भेद । नाहीं, नका करूं वाद ।। " ह्या तुकोबाच्या भावी उपदेशाप्रमाणेंच सौतीसही त्यावेळीं कार्य करावयाचें असून तें त्यांनीं इतकें उत्कृष्ट बजाविलें आहे कीं, हिंदुधर्मांतील प्रत्येक पंथ आज त्या पुस्तकास—त्या अथांग व दिव्य तत्वज्ञानात्मक ग्रंथास—आपलेंच म्हणून आनंदानें कवटाळित आहे. अनुशासनपर्वांतील उपमन्युआख्यान घ्या, द्रोणपर्वांतील पुनश्चपाशुपतास्त्रप्राप्तीची अर्जुनाची गोष्ट घ्या, अथवा सौप्तिकपर्वांतील भारतीययुद्धावशिष्ट पांडवपक्षीय निद्रिस्त वीरांचा सूड घेण्यासाठीं ' कराल करवाल ' मागण्याप्रीत्यर्थ अश्वत्थाम्याची—राक्षसी सूडवृत्तिनें पिशाचासारख्या वेड्या झालेल्या अश्वत्थाम्याची—शिवप्रार्थनेची गोष्ट घ्या, ह्या सर्व ठिकाणीं तुम्हास कृष्ण—विष्णु—नारायण शंकराची, किंवा शंकर श्रीकृष्णाची—विष्णुची स्तुति करीत आहेत, किंबहुना, ब्रह्मा-विष्णुमहेश ही त्रयी-एकच आहे असें दाखविलेलें आहे. दत्तात्रेयाचा अवतार ह्याच उदात्त कार्यासाठीं झाला, असेंहि जातां जातां येथें म्हणतां येईल.* असो. तर याप्रमाणें वर सांगितल्याप्रमाणें 'हरिहरभेटी ' च्या देखाव्या-प्रमाणें हरिहरांचा अभेद स्थापून ' तुका म्हणे हरिहरा । एका वेलांटीचा

---

* टीपः—( श्री. फडकेकृत—" सगुणोपासना अथवा मूर्तिपूजा " पान १७० पहा )



**सौतीचा यत्न.** [ हरिहर भट.

" शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः । "

—महाभारत.

फेरा ॥' ह्याप्रमाणें वास्तविक त्यांत भेद नाहीं असें सौतीनें जागोजाग दाखवून दिलें आहे, असें सांगून श्रीयुत वैद्य शेवटीं म्हणतातः—

"The Mahabharat as it is, consequently cannot be looked upon as Vaishnavit, though it was perhaps so in the begining and though the Vaishnavit element had been accumulating before its final reduction." अर्थात् गौतमादिकांच्या हल्ल्यांची भीति नसती तर महाभारत निस्संशय वैष्णवपंथप्रधानच झालें असतें ह्यांत शंका नाहीं, हेंच श्री. वैद्यांना वरील उताऱ्यांत ध्वनित करावयाचें आहे. पण तसे हल्ले आले किंवा येण्याची चिन्हें दिसूं लागलीं तेव्हां साहजिकच वरीलप्रमाणें सौतीनें खटपट केलेली आहे. त्यासंबंधीं—वर निर्देश केलेल्या शिवविष्ण्वात्मैक्याच्या गोष्टींसंबंधीं श्रीयुत वैद्य हेंच सांगतात. ते म्हणतातः—

"It seems clear that all these references to शिव-worship are made in a spirit of unifying the diverse sects that existed when सौति recast the poem." असो. शिवपूजा व विष्णुपूजा हींच दोन वादाचीं मुख्य स्थळें होतीं; पण याशिवाय इतरही देवी, सूर्य, कार्तिकेय,इत्यादि देवतांच्या स्तुतिपर उद्गारही महाभारतांतून आले आहेत अथवा त्यांतील प्रमुख पात्रांच्या मुखांत घातलेले आहेत, त्यावरूनही हीच गोष्ट दृष्टीस पडते कीं, 'मराठा तितुका मेळवावा ' ह्या दासोक्तीसारखेंच ' वैदिक तितुका मेळवावा ' म्हणजे जुन्या धर्मांचे अनुयायी सौतिला एकत्र राखण्याचें कार्य करावयाचें होतें. ह्या दृष्टीनें भीष्मार्जुनयुद्धप्रारंभींच्या पंतांच्या खालील आर्या विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. पंत म्हणतातः—

" युद्धारंभीं यदुपति वदला विजया रथातळीं उतर । दुर्गेसि हात जोडीं होइल खळबळसमुद्र हा सुतर ॥१॥ स्वरथाखालें उतरुनि नमुनि म्हणे विजय विजय दे दुर्गे । त्वत्पदभजनीं बहु सुख, म्हणुनि म्हणे भक्त मुक्तिला दुर गे ॥२॥ " असो. तेव्हां शिवविष्णुच काय, पण तेहतीस कोटि देव तरी "अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न ॥ " ह्या तुकोक्तीप्रमाणें त्या सर्वांत अभेद स्थापण्याचा व दाखविण्याचा यत्न धार्मिक-

दृष्ट्या सौतिस करावयाचा होता, व महाभारत ही कोणच्याही विशिष्ट-पंथाची वारसदारी नसून शैव, वैष्णव, गाणपत्य, शाक्त, इत्यादि सर्व देवांचे उपासक त्यास सारख्याच प्रेमानें आज डोक्यावर घेऊन नाचत आहेत यावरून सौतीचा यत्न त्या बाबतींत पुष्कळच यशस्वी झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पण ही झाली सौतीच्या वेळची गोष्ट. परंतु थोडेसें मागें हटत गेलों तर खुद्द व्यास हे कृष्णाचे चहाते व विष्णूचे उपासक होते असें "नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमं । देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥" ह्या त्यांच्या प्रारंभींच्या श्लोकावरून उघड दिसून येतें. पण वैदिककालाच्या दृष्टीनें विचार करतां हें चमत्कारिक दिसतें. त्यावेळच्या मंत्रांतून तर इंद्राचीच प्रामुख्यानें स्तुति केलेली आहे. मग ते इंद्रावरुणादि देव कोठें गेले? ब्राह्मणकाळीं त्यांचें महत्त्व कमी होऊन सर्व विश्वांत भरून राहिलेला जो एकच एक देव विष्णु त्याचीच स्तुति व पूजा सुरू झाली हें साहजीकच —अनेकत्वांतून एकत्वाकडे जाण्याच्या उच्च मार्गास धरूनच—झालें, व आमचे व्यासही त्याचकाळचे असल्यामुळें त्यांच्या मतांत तत्कालीन ऋषींच्या मतांचेंच प्रतिबिंब पडावें हें किती साहजीक आहे बरें! इतर देवांची कल्पना नव्हती असें नाहीं, व शिवपूजकही त्यावेळीं नव्हते असेंहि नाहीं. पण ते अल्पसंख्याक होते व ऋग्वेदाच्या ऐतरेयब्राह्मणाच्या प्रारंभीं 'देवांत विष्णु श्रेष्ठ व अग्नि हा कनिष्ठ' अशी मर्यादा घालून दिली, तीच चालू झाली. हीच गोष्ट श्रीयुत वैद्यांनीं खालील आंग्लशब्दांत सांगितली आहे, ते म्हणतातः—

That Vyas was an admirer of Shrikrishna and worshipper of Vishnu appears clear from the very first verse of the invocation which we cannot attribute to any one but Vyas. And Vyas but reflected the general statement of the Rishis of the Brahman period ( at which time he lived ) who had come to give predominance to Vishnu and ignore the precedence of Indra, so conspicuous in the Mantra portion of the Vedas. There was another school of Shiva

worship; but it was in the minority, and the diction was laid down by the Rishis that among Gods Agni was the last and Vishnu was the first ( Beginning of the Aitareya Brahman of the Rigveda ). " असो.

आतां आपण महाभारताच्या व भारताच्या कालाचा-रचनाकालाचा-थोडासा विचार करूं. पैकीं, महाभारताच्या कालाचा विचार थोडासा मागें येऊन गेलाच आहे. प्रस्तुत प्रकरणाच्या प्रारंभींच आम्ही तो प्रश्न उपस्थित करून भारताचें महाभारत कां व केव्हां झालें याचें उत्तर तेथेंच श्रीयुत वैद्यांच्या शब्दांच्या सुंदर आधारासह दिलेलें वाचकांस स्मरत असेलच. " गौतमबुद्ध हा इ० स० पूर्वी सहाव्या शतकांत झाला असें ठरलें आहे " ( वे. नि. पा. ४६ ) हें आपणांस ठाऊकच आहे. व त्याच्या हल्लयानें विस्कळित झालेल्या जन-समाजाला स्थिरस्थावर करून एकत्र बांधण्याची धार्मिक घडपड सौतीनें आपल्या महाभारतांत केली हेंहि आपणांस श्री. वैद्य सांगत असल्याचें व आपणांसही स्वतंत्ररीत्या पटल्याचें आपण वर पाहिलेंच आहे. तेव्हां साहजीकच महाभारत इ० स० पूर्वी सहाव्या शतकानंतर पुढल्या एकदोन शतकांत झालें असें यावरून दिसतें. दुसरा महत्त्वाचा मुद्दा असा कीं, महाभारतांत यवनांचें वर्णन वारंवार येत असतें; व हे यवन म्हणजे दुसरे कोणी नसून ॲलेक्झांडरबरोबरचे ग्रीक लोकच होत, हें उघड आहे. आतां अलेक्झांडरची स्वारी इ. स. पूर्वी ३०० च्या सुमारास होऊन ग्रीकांचा संबंध इ० स० पूर्वीच्या प्रारंभापर्यंत टिकला हें इति-हासज्ञांस ठाऊकच आहे. ह्या यवनांशींच आर्यांचा पहिला संबंध पडला व त्यांच्याच पराक्रमीपणाचें महाभारतकारांनीं वर्णन केलें आहे, हें उघड आहे. तसेंच यापूर्वी नक्षत्रांवरून ग्रहांची स्थिति काढण्याची पद्धत होती. आणि राशीवरून ती काढण्याचे सर्व सिद्धांत इ. स. पूर्व ३०० च्या नंतरचे आहेत असें खुद्द दिक्षितच कबूल करतात. तसेंच पूर्वी नक्षत्रांवरून कालगणना करीत असत. महाभारतांत राशींचा उल्लेख नाहीं,पण ग्रीकांचा-यवनांचा आहे व राशी तर आपण इ. स. पूर्व २०० च्या सुमारास ग्रीकांच्या पासूनच घेतल्या असें दिसतें. तेव्हां उघडच महाभारत हें इ. स. पूर्व ३०० ते २०० च्या सुमारास लिहिलें गेलें असलें पाहिजे. हेच दोन

महत्वाचे मुद्दे खुद्द वैद्यांच्याच आंग्ल शब्दांत आम्ही सांगतों. ते आपल्या " Mahabbharat--a criticism "च्या तिसऱ्या चॅप्टरमध्यें म्हणतात—

( 1 ) " Various arguments can be adduced to prove that the महाभारत in its present shape cannot be placed earlier than 300 B. C. The first and the foremost among them is the fact that the यवनाs are frequently mentioned in महाभारत as a very powerful people. The Indians came into contact with the यवनाs or the Greeks, for the first time, in the days of Alexander ( about 300 B. C. ) and their connection lasted from that time to about the beginning of the Christain era.

( 2 ) " It seems therefore certain that the Rashis were borrowed by us about 200 B. C. from the Greeks who had invaded India long ago and whose connection was already threatening to be permanent. As the present Mahabharat mentions Yavanas admiringly, but does not anywhere mention the Rashis, one is justified in holding that it was recast into its present shape some time between 300 and 200 B.C."

असो. याशिवाय अजून एक मुद्दा याचसंबंधीं सांगावासा वाटतो तो असा कीं, याचवेळीं अलेक्झांडरबरोबर आलेल्या मेगॅस्थेनिसनें तत्कालीन लोकसमाज, धर्म व तत्वज्ञान यांचें जें वर्णन लिहून ठेवलें आहे तें महाभारतांत वर्णिलेल्या स्थितीशीं अत्यंत जुळतें आहे. श्रीयुत वैद्य म्हणतात:—

" If a confirmation of the fact urged above that the Mahabharat was recast at the time of Megasthenis is needed, the state of society, religion, and knowledge, depicted generally in the Mahabharat, corresponds very closely with what has been described about India by Megasthenis. " असें

म्हणून जातिभेद हा ‘ वॉटरटाईट कंपार्टमेंट ’ सारखा कसा झाला होता, मांसाशन क्वचित् चालूं असलें तरी हळूंहळूं कसें मागें पडूं लागलें होतें, शिव व विष्णु यांची पूजा कशी स्थायीभाव पावली होती, ग्रीकांनीं केलेल्या हिंदुस्थानच्या भौगोलिक वर्णनाशीं महाभारतीय वर्णन कसें जुळतें आहे, व व्याकरण, न्याय, आणि वेदांत यांचा व्युत्पत्तीसह अभ्यास कसा जारीनें सुरू होता, इत्यादि गोष्टींच्या वर्णनांतील साम्य त्यांनीं दाखवून दिलें आहे. व यावरून मेगॅस्थेनिसच्या वेळींच महाभारत लिहिलें गेलें असें तें म्हणतात तें अयोग्य आहे असें कोण म्हणेल ? असो.

आतां आपण त्याहून पलीकडच्या म्हणजे भारताच्या काळाकडे जाऊं या. याकामीं श्रीयुत न्यायमूर्ति तेलंगांनीं आपल्या “भगवद्गीतेच्या प्रस्तावनें”त व श्रीयुत वैद्यांनीं आपल्या “ Mahabharat-a criticism ” ह्या ग्रंथांतील “ The Date of the Mahabharat War ” ह्या प्रकरणांत सविस्तर विचार केलेला असून तो शक्य तर मूळांतूनच पहावा अशी आमची वाचकांस शिफारस आहे. तथापि सामान्य वाचकांसाठीं आपण त्याचा थोडक्यांत व सोप्या रीतीनें निष्कर्ष पाहूं या. भगवद्गीता, श्रीकृष्ण, व्यास, भारतीय युद्ध, भारत, व कलियुगप्रारंभ या सर्वांचा काळ सामान्यत: एकच आहे. कारण व्यास हे भारतीय युद्धकालीं जिवंत व हजर असून त्यांनीं मागून कांहीं वेळानें आपला ‘जय’ नामा इतिहास लिहिला हें भारताच्या साध्या, बोलत्या व जोरदार भाषाशैलीवरूनच कळून येणार आहे. श्रीयुत वैद्य म्हणतातः--

“ Vyas was a contemporary of the event ( of the महाभारत war ) and wrote his poem some time after the war. The argument from the language of the original poem is that the language of Vyas is simple and forcible and bears the mark of a spoken language.” तसेंच भारतीयुद्ध म्हणजे कलियुगाचा प्रारंभ ही समजूतही आजची नसून आज शेंकडोशें वर्षें चालत आलेली आहे, अगदीं आर्यभट्टापासून ते आजवरच्या सर्व ज्योतिषांना ती संमत आहे, व त्याहून महत्वाची गोष्ट म्हणजे, खुद्द भारतांतच ही कल्पना उचित प्रसंगीं त्या त्या व्यक्तीकडून बोलून दाखविली गेली आहे. उदाहरणार्थ, अधर्मानें

दुर्योधनाच्या मांडीवर गदाप्रहार झालेला पाहून तो खेळ पाहणाऱ्या बळरामदादांनीं जेव्हां भीमाला मारण्यास आपलें लांगल सरसावलें, त्यावेळीं श्रीकृष्ण दादांच्या कमरेस मिठी घालून त्यांस म्हणतात, दादा, " प्राप्तं कलियुगं विद्धि प्रतिज्ञा पांडवस्य च । " ( गदापर्व ). तसेंच आदिपर्वांत, " अंतरे चैव संप्राप्ते कलिद्वापारयोरभूत् । स्यामंतपंचके युद्धं कुरुपांडवसेनयोः " व वनपर्वांत, " एतत्कलियुगं नाम अचिरात् यत्प्रवर्तते । " अशाप्रकारचे उल्लेख आले आहेत, त्यावरून हीच गोष्ट दिसून येते. धोलपूरच्या डोंगरांत निद्रिस्त अशा मुचकुंद ऋषींनीं आपणांस लाथ मारणाऱ्या कालयवनाला केवळ दृष्टिपातानें ठार मारल्यावर तेथेंच लपलेल्या श्रीकृष्णाला 'सध्या कोणचें युग चालू आहे' असें विचारल्यावरून प्रभूंनींही "कलियुगाला सुरवात झालीच समजा " असेंच उत्तर दिलेलें आपण " भगवान् श्रीकृष्णां" त पाहिलेंच आहे, त्यावरूनही हेंच दिसतें. असो, तर याप्रमाणें कलियुगप्रारंभ व भारतीय युद्ध यांची अच्छेद्य व अभेद्य अशी सांगड आहे. इ. स. १८९९ मध्यें कलियुग सुरू होऊन पांच हजार वर्षे झालीं अशी समजूत आहे. अर्थात् भारतीय युद्ध म्हणजे जर कलियुगप्रारंभ तर इ. स. पूर्व ३१०१ ह्या वर्षी भारतीय युद्ध झालें असें यावरून उघड होतें. आता ह्या लढाईलाच कलियुगप्रारंभ कां म्हटलें गेलें किंवा मानलें गेलें याला, प्रत्यक्ष तें तसें होतें हें तर एक उत्तर आहेच; पण तात्त्विक, विचारी व धार्मिक दृष्टीनें पाहिल्यास " कलियुगाचे मुळें । झालें धर्माचें वाटोळें ॥ " ह्या तुकोक्तीप्रमाणें भाऊबंदकीच्या झगड्याचा पाया व बीज व त्यांत एकानें एक अन्याय केला म्हणून दुसऱ्यानें दुसरा करावा, एकानें गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारावें, असा प्रकार, व उच्च संस्कृतिचा—त्या वेळेस कळसास पोंचलेल्या धार्मिक, सामाजिक, व राजकीय उच्च संस्कृतीचा—अधःपात तेव्हांपासून सुरू झाला, अशी साहजीकच सामान्यजनांची समजूत आहे. कारण कृतयुगांतील रामायणाशीं महाभारताची तुलना केल्यास एक शुद्ध व निर्भेळ अशा स्वभावांचा चित्रपट, त्यांत सद्गुण हा सद्गुणच व दुर्गुण हा दुर्गुणच आहे; पण भारतांत तसें नाहीं, ते एक संमिश्र स्वभावांचें आधुनिक नाटक आहे, अशा अर्थाचे उद्गार मिसेस ॲनिबेझंटनींही आपल्या " श्रीरामचंद्र " नामक पुस्तकाच्या प्रस्तावनेंत काढले आहेत. श्रीयुत वैद्य म्हणतातः—

Kali Yuga has properly been believed to begin with the great war between the Pandavas and Kauravas. For, the Aryans of India had arrived at a very high state of both moral and material progress at the time of the war and the war was the beginning of its down-fall. Departures from fixed moral rules begun by one party were multiplied by the other in retaliation." etc. असो. तर याप्रमाणें भारतीयुद्ध म्हणजे कलियुगाचा प्रारंभ होय यांत कांहीं शंका नाहीं हें आपण येथवर पाहिलें.

आतां भगवान् श्रीकृष्ण व त्यांची भगवद्गीता यांचा विचार करूं. श्रीकृष्ण त्यावेळेसच जिवंत होते, त्यांच्या चरित्राचा उत्तरार्ध बराचसा पांडवांच्या बरोबरच गेलेला आहे, किंबहुना, त्यांची व्यक्ति भारत व हरिवंश व भागवत यांतून काढून घेतल्यास हॅम्लेट वाचून होणाऱ्या हॅम्लेट नाटकासारखीच ती पुष्कळशी स्थिती होणार आहे, हें दुराग्रह्याशिवाय इतरांस कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. इ. स. पूर्व ३०० च्या वेळच्या ग्रीक लेखकांनीं लिहून ठेवलेल्या एका गोष्टीवरूनही, इतक्या जुन्या काळीं सुद्धां हाच विश्वास होता कीं कृष्ण व पांडव हे वेगळे करतां येत नाहींत, असें दिसून येईल. श्री. वैद्य म्हणतात:-" Krishna and Pandavas cannot be seperated. There is a curious story related by greek authors, in which, though a jumble of names and facts is made, there can still be inferred ( from it ) the inseperable connection between the Pandavas and Krishna. And the account shows that so far back as 300 B. C. Krishna and Pandavas were inseparably connected in public mind of India." असो. आतां त्यानीं सांगितलेली गीता इतर भारताप्रमाणें खुद्द व्यासानींच कशी लिहिली असली पाहिजे हें गीतेची एका सुंदर, सुबद्ध, व सुश्लिष्ट इमारतीशीं तुलना करून श्री. वैद्यांनीं आपणाला दाखविलेलें आपण मागेंच पाहिलें आहे. अर्थात् गीतेचा व कृष्णाचा काळ म्हणजे भारताचा, भारती-

युद्धाचा, व कलियुगप्रारंभाचाच काल होय ह्यांत शंका नाहीं. आणि या सर्वांचा काळ म्हणजे खुद्द व्यासांचा काळ होय, हेंहि उघड आहे. कारण ते तर त्यावेळीं हजर असून त्यांनींच तर मूळ भारत " जयो नामेतिहासोऽयं " म्हणून लिहिलें हें आपण वर पाहिलेंच आहे. असो.

तर आतां व्यासांचा काळ कोणचा हें आपणास पाहणें आहे. पण त्याचीही विशेष अडचण वाटावयास नको. कारण ते ब्राह्मणकाळीं होते व त्याकाळच्या ऋषींच्या विष्णुपूजेच्या कल्पनेचेंच प्रतिबिंब "नारायणं नमस्कृत्य" ह्या त्यांच्या पहिल्याच श्लोकांत पडलेलें आहे, हें आपण वर पाहिलेंच आहे. तेव्हां ह्या ब्राह्मणकालांतच हा झगडा व त्याचा ग्रंथ झाला हें उघड आहे. याला दुसरींही कारणें आहेत. या व्यासांच्या काव्याची भाषा उपनिषदांच्या भाषेसारखी आहे. समाजस्थितीचें वर्णन दोहोंतही सारखेंच आहे. आर्यांची उच्च संस्कृति, राजे, सैन्य, राजवाडे, बागा यांचीं वर्णनें दोहोंतही आहेत. जातिभेद इतका कडक झालेला नव्हता. ब्राह्मणांनीं आपल्या तपःप्रभावानें आपल्या विशुद्ध चारित्र्याबद्दल नांव गाजवून दैवीसंपत्तीचे साधुपुरुष म्हणून लोकसमाजाकडून ते मानले जाऊं लागले होते. मांसाशन हे क्षत्रियांत व ब्राह्मणांत अनिर्बंध सुरू होतें. सांख्य, योग, वेदांत, इत्यादि नवीन तत्वज्ञानांनीं यज्ञयागादिकांवरील विश्वास डळमळूं लागला असला तरी यज्ञविधी अद्यापपर्यंत धडाक्यानें सुरू होते. याप्रमाणें ब्राह्मणकाळाचें व भारताचें विविध गोष्टींत साम्य दाखवून श्री. वैद्य म्हणतातः—

"These salient features are enough to indicate that the Mahabbharat War took place about the time when the Brahmanas were being and had party been composed." म्हणजे, वरील गोष्टीवरून भारतीययुद्ध हे ब्राह्मणकाळाच्या मध्यावर—मध्याच्या सुमारास—झालें असावें असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें म्हणण्यास दुसरेंहि एक बलवत्तर कारण आहे. तें असें कीं, शतपठब्राह्मणाच्या पहिल्या अर्धांत कौरवपांचाल हीं दोन भरभराटलेलीं राजघराणीं आहेत एवढेंच विधान असून उत्तरार्धांत जनमेजय परिक्षित व त्याचे भाऊ—अर्जुनाचे पणतु—यांचा स्पष्ट उल्लेख आलेला आहे. कृष्ण देवकीपुत्र हा वेदांताचा शिक्षक होता, असा स्पष्ट निर्देश

ांग्योपनिषदानें केला आहे.कृष्णयजुर्वेदाच्या काठकब्राह्मणाच्या परिशिष्टांत सांचा 'एक ऋषि' म्हणून उल्लेख आहे. आतां शतपठब्राह्मणांत भार- य युद्धाबद्दल कांहीं उल्लेख नाहीं हें खरें. पण त्याचें एवढेसें महत्व मानतां नाहीं. कारण जनमेजयपारिक्षित, अंबा, अंबिका, अंबालया, सुभद्रा, र्जुन, फाल्गुन, इत्यादि भारताशीं अत्यंत निगडित अशा नामांच्या त्यांत लेल्या उल्लेखावरून ही लढाई मध्यंतरीं झाली असली पाहिजे यावांचून ग्य अनुमानच निघूं शकत नाहीं व शंकेला तिळमात्रही जागा रहात हीं. म्हणूनच श्री. वैद्य शेवटीं म्हणतात:—

"It thus seems very problable from internal and ternal evidence that the Mahabbharat war took ace after the Shatapath Brahman had been com- enced and certainly before the later portions of it, d some of the oldest Upanishadas such as छांदोग्य d बृहदारण्यक were composed." असो. यावरून म्हणजे, भारती- ाचें नक्की वर्ष जरी कळत नसलें तरी, सामान्यतः तें कोणच्या वेळेच्या ारास जवळजवळ झालें तें निस्संशय कळतें. आतां त्याच्या नक्की काल- ाकडे वळायचें म्हणजे प्रथमतः शतपठब्राह्मणाचा काल पाहिला पाहिजे. टिळक व शंकरराव दिक्षित यांचे ज्योतीर्विषियक शोध याकामीं उप- ाी पडणारे आहेत. वेदांचा मंत्रकाळ इ. स. पूर्वी चार हजार व ब्राह्म- ाळ तीन हजार वर्षापर्यंत जातो, असें त्यांचें म्हणणें आहे. या कामीं क्षितांचे म्हणणें जोरदार व निर्विवाद असून कोणासही पटणारें आहे. पठब्राम्हणाच्या द्वितीय कांडांत "पूर्वेकडून इतर नक्षत्रें हलतात पण ेका हलत नाहींत" अशा अर्थाचें विधान आहे. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या ाी स्थिती इ.स.पूर्व ३०००किंवा कांहीं अधिक वर्षामागें असली पाहिजे ं दीक्षितांनीं आपल्या भारतीय ज्योतिषशास्त्राच्या इतिहासांत दाख- े आहे. वेदांगज्योतिष फार तर इ. स. पूर्व दोनहजार या वर्षी झालें ं दिसतें. व तत्पूर्वी शतपठ ब्राह्मणाचा उत्तरार्ध तयार झाला. म्हणजे स. पू. ३१०० ते २००० ह्या काळांत भारतीय युद्ध झालें, असें सिद्ध . आणि कलियुगप्रारंभास ही लढाई झाली ही समजूत व कलियुगप्रारं- ा काळ याबद्दल वर लिहिलेंच आहे. विष्णुपुराणकर्ता, वराहमिहिर,

कल्हाण, इत्यादि ह्याहून सर्व लोक ह्याच समजुतीस मान तुकवीत आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ग्रीक इतिहासकारांनीं, इ. स. पूर्व ३१२ मध्यें हिंदुस्थानांत जी समजूत प्रचलीत होती म्हणून लिहून ठेविलें आहे, तीवरून पाहतांही कृष्णाचा काळ इ. स. पू. ३०७२ म्हणजे वर नमूद केलेल्या कलियुगप्रारंभाच्या कालाजवळजवळच येतो आहे. आणि हटरसाहेबांनीं आपल्या "इंडियन एम्पायर" नामक पुस्तकांत कबूल केल्याप्रमाणें, 'चंद्रगुप्ताच्या दरबारच्या ग्रीक वकिलांनीं अतिशयोक्ति व कल्पनासाम्राज्य यांची वाट टाकूनच सर्व हकीकत लिहिली आहे' हें लक्षांत घेतां वरील विधानास बळकटीच येत आहे. आणि यावरून ऐतिहासिक गोष्टी व राजवंशावळी किती व्यवस्थित नमूद होत हेंही दिसून येतें. मेगॅस्थेनिस व हुएनसंग यांचे उद्गार ह्यास पोषकच आहेत. खुद्द महाभारत हा मूळ इतिहास आहे. राजतरंगिणी काश्मिराच्या राजांची वंशावळ व इतिहास सांगत आहे. अगदीं वैदिककाळींसुद्धां इतिहासग्रंथ ठाऊक होते. अशा स्थितींत इतिहासाचें ज्ञान हिंदुस्थानास नव्हतें असें कोणच्या तोंडानें कोणास म्हणतां येईल? असें श्री. वैद्य विचारतात तें योग्यच आहे. असो.

वर सांगितलेंच कीं, विष्णुपुराण, वराहमिहिर, व कल्हाण हे भारतीययुद्ध कलियुगप्रारंभास झालें हें कबूल करतात म्हणून. अर्थात् अशा स्थितींत विष्णुपुराणानें जें भारतीयुद्धापासून नंदापर्यंत १०६५ च वर्षे झालीं म्हणून विधान केलें आहे तें सर्व ज्योतिषांच्या मताला विरुद्ध नाहीं काय? अर्थात तें बुद्धाचा पाडाव होऊन हिंदुधर्म पुनश्च प्रस्थापित होण्याच्या धामधुमीच्या कालांत जो ऐतिहासिक अंधार पडला त्या काळांत कोणातरी अज्ञ माणसानें मुळांत दडपलें असण्याचा संभव आहे, हेंच उघड होत नाहीं काय? विशेषतः ग्रीक इतिहासकारांच्या काळजीपूर्वक लेखनाच्याही तें उलट जात असल्यामुळें वरील अनुमानच अधिक संभवनीय आहे.

आतां वराहमिहिरानें गर्गाच्या एका कवितेवरून कलियुगप्रारंभानंतर ६५३ वर्षांनीं भारतीयुद्ध झालें असें म्हटलें आहे. पण तेंहि चूक आहे. कारण गर्ग इ. स. पूर्व १५४ च्या सुमारास झाला असें नुकतेंच कळलें असून शालिवाहनाचा जन्मही त्यावेळीं नव्हता; मग त्याचा शक कोठून येईल? तेव्हां, "२५२६ वर्षे शककलेंत मिळविली असतां त्या ( युधि-

ष्ठेर ) राजाचा काळ होतो " ह्याचा अर्थ मि. अय्यरनीं दाखविल्याप्रमाणें नेराळा—निर्वाणशकाला उद्देशून—असला पाहिजे, आणि त्याप्रमाणें धरलें ह्मणजे युद्धिष्ठिरकाळ इ. स. पूर्व ३१०९ येतो तो मग योग्यच येतो, हें कोणासही कळून येणार आहे. असो.

आतां शेवटीं कल्हाणाची पहिला गोनंद हा राजा पांडवांचा समकालीन होता ही त्याच्या राजतरंगिणींतील समजूत चुकीची असून केवळ नसत्या अभिमानप्रेरित कल्पनासाम्राज्याची दर्शक आहे. कारण महाभारतांत कोणाही काश्मीरराजाचा उल्लेख नाहीं.तेव्हां वराहमिहिराचीच चूक कल्हाणानें करून आपल्या इतर जातभाई काश्मिरी इतिहासकाराप्रमाणें नसत्या महत्त्वकांक्षेला भरी मरून येनकेनप्रकारेण रामायण किंवा महाभारतापर्यंत आपल्या राजांच्या वंशावळीचा जुनेपणा जाऊन भडकत आहे हें दाखवण्याचा त्यानें खुळा प्रयत्न केला आहे इतकेंच.असो येणेंप्रमाणें ही भारताच्या काळाची हकीकत असून आतां आपण जैनांच्या इतिहासाकडे थोडेसें पाहूं या.

---

# भाग ७ वा.



" Buddhism is the rebelled child of Hinduism." हे स्वामी विवेकानंदाचे बुद्ध धर्मासंबंधींचे उद्गार जैनधर्मासही तंतोतंत लागू पडतात. " हिंदुधर्माचें बंडखोर पोर " ह्या पारिभाषेतून हेटाळणीचा जसा ध्वनि निघतो तसाच "a rebelled child " ह्यांतून दुसरा उदात्तही अर्थ काढता येणें शक्य आहे. विशेषतः स्वामींचा बुद्धधर्माविषयींचा आदर त्यांच्या "खाजगी पत्रां"तून व्यक्त झालेला पाहिल्यावर तर—व तो आपण मागें पाहिलाच आहे—स्वामींच्या मनांत हे शब्द उच्चारतांना नक्की कोणची भावना होती,हें सांगणें काठिण आहे. पण कोणचीहि भावना घेतली तरी, आचारदृष्ट्या दोन्ही धर्मांचा—बौद्ध व जैनांचा—आपणास योग्य पाठपुरावा करतां येणार आहे. वैदिकांचे ते स्वर्गपर हपापलेले कामात्मे, श्रौतकर्मांतले ते पशुहिंसक यज्ञयाग, देव,पितर, अतिथि, विवाह, राजा, ब्राह्मण, इत्यादि-

कांच्या सत्कारासाठीं गाई, बैल, बोकड, इत्यादिकांचा होणारा अमानुष वध, वैदिक ब्राह्मणक्षत्रिय तेवढेच मोक्षाचे अधिकारी ही त्यांची दर्पोक्ति, जातिभेदांचे ते कर्कश पाश, खालच्या जातिबद्दल अक्षम्य अवलेहना, इत्यादिकांनीं कोण खरा सहृदय महात्मा खवळून जाणार नाहीं ? आणि कोणा खऱ्या तत्त्ववेत्त्यास त्यांच्या बालिश तत्त्वज्ञानाची चीड येणार नाहीं? वेदांत उर्फ उपनिषदें, गीता, बौद्धधर्म, जैनधर्म, इत्यादिकांचे हल्ले धडाधड जुन्या कर्ममार्गावर—कर्मठ धर्मावर होऊं लागलें व उपनिषदांपासून ते जैनापर्यंत सर्वांनींच एकजात वैदिक धर्माविरुद्ध बंड उभारलें, तें यासाठींच ! पैकीं वेदांतांनीं किंवा उपनिषदांनीं विशेषतः तत्त्वज्ञानात्मक बाजूचा विचार करून असें कांहीं अलोट तत्त्वज्ञान जगास दिलें कीं, त्याच्या तोडीचें ज्ञान सर्व जगांत आजवर कोणच्याच धर्मास प्राप्त झालें नाहीं ! गीतेंत त्याचेंच प्रतिबिंब पडलें आहे. पण गीतेनें इतरही कित्येक गोष्टींचा विचार केलेला असून अहिंसा व जातिभेद याबाबतींत ती कांहीं अंशीं मवाळ कशी ठरते तें आम्ही मागें दाखविलेंच आहे. गौतमानें व जैनधर्मानें या दोन गोष्टींचा विशेष पाठपुरावा करून त्यांना उचलून धरलें, व हिंसाप्रधान कोणच्याही कर्मानें धर्म घडत नसून अधर्म घडतो व मोक्षाला जायला सर्व वर्ण सारखेच अधिकारी आहेत, किंबहुना,समाजांत जातिभेदच नाहीं असें त्यांनीं सांगितलें. पैकीं बुद्धाचीं मतें,त्याची कामागिरी, त्याचा ऱ्हास,इत्यादिबद्दल मागें विवेचन झालेंच आहे. आतां जैनांची विशेष कर्तबगारी,त्यांचा इतिहास, व त्यांच्या ऱ्हासाचीं कारणें, इत्यादि आपणांस आतां पहावयाचें आहे.

जैनधर्माची खरोखर विशेष कामगिरी म्हणजे अहिंसेचीच होय. लो. टिळक म्हणतात:—

"जैनधर्माचें महत्व आज ब्राह्मणधर्मानुयायांस कळत नाहीं. तसें दोन हजार वर्षांपूर्वी नव्हतें. जैनधर्म व ब्राह्मणधर्म यांचा त्यावेळीं मोठा झगडा चालला होता. अहिंसा व मुक्तिसाधनार्थ सर्व वर्णांस ज्ञानदान हीं दोन तत्त्वें जैनांनीं प्रमुखपणें स्वीकारलीं होतीं. मीमांसक मुक्तीकरतां यज्ञयाग करीत. कालीदासानें सुद्धां मेघदूतामध्यें नदीचें पाणी यज्ञपशूंच्या वधानें लाल झाल्याचें वर्णन केलें आहे. पशुवधानें मोक्षप्राप्ति होत नाहीं असें गाजवून जर कोणी दयेचा ध्वज प्रथम उभारला असेल तर तो मान जैनांचाच आहे. ब्राह्मणधर्म व जैनधर्म यांच्यामधील तंट्याचें कारण हिंसाच

होय....बायबलांतसुद्धां ‘Don’t kill’ म्हणजे ‘हत्या करूं नको’ अशी आज्ञा आहे. पण खिस्ती लोकांनीं त्या आज्ञेचा अर्थ ‘मनुष्यहत्या करूं नको’ असा केला आहे......बौद्धधर्मांतसुद्धां अहिंसा हें मुख्य तत्व आहे, परंतु बौद्धधर्मानुयायी चिनी लोकांच्या सपाट्यांतून कोणताच प्राणी सुटत नाहीं...... अहिंसेच्या तत्वावरूनच मोठा बखेडा पडला. पशुयज्ञ वेदविहित मानला असल्यामुळें ब्राह्मण सोडीनात आणि जैन म्हणत कीं, वेदांत हिंसा असेल तर ते वेद आणि हिंसेनें तृप्त होणाऱ्या देवताही आम्हांस मान्य नाहींत. शेवटीं ब्राह्मणांनीं जैनांचें अहिंसातत्व स्वीकारलें.” ( जैन कॉन्फरन्स रिपोर्ट ता. १०।१२।४ ‘मुंबईसमाचार’ ).

याच बाबतींत श्रीयुत वा. गो. आपटे यांनीं सन १९०४ मध्यें “विविधज्ञानविस्तारा”त एक निबंध लिहिला आहे. त्यांत बौद्ध आणि जैनांच्या अहिंसेची तुलना करतांना ते म्हणतातः—

“दोन्ही धर्मांत प्रधान असें जें अहिंसेचें तत्व त्यासंबंधानें सुद्धां त्या दोघांत भिन्नता दृष्टीस पडते. आपल्या हातून जीव हिंसा घडूं नये म्हणून जैन जितके जपतात तितके बौद्ध जपत नाहींत. फार काय, पण हवार्थ साहेबांनीं आपल्या “Religion of India” नामक पुस्तकांत दंतकथेच्या आधारानें लिहिलें आहे, तें खरें असेल तर, स्वतः गौतमबुद्ध डुकराच्या मांसावर यथेच्छ हात मारल्यानें अजीर्ण होऊन मेला हें ऐकून पुष्कळांना चमत्कार वाटेल. या दंतकथेवर भरंवसा न टेवला तरी, प्रचलित बौद्धधर्म व प्रचलित जैनधर्म यांची तुलना केली असतां बौद्धधर्मी देशांत मांसाहार मोठ्या प्रमाणावर जारी आहे ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. आपण स्वतः हिंसा करावयाची नाहीं, परंतु दुसऱ्यानें बोकड मारल्यावर त्याचें मांस घेऊन खाण्यास हरकत नाहीं, असें सोईचें अहिंसातत्व बौद्धांनीं काढलें होतें तें जैनांना मान्य नाहीं.” सारजीकच, श्रीयुत तात्या नेमिनाथ पांगळ आपल्या “जैनधर्मा” वरील १९१३ सालच्या ‘वसंतव्याख्यानमालें’तील व्याख्यानांत साभिमान म्हणतातः—

“खिस्तानें पशुपक्षांस मारण्यास हरकत नाहीं (cow has no soul) असें म्हणून मानवीप्राण्याव्यतिरिक्त प्राण्यांशीं सदयता दर्शविली नाहीं.

बुद्धानें प्राणीहत्येपासून उत्पन्न होणारें मांस खाण्यास मनाई केली नाहीं, यावरून अप्रत्यक्ष रीतीनें जीवहत्येस बौद्धधर्माचीहि संमति दिसते. हिंदुधर्मास वेदांतकथनानुसार, पशुयज्ञ करा व स्वर्ग मिळवा असेंच सांगून धर्माच्या नांवावर अधर्म उर्फ हिंसा करविली आहे; पण एकट्या जैनधर्मानें भूमंडळावर जेवढे म्हणून अत्यंत सूक्ष्मापासून स्थूलापावेतों जे ( लहानापासून मोठे ) जीव आहेत त्या सर्वांना उपद्रव देणें तर दूरच राहिलें पण दुखऊंसुद्धां नका, तर यांशीं सदयांतःकरणानें वागा, त्यांच्याशीं मैत्री जोडा, त्यांच्यावर दया करा, असाच उपदेश करून जैनधर्मानें विश्वांतल्या संपूर्ण प्राण्यांशीं आपली मैत्री व सदयता व्यक्त केली आहे. सभासदहो, जैनधर्मासारखें उदात्त व व्यापक अहिंसातत्व अन्यत्र कोठें आहे काय ? असेल तर सांगा ! " ( श्री. पांगळकृत " जैनधर्म " पा. २८।२९ )

पण ह्या अहिंसातत्वपालनाचे बाबतींत तें तत्त्व जैनांचे पासून ज्यांनीं घेतलें त्या ब्राह्मणानींच पुढें त्याचें तात्विक दृष्टया यथातथ्य स्वरूप रेखाटलें असून ( ज्ञानेश्वरींतील तेराव्या अध्यायांतील 'अहिंसा' पदावरील व्याख्यान पहा ) व्यावहारिकदृष्टया मात्र पाणी तापविणें, व पाणी गाळणें, यासारख्या गोष्टीनें ते जैन आपल्या आचरणाचा धार्मिक दृष्टया कसा हास्यास्पद अतिरेक व मूळ अहिंसामताशीं विसंगत वर्तन कसें करीत असतात व सर्वच गोष्टींत खरें व शुद्ध अहिंसातत्व पुढें ब्राह्मणानींच कसें तत्वतः व व्यवहारतः पाळलें हें ज्ञानेश्वरींतील १३ व्या अध्यायांतील अहिंसेच्या मताचा उपन्यास करण्यापूर्वी तत्पूर्वी ज्ञानेश्वरांनीं जी इतर मतांची झणझणीत हजेरी घेतली आहे व पुढें जें अहिंसेचें दिव्य प्रतिपादन केलें आहे त्यावरूनच दिसून येणार आहे. विस्तारभयास्तव तें सर्व येथें देतां येत नाहीं. पण तें प्रकरण जो सूक्ष्मपणें वाचील त्यास ' शिष्यानें गुरुवर खरोखर मात केली ' असेंच म्हणावे लागेल. कारण हा हास्यास्पद प्रकार व ही विसंगति जैनांच्या पदरीं कशी येते पहा, वर सांगितलेल्या निबंधांत श्री. आपटे म्हणतातः—" हे ढुंढ्येलोक थंड पाणी पीत नाहींत, कारण थंड पाण्यांत सजीव प्राणी असतात...पण पाणी तापवितांना लक्षावधि जीव उष्णतेनें होरपळून मरतात हें त्यांना कळत नाहीं हें आश्चर्य आहे. पाण्याचा एक थेंब घेऊन तो सूक्ष्मदर्शकयंत्रातून पाहिला म्हणजे त्यांत किती असंख्य जीव वळवळतांना दिसतात, पाणी उकळतांना

हे जीव अर्थातच मरतात, परंतु अहिंसा तत्व पाळणारे जैन थंड पाणी पीत नाहींत म्हणजे ते अहिंसेसाठीं हिंसा करतात असें म्हटलें पाहिजे." जी गोष्ट पाणी तापविण्यांत तीच गोष्ट पाणी गाळण्यांत. ज्ञानेश्वरांनीं फक्त हा दुसरा सार्वत्रिक प्रकारच घेऊन त्यावरही जर त्यांनीं हल्ला चढविला आहे व " एकीं धर्माचिया बाहणी । गाळूं आदरिलें पाणी । तंव गाळितया आहाळणी । जीव मेले ।। " असे उद्गार काढले आहेत, तर पाणी तापविण्याच्या गोष्टीनें त्यांचा सात्विक संताप किती झाला असता हें काय सांगायला पाहिजे? आतां या वरील आपत्यांच्या विधानांस उत्तर देण्यासाठीं पुढें सरसावलेल्या सोलापूरच्या शेट हिराचंद नेमचंद यांनीं किती हास्यास्पद व परस्परविरोधी विधानें केलीं आहेत व स्वतःच्या जैनसमाजाच्या कृतीचें किती लंगडें समर्थन केलें आहे तें पाहिलें म्हणजे खरोखर हंसूच येतें! ( " जैनधर्म " पान ६५ ते ६९ पहा ). वास्तविक मुद्दाम जाणून बुजून पाणी तापविणें व जीव मारणें-अगदीं सदयवृत्तीनें ( ! ) जीव मारणें—ही व्यवहारांत घडणारी हिंसा अगदीं सहजासहजीं टाळतां येण्यासारखी आहे. बरें, पाणी तापवून प्यायलें तरच अहिंसा झाली असें नसून उलट पाणी तापविण्यांत थोडीबहुत हिंसा होत असतेच आणि म्हणूनच श्रावक उच्च अशा आठव्या प्रतिमेला चढला म्हणजे त्यास पाणी तापविणें बंद करावें लागतें, असें वरील शेटजीच कबूल करतात. मग पाणी तापविणें बंद करणें हें कार्य इतकें अवघड आहे काय, कीं त्याला उच्च अशा आठव्या प्रतिमेंतच चढलें पाहिजे? चूल पेटविणें, शेतकी करणें, व्यापार करणें, इत्यादि गोष्टी आणि पाणी तापविणे ही गोष्ट सारखीच काय? पण चूल पेटवून एक हिंसा केलीच आहे, तेव्हां मग पाणी तापवून दुसऱ्या हिंसेचीही—जी सहज टाळतां येईल अशा हिंसेचीही—त्यांत भर कां न घाला? अशाप्रकारची खुळी, चमत्कारिक व हास्यास्पद विचारसरणी–अर्थात् अहिंसामत–प्रतिपादनासाठींच ( ! ) शेटजींनीं अंगिकारिली आहे हें पाहून आश्चर्य वाटतें. अहो शेटजी! " पाणी तापविण्यापासून घडणारी हिंसा " श्रावकास " टाळावयास सांगितली नसेल " पण ती कराच, जरूर करा, अशी आज्ञा तरी तुम्हांला तुमच्या जिनेंद्रानें केली आहे काय? "त्याच्या ( श्रावकाच्या ) पदवीला अशा तऱ्हेची मनाई नाहीं " पण ती केलीच

पाहिजे अशी आज्ञा किंवा जोर आहे काय ? व असेल तर अहिंसेचा टेंभा मिरविणाऱ्या तुमच्या त्या जिनेंद्रानें अशी हिंसात्मक व स्वतःच्या मताशीं विसंगत अशी आज्ञा कशी दिली ? काय, ती अपरिहार्य आहे ? श्वासोश्वास करावयास लागणाऱ्या हवेंतील जंतु जितके अपरिहार्यपणें मरतात तितकेंच अपरिहार्यपणें पाणी तापवितांना व गाळतांना मरतात काय ? अहो, धडधडीत तुम्ही आपल्या हातानें पाणी तापवितां व गाळतां, आणि पुन्हां तें अपरिहार्य आहे म्हणतां ? ही किती शरमेची गोष्ट आहे बरें ? श्वासोश्वास न केला तर प्राणी मरेल हें सर्वांस ठाऊक आहे. पाणी तापवून किंवा गाळून न प्यायल्यास प्राणी मरेल असें का जैनांचें म्हणणें आहे ? असे किती लोक मेले आहेत तें ते सांगतील काय ? केवळ शरीरयात्रा चालविण्यासाठीं, जगांत पाऊल टाकल्यापासून, अवशपणें, अगदीं न जाणतां, झोपेंत सुद्धां जी श्वासोश्वासाची अगदीं सहज क्रिया घडते, तिचें जाणूनबुजून पाणी तापाविण्याच्या क्रियेशीं साम्य दाखवून, दोहोंतील हिंसा एकच म्हणणाऱ्यांची बुद्धि ठिकाणावर नाहीं असें म्हटलें पाहिजे ! दुसरें काय ? मग यावर शेटजींचे किंवा त्यांचें मंडन करूं इच्छिणाऱ्या अन्य कोणाचें काय म्हणणं आहे ? आम्हांस तर वाटतें कीं शांतपणें विचार करून निव्वळ वावदूकता जो करणार नाहीं, त्यास हा दोष मुकाट्यानें पदरीं घेणें भाग आहे. आम्ही हें आरोग्यशास्त्राच्या दृष्टीनें लिहिलें नाहीं, हें उघड आहे. कारण आरोग्यदृष्टी व धर्म किंवा पुण्यापुण्यदृष्टि—अहिंसादृष्टि यांचें खडाष्टक आहे व म्हणूनच दोन्हीं प्रश्न वरील शेटजीप्रमाणें एकमेकांत घुसडणें चूक आहे, असें आमचें स्पष्ट मत आहे. “ आयुर्वेदु आघवा । तो याचि मोहोरा पांडवा । जे जीवाकारणें करावा । जीवघातु ॥ ” असें म्हणून आयुर्वेदावरही हल्ला चढविणाऱ्या ज्ञानोबांस जैनांची ही आरोग्यदृष्टी कशी मान्य होणार ? बौद्धांनीं स्थूलपणानें आपणांस सोयीस्कर असें अहिंसातत्व लावून घेतलें. जैनांनीं सूक्ष्मपणें तेंच केलें. एरवीं, “ यतिलोक स्वतः पाणी तापवीत नसून श्रावकांच्या घरीं भोजनास आल्यावेळीं त्यांच्या येथील आयतें तापाविलेलें पाणी पितात....तेव्हां पाणी तापवितांना जी हिंसा होत असते ती यतींच्या हातानें होत नसून श्रावकाच्या हातानें होते” ह्या शेट हिराचंदांच्या विधानांत व “ आपण स्वतः हिंसा करावयाची

नाहीं. परंतु दुसऱ्यानें बोकड मारल्यावर त्याचें मांस घेऊन खाण्यास हरकत नाहीं '' या श्रीयुत आपटेप्रतिप्रादित बौद्धांच्या सोयीस्कर अहिंसा-तत्वविधानांत, तत्वतःच पाहिल्यास, काय मोठासा फरक आहे ? आणि असें असूनही, '' बुद्धानें प्राणीहत्येपासून उत्पन्न होणारें मांस खाण्यास मनाई केली नाहीं यावरून अप्रत्यक्षपणें जीवहत्येस बौद्धधर्माचीही संमति दिसते '' म्हणून त्या धर्माच्यावर आपला जैनधर्म बसविण्याची रा. पांगळ यांची तयारी आहेच ! तेव्हां यांत, तात्त्विकदृष्टया विचार करतां, सत्यापेक्षां स्वधर्माभिनिवेशच अधिक आहे हेंच उघड होत नाहीं काय ? कारण, आम्ही त्यांस व सोलापूरच्या शेट हिराचंदांस असें विचारतों कीं, पाणी तापविणें व गाळणें यांस मनाई न करून, उलट प्रसंगवशात् तें भोजनादि-समयीं पिऊन, यतिलोक अप्रत्यक्षपणें हिंसेला उत्तेजनच देत नाहींत काय ? मग '' यावरून अप्रत्यक्ष रीतीनें जीवहत्येस जैनधर्माची-ही संमति आहे '' असें कोणी म्हटल्यास त्यांस बरें वाटेल काय ? मग स्वतःच्या पायाखालीं काय जळत आहे तें पहावयाचें टाकून, दुसऱ्याच्या डोळ्यांत उगीच बोटें खुपसण्याचा उपद्व्याप यांनीं कां करावा ? दुसरी मौज अशी कीं, "आतां थंड पाणी न पिणारे व पाणी तापवून तें पुन्हां थंड केलेलें पाणी पिणारे मुख्यत्वें यति लोक असतात व व्रती श्रावकांमधील पांचव्या पायरीला चढलेला सचित्रत्यागप्रतिमाधारी श्रावक व त्याच्या पुढील पायऱ्या चढलेले श्रावक मात्र असतात. बाकीचे त्याच्या खालच्या प्रतीचे सर्व अव्रती आणि अणुव्रती श्रावक थंडपाणी गाळून पितात.'' असें शेट हिराचंद म्हणतात ( '' जैनधर्म '' पान ६५ ) म्हणजे थंडपाणी गाळण्यांत एकपट हत्या तर तें तापविण्यांत दसपट हत्या असूनही, उत्तरोत्तर वरच्या पायरीवर ती अधि-काधिक केली जाते असेंच होत नाहीं काय ? म्हणजे अधिक श्रेष्ठ अहिंसा-वादी कोण तर जो अधिक हिंसा करील तो ! असल्या या चमत्कारिक धर्माच्या व्यवहाराला काय नांव द्यावें, तेंच आम्हांस समजत नाहीं ! बरें, या सर्व व्यवहाराचा श्रीयुत हिराचंद कसा मौजेचा ' डिफेन्स ' देतात पहा:—

'' पाणी दुहेरी वस्त्रानें गाळलें म्हणजे बरेच जंतु त्यांतील कमी होतात ( म्हणजे मरतात ! ). आतां जे अतिसूक्ष्म राहिले ते बचावण्याचा कोणताहि

मार्ग नसल्यामुळें न तापावितां पाणी प्यालों तरी ते मरतात व तापवून प्यालों तरी मरतातच. अशा अपरिहार्य स्थितींत निदान थंड पाण्यांतील नवीन होणारे जतुं तरी आपल्या पोटांत जाऊं नयेत अशा दृष्टीनें पाणी तापवून पिण्यांत येतें." ("जैनधर्म" पान ६६) पाणी न तापवितां (किंबहुना न गाळतां) प्याल्यानें जंतु मरतात, यांत आपणाकडे दोष कसा येतो तें समजणें कठिण आहे. कारण, श्वासोच्छ्वासार्थ जशी हवा तसेंच तृषाशमनार्थ जल आहे. व या नैसर्गिकक्रियेंत दोष कोणाचा असलाच तर तो निसर्ग किंवा प्रकृति इचा आहे, आपला नाहीं, हें उघड आहे. बरें, आपला आहे असें घटकाभर वादाकरतां धरलें, तरी त्यावर उपाय काय? तर सहजगत्या जें जीवहत्येचें पाप होत होतें, तें मुद्दाम पाणी तापवून जाणूनबुजून करा! तुमची प्रकृति तरी त्या जंतूंना ठार मारणारच की नाहीं? मग त्याच्या आधीं तुम्हीच कां जाणून बुजून त्यांना ठार मारीत नाहीं? असली ही विचित्र विचारसरणी आहे. बरें, इतकें सगळें कशाकरतां करायचें तर "पाणी न तापविल्यानें पाण्यांत नवीन जंतु जे पुष्कळ उत्पन्न होतात ते तापविल्यानें उत्पन्न होत नाहींत ही येथें अहिंसा आहे!" म्हणून. मग ही अहिंसा—ही असली अहिंसा—सर्वच श्रावकांना कां उपदेशिली नाहीं? (कारण त्यांत हिंसा आहे हेंच त्याचें खरें कारण आहे. मग ह्या हिंसाअहिंसेच्या चक्रिकापत्तींतून जैन कसें सुटणार?) एकंदरींत, अहिंसेसाठीं हिंसा करा असाच जैनांचाहि मग उपदेश आहे म्हणायचा! मग "एवं हिंसाचि करोनि अहिंसा। निफजविजे हा ऐसा। पै पूर्वमीमांसा। निर्णो केला॥" ह्या पूर्वमीमांसेच्या व वरील जैनांच्या निर्णयांत तत्वतः काय फरक राहिला? तस्मात् ज्ञानेश्वर—अगदीं जैनमतासुद्धां सर्वांवर—खालीलप्रमाणें टीका करतात तीच यथार्थ वाटतेः—

"तरी अहिंसा बहुतीं परी। बोलिली असे अवधारी। अपुलालिया मतांतरीं। निरूपिली॥ परी ते ऐसी देखा। जैशा खांडुनिया शाखा। मग तयाचिया बुडुखा। कुंप कीजे॥ कां बाहु तोडोनि पचविजे। मग भुकेची पीडा राखिजे। नाना देऊळ मोडोनि कीजे। पौळी देवा॥... अहो वसती धवळारें। मोडूनि केलीं देव्हारें। नागवूनि वेव्हारें। गवादी घातली॥ मस्तक पांघुरविलें। तंव तळवटीं उघडें पडलें। घर मोडोनि

केले । मांडव पुढें ।। नाना पांघुरणें । जाळूनि जैसें तापणें । का जालें आंग धुणें । कुंजराचें !।। नातरी बैल विकूनि गोठा । पुंसा लावोनि बांधिजे गांठा । इयाकरणी कीं चेष्टा । काई हंसों ? ।।'' अर्थात्—

" एवं हिंसाचि अहिंसा । कर्मकांडीं हा ऐसा । सिद्धान्तु सुमनसा । वोळखे तूं ।। '' असें तें शेवटीं सांगतात तेंच खरें नव्हे काय ? जैनांनीं तात्त्विकदृष्ट्या अहिंसेचें प्रतिपादन पुष्कळच केलें व आचारांतसुद्धां त्यांचे मतें ते अहिंसाच आचरतात. पण खरोखरी वस्तुस्थिति काय आहे, व प्रत्यक्ष आचाराच्या कर्मकांडांत उतरल्यावर जैनासारख्या नितांत अहिंसा-वाद्यांनींसुद्धां नसती ढवळाढवळ केली म्हणजे कसा हास्यास्पद प्रकार होतो, हेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे. कारण, नारू, जंत, वगैरे विकारांवर औषध घेऊन त्यांना मारण्यास ते कचरत नाहींत. पण " जंगमाही हात । लाऊनि काढिलें पित्त । मग राखिले शिणत । आणीक जीव ।।'' ह्या प्रकाराला ज्ञानेश्वर कोणच्या कोटींत घालीत आहेत तें नुकतेंच वर सांगितलेंच आहे. असो. तर याचा निष्कर्ष असा आहे कीं, ज्ञानेश्वरांनीं आपल्या दिव्य ओव्यांतून ध्वनित केल्याप्रमाणें शक्य तितका हळुवारपणा व मार्दव आपल्या चालण्यांत,बोलण्यांत,वागण्यांत, वगैरे आणावें. खुद्द जैनांचा उपदेशही असाच आहे. पण प्रत्यक्ष कृतींतलें त्यांचें चमत्कारिक वर्तन कसें असतें किंवा होतें तें वर सांगितलेंच आहे.ज्ञानेश्वर, एकनाथ,इत्यादि साधूंचे या बाबतींतील बहुमूल्य बोल व दिव्य उद्गार आम्हीं आमच्या "सायुज्यसोपान" नामक ग्रंथांत (पा.११४ते ११९) वर विस्तारशः दिलेच आहेत. जिज्ञासूंनीं ते अवश्य पाहावेत, म्हणजे आमच्या म्हणण्याची— 'शिष्यानें गुरूवर मात केली'या विधानाची त्यांस अधिक प्रतीति येईल.असो.

दुसरी जैनांची कामगिरी म्हणजे जातिभेदनिर्मूलनाचा यत्न अथवा सर्व ज्ञातीस ज्ञान देऊन त्यांनाही मुक्तीचें द्वार खुलें करून देण्याचा सात्त्विक अट्टाहास ही होय. "जैनधर्मांत जातिभेद नाहीं." (लो. टिळक व्याख्यान ता. ३०-११-१९०४.) पण आमच्या मतें या बाबतींत जैनांपेक्षां किंवा जैनांच्या आधीं गौतमानें ही कामगिरी इतकी बिनमोल बजावली होती कीं, त्याच्यापुढें जैनांच्या चळवळीचें फारसें तेज पडलें नाहीं, किंवा वैशिष्ट्य दिसून येत नाहीं. कारण त्यांची त्या बाबतींतली तितकीच—अहिंसामताइतकीच—जोरदार व उज्ज्वल कामगिरी असती, तर

श्री. पांगळ आपल्या वरील व्याख्यानांत त्याचा तितकाच प्रामुख्यानें व गौरवानें उल्लेख करण्यास खास चुकतेना. परंतु त्यांच्या पुस्तकांत त्यांचा असा त्या बाबतींत प्रामुख्यानें उल्लेख कुठेंच नाहीं. तथापि लो. टिळकांच्या १९०४ मधील जैन कॉन्फरन्समधील भाषणावरून जैनांची या बाबतींतली कामगिरी दिसून येते. ते म्हणतातः—

"ब्राह्मणधर्मामध्यें चारी वर्णांना सारखा अधिकार नव्हता, यज्ञानें मोक्षप्राप्ति होते असें ब्राह्मण मानीत. परंतु यज्ञाचा मार्ग शूद्राला खुला नव्हता, तेव्हां परमेश्वराच्या घरीं सगळ्यांना समान हक्क आहेत किंवा नाहींत हा प्रश्न उपस्थित झाला होता. धर्माच्या बाबतींत माणसामाणसांमध्यें अंतर न ठेवतां सर्वांना मोक्षमार्ग एकच आहे असें जैनमतानें ठरविलें. "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ।" हा गीतेंतील श्लोक जैनधर्माचाच परिणाम होय. या व दुसऱ्या बाबतींत-सुद्धां हिंदुधर्मावर जैनधर्माची छाप बसली. हिंदुधर्मांतील अपूर्णता त्यामुळें पुरी झाली." ( श्री. पांगळकृत "जैनधर्म" पान ७६ ) पण अहिंसा-मताप्रमाणेंच ह्या मताचा हा परिणाम जैनामुळें झाला कीं गौतमबुद्धामुळें झाला हें सांगणें कठिण आहे. लो. टिळक जैनामुळें झाला म्हणतात; कारण बुद्धाला ते जैनांच्या मागूनचा समजत आहेत. पण श्री. फडक्यांच्या म्हणण्याप्रमाणें पहातां गौतमबुद्ध आधीं झाला व जैन मागून झाले व मतांच्या वाढत्या परिपूर्ण व जोरदार इतिहासाच्या दृष्टीनें पहातां श्री. फडक्यांचेंच अनुमान अधिक बरोबर दिसतें. आणि तसें कबूल केल्यावर मग वरील लोकमान्यांचे जैनांच्या बाबतींतले उद्गार तंतोतंत बौद्धांसही लागू पडतात हें उघड आहे, व तें आपण मागें पाहिलेंच आहे. किंबहुना, ही चळवळ उपनिषदें व गीता यावेळेपासून कशी चालू आहे, तेंहि आम्ही मागें दाखविलेंच आहे. असो. तथापि, कोणीही कोणाआधीं असला व कुणामुळेंहि प्रथम परिणाम झाला असला, तरी तो दृढ कर-ण्याचे बाबतींत दुसऱ्याचा निःसंशय उपयोग झाला आहे, यांत शंका नाहीं. असो. आतां ह्या जैनबौद्धांच्या आगील–मागीलपणाच्या इतिहासांत अधिक शिरण्यापूर्वी आपण प्रथम जैनांच्या तत्वज्ञानाचें थोडक्यांत परी-क्षण करूं या.

आणि याप्रमाणें विचार करतां आपणांस हें कबूल केलें पाहिजे कीं, उपनिषदाइतकें नसलें तरी जैनांचें तत्वज्ञान बरेंच उच्च दर्जाचें आहे. ते सांख्यमताप्रमाणें आत्माच केवळ मानून तोच उच्चावस्थेंत सिद्ध, महात्मा, परमात्मा, ईश्वर होतो असें त्यांचें म्हणणें आहे. किंबहुना, "ईश्वर वेगळा नसून आत्मा हाच उच्चावस्थेंत ईश्वर आहे" हें जैनांचें वाक्य व "जीवो ब्रह्मैव नापर:" किंवा "अहं ब्रह्मास्मि" "तत्त्वमसि" इत्यादि-वचनांतले शब्द किती सारखे वाटतात? व जैनांनीं ते खरोखर उपनिषद्-कारांच्या किंवा शंकराचार्यांच्या भावनेनीं उच्चारले असते तर किती बहार झाली असती, अशी तळमळ वाटत राहण्याइतकें त्यांचें तेथपर्यंतचें तत्त्वज्ञान उच्च आहे! त्यांचा तो कर्मबंधवाद, शुभाशुभाश्रव व शुद्ध आश्रव यांतील फरक, अशा एक का दोन, किती गोष्टी सांगाव्या, कीं ज्या वाचीत असतां पदोपदीं आपणांस आपल्याच धर्मांतील सर्व तत्त्वांची अथवा विवेचनांची आठवण व्हावी? व्रतें, तपा-चरण, व त्याग—अगदीं नग्नावस्थेपर्यंत त्याग—यांची त्यांच्या धर्मांत फार महती आहे. सांख्यांचें तत्त्वज्ञान व योग्यांचे तपाचरण यांचा सुंदर मिलाफ त्यांच्या धर्मांत झाला आहे. पण गौतमाला आत्मा मान्य नसून यांना तो मान्य असला तरी त्यांच्या—बौद्धांच्या—निर्वाण शब्दाची व कल्पनेची त्यांच्यावर बरीच छाप बसलेली दिसतें. श्रीयुत पांगळ यांचें "जैनधर्म" पुस्तक व श्रीयुत फडक्यांनीं "वेदांत निदर्शन" ह्यांत सांगितलेली हकीकत ह्या दोन्हींच्या वाचनानें सूक्ष्म विचाराअंतीं वरीलप्रकारचा ठसा मनावर उमटतो. पण इतकें त्यांच्या बाजूनें बोलल्यावर उच्च तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें, ईश्वराच्या, परब्रह्माच्या, चित्तत्वाच्या, स्वतंत्र, विश्वव्यापी व विश्वाकृति स्वरूपाच्या दृष्टीनें, "सूक्ष्मचि कोंदाटलें। जेथें तेथें॥" ह्या दासांच्या वचनाप्रमाणें, किंवा "आंत बाहेरी मिया कोंदलें। जग हे निखिळ माझें-चि वोतलें।" या ज्ञानोक्तीप्रमाणें सर्वत्र विलसणाऱ्या व असणाऱ्या त्या परब्रह्माच्या दृष्टीनें पहातां आपणांस जैनधर्मांत काय दिसतें? निव्वळ ठणठणाट! कारण, "परी कैसें कर्म आड आलें। जे मींचि नाहीं म्हणती!॥" अशी त्यांची—त्या जैनांची—स्थिति! आणि तरी म्हणे आम्हांला अस्तिक म्हणा! कोण म्हणणार? आम्ही तर स्पष्ट म्हणतों कीं, हें चित्तत्त्व, हें परब्रह्म, ज्यास मान्य नाहीं तो नास्तिकच होय! जैनधर्म पर-

लोक मानतो, वेदांची निंदा त्यांच्या हिंसाप्रधानत्वामुळें करतो, व म्हणूनच यासाठीं तो नास्तिक नव्हे, तर तो जीवांपेक्षां दुसरा कोणी ईश्वरच मानीत नाहीं म्हणून तो नास्तिक होय, असें आमचें स्पष्ट म्हणणें आहे. यासंबंधांत आम्ही मागें सांख्यांबद्दल लिहितांना काय सांगायचे तें सांगितलेंच आहे. त्याची येथें द्विरुक्ति करण्याचें कारण नाहीं. जैनांच्या अनीश्वरवादीपणाचें म्हणजेच नास्तिकपणाचें प्रत्यंतर वाचकांस खालील उद्गारांवरून पटणार आहे:—

"जैनधर्मात अनादिकाळापासून शुद्ध, बुद्ध, व मुक्त असा कोणी ईश्वर आहे या म्हणण्यास मुळींच आधार नाहीं." (रा. पांगळकृत "जैनधर्म" पान ३)

"सारांश, देव आपत्तींचा नाश करतो व उपासकास साह्य करतो, या म्हणण्यास जैनधर्मात मुळींच थारा नाहीं" (सदर पान ४) "हें जग परमेश्वरानें उत्पन्न केलें आहे, त्यांत असंख्य तारका, सूर्य, चंद्र, नक्षत्रादि प्रकाशमान् ग्रहगण त्यानें निर्माण केलें आहेत; अग्नि, पाणी, भूमी, वनस्पत्यादि स्थावरवस्तु देवानें निर्माण केल्या आहेत, तसेंच मनुष्य, तिर्यचादिक प्राणिवर्गही त्यानेंच उत्पन्न केला. ईश्वर हा सुखदुःखांचा दाता आहे. जगाचीं सूत्रें तो ईश्वरच हालवितो, त्याच्या आज्ञेवांचून झाडाचें पान सुद्धां हलत नाहीं" ही जी अन्य धर्मांची मीमांसा आहे त्या मीमांसेस जैनधर्म मुळींच मानीत नाहीं." (सदर पान ३४)

वाचक ! जैनांच्या नास्तिकपणाच्या सिद्धीसाठीं याहून अधिक वचनांची जरूर आहे काय ? आतां पांगळांच्या प्रतिपादनाकडे लक्ष्य दिल्यास जैनांनीं आपला ईश्वर व इतर धर्मात म्हणतात तो ईश्वर एकच समजून दोहोंचा घोटाळा केला आहे असें दिसतें. जैनांचा ईश्वर म्हणजे आमचा आत्मा होय. त्यांच्या ईश्वराप्रमाणेंच आमच्या आत्म्यालाही उच्च अवस्थेंत शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वरूप प्राप्त होतें. पण याच्या पलीकडे त्यांच्या जवळ काय आहे ? तर निर्वाण व उच्च लोकांत दुसऱ्या आत्मसदृश आत्म्याबरोबर वस्ती. पण आमच्या धर्माची कल्पना निराळी आहे. जैनलोक जीवात्म्यालाच परमात्मा मानतात. म्हणजे परमात्मा म्हणून कोणी नाहींच— त्याचा अत्यंताभाव आहे ही त्यांची समजूत. पण सृष्टिनिर्माणकर्ता—धर्ता—

भर्ता—व हर्ता असा परमात्मा चित्सागर—चित्स्वरूप सर्वत्र भरलेलें असून त्याच्या " एकोऽहं बहु स्याम् " ह्या इच्छेच्या स्फुरणरूप मायेनें जगत् व जीव किंवा आत्मा अशा दोन लाटा त्याच रूपसागरावर उठल्या; पण त्या दोन्हीही खोट्या असून मूळस्वरूपच खरें आहे. याबाबतींत " ब्रह्म-सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रम्हैव नापरः " ही आद्यश्रीशंकराचार्यांची मीमांसा थोडक्यांत पुढें ठेवतां येणार आहे. याहून अधिक विस्तार या ठिकाणीं करतां येणें शक्य नाहीं, आमच्या "सायुज्यसोपान" ग्रंथांत (पृ.२३४-ते२३६वर) तो जिज्ञासूंना केव्हांही पहाण्यास मिळणार आहे. असा ईश्वर, प्रभु, ब्रह्म, चित्तत्व, मानण्याचें कारण सृष्टिकर्तृत्वादिकाची धमक जीवाचे ठायीं—तो कितीही मोठा झाला तरी—नाहीं व असणें शक्य नाहीं. बरें, त्याला तशी हाव बाळगण्याचें वेगळें कारणही नाहीं. कारण, " तत्त्वमसि " किंवा " अहं ब्रह्मास्मि " ह्या भावनेनें जीवब्रह्मैक्य कळल्यावर मग भेदभाव कोठें राहिला ? तथापि " सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः " ही आचार्योक्तीच खरी असून अद्वैतावस्थेंतही ज्ञानी भक्ति म्हणतात ती हीच. "विठ्ठला तूं जळ, मी तेथें कल्लोळ" ह्या भावनेंत—ह्या उच्चतत्त्वज्ञानांत—जें अपरिमित सुख आहे तें इतर कोणच्याहि तत्वज्ञानांत मिळेल काय ? ही उच्च मीमांसा न झेंपल्यामुळेंच जैनांचा सृष्ट्युपत्त्यादिवाद लंगडा पडतो. कारण ज्या पुद्गलांची एवढी सृष्टि झाली किंवा बनली तिची, म्हणजेच त्या पुद्गलांची स्थिति, धारणा, कोण करतो, त्यांना एकत्र कोणी आणलें, त्यास एकत्र कोण राखतो, विश्वचक्र कोण चालवितो-इत्यादि प्रश्नांस त्यांचेजवळ काय उत्तर आहे?"अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकं " असें म्हणणें असेल तर चार्वाकांच्या-नास्तिक व भंगड चार्वाकांच्या हद्दींत जाऊन उभे राहावें लागेल.सांख्याप्रमाणें व बौद्धाप्रमाणेंच जैनांचाही एक पाय—विचारांचा एक पाय—चार्वाकांच्या, नास्तिक चार्वाकांच्याच हद्दींत आहे ह्यांत शंका नाहीं. पण सृष्टिकर्तृत्वमीमांसा सांख्यांनीं प्रकृतीच्याद्वारां उत्कृष्ट लावून दाखविली तसें तरी जैनांच्या जवळ काय आहे ? ईश्वर व जीवात्मा यांचा घोंटाळा व सृष्टिकर्तृत्वमीमांसेचा लंगडेपणा पांगळांच्या पुस्तकांत—" जैनधर्म "त—पृष्ठ ३५ वर चांगला पहावयास सांपडतो. असो.

पण ह्याच उच्च तत्त्वज्ञानाचे अभावीं पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश,

वनस्पति, धान्यें, इत्यादि एकेंद्रिय प्राण्यांशीं वागण्यांत अहिंसेच्या बाबतींत "त्यांच्या हिंसेपासून अलिप्त राहणें कोणासहि शक्यच नाहीं " असें म्हणून जैनांची वागणूक तत्त्वतः कशी लंगडी पडते व हिंदूंची अथवा ब्राह्मणांची कशी उच्च दर्जाची असून जैनांवर मात करणारी आहे हें, ज्ञानेश्वरींतील मागें सांगितलेलें अहिंसेचें व्याख्यान किंवा भागवतांतील एकनाथकृत अहिंसावर्णन वाचलें असतां, कोणासहि समजून येईल. जिज्ञासूस ते आमच्या "सायुज्य-सोपानां"त(पृ. ११४ ते ११९ वर) वाचण्यास सांपडेल. विस्तारभयास्तव तें आम्हास येथें देतां येत नाहीं इतकेंच. असो. पण असें असूनहि स्वधर्माभिनिवेशानें प्रेरित होऊन "जैनधर्मच एके काळीं विश्वधर्म होता" अशा तऱ्हेची अतिशयोक्तीचीं विधानेंहि (पृष्ठ ५० "जैनधर्म") रा. पांगळांनीं केलेलीं आहेत. तीं त्यांच्या धर्मावरील त्यांचें प्रेम व्यक्त करीत असलीं तरी कितपत खरीं आहेत हेंहि पाहिलें पाहिजे. त्याचप्रमाणें लो. टिळक म्हणतात, कीं " वैदिकधर्मी लोकही आचारानें जैनमर्मी व जैनधर्मी लोकही तत्वज्ञानानें वैदिकधर्मी झाले आहेत " ( " जैनधर्म " पृ. ७८।७९ ) पण यांतील पूर्वार्धच खरा असून उत्तरार्ध मुळींच खरा नाहीं, असें श्री. पांगळांच्या व्याख्यानावरून मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. तसें जर होईल– जैन जर आमचें तत्त्वज्ञान स्वीकारतील तर किती बहार होणार आहे ! पण असा दिवस उगवेल तो सुदिन ! असो.

आतां आपण जैनांचा थोडक्यांत इतिहास पाहून त्यांच्या ऱ्हासाचीं किंवा मागें पडण्याचीं कारणें काय झालीं किंवा काय असावींत तें पाहून या धर्माची रजा घेऊं.

जिन हा शब्द 'जी' ( जय् ) या धातूपासून झाला असून " जिन म्हणजे जिंकले आहेत रागद्वेषादि विकार ज्यानें तो " असें लक्षण श्रीयुत पांगळ आपल्या व्याख्यानाच्या प्रारंभींच सांगतात. ( 'जिन म्हणजे जिंकले आहेत ' हा अर्थ चूक आहे; 'जित' म्हणजे जिंकले आहेत असा अर्थ पाहिजे ). " माराजिल्लोकजिज्जिनः " असा अर्थ अमरसिंह सांगतो तो यथार्थच आहे. या धर्मांतील लोकांच्या श्रावक व मुनि अशा दोन कोट्या किंवा दोन अवस्था असून श्रावक हे गृहस्थाश्रमी असल्यामुळें विकल ( म्हणजे अपूर्ण ) चारित्र्य आचरणारे व मुनि हे सकल चारित्र्य-

चान् असे लोक असतात. श्रावकांच्या व मुनींच्या निरनिराळया पायऱ्या असून त्यांचें वर्णन मोठें वाचनीय आहे ह्यांत शंका नाहीं. जिज्ञासूंनीं तें श्री. पांगळांच्या "जैनधर्म" नामक सुंदर पुस्तकांतून अवश्य वाचावें. जैनांचे धंदे असि, मसि, कृषि म्हणजे तरवार, लेखणी, व शेती इत्यादि असून त्यांच्यांत पूर्वकाळीं चांगले चांगले राजेहि होऊन गेलेले आहेत. त्यांच्या 'अनेकांतात्मक स्याद्वादनया' वरून तत्त्वज्ञानांत त्यांची दृष्टी सखोल नाहीं एवढेंच सिद्ध होतें. त्यांचें अहिंसामत किंवा तत्त्व मात्र चांगलें असून, "पंच द्राविड ब्राह्मण निवृत्तमांस आहेत हा जैनांचाच प्रताप होय. अशा रितीनें दुसऱ्या धर्मावर छाप बसवून जय मिळविल्यामुळें जैनांनीं जैन हें नांव अन्वर्थ केलें आहे" असें लो. टिळक म्हणतात तें खरें आहे. ( रा. पांगळकृत " जैनधर्म " पा. ७५ ). किंबहुना, " कुमारिलभट्ट व शंकराचार्य यांनीं ब्राह्मणधर्माची पुन्हां स्थापना केली ती जैनांचें अहिंसा-तत्त्व स्वीकारूनच केली. ते तसें न करते तर ब्राह्मणधर्माची स्थापना झाली असती किंवा नाहीं याबद्दल शंकाच आहे " असेंहि जें लो. टिळक म्हणतात तेंहि योग्यच आहे. ( सदर " जैनधर्म " पा. ७७ ).

आतां त्यांच्या इतिहासाविषयीं विचार करतां " ह्या धर्माचा सोपपत्तिक क्रम लागत नाहीं. भागवतामध्यें जैनधर्माची पूर्वपीठिका दिली आहे, ती ऋषभ देवापासून:—हा जडभारत पूर्वजन्मीं हरिणाच्या ममतेनें, ध्यासानें हरिणाच्या योनींत गेला होता, त्यामुळें आतां सर्वसंगपरित्याग करून मूढ, उन्मत्त, पिशाच्याप्रमाणें रहात असे. हा ऋषभदेव कोंक, वेंक, कुटक देशांत हिंडत असतांना सायुज्यमुक्तिप्रत गेला; त्याची कीर्ति ऐकून अर्हत राजानें त्याच्या वर्तनक्रमाप्रमाणें वर्तन करण्यास सुरवात केली, आणि पहिला धर्म सोडून जैनधर्माचा स्वीकार केला. भारतांतील पौष्यपर्वांत नग्न क्षपणकांचा ( जैनांचा ) उल्लेख आहे. शांकरभाष्यांत जिनांचा उल्लेख आहे. पण तेवढ्यावरून त्यांच्या प्राचीनत्वाचा पुरावा होत नाहीं. " ( वे. नि. पा. ५५ ) नगरच्या जैनांच्या म्हणण्याप्रमाणें ऋषभध्वज व पुंडरीक हे गुजराथी जैनांचे मूळपुरुष व वर्धमानस्वामी आणि गौतम हे धर्मसंस्थापक होत. पुर्वी औन्ध प्रांतांत ते रहात असून वर्धमानस्वामींच्या प्रख्यात भरत नांवाच्या शिष्याबरोबरच त्यांनींहि जैनधर्म स्वीकारला. " ( Ahmednagar gazetteer P. 65 ).

" जैनांत दिगंबर व श्वेतांबर असे दोन पंथ आहेत. पैकीं दिगंबरपंथांत जिनाच्या नग्न मुद्रेची उपासना करितात व श्वेतांबरपंथांत वस्त्राभरणान्वित जिनेंद्रमूर्तींची उपासना करितात. " ( श्री. पांगळकृत " जैनधर्म " पा. ४ ). " जैनधर्माचीं मुख्य मतें अशीं आहेत कीं वेद हे (ब्राह्मण मानतात त्याप्रमाणें ) अपौरुषेय आणि अत्यंत प्रमाण नाहींत; स्वार्थत्याग आणि तप ह्या साधनांनीं जे पुरुष देवांच्याहीपेक्षां जास्त योग्यतेचे झाले, त्यांचा योग्य सन्मान केला पाहिजे; आणि जीवमात्राविषयीं अत्यंत (हास्यास्पद होण्यासारखी ) दया दाखवावी." ( Essays and Lectures by H. H. Wilson P. 287 ) " त्यांच्यांत पुराणें, कथा आहेत, त्या हिंदूंच्या कांहीं गोष्टी घेऊन आणि बुद्धाच्या कांहीं कथा घेऊन बसविल्या आहेत " ( वे. नि. पा. ५६ ) ता. १३ डिसेंबर १९०४ चा 'केसरी' म्हणतोः—

" पूर्वकालीं जैनपंथांत पुष्कळ विद्वान् लोक होऊन गेलेले असून व्याकरण, न्याय किंवा तत्त्वज्ञान यांजवर त्यांनीं लिहिलेले अनेक ग्रंथ आज उपलब्ध आहेत. परंतु आदिशंकराचार्यांनीं जैन तत्त्वज्ञांचीं मतें खोडून वेदांतमताची स्थापना केल्यानंतर जैनलोकांतील विद्वत्परंपरा नाहींशी झाली....रा. रा. टिळक यांनीं आपल्या व्याख्यानांत सांगितल्याप्रमाणें जैनलोकांचें तत्त्वज्ञान जरी आज प्रचारांत नसलें, तरी जैनलोकांच्या अहिंसादि आचारांची छाप आज ब्राह्मणधर्मावर पूर्णपणें बसलेली आहे, आणि शंकराचार्यांनीं जैनमताचें जरी खंडन केलें, तरी जैनआचारांची ब्राह्मणधर्मावर बसलेली छाप कबूल करूनच त्यांस आपलें काम करावें लागलें......जैनपंथांत वेद प्रमाण मानीत नाहींत हें खरें आहे, पण त्याचें कारण श्रौतकर्मांतील हिंसा होय, वैदिक धर्मपरंपरेबद्दल अनास्था नव्हे, हें आम्ही नेहमीं लक्षांत बाळगलें पाहिजे, रामायण, महाभारत किंवा पुराणें यांतील कथा किंवा देवता आणि योगशास्त्रांतील तत्त्वें जैन लोकांस आमच्याप्रमाणेंच मान्य आहेत. " इ. वरील ' केसरी ' म्हणतो त्याप्रमाणें "दुसऱ्या धर्मांतील लोक या धर्मांत घेतां येतात" हाही त्याचा एक विशेष आहे. तसेंच तो-' केसरी '—पुढें म्हणतोः—"राष्ट्रीय प्रगतीस मांसाहाराची अपेक्षा आहे असें जें कित्येकांचें मत आहे तें अगदीं चुकीचें आहे. हर्बर्ट

स्पेन्सरसारखे तत्त्वज्ञानी यांसही एकदां अहिंसातत्त्व मान्य झालेलें होतें;... अहिंसाधर्माची योग्यता एवढ्यावरून सहज कळून येणार आहे. ”

आतां जैनांच्या काळासंबंधीं विचार करतां १९०४ सालीं लोकमान्यांचें मत खालीलप्रमाणें होतें:—

“ प्रथम प्रथम विद्वान लोकांची अशी समजूत होती कीं, बौद्धधर्मापासून जैनधर्माची उत्पत्ति आहे; परंतु ती समजूत आतां चुकीची ठरली आहे. प्राचीन पुस्तकावरून असें दिसतें कीं, महावीराचा बुद्ध हा शिष्य होता. बुद्धशक व महावीरशक यामध्यें २७ वर्षांचें अंतर आहे. बौद्धधर्मात बुद्धापूर्वी २४ बुद्ध झाल्याचा उल्लेख आहे.जैनधर्मांतही २४ तीर्थंकर झाले.बौद्धधर्मांतील बऱ्याच उदात्त तत्त्वांचा उगम जैनधर्मांत सांपडेल ” ( सदर “जैनधर्म” पा. ७४।७५ ). वास्तविक दोहोंतही जर पूर्वजांची संख्या २४ आहे तर फारतर दोन्ही धर्म side by side म्हणजे एकाच वेळीं उदयास आले असें म्हणता येईल. मग, तरीही जैनांना लोकमान्य आधींचे कां मानतात समजत नाहीं. आतां त्या दोन शकांतल्या २० वर्षांच्या अंतरावरूनच केवळ लोकमान्यांचें अनुमान असेल तर तें बरोबर आहे. पण एरवीं, गीता व बुद्धधर्म यांचा विचार करतांना, “ In this view the old system of Upanishads, Gita, and Buddhistic philosophy constitute a regular progression.” ही जी ऐतिहासिक प्रगतीची कल्पना श्रीयुत तेलंगांनीं बोलून दाखविली आहे तीच येथेंहि—तत्वज्ञान व आचार ह्या दोन्ही दृष्टीनें—लागू करण्यास हरकत नाहीं, नव्हे, लागू पडते. व त्यांत आमच्यामतें आत्मासुद्धां न मानणारा, मृतपशूचें मांस खाण्यास परवानगी देणारा, व प्रत्यक्ष आजच्या आचारांतही अहिंसेचें तत्व ज्याच्या चिनी लोकासारख्या अनुयायांनीं पुस्तकांतच गुंडाळून ठेवलें आहे असा बौद्धधर्म हा परमेश्वर म्हणून कां होईना पण जीवात्मा मानणाऱ्या, मांसनिवृत्त, व अहिंसाप्रधान अशा जैनधर्मापासून निघाला म्हणण्यापेक्षां, बौद्धांत असलेली कमताई किंवा कमीपणा जैनांनीं—त्यामागून येणाऱ्या जैनांनीं—भरून काढला व तीं तत्वें अधिक खंबीर करून रेसिस नेऊन भिडविलीं असें म्हणणेंच सृष्टिक्रमानुसार होणार आहे.वुइल्सन साहेबांचेंहि “जैन हे अलिकडचे आहेत” असेंच मत आहे. व श्रीयुत फड-

क्यांचेंहि तसेंच मत असल्यामुळें बुहल्सनचें मत त्यांनीं आपल्या ' वेदांत-निदर्शनां ' त ( सन १९१३ ) खालीलप्रमाणें दिलें आहे:—

" एकंदर मिळालेल्या सर्व विश्वसनीय पुराव्यावरून पहातां जैन मत बुद्धमताच्या मानानें अलीकडचें आहे. इ. स. आठव्या किंवा नवव्या शतकाच्या सुमाराला त्यांचा उदय झाला असावा; पुढें त्यांना राजाश्रय मिळाला. बुद्धांचा पोटभेद म्हणून जैनमत पूर्वी असेल, परंतु बुद्धधर्माला पडती कळा लागलेली संधि पाहून त्यांनीं आपली महती वाढविली. ह्याला पुरावा दक्षिणेकडल्या दंतकथांत पुष्कळ आहे. अकलंक नांवाच्याा जैन भिक्षूनें कांची-च्या बुद्धांचा पांडाव करून त्यांना हद्दपार करविलें, मदुरेचा राजा वरपांडय ह्यानें जैनधर्म स्वीकारला आणि बुद्धांचा छळ केला, त्यांचे हालहाल करून त्यांना देशाबाहेर घालवून दिले, गुजराथेंतील बुद्ध संस्थानिकाच्या मागून जैनांचे हातीं सत्ता आली, सारांश, बुद्धधर्माची समूळ हकालपट्टी होण्याला जैनलोकच कारण झाले. त्यांच्या उदयाला ६।७ व्या शतकांत आरंभ झाला तो बाराव्या शतकापर्यंत त्यांची सद्दी टिकली. " ( Essays and lectures by H. H. Wilson p. 334 ). वास्तविक शंकराचार्यांनीं जैनमताचें खंडन करूनही त्यांची ' सद्दी ' इतकी कां ' टिकली ' याचें कारण श्री. वा. गो. आपटे यांच्या खालील उद्गा-रांवरून समजून येईल:—

" बौद्धधर्माचा हिंदुधर्मांत लोप झाला, तसा जैनधर्माचा झाला नाहीं, पण त्याला अनेक ऐतिहासिक कारणें आहेत. त्यांचा संक्षेपतः उल्लेख केला तरी फार विस्तार होईल. पण मुख्य गोष्ट ही आहे कीं, बौद्धधर्माचा वैदिक धर्माशीं प्रत्यक्ष संघर्ष झाला तसा जैनधर्माचार्योनीं होऊं दिला नाहीं. बौद्धांनीं मूर्तिपूजेचा स्वीकार कधीं केला नाहीं. जैनांनीं देवांच्या मूर्ती बस-विल्या नाहींत, तरी तीर्थंकराच्या बसवून देवांच्या मूर्तिप्रमाणेंच सारे षोड-शोपचार करण्याचा प्रघात उचलला. जैनांनीं हिंदुधर्माशीं सलोखा टेवण्या-च्या बुद्धीनें म्हणा किंवा कोणत्याही बुद्धीनें म्हणा, पण वैष्णवांशीं आपले आचार जुळतेच ठेवले. इतकेंच नाहीं तर अनेक जैन घराण्याचे कुलोपा-ध्याय अद्यापही वैष्णव असलेले आढळतात. जैनांनीं वैदिकधर्माला किंवा हिंदुधर्माला कधीं विरोध केला नाहीं. त्यापासून फक्त अलिप्तपणा आरंभीं

ठेवला व हळुहळू न कळत त्यांचे कित्येक आचार घेतले. यामुळें हिंदूंचा कटाक्ष बौद्धांवर जसा होता तसा जैनांवर कधीं गेला नाहीं. जैनधर्म टिकून राहिला यांतलें रहस्य हें आहे, असें माझ्या अल्पमतीला वाटतें." (रा. पांगळकृत "जैनधर्म" पा. ५९-६०). श्रीयुत फडकेहि म्हणतातः—"जैनांच्या देवळांत तीर्थंकराची पूजा आहे. देवळांतील अधिकार गुजरब्राह्मणाकडे असतो. असल्या सुधारणा करून त्यांनीं ब्राह्मण लोकांच्या वैराचा रोंख कमी केला." (वे. नि. पा. ५५।५६). पण याशिवाय दोघांच्या—बौद्ध व जैन ह्यांच्या—तत्त्वज्ञानांत, मतांत, व आचारांतहि मुळापासूनच फरक होता हेंहि जैनांचा धर्म टिकून राहण्याचें अजून एक कारण सांगता येईल.

आतां बुद्धांचा पोटभेद म्हणून निघालेल्या, व बुद्धाच्या अज्ञेयवादापलीकडे जाऊन उघडउघड नास्तिकपंथ स्वीकारणाऱ्या नागार्जुनापासून फुटून निघालेल्या, महावीरपंथाच्या (" विदेह—तिरहूत—मध्यें वैसलीजवळील कुंडग्रामीं रहाणारा क्षत्रियजातीचा महावीर नांवाचा पुरुष जैनधर्माचा उत्पादक होता "— Imperial Gazetteer of India, Part 2, P. 260.) जैन धर्माला व त्याच्या मताला अखेर मागें पडून त्याची गति शेवटीं बाराव्या शतकांत कुंठित कां झाली हें पाहिल्यास खालीलप्रमाणें कारणें सांगता येतीलः—

(१) " पण हळुहळू कालावधीनें जनसमाज दुसऱ्याबाजूनें निवृत्तीच्या परमावधीस गेला, आणि हजारों बौद्ध आणि जैन भिक्षु आणि भिक्षुकिणी यांनीं गच्च भरलेले शहरवजा झालेले विहार अनीतीचे माहेरघर बनले.... खोट्या संन्याश्यांनीं संन्यासास त्या काळीं इतक्या नीच स्थितींत आणून सोडलें होतें कीं, संन्यासी म्हटला म्हणजे मंडनमिश्राच्या डोक्याची तिडीक उठे. " (म. उ. पा. ८७५-६)

(२) " शंकराचार्यांच्या वक्तृत्वाच्या ओघापुढें आणि विद्वत्तेच्या जोरापुढें कोणाचा टिकाव लागला नाहीं, आणि बहुतेक पाखांडवाद्यांचीं तोंडें बंद झालीं. " (वे. नि. पा. ५९) आचार्यांनीं जैनमताचें खंडन केलें.

(३) जैन हे सांख्यांप्रमाणें अनीश्वरवादी म्हणजेच नास्तिक होते.

(४) त्यांच्या अहिंसेच्या आचारांत हास्यास्पद असा परस्परविरुद्धपण होता. म्हणून ज्ञानेश्वरासारख्यांनीं त्यांच्यावर योग्य टीका केली.

(५) बाराव्या शतकाचे सुमारास वरील कारणांनीं आधींच कमजोर झालेल्या जैनधर्मांची "अखेर लिंगायतच्या पंथांनीं वाढ खुंटविली." (वे. नि. पा. ६२). असो.

पण अशाहि जिनानें सांगितलेल्या व म्हणूनच "जैन"नाम पावलेल्या जैनधर्माच्या मूळ स्वरूपांत—"उदात्त तत्त्वें, आत्मोन्नतिकारक धर्माचरण, कमालीचा स्वार्थत्याग, अत्यंत सूक्ष्म प्राण्यांपासून ते स्थूल प्राण्यांविषयींची सदयता, सूक्ष्म जंतूंचा बचाव करण्याचा उदात्त व विश्वव्यापक उपदेश" (जैनधर्म पा. ५०) वगैरे गोष्टी असल्यामुळें व "हास्तिना पीड्यमानोऽपि न गच्छेज्जिनमंदिरम्" अशा संकुचित किंवा हट्टी वृत्तिचा काळ निस्संशय आतां उरला नसल्यामुळें, सर्वांनीं जैनांच्या धर्माच्या इतिहासाचा अभ्यास करावा अशाच लायकीचा तो आहे ह्यांत संशय नाहीं, असें शेवटीं सांगून आपण आतां पुढील भागाकडे वळूं या.

---

# भाग ८ वा.



बाराव्याशतकाचे सुमारास जैनधर्माचा ऱ्हास कां झाला व त्याची गति कुंठित कां झाली याचीं कारणें मागील भागाच्या शेवटीं थोडक्यांत दिलींच आहेत. तसेंच तो धर्म ऱ्हास पावला असला, सद्दीत नसला, त्याची गति किंवा प्रगति कुंठित झाली असली, तरी तो अद्यापपर्यंत हिंदुस्थानांत टिकाव धरून राहिला आहे याचीं कारणें काय, त्यास गुरुस्थानीं असलेल्या बौद्धांची हिंदुस्थानांतून हकालपट्टी कां झाली व शिष्यस्थानीं असलेले जैन कां व कसे टिकाव धरून राहूं शकले, "महापुरें झाडें जातीं। तेथें लव्हाळें वाचतीं।" असा कांहींसा प्रकार त्यांत कसा झाला, एक चित्र असें कां झालें व दुसरें तसें कां उमटलें, त्याचीं कारणेंहि आम्हीं त्यापूर्वी सांगितलींच आहेत. पण टिकून राहिला असला, तरी तो नऊ ते बाराव्या शतकापर्यंत स्वतःच्या दोषांनीं व मंडनमिश्र, शंकर, ज्ञानेश्वर, इत्यादिकांच्या हल्ल्यांनीं बराच खिळखिळा झाला होता, व शेवटीं लिंगा-

यतांनीं त्याची वाढ खुंटविली हें खरें आहे. हें कसकसें झालें तें आपण आतां आपण प्रागतिक इतिहासाच्या दृष्टीनें पाहूं व त्यासाठीं आपणांस आधीं थोडें मागें हटलें पाहिजे.

गीता व बुद्ध-जैन यापर्यंतच्या प्रवृत्तिनिवृत्तीच्या आंदोलनाचा क्रम आम्ही मागें दिलाच आहे. श्रीकृष्णाच्या उपदेशानें प्रवृत्तीकडे वळलेला समाज, पुढील हजार दोन हजार वर्षांत घड्याळाच्या लंबकाप्रमाणें प्रवृत्तीच्या परमावधीस जाऊन चैन आणि सुखोपभोग यांत दंग झाला, तेव्हां साहजीकच समाज निवृत्तीकडे पुन्हां वळला व बुद्ध, महावीर इत्यादि धर्मोपदेशक निघून त्यांचें निवृत्तिपर मत लोकांत पसरूं लागलें. पण अशाहि निवृत्तिपर मताच्या दुसऱ्या—परमावधीच्या—टोंकाला हळूहळू जाऊन तत्कालीन समाज खोट्या संन्यासीसंन्यासिनींच्या व बौद्ध व जैन भिक्षुभिक्षुणींच्या अनीतिकर्दमानें इतका लडबडला गेला कीं, कोणासही ह्या दिखाऊ टेंभ्याचा वीटच यावा. तेव्हां साहजीकच संन्यासाचें नांव घेतलें कीं, मंडनमिश्राच्या डोक्याची तिडिक उठे यांत नवल नाहीं. "साहजीकच समाज उलट खाऊन पुन्हां प्रवृत्तीकडे वळला. तो इतका कीं, जैन व बौद्ध ह्यांनीं वेदांस झुगारून देऊन अरण्यवास व संन्यासास गादीवर बसविलें होतें तर मंडनमिश्रादि नवीन मंडळींनीं वेदांस पुन्हां गादीवर बसवून मद्यमांसाचें सेवन पुन्हां सुरूं केलें, आणि संन्यासास पदच्युत करून त्यास कलिवर्ज्यांत टाकलें." ( म. उ. पा. ८७६ ) "ख्रिस्तशकाच्या ५ व्या शतकापर्यंत बुद्धधर्माची चलती उत्तर हिंदुस्थानांत होती. त्यावर प्रथम हल्ला कुमारिलभट्टानें केला. सहाव्या ७ व्या शतकांत त्या बुद्धधर्माला उतरती कळा लागली. मंडनमिश्रानें कर्ममार्गाला प्राधान्य देऊन ह्या यतींचे बंड मोडण्याचा विडा उचलला होता. बुद्धधर्माच्या विस्कळीतपणानें अनीति व स्वतंत्रता यांचा फार फैलाव झाला होता, तो मोडून समाजाला शास्ता होऊन त्याला नियमबद्धता त्यानें आणली." ( वे. नि. पा. ५२—५३ ) पण मद्यमांसादिकांचे यथेच्छ सेवन सुरूं झाल्यावर समाज प्रवृत्तीकडे, कर्माकडे, सुखोपभोगाकडे झुकूं लागावा यांत काय आश्चर्य आहे ? संन्यास हा तत्वतः केव्हांही वाईट नाहीं; पण त्यावर हल्ला करून कर्ममार्गाचें पुनश्च प्रतिपादन करण्याच्या भरांत मंडनमिश्रादिकांना याचें भान राहिलें नाहीं. व संन्यासाला

कलिवर्ज्यांत टाकण्यापर्यंत त्यांची हद्द जाऊन पोहोंचली. जणूं कांहीं कलियुगांत उत्कृष्ट संन्यासी निर्माणच होऊं शकत नाहींत किंवा शकणार नाहींत! पण ही गोष्ट खोटी आहे असें मंडनमिश्रादिकांच्या नाकावर टिच्चून सांगून संन्यासधर्माची महती पुनश्च प्रस्थापित करण्यास, खुद्द श्रीशंकराचार्यांचा आद्य अवतारच आठव्या शतकांत दक्षिणभागांत कन्नड प्रांतांत उत्पन्न झाला ! व त्यांनीं मंडनमिश्राशीं वाद खेळून वादाच्या निर्णयाचा निकाल सांगण्यास बसलेल्या खुद्द त्याच्या बायकोकडूनच तो वादांत हरल्याची कबुली मिळविली ! शंकराचार्यांच्या जोरदार वक्तृत्वापुढें व विद्वत्तेपुढें जगांतला कोणचा पामर टिकाव धरूं शकणार आहे ? त्यांनीं आपल्या अगाधविद्वत्तेनें व जोरदार भाषासरणीनें मंडनमिश्रास तर पराभूत केलेंच, पण इतरही बौद्ध, जैन वगैरे मतांचें पूर्ण खंडन करून, दोन हातांत दोन पट्टे घेऊन लीलेनें ते खेळत डाव्या उजव्या हातच्या शत्रूंला लोळविणाऱ्या वीराप्रमाणें अपूर्व विजय संपादन केला ! व "निवृत्तिला पुन्हां जागृत करून व संन्यासास योग्यस्थानीं बसवून समाजास मध्यबिंदूवर आणलें." (म. उ. पा. ८७६ ). प्रतिपक्षाशीं वाद करतांना त्याच्याहून अधिक ज्ञान यांना त्या विषयाचें असायचें अशी त्यांच्या अगाधज्ञानाची महती सांगतात ती त्यांच्या अपूर्व विजयावरून कोणासही खरीच वाटणार आहे! असो. " हे नंबुरी ब्राह्मण होते. त्यांचे वडील विद्वान्, सात्विक ब्राह्मण होते पण ते लवकरच वारले. शंकराचार्यांनीं ब्रह्मचर्यांतूनच संन्यास घेतला आणि आपल्या विद्वत्तेनें अद्वैतमार्गाची स्थापना केली." (वे. नि. पा. ५३). अवघ्या तास पस्तीस वयाच्या आयुष्यक्रमांत अत्यंत देदीप्यमान ताऱ्याप्रमाणें ते चमकून गेले, यांत शंका नाहीं! अज्ञेयवाद, नास्तिकवाद, अनीश्वरवाद, व द्वैतवाद इत्यादिकांची बजबजपुरी विविधरूपानें त्यावेळीं जी सखोल ज्ञानाच्या अभावीं ' उथळ पाण्याच्या खळखळी ' प्रमाणें उथळपणानें माजली होती ती त्यांनीं आपल्या दिव्य दर्शनानें, अलोट बुद्धिमत्तेनें व विलक्षण वादपटुत्वानें मोडून काढून पुनश्च अद्वैतमताची स्थापना केली, इतकेंच नव्हे, तर त्यावेळचा समाज बौद्ध व जैन यांच्या मतांमुळें जो धार्मिकदृष्ट्या विस्कळित झाला होता तो सर्व हिंदुस्थानभर हिंडून त्यांनीं एकत्र केला, व जागजागीं प्रतिपक्षाला वादांत नामोहरम करीत, चारी दिशांस चार मठांची स्थापना केली व हिंदुधर्माचा गाडा पुन्हां सुर-

ळीत चालू केला ! त्यांनीं अद्वैतमार्ग स्थापन केला तरी सुद्धां, "अद्वैतमार्ग समजण्याइतकी तीव्र बुद्धि एखाद्याची नसेल तर त्यानें अनाचार करूं नये, एवढ्यासाठीं जीवेश्वरभेद कायम ठेवून भक्तिभावानें कोणी ईश्वरपूजन करील तर त्याला हरकत नाहीं,अशी आचार्यांची सांगी होती." (वे. नि.पा. ५९). बौद्धधर्माचे व जैनधर्माचे हल्ले जुन्या ब्राह्मणधर्मावर धडाधड होऊं लागले तेव्हां गडबडलेल्या ब्राह्मणसमाजाच्या नेत्यांनीं लोकांना एकत्र ठेवण्याचा कसा यत्न केला, व याकामीं सौतीच्या महाभारतांत आपणांस कशी पदोपदीं साक्ष पटत आहे, हें महाभारतांतील 'शिवपूजा व विष्णुपूजा' ह्या बाबीचा विचार करतांना आपण मागें पाहिलेंच आहे. त्यानंतर "बुद्धाशीं वादविवाद करण्याची, त्याच्या पाडावाची खटपट आधींपासून सुरू होतीच, शंकराचार्यांनीं त्याची अखेर केली. खिस्तशकाच्या ६ व्या शतकांत बौद्धमताला उतरती कळा लागली ती आठव्यांत पुरती झाली." (वे. नि. पा. ५९). पण एकीकडे याप्रमाणें 'शांकरदिग्विजय' सुरू असतां त्यांच्याच कार्यास हातभार लावण्यासाठींच कीं काय, "ह्यावेळीं लोकाराधनेकडे ब्राह्मणांनीं लक्ष पुरविलें, आणि बौद्धांच्या चित्ताकर्षक वस्तु पाहून तसलाच कांहीं प्रकार त्यांनीं आपल्या धर्मांत अंतर्भूत करून घेतला." (वे. नि. पा. ५९।६०). "बौद्धांनीं स्तूप, चैत्य, धातुगर्भ वगैरे बांधून लोकांना भुलविलें होतें, तेव्हां ब्राह्मणांनीं मोठमोठीं देवालयें बांधिलीं, आणि त्यांच्यांत रामायणांतील, भारतांतील पराक्रमी वीरांच्या मूर्ति स्थापन करून त्यांची आराधना सुरू केली. बुद्धाच्या नास्तिकवादाला हाणून पाडण्यासाठीं ब्राह्मण व क्षत्रिय एक झाले व त्यांनीं आपल्या संपत्तीच्या व मान्यतेच्या बळावर मूर्तिपूजेला मोठे गोडवें रूप आणलें. बुद्धभिक्षूप्रमाणें ( योगाभ्यासानें) ब्राह्मणही अदभुत, अमानुष चमत्कार करून दाखवूं लागले....कर्मकांडाचा —माराबरोबर झगडण्याचा बुद्धाचा उपदेश चाले. तसल्या उपदेशाचे आतां ग्रंथ झाले व त्यांतून ( चित्ताकर्षक) गोष्टी बुद्धभिक्षू लोकांना सांगून त्याचा अर्थ सांगत, त्याच्यावर चढ करण्यासाठीं ब्राह्मणांनीं पुराणें रचिलीं आणि त्यांचीं व्याख्यानें सुरू झालीं. लवकरच देवळांनीं मठांना चारीमुंड्या चीत केलें." (p. 460–62. "Vicissitudes of Aryan Civilization in India" by M. M. Kunte ) बुद्धाच्या पूर्वीं देवळें नव्हतीं. "बुद्धधर्माच्या आधींच्या काळच्या देवळांचे अवशेष अजूनपर्यंत सांपडलें

नाहींत" (P.522 History of India by J. Talboys Wheeler) असो. याप्रमाणें जनता जागृत होऊन तिला पुढारीही असामान्य मिळाल्यावर सर्वच बाजूंनीं उठावणी होऊन हां हां म्हणतां धार्मिक स्वातंत्र्याची परत प्राप्ती झाली व "बुद्धधर्माचा पाडाव होऊन त्याला हिंदुस्थानांतून हद्दपारी मिळाली "( वे. नि. पा. ६१ ) यांत काय आश्चर्य ! "या काळांत बुद्धांचा बराच छळ झाला. आनंदगिरी म्हणतो कीं, शंकराचार्यांनीं बुद्धजतींशीं प्रत्यक्ष वाद करून त्यांना जिंकलें. " ( वे. नि. पा. ५३ ) "बुद्ध व जैन ह्या दोन्ही पंथाचे लोकांचा हिंदुस्थानच्या एका भागांत रुद्रपूर येथें छल झाला तो शंकराचार्यांच्या समाधीपूर्वी झाला, परंतु त्यांत शंकराचार्यांचें कांहीं एक अंग नव्हतें, असें तोच म्हणतो. माधवाचार्यही आचार्यांकडे त्याचा कांहींच दोष नाहीं असें म्हणतात. " ( P. 24 Essays on Hindu Religion by Wilson). "इतकेंच नव्हे तर शंकराचार्य प्रछन्न बुद्ध होते असें कित्येकांनीं दूषण दिलें आहे. " ( वे. नि. पा. ५३ ). अर्थात् हे दोष देणारे मंडनमिश्राची तळी उचलून धरणारे व बुद्धजैनांच्या छळाला शंकराचार्यांचीही संमति पाहिजे, त्यावांचून ते कमकुवत ठरतात, असल्या क्षुद्र विचारसरणीचे एकांडे शिलेदारच असले पाहिजेत, हें कोणासही समजून येणार आहे. असो. "शंकराचार्यांनीं मंडनमिश्राला जिंकून, संन्यासमार्गाचा लोप झाला होता, तेवढा प्रचारांत आणला. त्यांनीं आपल्या भाष्यांत जैन व बुद्ध ह्यांच्या मतांचें खंडन केलें आहे, तसेंच आणखीही कित्येक मतांचें केलें आहे. " ( वे. नि. पा. ५३ ). "ख्रिस्ती शकाच्या ५।६ शतकापर्यंत बौद्धांच्यापुढें ब्राह्मणांचें कांहीं चालेना. परंतु ह्यानंतर ब्राह्मणांची हळुहळुं छाप बसूं लागली. संस्कृतवाङ्मयाला यावेळीं जोर आला. वराहमिहिर, आर्यभट्ट, भास्कराचार्य इत्यादि ज्यौतिषी, कालिदासासारख्या कवींचीं सर्वोत्कृष्ट नाटकें, बुद्ध अमरसिंहाचा अमरकोश, विष्णुशर्म्याचें पंचतंत्र, शुश्रुताचा वैद्यकग्रंथ, इत्यादि सर्व ह्याच म्हणजे सन ४०० ते ८०० च्या दरम्यानचे होत. "कुमारिलभट्टानें अद्भुत चमत्कार दाखवून राजाश्रय संपादन केला आणि बुद्धांच्या लाटेला प्रथम मार्गे फिरविलें. बुद्धांचा नास्तिकवाद लोकांच्या ध्यानांत येऊं लागला, तसतसें त्यांचें बहुजनसमाजाचें पाठबळ कमी होत चाललें." ( वे. नि. पा. ५८ ). शिवाय बौद्धधर्मांत शिरायचें म्हणजे जातीचा

सबगोलंकार होता. पण " जात सोडण्याला तयार असलेल्या मंडळींला नातेवाईकांचा पाश एकदम सोडवत नाहीं, ब्राह्मणांची बरोबरी करण्याकरितां त्यांच्या जातींत मिसळूं पहाणाऱ्या मंडळींला खालच्या किंवा आपल्यापेक्षां हीन जातीच्या लोकांनीं आपली मानखंडना करावी, हें आवडत नाहीं. " ( वे. नि. पा. ५८।५९ ). असो. याप्रमाणें विविध-कारणांनीं कमजोर होऊं लागलेल्या बुद्धधर्माला शेवटचा तडाखा शांकर-वाक्गंगौघानें दिला व त्यापुढें बुद्धमत व जैनमत वाहून गेलें !

पण " सुंभ जळला तरी पीळ जळत नाहीं " ह्या न्यायानें एक हजार वर्षें हिंदुस्थानांत गाजलेला बुद्धधर्म एकाएकीं हिंदुस्थानांतून नाहींसा होणें शक्यच नव्हतें. " बुद्ध धर्मानुयायी लोक व राजे बाराव्या शतकापर्यंत ( हिंदुस्थानांत ) होते असा ऐतिहासिक पुरावा आहे...त्रिभुवनमल्ल किंवा दुसरा विक्रमादित्य या राजाचे अमदानींत १०१७ त सोळा वैश्य व्यापाऱ्यांनीं धारवाड जिल्ह्यांतील धर्मवोलल—हल्लींचें दामबोल-येथें एक विहार आणि देऊळ बांधविलें. इ. १०३२ त कोल्हापूरच्या शिल्हर वंशांतल्या पुरुषानें एक मोठें तळें बांधलें आणि त्याचें काठीं बुद्ध, शंकर, आणि अर्हत् यांच्या मूर्ती स्थापन करून त्यांच्याकडे जमिनी लावून दिल्या." (वें. नि. पा. ६१-६२) यावरून आस्तेकदम बुद्ध व जैन यांची पिछेहाट सुरू झाली होती, व ती याउप्पर पूर्ण झाली. तरीसुद्धां ते बाराव्या शतकाच्या मध्यापर्यंत थोडेबहुत होतेच. कारण त्यावेळीं " एकांतद रामय्याला जैन व बौद्ध यांचा पाडाव करण्यास पाठविलें होतें असा उल्लेख आहे" (वे. नि. पा. ६४). असो. बौद्धांच्या मागून जैनधर्म जोरांत होता; पण " ह्याच सुमारास ( १२ व्या शतकाच्या सुमारास ) जैन धर्माचें प्राबल्य कमी झालें आणि अखेर लिंगायताच्या पंथानीं त्याची वाढ खुंटविली. जैनधर्माला मोठा जोर व्यापारी वर्गाचा होता, तेच आतां नवीन ( लिंगायत वगैरे ) पंथांत शिरूं लागले. " तेव्हां ह्या लिंगायतपंथाच्या इतिहासाकडे वळायचे आधीं, तो ज्यामुळें निघाला त्याचा थोडक्यांत विचार करून मग त्याचा इतिहास पाहूं.

आद्य श्रीशंकराचार्यांनीं अद्वैतमत व संन्यासमार्ग पुनश्च आठव्या शतकांत स्थापन केले हें आपण वर पाहिलेंच आहे. पण पुढील शेदोनशे

वर्षांत ह्या निवृत्तिपर संन्यासाचा व रुक्ष अशा अद्वैततत्वज्ञानाचा अतिरेक झाला तेव्हां साहजीकच, निवृत्तिचा पुन्हां जोर झाला तेव्हां, रामानुज,मध्व इत्यादि प्रवृत्त्याभिमानी धर्मोपदेशक उत्पन्न होऊन त्यांनीं समाजास प्रवृत्ति-कडे वळविलें. " ( म. उ. पा. ८७६ ). पण केवळ शंकरांचें म्हणणें संन्यास व निवृत्तिपर होतें म्हणूनच केवळ रामानुज निघाले नाहींत. तर " शंकराचार्यांचें अद्वैतमत दक्षिणेकडे पसंत पडेना " (वे. नि. पा, ६४) म्हणून रामानुज निघाले. रुक्ष अद्वैतज्ञान रामानुजांना मानवेना म्हणून "Ramanuja added an emotional element to the dry bones of Shankaracharya's Advait." म्हणजे "त्यांनीं शंकराचा-र्यांच्या रुक्ष अद्वैतांत भक्तीचा—उपासनेचा मधुर गंध मिसळून दिला" असें कै. प्रो. पटवर्धन म्हणतात तें खरें आहे. ( Wilson Philological Lectures 1917, Lecture III. ) " प्रथम रामानुजांनीं (१०१७) विशिष्टाद्वैत पंथ काढला...त्यांनीं ब्रह्म तर कबूल केलेंच पण सगुणभक्तीला जास्त प्राधान्य देऊन ( मुद्रा वगैरे ) बाह्योपचार वाढविले. " ( वे. नि. पा. ६४). ह्या विशिष्टाद्वैत मताचा आपण त्यांच्या "श्रीभाष्ये चतुःसूत्री" ह्या ग्रंथाधारें थोडक्यांत अर्थ पाहूं.त्याचा अर्थ असा कीं, अद्वैत तर खरेंच; पण तें एका विशिष्ट तऱ्हेनें अद्वैत त्यांना—रामानुजांना मान्य होतें. ती तऱ्हा, किंवा ती रामानुजांची कल्पना अशी कीं, शंकराचार्य फक्त ब्रह्मच खरें मानीत, पण रामानुजांनीं आधीं ब्रह्माबरोबर व ब्रह्माइतकेंच जीव व जगत् हेंही खरें मानून त्याना वेगळें अस्तित्व कल्पिलें आहे. व याप्रमाणें पुढील मतासाठीं पाया तयार झाल्यावर किंवा केल्यावर त्यावर विशिष्टाद्वैताची इमारत उठवून दिली. ती अशी कीं, आपल्या जीवाचा किंवा आत्म्याचा जसा हा बाह्य देह आहे, त्याप्रमाणें जिव व जगत् हें त्या परमात्म्याचें राहण्याचे देह आहेत. त्यांच्या आंत तो राहतो. पण ज्याप्रमाणें अतिनिकट-सान्निध्यपरिचयजनितप्रेमानें किंवा भुलीनें आपण देहालाच आत्मा सम-जतो—त्यांत अद्वैत मानतो, त्याप्रमाणेंच वरील बाबतींत मानावें, असें रामानुजांचें मत आहे. अर्थात् मुक्त झालेला जीव परत मूळस्वरूपांत मिस-ळून जातो—सायुज्यमुक्ती पावतो—हें त्यांना मान्य नाहीं, हें उघड आहे. तेव्हां स्पष्ट द्वैत म्हणवेना म्हणून अद्वैताचें पांघरूण त्यांनीं घेतलें आहे; व तें कांहीं अंशीं खरेंहि आहे. पण एकंदरींत,त्यांच्या मताचा कांटा अद्वैता-

पेक्षां द्वैताकडेच जास्त झुकता असून त्यांनीं शंकरांच्या ज्ञानाला भक्तीची विशेष जोड दिली. यावरून शंकरांची बिलकुल भक्ति नव्हती असें नव्हे. ज्ञानी भक्ती' जिला म्हणतात, ती त्यांच्या ठायीं पुरी बिंबलेली होती हें आम्ही "सत्यपि भेदापगमे" ह्या त्यांच्या श्लोकावरून "सायुज्यसोपानां"त (पान ९० वर) दाखविलेंच आहे. जिज्ञासूंनीं तें जरूर पहावें. परंतु ज्ञानी भक्ति असली व त्यांत हृदयप्रेमाचा उमाळा दिसत असला, तरी ती उच्च प्रकारची व शेवटच्या पायरीवरची भक्ति आहे. तिच्यांतच अखेर पर्यवसान पावणारी पण प्रथमावस्थेंत तिच्याहून सुलभतर अशी सगुणभक्ति रामानुजांपासून पुढें सुरू झाली, हेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे. असो.

रामानुजांनीं द्वैतभाव भीतिभीत व विशिष्टाद्वैताच्या किंवा अद्वैताच्या विशिष्ट पांघरुणाखालीं तरी स्वीकारला होता. पण मध्वाचार्योंनीं (१११९) उघड उघड द्वैतमत प्रतिपादण्यास सुरवात केली. "ह्यांना मारुतीरायाचा अवतार मानतात. ह्यांच्यांत तप्तमुद्रा, उभी काळी रेघ, शिवाशिवीचें बंड वगैरे विष्णुभक्तीची स्थिती उपहासाला आणि द्वेषाला कारण होण्याजोगी तऱ्हेवर गेली." (वै. नि. पा. ६४) असें श्रीयुत फडके म्हणतात तें योग्यच आहे. कारण येथेंच भावी लिंगायत पंथाचा पाया घातला गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं. तें कसें तें लवकरच दिसून येईल. असो. "श्रीमदाचार्य, पूर्णबोधरू, सर्वज्ञाचार्य, ही त्यांचीच (मध्वांचींच) नांवें आहेत. मध्वाचार्योंनीं उडुपी, मध्यतळ, आणि सुब्रह्मण्यमंगळूर अशा तीन ठिकाणीं मठ स्थापन केले. ते ११९७ मध्यें बद्रिकाश्रमाला गेले." (वै. नि. पा. ६४). याशिवाय १४ व्या शतकांत रामानंद व पंधराव्यांत वल्लभ, स्वामीनारायण, चैतन्य वगैरेंचे मार्ग निघाले. पण त्यांच्याबद्दल बोलायचें आधीं वर उल्लेखिलेल्या मध्वाचार्योंच्या "या विष्णुपूजेच्या कडक अमलाचा परिणाम शिवपूजक लिंगायतपंथ निघाला" (वै. नि. पा. ६४।६५) त्याकडे आपण आतां आधीं थोडक्यांत वळूं.

ब्राह्मणधर्माविरुद्ध म्हणून ज्या गौतमबुद्धाच्या व जैनांच्या चळवळी झाल्या त्यांतलीच एक किंवा त्यांत भर घालणारी एक अशी ही लिंगायतांची चळवळ होय. व त्या दृष्टीनें जैन व लिंगायत यांत पुष्कळ साम्य आहे. "जैनांच्याप्रमाणेंच लिंगाइतांनींहि वेदांतून प्रार्थना घेतल्या. जैनांच्या

मताला अनुकूल असा वेदांचा अभिप्राय पडत असेल त्यावेळीं तो मान्य करून त्यांतील उतारा ते आधाराला घेतात. खाण्यापिण्याच्या नियमांत, प्राणीमात्राच्या जीवाबद्दल जपण्यांत, आणि मनुष्य मेल्यावर त्याचें पुढें कांहीं रहात नाहीं ह्या समजुतींत, जैन व लिंगायत यांचें साम्य असल्यावरून जैनांपैकीं पुष्कळांनीं लिंगायत पंथ स्वीकारला असावा असें वाटतें. ब्राह्मणांचा गायत्रीमंत्र टाकून दिला तर त्याऐवजीं जैनांचा 'नमः सिद्धाणं' आणि लिंगाइतांचा 'नमः शिवाय' ह्या मंत्राचा जप सुरू झाला." (P. 107. Dharwar Gazetteer) पण हा लिंगायतपंथ मूळ निघण्यास कारण द्वैतमार्गी भक्तीचे प्रतिपादक मध्वाचार्य यांच्या कडक विष्णुपूजेच्या अंमलांतलि, द्वेषाला कारण होणारें शिवाशिवीचें बंड वगैरे गोष्टीच होत ह्यांत कांहीं शंका नाहीं. "नंदीचा अवतार बसवा यानें लिंगायतधर्मांत सुधारणा करून लिंगपूजा सुरू केली. ब्राह्मणांचा द्वेष, अल्पवयांत लग्नें न करणें, व सोंवळया ओंवळ्याच्या कटकटींचें निवारण ह्या गोष्टींच्या जोरावर बसवानें अनार्य लोकांतली लिंगपूजा पुढें आणली. बिज्जल राजा कल्चुरी (११५६–११८२) ह्याला बसवानें आपली बहीण दिली आणि आपल्या पंथाला राजाश्रय मिळविला" (वे. नि. पा. ६५), असो. तर "ह्या विष्णुपूजेच्या कडक अमलाचा परिणाम शिवपूजक लिंगायतपंथ निघाला" असें श्री. फडके आपल्या वे. नि. पा. ६४।६५ वर म्हणत असल्याचें आम्ही वर सांगितलेंच आहे. व हाच कडक अंमल दूर करून "हरिहरा भेद। नाहीं" असें सांगण्यासाठीं, व शिवाशिवीचें बंड भक्तिगुणाच्या नटनाचांत विरवून टाकण्यासाटीं पुढें भागवत पंथ निघाला आहे. त्याची त्या बाबतींतली कामगिरी पुढें ओघाओघानें येणारच आहे. असो. पण "जैनांची वाढ अखेर लिंगायतांनीं खुंटविली" किंवा "बसव्यानें जैनधर्माचा पाडाव करण्यास सुरवात केली." (वे. नि. पा. ६५) असें श्री. फडके म्हणतात, यावरून जैन व लिंगायत यांत कांहीं गोष्टींत तीव्र मतभेद असला पाहिजे व जैनांची वाढ खुंटविण्यास बसव्याला तसेंच कांहीं तरी कारण झालें असलें पाहिजे, हें उघड आहे. पैकीं, पहिलें कारण राजकीय असून दक्षिणच्या राज्यकारभारांत वर्चस्वासंबंधीं दोघांत लढा माजला व "कल्याणच्या राज्यकारभारांत हात घालून बसव्यानें जैनधर्माचा पाडाव करण्यास सुरवात केली" (वे. नि. पा. ६५). दुसरें

कारण धार्मिक असून, लिंगायत लोक मूर्तिपूजक आहेत—शिवालिंगाची पूजा त्यांच्यांत आहे. पण जैन हे पूजा करीत असले तरी ते देवाची, ईश्वराची, न करतां सिद्धांची करतात, हाही एक फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. व तिसरें कारण, लिंगायत लोक आपणास जैनांपेक्षांच काय, पण ब्राह्मणांपेक्षांही श्रेष्ठ मानीत. अशा विविधकारणानें त्या पंथानें राजाश्रयाच्या जोरावर जैनांचा पाडाव केला, त्यांची वाढ खुंटविली व स्वतः कांहीं काळ सद्दी भोगली. पण पुढें मुसलमानांच्या तडाक्यापुढें सर्वच वाहून जाते कीं काय, अशी स्थिती येऊन पोंचली. पण मुसलमानांकडे वळण्यापूर्वीं, आपण तत्कालीन परिस्थितीचें विहंगमदृष्ट्या अवलोकन करूं.

शंकराचार्यांनीं अद्वैतमताची स्थापना करून अद्वैतवेदांत प्रतिपादिला व "अद्वैतज्ञानावाचून मोक्ष नाहीं" हें तत्व प्रस्थापित केलें. पण त्यांचा तो रुक्ष वेदांत न मानवल्यामुळें शंकरांचें ब्रह्म कबूल करूनही त्यांच्या वेदांताला सगुणभक्तिच्या द्वैती सुगंधाची जोड रामानुज व मध्व यांनीं दिली. "रामानुजाचाच पोटभेद रामानंदानें काढला. त्यानें १४ व्या शतकांत उत्तरेकडे पंथ स्थापना केली. १४७९ मध्यें वल्लभाचार्यांनीं गुजराथेंत पुष्टिमार्ग काढला. त्यांतील वाईट भाग टाकून स्वामीनारायण पंथ निघाला. वल्लभाचार्यांचा जांवई चैतन्य अथवा गौरंग ह्यानें बंगाल्यांत संकीर्तनमार्गाचा उपक्रम केला." (प्रो. मानियर वुइल्यम ह्यांचा 'हिंदुधर्म' पा. १३९–४७) याप्रमाणें "आद्यशंकराचार्यांपासून उत्पन्न झालेल्या लाटेचा धक्का दक्षिण, पश्चिम, उत्तर असा वरवर चढत जाऊन रामानुज, माधवाचार्य, रामदास, तुकाराम, शिखगुरू, गौरंग अशा व्यक्तींला उत्पन्न करीत गेला. (व) जेथें मुसलमानांशीं तोंड लागलें, तेथें राष्ट्र उत्पन्न झालें." (वे. नि. पा. ७२). पण वरील धक्क्यानें उत्पन्न झालेल्या लाटेकडून प्रसवल्या जाणाऱ्या रामानुजमध्वादिकांत व भागवतधर्मी व महाराष्ट्रधर्मी साधुसंतांत फार मोठा फरक होता. पहिल्या लोकांत पुष्कळच उणीवा होत्या त्या दुसऱ्या लोकांनीं—महाराष्ट्रीय साधुसंतांनीं—फार उत्तमप्रकारें भरून काढल्या, इतकेंच नव्हे, तर त्यांनीं भारतवर्षाच्या धार्मिक व वाङ्मयात्मक इतिहासांत लोकविलक्षण अशी अलौकिक कामगिरी बजावलेली आहे. ती इतकी कीं, तिच्या तेजानें आजच्या विसाव्या शतकांतील समाजसुद्धां दिपून गेला असून त्या तेजाची मशाल प्रत्येक स्वातंत्र्यो-

त्सुक मानवाला मार्गदर्शक झाल्याविना राहणार नाहीं ! तेव्हां त्या साधुसंतांच्या पूर्वी उणीवा काय होत्या, त्या त्यांनीं कशा भरून काढल्या, तसेंच त्या मार्गात संतांच्या मोठमोठ्या अडचणींच्या धोंडी कशा पडल्या होत्या, व त्यांशीं झुंजून व झगडून त्यांना त्यांनीं कसें उलथून पाडलें, व धार्मिक व राजकीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं कसकशा प्रकारची अलौकिक, उदात्त व उज्ज्वल कामगिरी बजावली तें आम्ही पुढील स्वतंत्र प्रकरणांतच सांगण्याचें ठरविलें आहे. तेव्हां, हें प्रकरण संपविण्यापूर्वी, आपण तत्कालीन परिस्थितींतील दोषांचा थोडक्यांत विचार करून त्यांतच कोसळलेल्या मुसलमानी अमलाचा, महंमदीधर्माचा, व त्याच्या परिणामाचा विचार करूं या. म्हणजे ह्या मागील छायेवर ( Back-ground वर ) महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीचें चित्र अत्यंत उठावदार व सुबकरीतीनें रंगलेलें आपणांस दिसणार आहे !

वाचक ! बुद्ध, जैन, ब्राह्मण, व लिंगायत या धर्मांचा इतिहास आम्ही येथवर सांगितला, बाराव्या शतकाचा तो काळ होता. आणि वरील आमचे सर्व लेखन काळजीपूर्वक वाचणारास तोच काळ राजकीय बाबी-प्रमाणेंच धार्मिक, वाङ्मयात्मक, व सामाजिक बाबतींतहि बेबंदशाहीचा काळ होता हें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. हीच गोष्ट सामान्य वाचकांसाठीं आम्ही आतां विशेष विशद करून सांगतों म्हणजे त्यांच्या ती ध्यानीं येईल.

वाचक ! भाषेचा संकुचितपणा, जातिभेद व त्यांतील स्पृश्यास्पृश्यत्व, ब्रह्माधिकाराची कोती दृष्टी, आणि शैव वैष्णवादि भेदांची भुतें यांचा नंगा नाच या बाराव्या शतकाचे सुमारास इतका चालू होता कीं, जणूंकाय या अभागी भारतवर्षाचा बारावा बृहस्पतीच उदयाला आला आहे. राजकीय बाबतीप्रमाणेंच वरील सर्व गोष्टींत एकोप्याचा अभाव असल्यामुळें परकी-राज्यकर्त्यांप्रमाणेंच परकीधर्मांच्या जोरदार व दणदणीत लाटेपुढें हिंदुस्थानचे नांवसुद्धां बदलून जातें कीं काय,अशी स्थिती लवकरच कशी उगवली त्याची सविस्तर हकीकत,निदान धार्मिक व वाङ्मयात्मक दृष्ट्या त्याची छटा कशी जागोजाग फाकत गेली, तें आपण लवकरच पाहणार आहों. पण त्या आधीं भारतवर्षांत राजकीय बाबींप्रमाणेंच धार्मिक बाबतींत माजलेल्या ह्या

बेबंदशाहीचें चित्र व त्याचीं कारणें पाहिलीं पाहिजेत. व तींच आतां आपण सविस्तर पाहूं.

( १ ) पहिली गोष्ट म्हणजे शैववैष्णवांचा झगडा घ्या. " शैव आणि वैष्णव ह्यांनीं कर्नाटकांत मोठाच धुमाकूळ घातला." (वे. नि. पा. ६६). पण ह्या झगड्याचें पायीं आपण बहुजनसमाजाचा मानसिक गाडा खिळखिळा करून टाकीत आहोंत, याची त्यावेळीं एकास तरी जाणीव होती काय ? वास्तविक देव तेथून एक अशा तत्वज्ञानाची परंपरा अखंड चालत आली असतां, परधर्मीयांच्या हल्ल्यासाठींच कीं काय, ह्या दुहीचें बीज—धार्मिक द्वैताचे बीज—ह्यावेळीं भारतभूमींत पेरलें गेलें. अशाच प्रकारच्या पंथाभिनिवेशाचें वारें महाभारतकाळींहि माजलें होतें, हें आपण " शैविझम् अँड् वैष्णविझम् " ह्या श्री. वैद्यांच्या लेखाधारें मागें पाहिलेंच आहे. अर्थात् त्यानें बुद्धधर्माच्या हल्ल्याला वाट सोपी करून दिली, हें उघड आहे. तीच गत येथेंही होऊन, महमंदीधर्माच्या प्रचंड लोंढ्याच्या लाटेला वाहून नेण्यास तें एक अनायासेंच खाद्य सांपडलें. एकाएका सुट्या काटकीला कुटकन् मोडून टाकणें सोपें असतें पण त्याच काटक्यांची जुडी मोडणें कठीण, किंबहुना, अशक्य असते या साध्या तत्वाचाही विसर यावेळीं शैवाना आणि वैष्णवांना सारखाच पडला होता ! दुर्दैव देशाचें, दुसरें काय !

( २ ) दुसरी गोष्ट म्हणजे जातिभेद व त्यांतील "शिवाशिवीचें बंड" उर्फ स्पृश्यास्पृश्यत्व घ्या. आपल्याच सारख्या ईश्वराच्या दुसऱ्या लेंकरास अस्पृश्य मानणें ही मानव्याच्या अपमानाची व उपमर्दतेची खरोखर हद्द आहे. पण आजच्या विसाव्या शतकांत सुद्धां जर महाराच्या सावलीच्या विटाळानें स्नान करणारे आकाशांतून पडलेले किंवा जमिनींतून वर आलेले देवदूत सांपडतात, तर त्यावेळच्या काळीं तर काय विचारायलाच नको. जातिबंधनाचे कर्कश पाश महाभारतकाळींहि असेंच जखडून टाकले गेले होते व त्यामुळें " वंशभेदाच्या नरकमूलक अभिमानावर " तेजस्वी कुठार चालविणारा बौद्धधर्म त्यावेळीं किती झपाट्यानें प्रसार पावला, हें आपण मागें पाहिलेंच आहे. पण ह्या इतिहासानेंही वेडा मानव शहाणा न होऊन त्यानें इथेंही तीच चूक केली. बुद्ध व जैनच नव्हे, तर खुद्द

लिंगायत पंथाला फुटून निघायला मध्वाचार्यांचें "शिवाशिवीचें बंड"च कारण झालें, हें आपण मागें पाहिलेंच आहे. अर्थात् याचा फायदा बौद्धाप्रमाणेंच महंमदीयांनीं घेतला असल्यास नवल काय ?

( ३ ) त्यानंतर भाषेची—ज्या भाषेंत धार्मिक व पारमार्थिक ग्रंथ लिहिले गेले त्या भाषेची—गोष्ट घ्या. ही भाषा कोणची होती ? संस्कृत, वाचक, ही भाषा संस्कृत होती. पण खेड्यापाड्यांतील गरीबाच्या झोंपडींतल्या ज्या लाखों जिवांच्या अभेद्य कोटावर ही धर्माची इमारत उभी राहायची, त्या जीवांच्या भाषेचे बोल त्यांत तिळमात्र तरी होते काय ? " आजपर्यंत वेदांतमतें संस्कृतांत होतीं. त्यांच्यावरील टीका तशाच, परिशिष्टें, निबंध सर्व कांहीं दैवी भाषेंत. रामानुज, मध्व यांनीं ग्रंथ केले ते सारे त्याच भाषेंत. कोणी त्याचा अर्थ करून लोकांना सांगेल तेव्हां समजणार. " ( वे. नि. पा. ६८ ) अशाप्रकारच्या 'अडचणी'ची जी केविलवाणी स्थिती श्री. फडक्यांनीं त्या काळच्या वाङ्मयाच्या धार्मिक अधिष्ठानाची रेखाटली आहे, ती किती सत्य आहे बरें ? पण संस्कृताच्या दैवी वाणींत रंगलेल्या तत्कालीन अहंमन्य पंडितांना त्याचें काय ? एवढेंच कीं, त्या संस्कृताच्या दैवी वाणीनें त्यांच्या ठायीं जरूर ती दैवी संस्कृति रेखाटली नाहीं, एवढेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे. पण याचा फायदा परके घेतल्यावांचून कसे राहतील ? महाभारतकाळींहि गीतेच्या कर्तबगारीची थोरवी गाताना " पण संस्कृत भाषा सार्वत्रिक नसल्यामुळें तिचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं " असे जे श्रीयुत फडक्यांनीं विधान केलें आहे तेंच इथेंही लागूं आहे. असो.

( ४ ) शेवटची गोष्ट म्हणजे साधुत्वाचा आणि परब्रह्मपदापर्यंत पोंचण्याच्या ब्रह्मत्वाचा ब्रह्माधिकार फक्त एका विशिष्टवर्गालाच आहे अशा प्रकारचा ब्राह्मणक्षत्रियांतील वर उल्लेखिलेल्या वेदाभ्यासजड व तत्त्वज्ञानशून्य अशा शाब्दिक अहंमन्य पंडितांचा अहंकाराच्या भुतानें झपाटलेला भलताच अभिनिवेश व त्यापायीं कित्येक सज्जनांचा झालेला अमानुष छळ होय ! अशाप्रकारच्या वृत्तीनें समाजाचा एकोपा राहील कां त्याच्या फुटून ठिकऱ्या उडतील, हें एखादें पांच वर्षांचें पोरही सांगू शकेल. पण बालाहून बालिश झालेल्या व भलतीकडेच भरंगळलेल्या त्या पंडितांना त्यांचें

काय ? पण याचा फायदा परधर्माला मिळाल्याशिवाय कसा राहील ? अशाच प्रकारचा खुळा अट्टाहास महाभारताच्या काळीं माजलेला होता व त्याचा फायदा साहजीकच बुद्धधर्मानें घेतला अथवा घेण्यास सुरवात केली, हें आपण मागें पाहिलेंच आहे. तीच गोष्ट यावेळींही होऊन चालू परिस्थितीचा फायदा महंमदीधर्माच्या लाटेला पूर्ण मिळण्याचा संभव उत्पन्न झाला.

येणेंप्रमाणें महंमदीधर्माच्या 'विषवृक्षा' चें बीजोरोपण करण्याला आपल्या हातानें जमीन अनुकूल करून देऊन, त्या परधर्मांची पिशाचें मृतधर्माच्या होळीभोवतीं नाचायला या भारतभूची विस्तीर्ण स्मशानभूमी बनवून आम्ही आमच्याच हातानें आमच्या पायावर धोंडा पाडून घेतला. मग त्या धोंड्याखालीं परकीयांनीं आम्हाला यथेच्छ ठेचायला सुरवात करावी, परधर्माच्या विषवृक्षाचा अफाट विस्तार या भारतभूमींत होऊन त्याची कडू फळें आम्हांस चाखायला लागावी, व परधर्मीयांच्या परधर्म-असहिष्णु पिशाचांनीं, नररुंडमाळा गळ्यांत घालून, एका हातीं कवटी व दुसऱ्या हातीं चितेच्या होळींतले हिलाल घेऊन, खुशाल ह्या स्मशानांत नंगा नाच घालावा यांत काय आश्चर्य? परधर्माची वावटळ उठून ज्यावेळेस स्वधर्मातले लोक त्यांत गिरक्या खाऊं लागतात, त्यावेळीं त्या लोकांचे पाय आधींच भूमीपासून सुटलेले असतात, हें निस्संशय समजावें. अशी स्थिती महाभारतकाळीं उठलेल्या बौद्धधर्माच्या वावटळीच्या वेळीं कशी झाली होती, व अगदीं हुबेहुब तीच स्थिती प्रस्तुत बाराव्या शतकाचे काळीं कशी होती, हें आपण दोन्हींच्या तुलनेनें वर नुकतेंच पाहिलें. अर्थात् बौद्धमताच्या लाटेला थोपवून धरून परतवून लावण्याचा अटोकाट यत्न सौतीच्या महाभारतानें व त्यांतील भगवद्गीतेनें कसा केला, "शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः," "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम्" इत्यादि शेंकडो वचनांच्या धीरगंभीर पण छातीठोक वाणीनें विस्कळित झालेला समाज त्यांनीं कसा सावरून धरला, याचा साग्र व सुंदर इतिहास आपण मागें पाहिलाच आहे. त्याच तोडीच्या भागवतधर्मी व महाराष्ट्रधर्मी साधुसंतांच्या अलौकिक, दिव्य व तेजस्वी कामगिरीची हकीकत आम्ही आमच्या प्रियवाचकांस आतां पुढील प्रकरणीं सादर करणार आहोंत. पण अर्थात् तत्पूर्वी आपणांस या महंमदीधर्माची रूपरेषा समजून घेऊन त्यांनीं

केलेल्या भीषण प्रलयाचें व उडविलेल्या दारुण कल्लोळाचें चित्र क्षणैक पाहिलें पाहिजे. तर आतां तिकडेच वळूं.

महंमदीधर्माच्या भीषण प्रळयाचें वर्णन करण्यापूर्वी प्रथम हें सांगणें अवश्य आहे कीं, तो धर्म व त्याच्या अनुयायांचा विश्वास अत्यंत जोरदार व तडफीचा आहे. अगदीं प्रथमपासून नसानसांतून सळसळणाऱ्या रक्ताची उसळी जर कोणच्या धर्मांत विशेष दिसत असेल, तर ती ह्याच धर्माच्या होय. तसेंच त्याच्यामध्यें असलेल्या, अगदीं चालू घटकेला सुद्धां दिसणाऱ्या, विलक्षण एकोप्यापासूनही मानवांनीं बोध घ्यावा असाच तो आहे. त्याच्या धर्मावरील त्यांची जाज्वल्य निष्ठा व कडक धर्माचरण व त्यापायीं प्रसंगीं एकजूट करून प्राणसुद्धां देण्याची त्यांची तयारी पाहिली, म्हणजे मनुष्य थक्क होऊन जातो. हे त्यांच्याठायीं असणारे गुण केंव्हांही वाखाण-णीयच होत. तसेंच ते एकेश्वरी मताचे असून त्यांच्यांत जातिभेद, शिवाशिवीचें बंड, वगैरे कांहींच प्रकार नाहीं. त्याचप्रमाणें त्या धर्माचे लोक अत्यंत शूर व कडवे असून अवघ्या ८० वर्षांत यूरोपांतील ८०० वर्षांचीं राज्यें या अरबस्तानच्या वीरांनीं एकेकाळीं पादाक्रांत करून सबंध हिंदुस्थानवर सुद्धां त्यांनीं ५|७ शें वर्षें आपल्या हिरव्या चांदाचें निशाण फडकवलें होतें, व त्यांच्या त्या अफाट व विस्तीर्ण सत्तेखालीं हिंदूंचें हिंदुत्व पार नाहींसें होऊन सर्व देश मुसलमानमय बनून जातो कीं काय, असा एक काळ आला होता.

पण इतकें सांगितलें म्हणजे त्यांच्या गुणवर्णनाची हद्द संपली. येथून पुढें त्यांच्या ठिकाणचे दोष व त्यांनीं उडविलेला प्रलयच आम्हांस सांगा-वयाचा आहे. वास्तविक पाहिलें तर मूळ महंमदी धर्मांतलीं पुष्कळशीं तत्वें चांगलींच आहेत, व "ईश्वराचा मी दूत आहे व तो सांगतो तें मी लिहवितों" असें म्हणणाऱ्या महंमदाची—मुसलमानी धर्माच्या आद्य प्रवर्तकाची—धार्मिक कळकळ व त्याच्या उत्सुकतेचा अतिरेकही पण आपणास त्यानें लिहिलेल्या 'कुराण' नामक मुसलमानी धर्माच्या मूळ ग्रंथांतून दिसून येतो, असें जे वुइल्सनसाहेब आपल्या कुराणाच्या प्रस्तावनेंत म्हणतात तें खरें आहे. इतकेंच नव्हे, तर स्वतः कवी किंवा विद्वान् नसूनही त्याच्या वाणींत जी एवढी कळकळ दिसून येते ती निस्संशय दैवी स्फूर्तीचीच असली

पाहिजे. पण त्यानंतर काय ? सर्वच उजेड अथवा अंधार! कारण, इतका कळकळीचा उपदेश असूनही कोणी ऐकेना, स्वताला फारच थोडे अनुयायी मिळाले, इतकेंच नव्हे, तर मक्केस छळ झाल्यामुळे मदिनेला त्याला पळून जावें लागले हें पाहून ह्या ईश्वराच्या प्रेषितानें काय केलें असेल असें, वाचक, तुम्हांस वाटतें ? अत्यंत शांतपणें लोकांचा छळ सोसून तो खिस्ताप्रमाणें लोकांच्या पापासाठीं फांशीं गेला काय ? लोकांचे पापक्षालनार्थ त्यानें आपल्या रक्ताची अंजुली भरून ती ईशपादकमलीं वाहिली काय ? छे ! इतका मनाचा मोठेपणा, चित्ताचा चांगुलपणा, व आत्म्याची उदात्तता असल्यावर मग पुढील प्रलयाचें चित्र, किंबहुना, चालू शतकांतल्या मारामाऱ्या सुद्धां कशा दिसल्या असत्या ? स्वतःच्या रक्ताची अंजुली भरायचे तर राहोच, पण लोक सुखानें त्याच्या धर्माचा स्वीकार करीनात, व त्याच्या धर्माचा प्रसार होईना, हें पाहून एकाद्या चवताळलेल्या चित्याप्रमाणें त्यानें बेशक लोकांची नरडी छाटण्याचा आपल्या अनुयायांना हुकूम सोडलान् व एका हातीं कुराण व दुसऱ्या हातीं तरवार घेऊन "अल्लाहो अकबर" अशी गर्जना करीत निघालेल्या त्याच्या अनुयायांनीं संबंध हिंदुस्थानभर चांगलाच नंगानाच घालून आपल्या भीषण तरवारीला शेंकडो हजारों हिंदूंचे बळी घेतले, शेंकडो देवालयें उध्वस्त करून ह्या 'मूर्तिभंजकां'नीं त्यांतल्या मूर्ती फोडल्या, गोब्राह्मणांच्या माना भररस्त्यावर कापण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं, व पतिव्रतांच्या अब्रूवरसुद्धां धाड घालण्यास त्या पशूंना लाज वाटली नाहीं ! एकंदरींत पहातां खिस्ताचा उपदेश व आचरण जितकें उदात्त तितकेंच महंमदीयांचें आडमुठेपणाचें, जितका खिस्त सुसंस्कृतवृत्तीचा तितकाच महंमद असंस्कृत वृत्तीचा होता, असें म्हणणें भाग आहे. हिंदुस्थानांत मुसलमानांनीं माजविलेल्या भीषण प्रलयाचें वर्णन करतां करतां मोठमोठ्या लेखकांची वाणी कुंठित होते, तेथें मजसारख्या पामराचा काय पाड ? " कलियुगीं हे मोंगल राक्षस । केला गाईब्राह्मणांचा नाश ॥ " अशा प्रकारचा तोताराम गोंधळ्याचा पोवाडा कै. हरिभाऊंनीं आपल्या ' गड आला पण सिंह गेला ! ! ! ' ह्या कादंबरींत दिलेला वाचकांना ठाऊकच आहे. पण अगदी तत्कालीन पुरावा म्हणजे समर्थांच्या दासबोधादि ग्रंथांतून आपणांस पहावयास मिळतो. ' तीर्थक्षेत्रें तीं मोडिलीं । ब्राह्मणस्थानें

भ्रष्ट केली । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥'' अशाप्रकारें त्या 'उदंड म्लेंच्छ दुर्जनांनीं बहुत दिवस माजविलेल्या बंडा'चें वर्णन वाचलें, म्हणजे या ओवींत समर्थांनीं त्या भीषण देखाव्याचें किती हुबेहुब चित्र रेखाटलें आहे तें दिसून येतें. सर्व हिंदुस्थानभर पायीं तीर्थयात्रेचा प्रवास करून आलेल्या समर्थांनीं काय पाहिलें, तें त्यांनीं वरीलसारख्या ओव्यांतून अत्यंत हृदयस्पर्शी वाणींत वर्णन केलें आहे. " उदास वाटते जीवीं । आतां जावें कुणीकडे ? '' अशाप्रकारची औदासिन्याची छटा त्या समर्थांसारख्या दुर्दम्य मनावर सुद्धां क्षणैक का होईना, पण पसराविण्याइतकें खरोखरच त्या भीषण प्रलयाचें भयाण स्वरूप होतें ह्यांत शंका नाहीं. आणि इतकें असूनही पुन्हां आमच्या सिस्टर निवेदिताबाई म्हणण्यास तयारच कीं—

"That brotherhood which is talked by Christianity is realized by Islam. The message of the Prophet is a message of humanity and freedom to the whole race of man" (P. 234 Web of Indian life.) म्हणजे " ख्रिश्चन धर्मांतल्या बंधुप्रीतीच्या गप्पा इथें खऱ्या झाल्या असून इस्लाम महंमद महात्म्याचा संदेश हा सर्व मानवजातीला दया दाक्षिण्याविषयीं व स्वातंत्र्य देण्याविषयींचा संदेश होय ! '' खरेंच आहे ! हिंदुस्थानांतल्या ज्या हजारों लोकांची डोकीं ह्या धर्मच्छलापायीं मारलीं गेलीं व जे शेकडोंशे लोक व बायकापोरें गुलाम करून वांटविलीं गेलीं, त्याला काय तुम्ही दुष्टपणा व जुलूम म्हणणार ? वाचक, लेखक, इतिहाससंशोधकहो, तसें असेल तर ती तुमची चूक आहे ! ऐका सिस्टर निवेदिताताई काय सांगत आहेत तें, व अजून तरी त्या झालेल्या व होणाऱ्या छळाला ' महंमदी दया ' ' महंमदी बंधुत्व ' व ' महात्म्या महंमदानें '—मदानें नव्हें, तर—' प्रेमानें दिलेलें स्वातंत्र्य ' असें मानण्यास शिका ! काय म्हणतां ? तुम्ही त्याला जुलूम व छळच म्हणणार ? म्हणा बापडे ! पण ती तुमची चूक आहे असें आम्ही भगिनी निवेदिताबाईतर्फे तुम्हांस साफ निवेदन करतों ! अस्तु.

तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा तऱ्हेचा आडमुठेपणाचा, हट-वादी व संकुचित वृत्तींचा हा इस्लामी धर्म असून त्यापासून या आर्या-

वर्तोला पुष्कळच त्रास झाला आहे—व अद्यापही, तितका नसला ( कारण सध्या राज्य निराळ्याच प्रभूचें आहे !) तरी पुष्कळच होत आहे. सध्याच्यां चालू घटकेवर उपाय सुचविण्या आधीं आपल्या पूर्वजांना आलेल्या अनुभवावर त्यांनीं कोणचे उपाय योजले, हें पाहणें अवश्य आहे. म्हणजेच, याकामीं धार्मिक व वाङ्मयात्मक दृष्ट्या, महाराष्ट्रीयच नव्हे, तर इतरही साधुसंतांनीं व कवींनीं काय तोडगा काढला तो आपणांस प्रथम पाहिला पाहिजे. तर आतां पुढील भागांत प्रथम तिकडेच वळूं.

---

# भाग ९ वा.



स्वाऱ्या, लुटी, विध्वंस, करून या मूर्तिभंजकांनीं शेवटीं येथें आपली गादी स्थापिली व परधर्मअसहिष्णु अशा त्या लोकांनीं येथील गरीब प्रजेचा धर्माचे पायीं कसा छळ केला, त्याचा वृत्तांत मागील प्रकरणीं येऊन गेलाच आहे. त्याचा प्रथमोल्लेख आपणांस रामदासांच्याही आधीं नामदेवांच्या अभंगांतून ' तुर्कीनीं देव फोडले, स्वाऱ्या केल्या, ' इत्यादि तऱ्हेनें सांपडतो. इतकेंच नव्हे, तर ह्याच तुर्कीशीं झालेल्या संघर्षणानें त्याच्या अभंगांतून वगैरे पुष्कळ फारशी शब्द येतात. ती दरबारी भाषा झाल्यामुळें व मुसलमानांचें वास्तव्य ह्या देशांत राज्यकर्ते या नात्यानें ५।७ शें वर्षे असल्यामुळें साहजीकच त्या राजभाषेला प्रमुखपणा जागोजाग मिळूं लागला, सामान्य लोकांच्या भाषेंतही ती बरीचशी शिरली, व त्याचेंच प्रतिबिंब आपणांस नामदेवापासून पुढच्या बहुतेक कवींच्या काव्यांतून पहावयास मिळतें. तें इतकें कीं, केवळ कांहीं फारशी शब्दच नव्हे, तर सबंध पदें व चाली सुद्धां कित्येक कवनांच्या मुसलमानी उचलल्या गेल्या. कोणच्याही राजभाषेचा जो जो काळ अधिक लोटत जातो तो तो असा अधिकाधिक देशभाषेवर परिणाम हा व्हावयाचाच, हें चालू राजभाषेंतले शब्दसुद्धा कसे कित्येक मराठी भाषेंत समाविष्ट झाल्यासारखे झाले आहेत ते पाहिलें म्हणजे तेव्हांच कळून येईल. पण अशाप्रकारें परभाषेंतल्या शब्दांचा भरणा स्वभाषेंत होणें हें कांहीं एका मर्यादेपर्यंतच शोभतें. त्यापलीकडे असली

भिकार भाषेची श्रीमंती ही त्या पाहिल्या भाषेच्या मूळावर येण्याचा संभव असतो. हें जाणूनच साधुसंतकवींनीं केवळ जनमनोबोधार्थ त्या परकी-भाषेचा परिमितच उपयोग केला व शिवबासारख्या महाराष्ट्रभाषाभिमानी वीरानें तर पूर्वीच्या पद्धतीचा मुसलमानी कोश मोडून नवीन कोश तयार केला व खुद्द दरबारच्या हुद्याचे शब्दसुद्धां संस्कृत ठेवले.

पण इथें जातांजातां हेंही कबूल केलें पाहिजे कीं, अकबरासारख्या न्यायी, समदृष्टी व सत्यप्रिय राजानेंच नव्हे, तर इतरही दख्खनच्या एक-दोन मुसलमानी बादशहानीं या मराठी भाषेला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष उत्ते-जन दिलेलें आहे. कै. प्रो. पटवर्धन आपल्या " वुइल्सन फायला-लॉजिकल लेक्चर्स " पैकीं " एकनाथ व त्याची प्रभावळ " ह्या पांचव्या व्याख्यानांत म्हणतातः—

" In passing let me gratefully note the conscious and positive encouragement that some of the Moslim princes extended to Marathi and the Marathas. In or about 1529 Padshah Burhan Nizam Shah appointed a Brahmin of Maharashtra his prime minister who, we may presume, advanced the claims of Marathi at the court. In 1555, Ibrahim Adil Shah came to the throne of Vijapur. He was a great admirer of the Marathas for their brave fighting qualities as well as their common sense, and naturally appointed Marathas to many high posts in his State. Such was his love of Maharashtra and Marathi that he made Marathi the language of the court and proscribed the use of फार्सी or persian in court matters. The adoption of Marathi as court language naturally gave to its growth a great impetus. "

पण अशा तऱ्हेच्या हिरवळ जमिनीच्या जागा फारच थोड्या असून बाकी सर्व सहाराचें रुक्ष व तापद वाळवंटच आहे. त्यांतल्यात्यांत अवरंग-

झेबी खाक्या कांहीं औरच असून त्याच्याकाळीं धर्मच्छळ अगदीं शिगेस जाऊन पोंचला होता. ‘ कमलकुमारी ’ सारख्या सतींची सेवा तर राहोच पण उलट ‘ जिझिया ’ सारखा त्यांनीं बसविलेला कर त्याची जुलमी राज्यरीति व धर्मरीतिच सांगत आहे. एक मनुष्य जर मुसलमानी धर्मांत गेला तर ‘ पुत्रजन्मसमः किल ’ असा आनंद जर कोणास होत असेल तर तो ह्याच बादशहास होय. सर्व मुसलमान राजांत महंमदी धर्माचा विशेष अभिमान, विशेष कडकडीत आचरण, जाज्वल्य निष्ठा, व आपल्या धर्मप्रसारार्थ अगदीं मनापासूनची खटपट जर कोणी केली असेल तर ती ह्याच बादशहानें होय. तसेंच त्याचें धार्मिक आचरण व धर्मप्रसारार्थ धडपड ही दोन्हीही नकली किंवा बेगडी नसून अगदीं खरीखुरी व त्याच्या अंतःकरणापासूनची भासतात. तथापि ह्याच वरील गुणामुळें स्वधर्माचें अंधानुकरण व परधर्मासहिष्णुता त्याच्या रोमरोमीं कशी अगदीं भिनून राहिली होती. राजकीयदृष्ट्या व सामाजिकदृष्ट्या तो कसा काय होता हें आमच्या पुढच्या खंडांत—“भारतवर्षाच्या राजकीय व सामाजिक इतिहासांत” आम्हीं सांगणारच आहोत. प्रस्तुत प्रकरणीं तो धार्मिकदृष्ट्या कसा काय होता हेंच आम्हांस दाखवावयाचें होतें. अर्थात् अशाप्रकारच्या यवनधर्माच्या आघातास प्रत्याघात कसा मिळाला हें आता आपण पाहूं. पण महाराष्ट्रीय साधुसंतांच्या कामगिरीकडे वळण्यापूर्वी ह्या यवनच्छळानें पंजाबांत निघालेल्या शीख धर्माची हकीकत आपण थोडक्यांत पाहूं, व मग महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीकडे वळूं.

शीखपंथ हा मूळ गरिब वृत्तीचा होता. त्या धर्माचा संस्थापक जो नानक त्यानें बंधुप्रीतीचा व समत्वभावाचा फार उच्च उपदेश केला आहे. पण या जगांत सहनशीलतेलाही मर्यादा आहे. निसर्गांतला रबरासारखा क्षुद्र पदार्थ घेतला तरी तो सुद्धां कांहीं एका मर्यादेपर्यंतच ताणला जातो. अगदीं भीरु अशी हरिणासारख्या प्राण्याची जात; पण अगदीं जिवावरच बेतल्यावर ती सुद्धां आपल्या प्राणघातक पशूवर उलटून तुटून पडतें असें आपण प्रत्यही पहातों. किंबहुना, हा निसर्गाचा सिद्धान्तच आहे. पण राज्यमदाप्रमाणेंच धर्ममदानें धुंद झालेल्या राज्यकर्त्यांना, सत्ताधिशांना, व अधिकाऱ्यांना तें दिसत नाहीं इतकेंच. असो. पण त्याचा व्हायचा तोच परिणाम होऊन अखेर राज्यसुद्धां हातून गमावण्याचा प्रसंग कधींकधीं त्या

राज्यकर्त्यांवर येतो. महाराष्ट्राचे बाबतींत हीच गोष्ट पुढें यवनांच्या प्रत्ययास आली. पण पंजाबांत काय झालें तें प्रथम आपण पाहूं.

वर सांगितलेंच आहे कीं, सहनशीलतेलाही मर्यादा असते. निदान ती समाजाचे बाबतींत तरी हमखास असतेच असते. एकवेळ एकनाथ, तुकाराम, जीझस खाइस्ट, सॉक्रेटीस, महात्मा गांधी, इत्यादि व्यक्ती आपल्या सहनशीलतेचा पारा पाहिजे तितका उंच नेऊं शकतील—अगदीं अमर्याद सहनशीलतेचें शांतिब्रह्म स्वरूप त्यांचेठायीं पहावयास सांपडेल. पण समाजचे समाज व राष्ट्रेंचीं राष्ट्रें या शांतिपाठांत व सहनशीलतेच्या शिकवणुकींत फार दिवस टिकाव अथवा तग धरूं शकत नाहींत, हें आजच्या घटकेला सुद्धां जर प्रत्ययास येतें, तर मागची गोष्ट तर काय बोलावयासच नको. यामुळेंच शीखपंथ प्रथम जरी वर म्हटल्याप्रमाणें गरीबवृत्तीचा होता, तरी मुसलमानांच्या अमर्याद छळापुढें तो तसाच टिकून राहणें केव्हांही शक्य नव्हतें. यामुळें साहजीकच गुरु नानकाचे मागून येणाऱ्या गुरु गोविंदसिंगानें शिखांच्या उर्फ आपल्या शिष्यांच्या लढाऊ जमाती बनविल्या, व वरील व्यक्तींच्या शांतिब्रह्माचे पाठ ऐकत न बसतां त्यांनीं एकजात आपल्या तेजस्वी तरवारींचें पाणी आपल्या धर्मावर उठलेल्या मोंगलांना पाजण्यास सुरवात केली. कारण शीख लोकांची वसाहत पंजाबांत असल्यामुळें "मुसलमानांचा जाच त्या पंजाबांतील लोकांना अफगाणिस्थानांतून आणि दिल्लीहून दोहोंकडून होई." अर्थात् मृदंगाच्या दोन्ही बाजवाप्रमाणें दोन्ही बाजूनीं बसणाऱ्या ह्या थपडांचे पायीं गरीब बिचाऱ्या शीखांची अगदीं दामटी वळायची वेळ आली. पण अशी स्थिती फार दिवस राहणें शक्यच नव्हतें. निदान शीखासारख्या तेजस्वी जातीस तरी हा छल फार दिवस सहन होणें कठिण होतें. कारण " न तेजस्वी साहे प्रकट परतेजोबलमदा। जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा॥" असें कवीचें वचनच आहे. तेव्हां त्यास अनुसरून साहजीकच शीखांनीं लवकरच आपल्या तळपत्या तरवारींचें पाणी यवनांना पाजण्यास सुरवात केली. हळुहळू तो पंथ पूर्ण राजकीय स्वरूपाचा बनून रणजितसिंगानें पंजाबांत आपली स्वतंत्र गादी स्थापिली. शीखांचा इतिहास फार मोठा आहे. त्यांच्या कित्येक गुरूंना व शेंकडोशें अनुयायांना ह्या यावनी धर्मच्छळाचे पायीं आपला देह बळी

द्यावा लागला आहे. पण " मुहूर्तं ज्वलितं श्रेयो नच धूमायितं चिरं " ह्या वचनाप्रमाणेंच त्यांच्या धार्मिक व राजकीय कामगिरीचें स्वरूप असून, तिच्या तेजाकडे पाहून आजच्या विसाव्या शतकांतही त्यांच्या सहनशीलता, दृढनिश्चय इत्यादि गुणांमुळें मनुष्यानें त्याकडे साश्चर्य व साभिमान पहातच राहावें अशाच तोडीचा तो शिखपंथ आहे ह्यांत शंका नाहीं. तोडीस तोड म्हणूनच कीं काय, त्यांच्याठिकाणीं हिंदु मुसलमानांच्या वागणुकीचें विलक्षण संमिश्रण पहावयास सांपडतें. श्रीयुत फडके म्हणतातः—" मुसलमानी कुराणाप्रमाणें ग्रंथसाहेब झाले पण ते हिंदूंच्या देवळाच्या नमुन्याच्या गृहांत जाऊन उच्च ठिकाणीं बसले. महंमदी तरवार त्यांनीं हातांत धरली आणि तोंडानें कृष्ण, राम यांच्या लिला ते गाऊं लागले. त्यांनीं यवनासारखी दाढी ठेवली, आणि हिंदुसारख्या जटा, सर्व केंस राखल्या. त्यांना सुंता आवडली नाहीं पण " पाहील " नांवाचा हिंदूंच्या मुंजीसारखा कांहीं संस्कार त्यांनीं ठेवला " (वे. नि. पा. ७४). तसेंच कंगवा, कृपाण, केश, इत्यादि त्यांचे पांच 'क' कारही मौजेचे आहेत. असो. अशाप्रकारचें धार्मिक राहणीचें व वागण्याचें वैशिष्टय हें प्रत्येक पंथांत असायचेंच. पण धार्मिक इतिहासाच्या दृष्टीनें त्यांची वर सांगितलेली हकीकत किती बोधप्रद व स्पृहणीय आहे हें वाचकांना येथवर कळून आलेंच असेल. तेव्हां आतां दख्खनकडे दृष्टी वळवून या यावनी छळामुळें महाराष्ट्राची धार्मिक प्रगति काय झाली ती आतां आपण पाहूं. कारण सर्व प्रगतीचें बीज झगड्यांत आहे व झगडा हा छळामुळेंच होत असतो अथवा करावा लागतो. मग तो छळ राजकीय, सामाजिक, धार्मिक अथवा कोणच्याही स्वरूपाचा असो व प्रत्यक्ष होवो वा अप्रत्यक्ष होवो किंवा आंतून असो वा बाहेरून असो. त्यानें प्रगति अथवा सुधारणा ही झालीच पाहिजे. कारण छळ—झगडा—सुधारणा अशी कार्यकारणभावाची निष्पत्ति व परंपरा अगदीं जगाच्या प्रारंभापासून ठरली असून, ती जगाच्या अंतापर्यंत अशीच अव्याहत चालूं राहणार आहे. या तात्विक दृष्टीनें पाहतां कोणचाही छळ हा सुधारणेला उपकारकच झाला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि त्या दृष्टीनें अशा छळ करणाऱ्या व्यक्तींचे, कायद्यांचे व सत्ताधाऱ्यांचेसुद्धां जे मौजेनं कधींकधीं आभार मानावें लागतात ते यासाठींच. " निंदकाचें घर असावें शेजारीं " किंवा " Bless them that torture you"

ह्या खिस्ताच्या उक्तीचें सार तरी हेंच आहे. पण यावरून निंदा किंवा छळ हा स्पृहणीय ठरतो, असा मात्र कोणीहि अर्थ समजूं नये. कारण तसें म्हटल्यास " अधर्माचें अभ्युत्थान " " धर्माची ग्लानी " " साधूंचा छळ " व " दुष्कृतांचा सुळसुळाट " यांनींच झाला तरी ईश्वराचा " संभव " होत असतो. म्हणून ह्या वरील गोष्टीस कोणी चांगलें कां म्हटलें आहे ? तसें असते तर रावण, कंस, इत्यादि व्यक्तीस पुराणांतरी चांगलेंच म्हटलें गेलें असतें. राक्षसांच्या मुळेंच मोहिनीचा अवतार होऊन देवांना अमृत प्यायला मिळाले असले म्हणून राक्षस ते राक्षसच ! त्यांना कोण चांगले म्हणणार ? असो. तर आतां महाराष्ट्राकडे वळून तिकडची धार्मिक हालचाल आतां आपण पाहूं या.

याप्रमाणें महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासावरून विहंगम दृष्टी फिरविली असतां आपणास बारा ते अठरा ह्या सहा शतकांचे साहजकिच दोन भाग करावे लागतात. एक भाग, पूर्वी माजलेल्या वैराण रानांतलि काटेकुटे साफ करून, ती जमीन नांगरून बीज पेरण्याचा, किंवा निदान नांगरटीचा तरी खास; व दुसरा भाग, त्या सुक्षेत्रांत बीज पेरून त्याचीं गोड फळें खाण्याचा ! कोणच्याही सुधारणेला असेंच करावें लागतें. कै० विष्णुशास्त्री चिपळुणकर, कै० आगरकर, इत्यादि व्यक्तींची कर्तबगारी पाहिल्या प्रतीची तर कै० लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांची कर्तबगारी वर सांगितलेल्या दुसऱ्या वर्गांत मोडणारी आहे. याचें तरी कारण हेंच. त्या त्या काळाला अनुरूप अशीच कर्तबगारी थोर पुढारी व लोकवंद्य महात्मे बजावित असतात. पण त्यांची योग्यता तत्काळ लोकांच्या नजरेस न येतां, किंबहुना, कित्येकदां कित्येकांकडून त्याचा विपर्यासही होऊन, अशा थोर महात्म्यांना व पूज्य विभूतींना लोकांचा —अज्ञ लोकांचा—छळही पण सोसावा लागतो. पण लोकांच्याच कल्याणासाठीं अवतरलेले ते महात्मे प्रसंगीं येशुख्रिस्ताप्रमाणें आपल्या प्राणधनाचें मोल देऊनही लोकांचें कल्याणच साधीत असतात. तीच गोष्ट— अशा प्रकारच्या छळाची हकीकत—आपणांस महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीमध्येंही लवकरच पुढें दिसून येणार आहे. तेव्हां साधुश्रेष्ठ ज्ञानोबापासून ते चालू घटकेपर्यंत असणाऱ्या व झालेल्या, ह्या देशांतील व परदेशांतील

अशाप्रकारच्या सर्व साधुसंतांबद्दल तुकोबांच्या प्रेमळ वाणींत एकच उल्लेख बाहेर पडतो कीं:—

" जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टविती उपकारें ॥१॥ थोरीव सांडिली आपुली परीसें । नेणें शिवो कैसे लोखंडासी ॥ २ ॥ भूतांची दया हे मांडवल संता । आपुल्या ममता नाहीं देही ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥ " व साहजीकच अशा साधुसंतांच्या उपकारांकडे पाहून त्यानें भारावलेल्या अंतःकरणाच्या जडजिव्हेंतून साहजिकच कृतज्ञतेचे उद्गार तुकोबाप्रमाणेंच आपल्या मुखांतून बाहेर पडतात कीं:—

"काय या संतांचे मानू उपकार ? । मज निरंतर जागविती ॥१॥ काय देवा यांसी व्हावे उतराई । ठेविता हा पायीं जीव थोडा! ॥ २ ॥ सहज बोलणें हाचि उपदेश । करुनी सायास शिकविती ॥३॥ " अरेरे ! अशा प्रकारें अगदीं सहज बोलण्याच्या आपल्या वाणीनें लोकांना उपदेश करणाऱ्या व "झाडू संतांचे मारग । आडरानीं भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं॥" असें म्हणून आडरानांत भरलेल्या जगाला नीट वाटेवर लावण्यासाठीं संतांचा मार्ग साफसुफ करुन लोकांना सुख देण्यासाठीं झटणाऱ्या ह्या "वैकुंठीचे वासी" अशा महात्म्यांना आम्ही काठीचा प्रसाद देउन, त्यांची यथेच्छ पाद्यपूजा करुन, प्रसंगीं त्यांना फांसावर सुद्धां लटकावण्यास तयार व्हावें काय ? जनतावृत्तिसागराच्या ह्या चंचल लाटांकडे पाहून मन विषण्ण होतें ! पण धन्य त्या महाभागांची कीं, अशा छळणाऱ्या जनतेचीही त्यांनीं सेवाच केली, " खांडावया घावो घालणाऱ्या " वरही त्यांनीं कृपेची ' साऊली ' च धरली व त्यांचा शिणभाग हरून त्यांचें कोटकल्याण केलें ! उघडच आहे. संनिपातांत बरळणाऱ्या, किंबहुना, मारण्यासही धावणाऱ्या रोग्याच्या बडबडीकडे किंवा वागणुकीकडे लक्ष देऊन वैद्यानें त्यास औषध देण्याचें कधीं नाकारलें आहे काय ? तो जसा त्या रोग्याच्या शिव्याशाप खाऊन, किंबहुना, प्रसंगीं थोडासा मार सोसूनही त्यास रोगमुक्त करण्यासाठीं प्रेमानें औषधच देतो, त्याच्या शतपटप्रेमानें भरलेलें, व सर्वत्र ईश्वरी भावाचें, जनीं जनार्दनाचें दर्शन पदोपदीं होणारे, इमर्सनच्या वचनांत बोलायचें तर, " Man is God playing the

part of a fool " ह्याची जाणीव असणारे ते संत, अशा जनांचा छळ व निंदा सोसूनही त्यांच्या कल्याणासाठींच अहर्निश झटत असतात! महाराष्ट्रांतील संतांनींही तेंच केलें. तें कसें तें आतां आपण पाहूं.

पहिल्या धडाक्याला महाराष्ट्रसंतांनीं कोणची कामगिरी बजावली असेल तर ती भक्तीची—दिव्य व उत्कट अशा प्रभुप्रेमाची होय. यावनी छळाच्या जहरी विषाच्या अमलाचा ताप सहन करण्यास तशाच प्रकारची उलट दुर्दम्य अशी नशा सर्व आबालवृद्धांच्या व आचांडाल जनतेच्या रोमरोमीं भिनायला पाहिजे होती. अशाप्रकारची नशा या संतांनीं सर्व जनतेला पाजली. हेतू हा कीं, त्याच्या जोरावर यवनछळाचें सहारा-वाळवंट हां हां म्हणता व सहज लिलेनें सर्वांनीं पार पडावें. परधर्मछळाशीं होणाऱ्या दोन हातांत अंगीं जोम येऊन दृष्टी धुंदकारून जावी यासाठीं अंमल करणें जरूर होतें व म्हणूनच संतांनीं पहिल्या सपाट्याला सर्व जनतेला नशापाणी, अंमल, करावयास लावलें. पण हें नशापाणी सामान्य नसून " या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी " अशा अत्यंत उच्चप्रकारचें होते. अंगांत भिनूं पाहणाऱ्या विषारी अंमलाला मारक असा उलट उन्मादकारक पदार्थ हवा होता. व तो ह्या भक्तीचा पदार्थ सर्व जनतेला चारून तिची देहबुद्धी हरपवून देहावरलि आसक्ती प्रथम या संतांनीं आपल्या अमोघ व दिव्य अशा भक्तिच्या वाणीनें उडवून देऊन सर्व जनता त्यांनीं भारून टाकली. इतकेंच नव्हे, तर " स्त्रियो वैश्यास्तथा-शूद्रास्तेपि यांति परांगतिम् " हा भगवंतांचा दिव्य संदेश " चहूं वर्णांसि नामाधिकार। नामीं नाहीं लहान थोर। जडमूढ पैलपार। पावती नामें॥" अशाप्रकारच्या वाणीनें व तोही संस्कृत नव्हे, तर अगदीं महारापोरांच्या प्राकृत वाणींत, अगदीं गरीबाच्या झोपडीपर्यंत त्यांनीं नेऊन भिडविला! महाराष्ट्रीयसंतांची भक्तीगुणाची कामगिरी, त्यांचा जाज्वल्य महाराष्ट्र-भाषाभिमान, शिवाशिवीच्या व जातिभेदाच्या भुताचें बंड मोडण्यासाठीं त्यांनीं उभारलेला झेंडा व बांधलेलें कंकण, आचांडाल सर्व जनता मोक्षाची अधिकारी बनविण्याचें त्यांचें व्रत, व शैववैष्णवादिकांमधील झगडा मिटवून टाकून, एकाच प्रभूचे सर्व भक्त म्हणून मिरवून, महाराष्ट्रधर्माची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठीं भागवतपंथाचा प्रथम घातलेला पाया व त्यावर पुढें महाराष्ट्रधर्माची उठलेली टोलेजंग इमारत, ह्या सर्व गोष्टींच्या

साखळ्यांचे दुवे एकमेकांत इतके गुंतलेले आहेत कीं, ते एकमेकांपासून विलग करणें फार कठिण आहे. तथापि वाचकांच्या सोयीसाठीं आपण ते वेगळें करून प्रत्येकाचें वेगळें तेज दाखवण्याचा यत्न करूं. तथापि, वाचकांनीं संतांची वरीलप्रकारची समग्र कामगिरी म्हणजे एक अष्टपैलू हीरक आहे हें लक्षांत ठेवून, आम्ही जरी त्यांतील प्रत्येक पैलूचे किरण वेगवेगळे दाखविणार आहोंत तरी, त्याच्या समग्र कांतीचा कधींच विसर पडूं देऊं नये, अशी त्यांस आमची नम्र विज्ञप्ति आहे. असो.

अशारीतीनें वर सांगितल्याप्रमाणें पहिल्या धडाक्याला संतांनीं भक्तिगुणाची कामगिरी बजावली. व तीहि अत्यंत उत्कट अशा प्रभुप्रेमाची होय. शंकराचार्यांचें रुक्ष असें अद्वैततत्वज्ञान दाक्षिणेकडे न मानवून रामानुजांनीं सगुणपूजेची गोड जोड त्यास कशी दिली, किंबहुना, खुद्द आचार्यही उच्च अशा ज्ञानीभक्तींत कसें मुरलेले होते, हें आम्ही मागें सांगितलेंच आहे. इतकेंच नव्हे, तर ह्या भावी भक्तीचीं बीजें ह्या आर्यभूमींत किती पूर्वीपासून रुजलेलीं होतीं, तेंही आम्ही ' वसिष्ठकृत वरुणप्रार्थने ' च्या वृत्तांतांत प्रारंभींच दाखवून दिलेलें वाचकांना स्मरत असेलच. आर्यावर्तातील भक्तिगुणाचा विलास फार पुरातन आहे, अगदीं वैदिककाळापासून चालत आला आहे, असें यावरून उघड सिद्ध होतें. इतकेंच नव्हे, तर आम्ही सगुणोपासक नाहीं, किंबहुना, मूर्तिभंजक आहों म्हणून शेखी मिरविणाऱ्या इतर धर्मीयांतूनही ती कशी विविध तऱ्हेनें दृष्टीस पडते तें आजवर अनेक लेखकांनीं दाखवून दिलेंच आहे; तेव्हां त्याचें पुन्हा येथें चर्वितचर्वण नको–त्यासाठीं वेगळी जागा अडविण्याचें कारण नाहीं. अशातऱ्हेनें सगुणपूजा ह्या नाहीं त्या मार्गानें सर्वत्र दृष्टीस पडते. किंबहुना, हा मनुष्यस्वभावच आहे. सामान्य माणसाचें काम जसें नुसत्या शील व चारित्र्य यांच्या उपदेशानें भागत नाहीं, तसेंच केवळ रुक्ष तत्वज्ञानाचे कोरडे फाके मारुनही त्याची भूक भागत नाहीं. " धर्माला काव्य लागत असतें " व तें काव्य सगुणपूजेच्या उत्कट भक्तींतच सांपडतें. म्हणूनच " देवाची, सगुणदेवाची भक्ती, पूजा वगैरे ज्यांत नाहीं तो धर्म सामान्य जनांना कायमचा मान्य होत नाहीं हें तत्व बहुतेक ठरल्यासारखें झालें आहे " ( वे. नि. पा. ७९ ) असें जें श्री. फडके म्हणतात, तें ह्याचसाठीं. ह्याच सगुणपूजेच्या अभावीं बुद्धधर्म जसा लवकर लयाला गेला

त्याचप्रमाणें ह्या सगुणपूजेकडे कानाडोळा करणारे शांकरसांप्रदायिक निव्वळ रुक्ष तत्वज्ञानही सामान्य जनांस फार दिवस मानवणें शक्यच नव्हतें व म्हणूनच तें साहजिकच मागें पडून सगुणोपासनेला रामानुजांच्या काळापासून पुनश्च भरती आली, ती महाराष्ट्रीय संतांनीं व इतरही कबीर, गौरंगादि साधूनीं अगदीं शिगेस नेऊन भिडविली.

या प्रेमाचा पहिला गोड धडा भगवान् श्रीकृष्णांनीं सर्व समाजाला-आचांडाल–जनतेला शिकविला. प्रभुप्रेमाची वारसदारी केवळ वरच्याच वर्गांस ( classes ला ) दिली आहे असें नसून महारापोरांला (Masses ला) सुद्धां तोच हक्क आहे, असें छाती ठोकून जर प्रथम कोणी सांगितलें असेल तर तें आमच्या भगवान् श्रीकृष्णांनीं होय. ' पायांत जोडा घालणारालाच तो कुठें बोंचतो हें नक्की कळतें ' अशा अर्थाची इंग्रजींत एक म्हण आहे. भगवंतांचें बाल्य व पौगंडावस्था सामान्यप्रतीच्या लोकांत गेल्यामुळें त्यांच्या हृदयाची जाणीव त्यास बरोबर झाली व 'परदुःखशीतळ' या न्यायानें आजवर उपेक्षिलेल्या सामान्य समाजाचा त्यास कळवळा येऊन भक्तीच्या–प्रभुप्रेमाच्या जोरावर अगदीं महारापोरांनीं सुद्धां उद्धरून जावें–त्यांना जातां येईल, किंबहुना त्यांचा तो हक्क आहे–अशा तऱ्हेची अभयवाणी प्रथम प्रभूंच्याच मुखांतून बाहेर पडली. यासंबंधीं ' भगवद्गीतेच्या कामगिरी'संबंधीं लिहितांना मागें आम्ही सविस्तर लिहिलेंच आहे. तेव्हां सांगण्याचा भाग इतकाच कीं, भक्तिगुणाचीं बीजें जरी आर्यावर्तांत प्राचीन वैदिककाळापासून असलीं तरी, " त्रैवर्णिकांच्याच कानीं लागणाऱ्या संपन्न वेदाला " दूषणदान करून चौथा वर्ण जो शूद्र, स्त्रिया, चांडाल, इ.कांचा होता त्याची बाजू उचलून धरून, त्या उत्कट प्रेमतरंगिणीच्या प्रवाहांत कोणीहि सुस्नात व्हावें असा भक्तीचा झेंडा प्रथम भगवंतांनींच उभारला, व तोच पुढें भागवतांनीं पंढरीच्या वाळवंटावर नाचविला.

या दिव्य प्रेमाचा व उत्कट भक्तीचा संदेश गोपींच्या दिव्य प्रेमांतच प्रथम पहावयास सांपडतो. त्या दिव्यप्रेमाच्या समाधींत देहभानही कसें हरपून जातें, हें प्रथम गोपींनींच सर्व जगाला दाखवून दिलें आहे. किंबहुना, ' भक्ति कशी करावी ' याला " यथा व्रजगोपि-

कानाम् '' म्हणजे ' गोकुळींच्या गोपींसारखी ' असें जें उत्तर ' नारद-भक्तिसूत्रांत ' नारदांनीं दिलें आहे, तें यासाठींच. किंबहुना, या श्रीकृष्णप्रेमांनीं सर्व गोकुळ कसें भारून टाकलें होतें, त्याचें गोड चित्र आमच्या ' भगवान् श्रीकृष्ण ' ह्या पुस्तकांत आम्ही वाचकांना सादर केलेंच आहे. विस्तारभयास्तव तें येथें जास्त देतां येत नाहीं. पण सांगण्याचा भाग इतकाच कीं, तेंच दिव्य चित्र महाराष्ट्रीय संतांनीं आपल्या डोळ्यांपुढें धरून तें सर्व जनतेला शिकविलें. काव्यामध्यें असणाऱ्या नवरसांच्या जोडीला भक्तिरसास नेऊन प्रथम ज्ञानोबांनीं बसविलें. " भाष्यकारातें वाट पुसत '' जाणाऱ्या ज्ञानोबांनाही रामानुजांनीं सुरू केलेल्या सगुणोपासनेच्या दिव्य प्रेमाची ओळख पटली व महाराष्ट्रांत ह्या भक्तिची मशाल त्यांनींच प्रथम पाजळून, तिच्या प्रकाशाचा पुरवठा अगदीं गरिबांच्या झोंपडीपर्यंत सुद्धां व्हावा म्हणून, त्यांनीं ती इतर संतांच्या हातीं देली. अशातऱ्हेनें ज्ञानदेवांनीं घातलेल्या भक्तिमंदिराच्या पायावर जी इमारत उठली तिच्यावर तुकोबांनीं कळस चढविला. आणि म्हणूनच ' ज्ञानोबा माऊली, तुकाराम '' अशातऱ्हेचे कृतज्ञतेनीं गहिंवरलेलें स्मरण आज घटकेला सुद्धां आचांडाल सर्व जनतां करीत असते !

या भक्तिगुणानें काय शिकविलें ? प्रभूच्या प्रेमसमाधींत देहाचा विसर कसा पडावा—त्या तंद्रींत गुंगलें असतां देहभान कसें हरपावें—हें त्यांनीं शिकविलें. एवढेंच नव्हे, तर " तुका म्हणे व्हावे देहासी उदार । रखुमादेवीवर जोडावया ॥ '' ह्याप्रमाणें दीड दमडीच्या देहावर तिळांजळी देऊन मरणाला मातीच्या मोलानें मोजण्याची महत्वाकांक्षा व धमक यानें निर्माण केली व " वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ '' अशाप्रकारचे अलौकिक निश्चयाचे व निधड्या छातीचे भक्तवीर—कायेला कस्पटासमान लेखणारे भक्तपुंगव—त्यांनीं जन्मास घातले व फांसावर चढतांना सुद्धां ' आकाश कडकडोनि पाहे । ब्रह्मगोल भंगा जाये । तरी मी तुझीच वास पाहे । पांडुरंगा ! ॥ '' अशी कळवळ्याची पण छातीठोक हांक प्रभूस मारणारे संतभानुदासासारखे, " मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं ॥ '' किंवा " फुटो हें मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥ '' असें सांगणारे तुकोबासारखे, किंवा " देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढभावो ॥ '' म्हणणाऱ्या नामदेवासारख्या

निधड्या छातीचे संतशाहीर त्यांनीं निर्माण केले व सर्व जनता त्यांनीं भारून टाकली—त्या संतांनीं सर्व जनतेच्या ठायीं निर्भयवृत्ति निर्माण केली.

शेवटीं संतांच्या कामगिरींतल्या या भक्तिगुणाच्या पहिल्या मुद्यासंबंधीं अजून एकच गोष्ट सांगून, आपण या मुद्याची रजा घेऊं. वर सांगितलेंच आहे कीं, ज्ञानोबांनीं या भक्तिरसाला नवरसांच्या बरोबरीस नेऊन बसविलें—किंबहुना, त्यांनीं त्यास आद्यस्थान दिलें असें म्हणण्यास सुद्धां हरकत नाहीं. सर्व रसांचा राजा असा हा भक्तिरस होता. अथवा सर्वरसरूप सरदारांला ताब्यांत ठेवून आपल्या कार्यीं लावणारी अशी ही भक्तिसम्राज्ञी आपल्या अतुलैश्वर्यानें चमकून राहिली होती. प्रभुप्रेमाच्या भक्तिच्या अमृताचे प्याले पिऊन उन्मादपूर्ण उत्कटतेनें व मातापुत्र, धेनुवत्स, जलकल्लोळ, अथवा जलमीन, रमणीरमण इत्यादि विविधभावनांनीं तन्मय होऊन नाचणाऱ्या व त्यापायीं " ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी ॥ " अशी खरोखरच अक्षरशः स्थिति अंगीं बाणलेल्या त्या संतांचीं चरित्रें व बोल वाचून अजूनही चित्त गहिवरतें, मग प्रत्यक्ष त्याचा साक्षात् अनुभव व टाळमृदंगाच्या ठेक्यांत तन्मय होणाऱ्या त्या साधुसंतांच्या दिव्य विभूतींना—नामदेव, तुकारामादिकांना—पाहून त्यावेळची जनता कशी वेडीपिशी होत असेल, याचा वाचकांनींच विचार करावा. अशा तऱ्हेनें वेड्यापिशा झालेल्या जनतेला त्या संतांनीं अशा उच्च वातावरणांत नेलें व तेथें दिव्य अशा प्रभुप्रेमाची जी Romance अथवा अदभुत सौंदर्य दाखविलें,त्यापुढें केवळ निसर्गरमणींच्या बाह्यदेहाच्या पार्थिव सौंदर्याभोंवतीं घुटमळणारी पाश्चात्यांची—पाश्चात्य कवींची· romance कशी फिक्की पडते त्याचें प्रो. पटवर्धन यांनीं आपल्या " Romance in the Bhakti School of Poetry " मध्यें मागें सांगितलेल्या " वुइल्सन फायलॉलॉजिकल् लेक्चर्स " मधून फार बहारीनें वर्णन केलें आहे. त्याकामीं वर्डस्वर्थसारखा एखादाच महात्मा—कवी अपवादभूत निघाला, व त्याची प्रतिभा व कल्पना मात्र कांहींशी आपल्याकडील संतकवींच्या वाणीशीं कशी जुळून समरस होते, हें पाहणेंही मोठें कौतुकाचें आहे. असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा तऱ्हेच्या दिव्य व उत्कट प्रेमतरंगिणीचें दर्शन देऊनच महाराष्ट्रीय संत थांबले नाहींत, तर ज्ञानोबाची ओवी, नामदेवतुकोबांचे अभंग, नाथांची

प्रेमळवाणी इ. नीं त्यांचे ठायीं उत्कट प्रेमाबरोबरच वर सांगितल्याप्रमाणें अलौलिक निधडी छातीही सामान्य जनतेंत निर्माण केली. आणि असें असूनही ह्या संताना ' संताळे ' म्हणून त्यांच्या कृतीनें आम्ही मेषपात्र बनलो असला दोष देणारे श्रीयुत राजवाड्यांच्यासारखे कांहीं नरपुंगव आहेतच. ह. भ. प. रा. रा. पांगारकर म्हणतात, " अलीकडचे एक नवीन ' राष्ट्राभिमानी ' समर्थांची महती वाखाणणारे पंडित वारकरी संतांवर फारच घसरतात. काव्येतिहाससंशोधनपटु असे रा. राजवाडे हे तुकाराम " मानसिक सुखदुःखांचें जाळें विणीत बसणारा कोणी निरुपयोगी मनुष्य होता व वारकरी पंथानें राष्ट्रकार्य न केल्यामुळें तो ' पंगु ' आहे" असें म्हणतात ! केवढा विलक्षण एकदेशीपणा हा ! ! शरीरांतल्या षड्रिपूंशी झगडायला ज्यांनीं शिकविलें व शिवरायानें पेरणी करण्यापूर्वी ज्यांनीं जमीन भाजून नांगरून ठेविली होती, ते संत पंगू होते असें म्हणणें मूर्खपणाचें व कृतघ्नपणाचें आहे. " ( " मोरो. चरित्र आणि काव्य० " पान ३७४ ) हे रा. पांगारकरांनीं वरील वावदूकांवर उडविलेले झणझणीत कोरडे यथार्थ नाहींत असें कोण म्हणेल ? कारण मराठीभाषेचा आद्य कोश रचणारे खुद्द मोल्सवर्थसाहेब आपल्या बिनमोल मोलाच्या बोलांत काय सांगतात पहा—ते म्हणतात:—

" There cannot be a doubt that the vernacular literature which had sprung up in the province, to which he ( Shivaji ) belonged, during the two centuries which preceded him, nursed the spirit of Hinduism in himself and his contemporaries and was one of the main causes of their hatred of and successful rebellion against Mahomedan power " (P. XXVII of Introduction to Marathi Dictionary by Molesworth ).

सोनारानींच अशा रीतीनें खुद्द कान टोचल्यावर मग तरी हे टीकाकार आपली टुरटुर बंद करतील काय ? अस्तु. ज्या शिडीनें आपण वर चढून आलों त्या शिडीलाच परत लाथ मारण्यासारखीं कृतघ्नपणाचीं विधानें रा.

राजवाड्यासारखे आंधळे इतिहाससंशोधक कितीही करोत; पण खुद्द त्यांच्या नाकाखालीं पसरलेला पुराव्याचा पसारा त्यांना न दिसला तरी जग कांहीं आजच आंधळें झालें नाहीं. आणि जो डोळे उघडून पाहील त्याला संतांची—महाराष्ट्रीय संतांची दिव्य, अलौकिक, व झगझगीत कामगिरी आपल्या कर्तबगार खबरदारीनें कशी चमकून राहिली आहे, हें सहज दिसून येणार आहे. असो. त्यांच्या भक्तिगुणाची पहिली अलौकिक कामगिरी आपण नुकतीच पाहिलीच. आतां आपण त्यांच्या दुसऱ्या, म्हणजे ‘ महाराष्ट्रभाषाभिमानाच्या व तत्प्रीत्यर्थ केलेल्या झगड्या ’ च्या कामगिरीकडे वळूं व त्यांत त्यांनीं केवढे तडफदार तेज दाखविलें तें पाहूं.

या कामीं पहिल्या धडाक्याला महाराष्ट्रभाषाभिमानाचें वारें आपणांस प्रथम ज्ञानोबामध्यें पुरेपूर पहाण्यास सांपडतें. आजवरच्या संस्कृत ग्रंथांमुळें कशी अडचण होती, किंबहुना, भगवद्गीतेसारखा बिनमोल ग्रंथ, पण तो सुद्धां संस्कृताच्या दैवीवाणींत लिहिला गेल्यामुळें, त्याचा कसा फारसा उपयोग झाला नाहीं,व त्याचाच फायदा घेऊन व ती उणीव भरून काढून गौतमबुद्धानें आपला उपदेश व ग्रंथ कसे लोकांच्याच—पालिभाषेंत केले, पण त्यानेंही न उमजून मुसलमानी धर्माच्या हल्ल्यापर्यंत सर्व ग्रंथरचना कशी संस्कृतांतच राहिली व त्यामुळें यावनीधर्माच्या लाटेला हिंदुस्थानांत हातपाय पसरायला कसें एक आयतेंच निमित्त झालें, इत्यादि हकीकत मागें येऊन गेलीच आहे. किंबहुना, वरील गोष्टी लक्षांत घेऊन जर कोणी प्राकृताची—प्राकृतांत रचना करण्याची—टुरटुर करील, तर त्यास हाणून पाडणारा—हाणून पाडण्याची शिकस्त करणारा—संस्कृत उर्फ दैवी भाषाभिमान्यांचा वर्ग त्यावेळीं अगदीं सज्ज होता. दैवीवाणीच्या अभिनिवेशानें भारावलेले हे पंडित आपल्या उपेक्षा, निंदा, उपहास, इत्यादि आयुधांच्या माऱ्याखालीं त्या गरीब बिचाऱ्या लेखकास व कवीस अगदीं जेरीस आणण्याचा आपल्याकडून शिकस्तीचा यत्न करीत असत. आतां “ संस्कृतांतले ज्ञानभांडार, संस्कृतांतल्या शब्दार्थांच्या चमत्कृति, संस्कृतांतलें नानाविध रस व अलंकार, आणि संस्कृतांतल्या वर्णनपद्धति ह्या निस्संशय श्रेष्ठ प्रतीच्या होत ” यामध्यें मुळींच शंका नाहीं, व महाराष्ट्रीय संतांनींही तशी शंका घेतलेली नाहीं. पण या संस्कृत ऊर्फ दैवी वाणींतच काय तें परब्रह्म भरलें आहे, किंबहुना, ईश्वर जर पावावयाचा असेल तर

या संस्कृतवाणींतच त्याची उपासना केली पाहिजे, प्राकृतभाषेनें तो कधींच सांपडणार नाहीं, अशाप्रकारच्या भलत्याच अभिनिवेशानें भरून जाऊन " प्राकृतांत काय आहे हो ! दरिद्री, मूर्ख, नेणत्यांची ती भाषा!" अशा तऱ्हेनें प्राकृताची हेटाळणी ज्या वेळी त्या पंडितांनीं मांडली, त्यावेळेस मात्र, आधींच प्राकृताची राष्ट्रीयधर्मदृष्ट्या किती बिनमोल किंमत आहे ह्याची जाणीव झालेल्या साधुसंतांना, ह्या संस्कृत पंडितांच्या आंधळ्या एकदेशीपणाची साहजीकच चीड आली—सामान्य माणसांच्या, महारापोरांच्या, गरिबागुरीबांच्या ज्या आधावर हिंदुधर्माची इमारत टिकायची त्यांच्या हृदयाच्या भाषेचे बोल स्वत: बोलायचे—आणि बोलून धर्मकारण तोलायचें-तर राहोच, पण दुसरा कोणी जर तसें करूं लागला तर त्याची अवहेलना करायची, हें पाहून कोणाही कळकळीच्या माणसाला—प्राकृतभाषेच्या उपासकाला—चीड आल्यावांचून राहणार नाहीं. एक दोन पिढ्यापूर्वी आंग्लभाषेच्या दिमाखदार वैभवानें दिपून जाऊन मराठी भाषेची हेळणा करणाऱ्या आंग्लविद्याविभूषित पंडितांची कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांस अशीच चीड आलेली-व चीड येऊन त्यांनीं निबंधमाला लिहिलेली-वाचकांस ठाऊकच आहे. तशाच प्रकारचा विलक्षण तेजस्वी अभिमान आपल्या महाराष्ट्रीय संतांचा मराठी भाषेसंबंधीं असून, त्यांना वरीलसारख्या पंडितांचे प्रलाप सहन होणें केव्हांही शक्य नव्हतें.त्यांनीं जागोजाग त्या पंडितांशीं वाद खेळून मराठी भाषेची महती व उपयुक्तता सिद्ध करून दिली आहे—" ये मराठीचिये नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळ करी ॥ " असें ज्ञानोबांचे ब्रीदच होतें. इतकेंच नव्हे, तर " माझा मराठाचि बोल निके । परी अमृतातेंही पैजा जिंके ॥ " अशा तऱ्हेची छातीठोक वाणी त्यांच्या मुखांतून बाहेर पडलेली आहे, तीही ज्ञानेश्वर ह्या महाराष्ट्रभाषाभिमानानें किती पूरेपूर भरून राहिले होते हेंच दाखविते. असो.

यानंतरचा प्रसंग एकनाथांच्या वरचा होय.कारण हा झगडा येथेंच थांबत नसून तो सर्व महाराष्ट्रीय संतकवींस पुरून उरलेला आहे व 'इंग्रजी विरुद्ध मराठी' असा झगडा अद्यापही चालू आहे, हें वाचकांना ठाऊक आहेच. पण पेशवाईनंतरच्या काळासंबंधीं आपण पुढें पाहूं. तत्पूर्वीचा ' संस्कृत विरुद्ध प्राकृत' हा झगडा आपणांस पहावयाचा आहे. पैकीं ज्ञानेश्वरांचा मराठीभाषाभिमान वर सांगितलाच आहे. दुसरा प्रसंग एकनाथांचा !

काशींतल्या पंडितांच्याबरोबर नाथाना याकामीं वाद करावा लागलेला आहे. संस्कृताची प्रौढी गाऊन मराठीचे निंदकही त्यावेळीं बरेचसे असावेत. कारण ज्ञानेश्वरांचा एकपट तर नाथांचा दसपट महाराष्ट्रभाषाभिमान प्रगट होऊन त्यांनीं जागोजाग या वावदूक पंडितांवर कोरडे ओढून आपल्या प्राकृत मराठी भाषेची महती व योग्यता प्रस्थापित केली आहे. आणि खरोखरच एकनाथासारख्या शांतिनिधीसही त्यानीं चीड यावी असाच तो महाराष्ट्रभाषेच्या उपेक्षेचा, राष्ट्रधर्माच्या अभिमानाच्या दृष्टीनें, देखावा होता. साहजीकच नाथांचा सात्विक संताप होऊन ते आपल्या भागवतांत विचारतात:—

" संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी । मा प्राकृतीं काय उणीवी ? । नवीं जुनीं म्हणावी । कैसेनि केवीं सुवर्णसुमनें ? ।। कपिलेचें म्हणावें क्षीर । मा इतरांचें तें काय नीर ? । वर्णस्वादें एकचिमधुर । दिसे साचार सारिखें ।। संस्कृत वाणी देवें केली । मा प्राकृत काय चोरापासूनि झाली ? ।। तरी असोत या अभिमानभुली । वृथा बोली काय काज ? ।। " तसेंच ते अन्यत्र म्हणतात:—

"संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य । हे बोल काय होती शुद्ध ? । हाही अभिमान वाया । अहंता अशुद्ध परमार्थी ।। देवासि नाहीं वाचाभिमान । संस्कृत प्राकृत त्या समान । ज्यावाणीं जाहलें ब्रम्हकथन । त्या भाषा श्रीकृष्ण संतोषें ।। माझी मराठी भाषा चोखडी । परब्रम्हें फळली गाढी । संतसज्जन जाणती गोडी । त्यालागीं जोडी जोडिला ग्रंथ ।। " अजून एक उतारा द्यावयाचा तर खालीलप्रमाणें देतां येईल:—

" कालचाचि आजी उगवला । तो सूर्य काय म्हणावा शिळा ? । कां आजिचा अग्नी सोंवळा । कालिचा काय वोंवळा म्हणों ये ? ।। तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान । तेंचि मराठीभाषेमाजीं जाण । तेथें ठेवूं जातां दूषण । दोषी आपण होइजे ।। कां सुवर्णाचे केलें सुणें । परी तें मोलें नव्होचि उणें । तेवीं सनकादिकांचीं ज्ञानें । देशभाषाहीनें नव्हतींच ।। जेवीं कां गुळाचें कारलें केलें । परी तें कडुपणा नाहीं आलें । तेंवी हंसगीत मराठें झालें । नाहीं पालटलें चिन्मात्र ।। जें मोल मुकुटींच्या हेमासी । तेंचि मोल सुवर्णश्वानासी । जो कां ग्राहक सुवर्णासी । दोषे दोघांसि समत्वें ।।

तैसे आत्मानुभवी जे येथें । ते मानितील या ग्रंथातें । येर ते हेळसितील यातें । निजभावार्थे न घेतां ।। ''

अर्थात् संस्कृतभाषाभिनिवेशानें ज्यांच्या डोळ्यावर धूर चढला आहे व त्यापुढें आत्मानुभवाची सुद्धां ज्यांना जाणीव किंवा किंमत नाहीं, त्यांना ह्या मराठी ग्रंथांची काय योग्यता कळणार ? तथापि, " जे वंदिती कां निंदिती । ते दोघे आम्हां ब्रह्ममूर्ती ॥'' असें म्हणून दोघांनाही सारखाच नमस्कार करून नाथ मोकळे झाले आहेत, तें त्यांच्या शांतिनिधित्वास व ' निजात्मभावाच्या प्रतीति 'स योग्यच आहे असें कोण म्हणणार नाहीं ? पण त्यामुळें त्यांनीं केलेल्या झगड्याची व महाराष्ट्रभाषेच्या तरफदारीची किंमत मुळींच कमी होत नसून, त्यांच्या सात्विक संतापाचा हिरा निजात्मभावप्रतीतिच्या व शांतिनिधित्वाच्या कोंदणांत अधिकच उठून, खुलून व चमकून दिसतो आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. वरीलप्रकारचे मराठीभाषेची तरफदारी करणारे बोल नाथांनीं आपल्या भागवतादि ग्रंथांतून जागोजाग काढले आहेत. त्यावरून त्यांचा त्या भाषेचा अभिमान किती जाज्वल्य होता, राष्ट्रधर्मास त्याच्या अवश्यकतेची जाणीव त्यांच्या हृदयांत कशी रात्रंदिवस वास करून राहिली होती, हें सहज दिसून येणार आहे.

ज्ञानेश्वरापासून सुरू झालेल्या महाराष्ट्रीय संत–भक्त–कविमंडळाकडे जर आपण दृष्टी फेकली, तर आपणास ज्याला इंग्रजींत Democratic spirit म्हणजे लोकसत्तावाद म्हणतात तो, व Classes versus Masses म्हणते उच्चदर्जाचा, जाणता असा छोटा पंडित वर्ग, विरुद्ध सामान्य, लहान जातीचा, अगदीं महारापोरापर्यंतचा-नेणत्यांचा वर्ग असा झगडा दृष्टीस पडतो. अशाप्रकारचा वाद राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, वगैरे बाबतींत आपणांस जगाच्या इतिहासांत पुष्कळ पहावयास सांपडतो. त्यापैकीं राजकीय व सामाजिक बाबतींत हिंदुस्थानांत काय झालें, त्याची हकीकत आम्ही पुढील खंडांत म्हणजे " भारतवर्षाच्या राजकीय व सामाजिक इतिहासांत '' सांगणारच आहोंत. प्रस्तुत आपणांस धार्मिक व वाङ्मयात्मक इतिहासाशीं कर्तव्य आहे. व या दोन्हीही बाबतींत महाराष्ट्रीय संतांनीं वरील झगड्यांत Democratic or Republic Spirit म्हणजे

लोकसत्तावाद हातार्शी धरून ज्या नेणत्या, दुबळ्या, दीन व अनाथ लोकांची उपेक्षा त्रैविद्येनें व आजवरच्या अहंमन्य पंडितांनीं केली होती, त्या नेणत्या समूहाची बाजू भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें छातीठोक उचलून धरली व भगवंताच्या पुढेंही ह्या भागवतांनीं एक पाऊल टाकून, त्या प्रभूची उपासना —भक्ति—प्रेम ज्या वाणींत करायचें ती भाषा संस्कृत न ठेवतां प्राकृत ठेवली, थोड्या लोकांच्या भाषेंत ते बोल न बोलतां सामान्य व अफाट अशा जनसमुदायाच्या भाषेंत—मराठींतच—त्यांनीं आपली ग्रंथरचना केली. असेंच आपणांस दिसून येणार आहे. उघडच आहे. मोक्षाची अधिकारी सामान्य जनतासुद्धां—स्त्रीवैश्यशूद्रादिकहि—आहेत म्हणून एकदां सांगितल्यानंतर, त्या मोक्षास जाण्याचें साधन ज्या भाषेच्या बळावर करायचें, ती भाषाही मग प्राकृतच असावी व मोक्षाधिकाराप्रमाणेंच या भाषेच्या बाबतींतही महाराष्ट्रसंतांनीं सामान्य जनांचे बाजूनें झगडा करावा, हें त्यांच्या मनौदार्यास उचितच आहे. किंबहुना, पंढरिच्या प्रांगणांत व काव्यदेवीच्या मंदिरांत सर्व भेदभाव हरपून जाऊन ब्राह्मण, शिंपी, कुंभार, चांभार, व महारसुद्धां—एकनाथ, नामदेव, गोरा, सेना, व चोखा हे खांद्याशीं खांदा भिडवून आनंदानें नाचले. सर्वजातींच्या साधुसंतांनीं भेदभाव, उंचनीचपणा, श्रेष्ठकनिष्ठ दर्जा विसरून जाऊन, पंढरीचा प्रसाद व काव्यदेवीचीं कुसुमें सारख्याच प्रेमानें उचलून घेतलीं. भक्ति व भाषा, वासुदेव व वाग्देवी, ही कोणच्याही एका पंथाची, एका जातीची अथवा एका वर्गाची वारसदारी नसून, कोणीहि येऊन त्या अमृताचा उपभोग घ्यावा अशा तऱ्हेचा जो दिव्य अलौकिक झगडा ह्या महाराष्ट्रीय संतांनीं केला, त्याला तोड सांपडणें कठीण आहे. हीच गोष्ट प्रो. पटवर्धन यांनीं आपल्या “ एकनाथ व त्याची प्रभावळ ” ह्या आंग्लव्याख्यानांत खालीलप्रमाणें सांगितली आहे:—

“ It is with a patriotic fervour that Eknath loved his Marathi......The literature was by the saints of the Bhakti school enfranchised......Literature is and ought to be a Republic. Eknath declared it to be so in the teeth of the Sanskrit Pandits. Ever since the days of Jnanadeva the gates of the temple of the

literary Muse were thrown wide open......and the Brahmins, the tailor, the potter, the shoemaker, the Mahar-aye, all stood shoulder to shoulder, danced hand in hand in the free atmosphere to the liberalizing tunes of Bhakti. As on the sands of the Chandrabhaga, so in the temple of the Muse, all castes and classes ate of the same dish and drank of the same well. That was the democracy of Bhakti and Saraswati, of Divine love and Divine speech." ( Wilson Philological Lectures 1917 ).

असो. यानंतरचा झगडा तुकोबांचा होय. तुकाराम हा जातीचा वाणी असून तो वेदांत सांगतो, लोकांना वेदांत–ज्ञान, भक्ति यांचा उपदेश करतो, इतकेंच नव्हे, तर त्यानें हजारों अभंगही मराठी भाषेंत रचले, हें पाहून रामेश्वरभटासारख्या कर्मठ पंडिताच्या पायाची आग मस्तकाला पोंचावी हें साहजीकच आहे. " जयाची वदे पूर्ण वेदांतवाणी । कसें हो म्हणावें तयालागि वाणी । परब्रह्मरूपीं असा हा तुकावा । तयाचे तुकीं कोण दूजा तुकावा ॥ " ही वामनपंडितांची प्रेमळ, उदार, व भाक्तियुक्त वृत्ति त्या कर्मठ पंडिताला कुठून येणार ? पण अत्यंत आचार व अत्यंत अनाचार ही दोन्हींही टोकें कशीं सारखींच त्याज्य आहेत. ते रा. पांगारकरांनीं आपल्या विविध संतांच्या चरित्रांतून त्या त्या प्रसंगीं उत्कृष्ट रीतीनें सांगितलेंच आहे. रामेश्वरभटाच्या व तुकारामाच्या ह्या झगड्याची हकीकत श्री. पांगारकर यांनीं आपल्या "तुकारामाच्या चरित्रां"त फार चांगल्यारीतीनें दिली असून अत्यंत वाचनीय आहे. पण त्याचा शेवटीं निष्कर्ष असा कीं, शांत व विनयशील अशा तुकोबास सरतेशेवटीं ब्राह्मणाची आज्ञा म्हणून आपले ग्रंथ इंद्रायणीनदीच्या डोहांत बुडवावे लागले ! केवढा तो विलक्षण प्रसंग ! स्वताचें लेखन लेखकाला किती प्रिय असतें याची कल्पना लेखकावांचून इतरांस कशी येणार ? स्वतः संवर्धन केलेल्या झाडाचा स्वतःच नाश करण्याचा प्रसंग एखाद्या बागवानावर यावा, स्वकष्टानें चित्रित केलेल्या एखाद्या सुंदर चित्रावर नाशाची कुंचली फिरविण्याचा दुःखद प्रसंग एखाद्या चितान्यावर यावा, अथवा पोटच्या पोराच्या

नरडीला नख लावून त्याला जगांतून नाहींसें करण्याचा दुर्धर प्रसंग एखाद्या अनाथ अबलेवर यावा, अशा स्थितींत त्या बागवानास, त्या चितान्यास, त्या अनाथ अबलेस काय बरें वाटेल ? वाचक ! तशाच प्रकारची शोकमय स्थिती, क्षणैक कां होईना, तुकोबांची झाली नसेल काय ? पण तुकोबा छातीचे माणूस. क्षणैक जरी त्यांना वाईट वाटलें, तरी दुसऱ्याच क्षणाला त्यांनीं आपलें मन आवरून, अभंगाच्या वह्या खांदाडास मारल्या व ते इंद्रायणीची वाट चालूं लागले ! यावेळीं एका सात्विक निश्चयाचें तेज त्यांच्या वदनावर खेळत होतें. त्यावेळेस त्यांच्या मनांत कसले बरे विचार चालले असतील ? कारण वाचक ! लक्षांत ठेवा कीं, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथादि साधूप्रमाणेंच व त्या साधुइतकेंच तुकोबाही वर उल्लेखिलेल्या Democratic Spirit नीं म्हणजे लोकसत्तावादानीं भरारलेले होते. " उत्तम ते कुळ पावन तो देश । जेथें हरीचे दास जन्म घेती ॥", किंवा " उंचनीच कांहीं नेणें भगवंत । सुटे भाव भक्त देखोनीया ॥" अथवा "जाणें भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥ आणिक न ये माझ्या मना । हो का पंडित शहाणा ॥ " अशाप्रकारची त्यांची सांगी, शिकवण, व उपदेशपरंपरा होती. साहजीकच, 'कसेंही करून आपण हा झगडा जिंकलाच पाहिजे व तो मी जिंकणारच ' अशा प्रकारचे दृढनिश्चयाचे विचार, इंद्रायणीकडे जाणाऱ्या तुकोबांचे मनांत त्यावेळीं चालूं असले पाहिजेत, हें उघड आहे. तुकोबा इंद्रायणीवर गेले, त्यांनीं क्षणैक आपल्या आवडत्या अभंगांच्या वह्यावरून दृष्टी फिरविली व दुसऱ्याच क्षणास " श्रीकृष्णार्पण " म्हणून त्यांनीं त्या वह्या इंद्रायणींत बुडविल्या व आपण तेथेंच अन्नपाण्यावांचून—त्या वह्या परत मिळेपर्यंत बसण्याच्या निश्चयानें—तळ ठोकला व तोंडानें विठ्ठलाच्या नामाचा गजर चालूं केला. केवढा हा विलक्षण निश्चय ! दिवसांमागून दिवस जाऊं लागले. दोन, चार, सहा असे दिवस गेले. पण तुकोबांनीं तोंडांत पाण्याचा थेंबही न घालतां ते कृतनिश्चयाप्रमाणें तेथेंच त्या नदीकांठीं शिलातलावर भगवन्नामस्मरण करीत पडून राहिले. या ठिकाणीं "आम्ही वैकुंठीचे वासी " ह्या त्यांच्या अभंगाची अथवा " धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हासी ॥ " ह्या त्यांच्या वचनाची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. खरोखरच, लोकसत्तावादी अशा धर्माच्या रक्षणार्थ

त्यांनीं आपल्या जीवाचा केवढा खरें आटापिटा चालविला होता ! आणि अशा संतांना 'संताळें' म्हणून " तुकाराम हा मानासिक सुखदुःखांचें जाळें विणणारा एक निरुपयोगी प्राणी होता !" अशाप्रकारचे प्रलाप वाचले, म्हणजे ते काढणारेंच निरुपयोगी प्राणी आहेत, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. असो. तुकोबा त्याठिकाणीं त्या शिलाखंडावर बसले होते. त्यांना आपण–महाराष्ट्रीय संत–आचरीत असलेला हा झगडा प्रभूला संमत आहे कीं नाहीं, हें पुनश्च एकदा पहावयाचेंच होतें. वास्तविक तसें वाटण्याचें मुळींच कारण नव्हतें. कारण खुद्द भगवंतांनीं आपल्या कृष्णावतारीं जर कोणची दिव्य व अलौकिक कामगिरी केली असेल, तर ती ह्याच लोकसत्तावादी झगड्याची होय. देव तेथून एक कसा आहे तें " तेऽपिमामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् " " अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा " इत्यादि वचनांतून सांगून, स्त्रीशूद्रचांडाळसुद्धां ह्या भक्तिगुणाच्या जोरावर कसें उद्धरून जातील तें त्यांनीं प्रतिपादन केल्याचें मागें सांगितलेंच आहे. जातिभेदाचीं बंधनें समूळ तोडलीं नसलीं, तरी भक्तिगुणांच्या नटनाचांत तीं सर्व विरून जातात हें त्यांनीं आपल्या प्रत्येक अवतारांत सिद्ध करून दिलें आहे. " वेडी गौळियांचीं पोरें । त्यांचें ताक प्यालों बारे । खाता भिल्लिणीचीं बोरें । उच्छिष्टाची चोज ॥" अशाप्रकारचे त्यांचे उद्गार प्रसिद्धच आहेत. किंबहुना, प्रत्येक जातींत भक्तवीर निर्माण करून, इतकेंच नव्हे, तर स्वतःही विठुमहाराचें रूप घेऊन, भक्तिगुणांच्या विलासांत महारापोरापर्यंत सर्व जनता मला सारखीच प्रिय आहे, हें त्यांनीं सर्व जगाला जाहीर केलें आहे. जातिभेद हा समाजाच्या धारणपोषणाला अवश्यक आहे, नुसता जातिभेद नाहीं म्हणून सबगोलंकार केल्यास काय परिणाम होतो तें आपण बुद्धधर्माच्या इतिहासांत मागें पाहिलेंच आहे. या जातिभेदाची वर्णव्यवस्था भगवंतांनीं गीतेंत उत्कृष्ट सांगितली आहे. पण जातिभेद सांगितला, म्हणून जातिमत्सर त्यांना केव्हांही प्रिय नव्हता. इतकेंच नव्हे, तर दैवीप्रेमाच्या तंद्रींत, " चंद्रभागेच्या कांठीं । डाव मांडिला ॥ " असतांना व " विठूचा, गजर हरिनामाचा, झेंडा रोविला ॥". असतांना वाऱ्यावर विहरणाऱ्या–फडफडणाऱ्या–नाचणाऱ्या त्या भागवतांच्या झेंड्याखालीं भेदाचें भूत कसें गाडलें जातें, तें त्यांनीं दाखवून दिलें. चोखामेळा महाराला दृढालिंगन देणाऱ्या, भिल्लिणीचीं बोरें खाणाऱ्या, व गणिकेला मुक्त करणाऱ्या प्रभूजवळ भेदभाव

होता असें कोण म्हणेल ? कारण, " अपिचेत् सुदुराचारो भजते मामनन्य-भाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ " किंवा, " धर्मा-धर्माचें टवाळ । दावी जें कां अज्ञान मूळ । तें त्यजूनि त्यजी सकळ । धर्मजात ॥ " अशाप्रकारची त्या प्रभूची शिकवण होती. राहता राहिला भाषेचा प्रश्न. पण त्याचाही उलगडा असा आहे कीं, संस्कृत वाणी ही त्यावेळीं मृतभाषा ( Dead language ) नसून नित्य व्यवहारांतली, चालतीबोलती, जिवंत भाषा होती. अर्थात् त्याच वाणींत त्यांनीं गीता-कथन केलें—अर्जुनास उपदेश केला, यांत कांहीं फारसें बिघडलें नाहीं. आतां पुढें ती संस्कृत भाषा मृतभाषा झाल्यावर त्या ग्रंथाचा तितकासा उपयोग होईना, हें खरें आहे. व तीच उणीव भरून काढण्यासाठीं महाराष्ट्रीय संतांनीं मराठी भाषेंत काव्यरचना केलेली आहे. पण त्रैविद्येवर हल्ले चढ-वून " वेदु संपन्नु होय ठायीं । परी कृपणु ऐसा आन नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥...मज पाहतां ते मागील कुटी । ग्याला, वेदु गीतेच्या पोटीं । रिगाला, आतां गोमटी । कीर्ति पावला ॥ " अशा प्रकारचें कार्य गीतेनीं बजावलें असून, एकंदरींत तिचें spirit ऊर्फ तेज हें लोकसत्तावादी Democratic कसें होतें, हें वर सांगितलेंच आहे. हाच भग-वंताचा कित्ता त्याच्या भक्तभागवतांनीं उचलून गिरविला असल्यामुळें, भग-वंताचे भक्त म्हणूनच केवळ नव्हे, तर त्याच्या लोकसत्तावादी झगड्याचें अनुकरण करणारे म्हणूनही, ह्या महाराष्ट्रीय संतांना भागवत हें नामाभिधान सार्थ शोभत आहे असें आम्हांस वाटतें. असो. तर अशा स्थितींत तुको-बांना तशी शंका येण्याचें कारणच नव्हते. व तशी ती त्यांना नव्हतीही. किंबहुना, आपण हा झगडा जिंकणार व प्रभूचा कौल आपल्या बाजूस मिळ-णार ही त्यांची खात्रीच होती. व त्याच दृढनिश्चयाचें तेज तशा स्थितीं-तही त्यांच्या वदनावर खेळत होतें. पण अशाही स्थितींत पांचसहा दिवस गेले. सातवा, आठवा, नववा दिवसही पार पडला. पण अद्याप त्या वह्यांचें दर्शन होईना. " सदा सर्वदा देव संनीध आहे । कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥ " ही दासांची उक्तिच खरी आहे. अंतःकरणांत एकीकडे राष्ट्रधर्मकार्यासाठीं पीळ पडत असतानाही अलौलिक दृढ-निश्चयानें सत्याग्रहाचा टाहो फोडणाऱ्या तुकोबांच्या त्या स्थितीनें ते ज्या शिलाखंडावर बसले होते, तो खंडही दुखंड झाला असता. मग ' ब्रह्म "



''चुकी झाळी एक वेळां। मजपासोनी चांडाळा। उभे करोनिया जळा। माझीं वह्या राखिल्या॥''

–श्रीतुकाराम.

तर काय ' सुकोमल ' च होतें, प्रभूचें हृदय तर लोण्याहून मृदु आहे. साहजीकच तो " सत्यसंकल्पाचा दाता भगवान् "—इंद्रायणीच्या लाटांत हेलावणारा तो आपोनारायण—गहिंवरला व त्यानीं दहाव्या दिवशीं कोरड्या ठणठणीत अशा वह्या तुकोबास परत दिल्या! जलाच्या पृष्ठभागावर " वह्या राखिल्या कोरड्या पाणी । भिजो दिल्या नाहीं त्वां ॥ " असा देखावा पाहून, तरंगरूप अनंतहस्तांनीं वरच्यावर झेलून धरलेली ती कृपा पाहून, तुकोबांना किती गहिंवर आला असेल, भक्तिप्रेमाचा उमाळा किती दाटून आला असेल व " प्रभो, ह्या दीनभक्तासाठीं आपणांस कितीहो त्रास झाला ! " म्हणून त्यांनीं कृतज्ञतेचे अश्रु कसे टपटप् गाळले असतील, याची कल्पना त्यांच्यासारख्या भक्तासच येणार आहे. असो. याप्रमाणें तुकोबांनीं हा झगडा रामेश्वरभटाच्या नाकावर टिच्चून जिंकला व संस्कृत-वाणीप्रमाणेंच प्राकृत भाषा व भूदेवब्राह्मणाप्रमाणेंच अन्यजातीही देवाला सारख्याच प्रिय आहेत, हें सिद्ध केलें.

यानंतर रामदासांनींही आपल्या दासबोधांत, ह्या मराठी भाषेच्या निंदक-वावदूकांची चांगलीच हजेरी घेतली आहे. वास्तविक, महाराष्ट्रभाषा, महाराष्ट्रधर्म, व महाराष्ट्राचें राजकारण हातारवांद्यावर खेळविणारे ते वीर असून त्यांच्या वाणीनें मृत हाडांनींसुद्धां जिवंत व्हावें, असल्या तेजस्वी-वाणीचें ते उत्पादक आहेत. त्यांच्या समग्र दासबोधांत हीच खणखणीत वाणी घुमून राहिली आहे. विषय कोणाचाही असो, तो खणखणीत व तेजस्वी भाषेनें सांगण्याची तडफ त्यांच्या अंगीं कांहीं विलक्षणच होती. स्वराज्यसंस्थापक, स्वराष्ट्राभिमानी, स्वधर्माभिमानी व स्वभाषाभिमानी अशा शिवबाचे ते गुरु होते. अर्थात् अशा तेजस्वी पुरुषाची तडफ किती दुर्दम्य असेल व त्यांचा महाराष्ट्रभाषाभिनिवेश किती जाज्वल्य असेल, हें काय सांगायला पाहिजे ? त्यांची महाराष्ट्रांतील जिवंत व जातिवंत कर्तब-गारीच तो सांगत आहे. तथापि, नमुन्यादाखल खालील ओंव्या पहाः—

"ज्या ग्रंथीं बोलिलें अद्वैत । तो म्हणूं नये प्राकृत । सत्य जाणावा वेदांत । अर्थाविषयीं ॥ ४६ ॥ प्राकृतें वेदांत कळे । सकळ शास्त्रीं पाहतां मिळे । आणि समाधान निवळे । अंतर्यामीं ॥ ४७ ॥ तें प्राकृत म्हणों नये । जेथें ज्ञानाचा उपाय । मूर्खासि हें कळे काय ? । मर्कटा नारिकेळ

जैसें ! ॥ ४८ ॥ आतां असो हें बोलणें । अधिकारपरत्वें घेणें । शिंपी-मधील मुक्त उणें । म्हणों नये ! ॥ ४९ ॥ जेथें नेति नेति म्हणती श्रुति । तेथें न चले भाषाव्युत्पत्ति । परब्रह्म आदिअंतीं । अनिर्वाच्य ! ॥ ५० ॥"

—( दासबोध, दशक ७, समास १० वा ).

त्याच सगसणीत वाणींत ते सातव्या दशकाच्या पाहिल्या समासांत म्हणतातः—

" एक म्हणती मराठें काये । हें तो भलत्यानें ऐकों नये । तीं मूर्खें नेणती सोय । अर्थान्वयांची ॥ ३२ ॥ लोहाची मांदुस केली । नानारत्नें सांठविलीं । ती अभाग्यानें त्यागिली । लोखंड म्हणोनि ! ॥ ३३ ॥ तैशी भाषा प्राकृत । अर्थवाद आणि सिद्धांत । नेणोनि त्यागिती भ्रांत । मंद-बुद्धीस्तव ! ॥ ३४ ॥ आहाच सांपडतां धन । त्याग करणें मूर्खपण । द्रव्य घ्यावें साठवून । पाहोंचि नये ॥ ३५ ॥ तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचीत । अध्यात्म लाभे अकस्मात् । तरी अवश्य घ्यावें ! ॥ ३६ ॥ "

यानंतर आर्यापति मोरोपंतांच्याकडे पाहिल्यास आपणांस काय दिसतें ? ज्ञानेश्वरापासून ते तुकाराममहाराजापर्यंतचें संतमंडळ अभंग आणि ओंवी एवढ्यावरच संतुष्ट होतें. परंतु पंतपंडितादिकाविमंडळानें संस्कृतांतली विविधवृत्तरचना व त्या भाषेचें अपार वैभवही मराठींत आणून, भक्तिच्या जोडीलाच व्युत्पत्ति व रसिकता ह्यांचीही तहान भागविण्याची त्यांनीं सोय केली. रा. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें, केवळ संस्कृताभिमानी अथवा केवळ प्राकृताभिमानी पंडितांच्या कोणच्याच एका टोंकाला धांव न घेतां, मोरोपंतादि कविमंडळांनीं मधला मार्ग स्वीकारून, दोहों-चाही गोड समन्वय घातला व दुधांत साखर, किंवा आधींच सोन्याचें, त्यावर जडावाचें, अशाप्रकारची विलक्षण शोभा व माधुरी आपल्या ग्रंथांना त्यांनीं आणलेली आहे. पण येथें लक्षांत ठेवण्याचा मुद्दा इतकाच कीं, असें असूनही महाराष्ट्रभाषेचा त्यांचा अभिमान फार दांडगा होता. कारण, वास्तविक पहातां " मोरोपंत गणेशकाका पाध्ये यांचे हाताखालीं संस्कृत पढून व्युत्पन्न पंडित झालें होते. तेव्हां त्यांच्यासारख्यांनीं नैषध-चंपूसारखे सरस ग्रंथ नित्य चाळीत बसून त्यांतील शब्दश्लेष व अर्थश्लेष यांच्या मजा मारीत व त्यांतील कूटें उलगडून आपलें पांडित्यप्रदर्शन करीत

शास्त्रिमंडळांत जन्म घालवावयाचा.पण असें कांहींच न करतां त्यांनीं बिचाऱ्या मराठी भाषेचा अभिमान धरून पंचविसीच्या आत तिच्यांत ग्रंथरचना करण्यास प्रारंभही केला !" ("मो. च. आ. काव्य." पृष्ठें २४९–५० ) तो तरी ह्यासाठींच. अर्थात्‌च त्यांनीं निंदकवावदूकांची क्षिती आपल्या उच्च ध्येयापुढें बाळगली नाहीं, हें उघड आहे. म्हणूनच ते म्हणतात:—

" काव्य करावें, नच म्यां दचकावें, दूषितो, परि लघूस ॥ कां न सदन बांधावें ? कीं त्यात पुढें बिळें करिल घूस ! ॥ १ ॥" अशारितीनें ह्या निंदकांना घुशीची उपमा देऊन त्यांनीं त्यांची चांगलीच शोभा केली आहे ! त्याचप्रमाणें मंत्ररामायणाच्या " उपसंहारांत पंतांनीं संस्कृताभिमान्यांची समजूत मुक्तेश्वरादि कवीप्रमाणेंच कांहीं युक्तीनें व कांहीं दांडगाईनें घातली आहे " ( " मो. च. आणि काव्य " पृ. २५१ ) त्यावरूनही पंतांचा मराठी भाषेचा जागृत अभिमानच दिसून येतो. मराठी भाषेची तरफदारी करतांना ते म्हणतात:—

"गीर्वाणें राघवाचें यश रसिकजनां लागतें फार मिष्ट । तैसें न प्राकृतानें, अचतुर म्हणती ! मानिती तें न शिष्ट ! ! ॥ पीतां गोक्षीर कार्तस्वरमणि चषकें येतसे जेंवि गोडी । सारज्ञाला पलाशद्रुमदलपटलें सेवितां ते न सोडी ॥ १॥ " अर्थात् पाहिल्या दोन ओळींत ' गीर्वाण ' भाषेच्या हेकट अभिमान्यांस ' अचतुर ' असें शालजोडींतलें पदवीदान करून ते साहजीकच पुढें विचारतात कीं, " बाबारे, दूधच प्यायचें तर तें सुवर्णाच्या रत्नखचित प्याल्यांतून प्यायलें काय किंवा पळसाच्या प्याल्यांतून–द्रोणांतून प्यायलें काय, त्या दुग्धाची गोडी कां त्यानीं कमी होणार आहे ? पात्रभेदानें रुचिभिन्नता कां येते ? तशी गोडी एक तसूभरही कमी होत नाहीं हें जर उघड आहे, तर मग असें असतांना केवळ गीर्वाणवाणीसाठीं अटून बसणें हें अचतुरत्व–हा वेडेपणा नव्हे तर दुसरें काय ? " अर्थात् सुवर्णाचें पात्र हें एका विशिष्ट, उच्च, श्रीमान वर्गासाठीं आहे. पण सबंध देशचा देश ज्या वर्गानीं बनला आहे, त्या सामान्य व गरीबगुरीब जनतेच्या पोटीं जर वेदांतज्ञानाचें–भक्तिचें–अमृत जाऊन ती ताजीतवानी व्हावयास हवी असेल, तर ती अमृतसंजीविनी संस्कृताच्या सुवर्णमंजूषेंत दडवून ठेवून 'आम्हीच काय ते मोक्षाचे अधिकारी,' असली मूर्खपणाची बड-

बद्ध न करतां, अगदीं पळसाच्या प्याल्यांतून आचांडाळ जनतेला ती वाढा-वयास नको काय ? अशा तऱ्हेचा खोल व तेजस्वी अर्थ ह्या पंतांच्या चार ओळींच्या श्लोकांत भरलेला आहे, हें वाचकांनीं विसरूं नये. पंत तशींच जोरदार उदाहरणें देऊन पुढें विचारतात कीं " बाबारे, मोत्यांचा हार रेशमानें गुंफला काय व सुतानें गुंफला काय, त्यानें प्रभेला कांहीं उणेपणा आला काय ? मोत्यांचें तेज त्यांनीं कांहीं कमी झालें काय ? तसेंच चांदीचा दिवा असला काय किंवा मातीची पंती असली काय ? दोन्हीं-च्याही दीपप्रभेनें व तेजानें अंधकाराचा सारखाच नाश होऊन उज्ज्वल प्रकाश पडत नाहीं काय ? मग बाहेर असा दिव्य प्रकाश फांकला असतां, अरुणरागरंगानें दशदिशा सुरंजित झाल्या असता, निंदकवावदूका, संस्कृ-ताच्या हेकट अभिमानी पंडिता, आपल्याच हृदयांत तूं अज्ञानाच्या अंधा-राची निशा कां बरें बाळगतोस ? ह्या तुझ्या करण्यानें, म्हातारीच्या कोंबडें दडविण्यानें, भगवान् सवित्याची आरक्तप्रभा पूर्वक्षितिजावर योग्य वेळीं फांकण्याची कशी राहील ? त्याप्रमाणें ती फाकली जाऊन, स्वातं-त्र्याचा सूर्य स्वदेशाच्या सर्वांगावर व स्वधर्मस्वभाषेच्या मंदिरावर कसा प्रकाशत आहे तें तुला, हे निंदकवावदूका, दिसत नाहीं काय ? मग तुझी ही करणी हास्यास्पद नव्हे काय ?" अशाप्रकारचा खोल व हृदय हलवून सोड-णारा अर्थ वरील पंतांच्या उपमांतून भरला आहे, असें कोण म्हणणार नाहीं ? अर्थात् सौंदर्याची शोभा ही श्रीमंतींतच दृष्टीस पडते असें नसून,जातीचें सौंदर्य हे गरीबीच्या वस्त्रांतही तितकेंच चमकतें, हेंच पंताना येथें ठळठळीतपणें दाखवून द्यावयाचें आहे. पण पंताचेंच केवळ नव्हे, तर ज्ञानेश्वरापासून सुरू झालेल्या संतमंडळाचें व कविमंडळाचेंही हेंच अट्टाहासानें सांगणें आहे कीं, " जातीच्या सुंदरांना कांहींहि शोभतें." खरोखर ह्या ठिकाणीं ह्या सौंदर्य-मीमांसेच्याबाबतींत—

" सरसिजमनुविद्धं शैवलेनाऽपि रम्यं ।
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति ।
इयमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी ।
किमिव हि मधुराणां मंडनं नाकृतीनाम् ?॥"

ह्या कविकुलगुरु कालिदासोक्तीची आठवण झाल्यावांचून राहात

नाहीं. अर्थात् वल्कलांनीं विभूषित अशा त्या शकुंतलेच्या सहजसौंदर्यानें वेडा झालेला दुष्यंत जसें तिला उद्देशून म्हणतो, त्याचप्रमाणें संस्कृताचा राजमहाल सोडून प्राकृताच्या पर्णकुटींत येऊन राहिलेल्या काव्यसुंदरी-कडे--कविताकामिनीकडे--पाहूनही कोणीही खऱ्या हृदयाचा रसिक असेंच म्हणेल कीं:--

" शैवालें युक्त जैसें पंकज तें शोभतें । शशिमाजीं लांछनाची बहु शोभा दीसते । तैशी ही वल्कलानें बहु नामी दीसते । जातींच्या सुंदरांना कांहींही चालतें ! ॥ "--इतकेंच नव्हे, तर मूळ कालिदासाच्या श्लोकांत " इय-मधिकमनोज्ञा " म्हणजे श्रीमंतीच्या भरजरी पडदणीपेक्षां ह्या वल्कलांच्या वस्त्रांतच ही अधिकच शोभून दिसतें असें जें वचन आहे, तेंही एखाद्या रसिक विवेचकास ह्या मराठी भाषेसंबंधीं पटून तो निस्संशय दुष्यंताप्रमाणेंच म्हणेल कीं, " दूरीकृताः खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः "--म्हणजे ह्या मराठी भाषेच्या साजिऱ्या गोजिऱ्या गोड सौंदर्यानें संस्कृत भाषेच्या श्रीमंती शृंगारसाजास खरोखरच लज्जेनें खालीं पहावयास लाविलें आहे ! तथापि, संस्कृतवाणीचें सौंदर्य व मराठीभाषेची माधुरी या दोहींचीही सारखीच गोडी चाखणाऱ्या एखाद्या रसिकास वरील उक्ति जरी थोडीशी अतिशयोक्तीची वाटली, तथापि खऱ्या काव्यदेवीस कोणच्याही वेषांत तितकीच शोभा असून ती कोणच्याहि भाषेच्या वस्त्रांत सारखीच खुलून दिसतें, कारण अंतरींचें सौंदर्य कुठेंहि चमकल्यावाचून रहात नाहीं, इतकें तरी खात्रीनें त्यास कबूल करावें लागेल--कबूल करणें भाग आहे. असो.

---

# भाग १० वा.



याप्रमाणें महाराष्ट्रीय संतांची दोन गोष्टींतली कामगिरी आपण पाहिली-इतकेंच नव्हें, तर महाराष्ट्रभाषाभिमानाचें वारें त्यानंतरच्या कविमंड-ळांतही कसें संचरून राहिलें होतें, तेंही आपण मोरोपंतांच्या उदाहरणावरून वर पाहिलेंच आहे. आतां त्यांच्या--महाराष्ट्रसंतांच्या--तिसऱ्या कामगिरी-कडे आपण वळूं. ही कामगिरी म्हणजे अर्थात् जातिभेदविध्वंसनाची नसली तरी राष्ट्रधर्मासारख्या, प्रभुप्रेमासारख्या, एखाद्या विवक्षित कार्या-

साठीं किंवा कार्याचें कामीं त्याचे काटे ढिलें करण्याची होय. किंबहुना, तशा स्थितींत व तशा अवस्थेंत ह्या भेदभावाच्या भुताला गाडण्याचें लोकोत्तर कार्य करून, सर्व समाजांत ह्या महाराष्ट्रीय संतांनीं कसा एकोपा निर्माण केला, तेंच आपणांस आतां पहावयाचें आहे. महंमदी धर्माची लाट हिंदुस्थानांत उसळण्यापूर्वी हिंदुसमाजाची कशी खिळखिळी स्थिती झाली होती, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत कसा राहिला नव्हता, व त्यास कोणकोणचीं कारणें घडलीं होतीं, ह्या वृक्षाला आंतून कोणच्या गोष्टींची कीड लागली होती, तें आम्ही मागें सांगितलेंच आहे. अर्थात् यामुळें यावनीधर्माच्या जबरदस्त तडाख्यानें हा समूळ वृक्षच उपटून पडतो कीं काय, अशी भीति जेव्हां निर्माण झाली, तेव्हां ह्या वृक्षास—ह्या हिंदुधर्माच्या वृक्षास—आंतून लागलेल्या व पोखरणाऱ्या किडींचें महाराष्ट्रीय संतांनीं आधीं कसें निर्मूलन केलें व नंतर रामदासांच्या 'महाराष्ट्रधर्मा'च्या अमृतसिंचनानें तो वृक्ष पुनश्च कसा बलवान् होऊन फोंफावला, हेंच आपणांस आतां पहावयाचें आहे. ह्या हिंदुधर्मवृक्षास एकंदर चार प्रकारची कीड लागली होती. पैकीं दोन किडींचें निवारण महाराष्ट्रीय संतांनीं कसें केलें तें येथवर कथन केलें. तिसरी विनाशक कीड म्हणजे जातिभेदाच्या दुर्दम्य भुताची. ह्या भुतानें झपाटलेला समाज खालच्या जातीविषयीं, महारापोरांविषयीं, व स्त्रीशूद्रादिक दुबळ्या जीवांविषयीं अगदींच बेपर्वा राहून, त्या आत्मघातकी मोहानें वाटेल तसा नाचत होता. अर्थात् ह्या भुताला गाडणारा कोणीतरी चांगलाच पंचाक्षरी पाहिजे होता, व तो आमचा महाराष्ट्रीय संतांचा मेळा निघाला, व त्यांनीं आपल्या दिव्य अलौकिक कामगिरीनें आपल्या ऐक्याचा झेंडा चंद्रभागेच्या तीरावर, हरिनामाच्या गजरांत, थै थै नाचवला व त्या खालीं ह्या भेदभुताला समाधी दिली. यासंबंधीं आमच्या एका पद्यांतील खालील ओळी आम्ही वाचकांसाठीं देतों, त्या त्यांनीं पहाव्या:—

" भागवतांचा, वारकऱ्यांचा, वैष्णववीरांचा ।
झेंडा फडके ज्ञानेशाचा, नाथतुकोबांचा ।।
अस्पृश्यासी स्पृश्य करीती कीर्तननटनाचें ।
भेदभुता गाडण्या पताका पंढरिला नाचे ! ।।

देवासाठीं, धर्मासाठीं, स्वदेशाहिसाठीं ।
उच्चनीचभेदाच्या वदती तुटोत ह्या गांठीं ॥ ''—

अर्थात् अशाप्रकारचें दिव्य व अलौकिक कार्य ह्या संतांनीं केलें आहे. यासंबंधीं आम्ही थोडाबहुत उल्लेख मागें केलाच आहे. तोच आतां थोडासा विस्तारपूर्वक आपणांस पाहणें आहे. तसेंच, याकामीं महाराष्ट्रीय संत, भगवंतांच्या व भगवद्गीतेच्या पावलावर पाऊल टाकून कसे चालले होते, हेंही आम्ही मागें दिग्दर्शित केलेंच आहे, तेंहि वाचकांनीं विसरूं नये. अर्थात् ह्या जातिभेदनिर्मूलनाचें कामीं नसलें—तरी खालच्या जाति-विषयींची अक्षम्य अनास्था दूर करण्यासाठीं, भगवंत व त्याचे भक्त भाग-वत सारख्याच जोमानें झटलें व झगडलें आहेत, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

वास्तविक, रामतीर्थांनी म्हटल्याप्रमाणें, " स्त्रिया, शूद्र, व मुलें हीं राष्ट्रीय वृक्षाचीं मुळें " असून तत्त्वज्ञानाचें जलसिंचन त्या राष्ट्रीय वृक्षाच्या डहाळ्यावरून न करतां ह्या मुळांला करणें किती बरें अवश्य आहे ? पण आजवर ह्या वर्गाची उपेक्षाच चालली होती. भगवान् श्रीकृष्णाच्या वेळीं हीच स्थिती असून, त्यांनीं ह्या असह्य वर्गाची छातीठोक बाजू उचलून धरलेली आहे. त्या भगवंताचेंच Democratic spirit (उदारमवादित्व) अंगीं भिनलेल्या संतांनींही—महाराष्ट्रीय संतांनींही—मग साहजीकच हाच झगडा पुढें चालविला, व स्वामी रामतीर्थांनीं वर म्हटल्याप्रमाणें राष्ट्रीय वृक्षाच्या मुळांला अद्वैततत्त्वज्ञानाच्या जलसिंचनाची अवश्यकता त्यास पटून तीं त्यांनीं आपल्या महाराष्ट्रभाषेंत अमलांतही आणली. एवढा 'वेद बापु' खरा व ' श्रुति परौति माऊली जगा ' दुसरी नाहीं हेंही खरें. पण ह्या मातृपितृप्रेमाच्या उपमेनीं अंध होऊन न जातां अगदीं पहिल्या धडाक्याला ज्ञानोबांनीं त्यातील वैगुण्य बाहेर काढलें आहे. " वेदु संपन्न होय ठायीं । परि कृपणु ऐसा आनु नाहीं । जे कानीं लागला तिहीं । वर्णांच्याचि ॥" आणि "येरा भवव्यथा ठेलिया । स्त्रीशूद्रादिकां प्राणिया । अनवसरू मांडूनिया । राहिला आहे ! ॥ " असें ज्ञानोबा म्हणतात ते ह्यासाठींच. खरोखर केवढी ही कृपणता, केवढा , हा कंजुषपणा ! उदार-दातृत्वाचा व प्रेमळ औदार्याचा कोण हा अभाव ! ज्यांच्या नांवानें खरोखर सगळा समाज जगायचा, ज्या हजारों, नव्हे, लाखो जीवांच्या

मोअदादीची खैरात ह्या हिंदुधर्माचे नांवाखाली व्हायची, हिंदुधर्माचे–आर्यधर्माचे ऐश्वर्य, वैभव, व दिमाख ज्यांच्या नांवावर, जिवावर चालायचा त्याच लक्षावधि जनसमाजाच्या वर्गाची, त्याच Masses ची हेळसांड वेदांनीं चालवलेली पाहून, कोणा खऱ्या सहृदयास—सहृदय उदारात्म्यास त्याचा चेव येणार नाहीं ? ज्या तिसऱ्या वर्गाच्या लाखो, नव्हे, कोट्यावधि उतारूंच्या जिवावर रेल्वेकंपनीची चंगळ चालायची, त्यांचे नानाप्रकारचे हाल मांडून पहिल्या व दुसऱ्या वर्गातील उतारूंची तेवढी सोय करण्यांतलाच हा प्रकार म्हणायचा! पण त्यामुळें चालू परकीराज्यांत सुद्धां जशी जागोजाग रेल्वेमंडळें स्थापन झालीं व जावडेकरांसारख्या देशभक्तांनींच नव्हे, तर मोठमोठ्या पुडाऱ्यांनींही त्याविरुद्ध ओरड व गिल्ला केला व अजूनही हा झगडा चालूंच आहे, त्याचप्रमाणें, व वरील वेदांतविषयक बाबत ही आपल्यांतलीच असल्यामुळें, त्याहूनहीं अधिक नेटानें, जोमानें व धडाक्यानें प्रथम भगवंतांनीं व नंतर त्याच्या भक्तभागवत अशा महाराष्ट्रीय संतांनीं हा झगडा चालविलेला आहे व अखेर तो जिंकून त्यांनीं त्याचीं गोड फळेंही महाराष्ट्रास कित्येक वर्षे चाखावयास दिलीं आहेत. ती कशी तेंच आतां आपणांस पहावयाचें आहे. पैकीं भगवंतांच्या झगड्याबद्दल आपण मागें थोडेसें बोललोंच आहोंत. "स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि याति परांगतिम्" "अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मन्तव्यः सम्यक्व्यवसितोहि सः॥" इत्यादि वचनांतून ह्या सामान्य जनतेचा–दीन, दुबळ्या, अनाथ, अशा शेंकडो जिवांचा–श्रीकृष्णानें कसा छाती ठोकून पाठपुरावा केला, व "सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज । अहं त्वां सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि माशुचः ॥" अशाप्रकारचें धीर, गंभीर पण तितकेंच प्रेमळ असें विश्वप्रेमी उदार आश्वासन भगवंतांनीं सर्व जनतेला कसें दिलें आहे तें पाहिलें, म्हणजे हृदय कसें कृतज्ञतेनीं गहिंवरून भरून येतें व साहजीकच ज्ञानोबांच्या खालील प्रेमळ व बहारीच्या ओव्या डोळ्यापुढें–कृतज्ञतेच्या अश्रूंनीं डबडबलेल्या डोळ्यापुढें चमकूं लागून पटापट मुखावाटे बाहेर पडूं लागतात: ज्ञानोबा या गीतेची म्हणजेच श्रीकृष्णाच्या कर्तबगारीची–थोरवी गातांना म्हणतात:—

" म्हणौनि मनें कायें वाचा । जो सेवकु होईल इयेचा । तो स्वानंद-

साम्राज्याचा । चक्रवर्ती करी ॥ कीं अविद्यातिमिर रोखें । श्लोक सूर्यातें पैजा जिंके । ऐसें प्रकाशिले गीतामिषें । रायें श्रीकृष्णें ॥ शास्त्र वाच्यें अर्थें फळें । मग आपण मावळें । तैसें नव्हे, हें सगळें । परब्रह्मचिं ! ॥ कैसा विश्वाचिया कृपा । करूनि महानंद सोपा । अर्जुनव्याजें रूपा । आणिला देवें ! ॥ चकोराचेनि निमित्तें तिन्ही भुवनें संततें । निववीली कळावतें । चंद्रें जेवीं ॥ का गौतमाचेनिमिषें । काळिकाळ ज्वरितोद्देशें ! पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥ तसें गीतेचें हें दुभतें । वत्स करूनि पार्थातें।दुभिनली जगापुरतें । श्रीकृष्ण गाय ! ॥ ”

अर्थात् जो उपकार प्रभूंचा, तोच व्यासांचाही आहे. ज्ञानोबा म्हणतातः—

“ बाळकातें वोरसें । माय जै जेवधुं बैसे । तैं तया ठाकती तैसे । घांस करी ॥ कां अफाटा समीरणा । आपैतेपण शहाणा । केलें जैसें विंजणा । निर्मूनिया ॥ तैसें शब्दें जें न लभे । तें घडूनिया अनुष्टुभें । स्त्रीशूद्रादि प्रतिभे । सामाविलें ॥ ”—

त्यानंतर ओघानेंच हीही गोष्ट आली कीं, जी कृपा व्यासांची, तीच खुद्द ज्ञानोबांचीही आहे. कारण एके काळीं संस्कृतभाषा चालू व जिवंत भाषा असली, तरी ती मृतभाषा झाल्यानंतरच्या, म्हणजे उदाहरणार्थ संतांच्या—महाराष्ट्रीय संतांच्या—काळीं काय ? त्या काळीं सामान्य जनांना मराठीवाचून अन्य आधार कोणचा बरें होता ? साहजीकच त्या मराठी भाषेंत— अफाट पसरलेल्या सामान्यजनांच्या हृदयींच्या बोलांतच—हें वेदांताचें, ज्ञानाचें, भक्तिचें हितगुज बोलल्यावांचून सुटका नाहीं, त्यावांचून त्या दीनदुबळ्यांची मुक्तता नाहीं, हें पाहून ज्ञानोबा साहजीकच म्हणतात कीं:—

“ आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासांचीं पदें पाहाता पाहाता । आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ ”—

असो. तर सांगायचा भाग इतकाच कीं, श्रीकृष्ण, व्यास, व ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरापासून सुरू झालेले संतमंडळ ह्या सर्वांचाच सामान्य जनांवर सारखाच लोभ व उपकार आहे. कारण कृपणवेदांनीं उपेक्षिलेल्या स्त्रीशूद्रादि सामान्यजनतेला या सर्वांनीं सारखाच धीर व आश्वासन दिलें

आहे. इतकेंच नव्हे तर Masses versus Classes असा झगडा उत्पन्न होऊन सुरू झाला,तेव्हां ह्या सर्वांनीं Masses ची म्हणजे सामान्यजनांचीच बाजू उचलून धरली आहे.

वास्तविक, ह्या स्पृश्यास्पृश्याचें बंड, उच्चनीच भेदाचीं भुतें, किती अनर्थकारक आहेत व स्त्रीशूद्रादि सामान्य जनांला मोक्षाचा मार्ग दाखवून देणें किती अवश्यक आहे, याची जाणीव पटून श्रीकृष्ण, गौतमबुद्ध इत्यादिकांनी कशी कळकळीची खटपट केली, त्याचा वृत्तांत आम्ही मागें दिलाच आहे. पण त्याचा उपयोग कितपत झाला ? तात्पुरता उपयोग निस्संशय झाला. पण पुन्हां मध्वाचार्यांच्या विष्णुपूजेच्या कडक अमलाला ह्या शिवाशिवीच्या अतिरेकाची कीड लागायची ती लागलीच ना ? त्यानंतर महाराष्ट्रीय साधुसंतांच्या दुर्दम्य व तडफीच्या कामगिरीनें ही कीड बरीच नाहिशी झाली. तथापि तिचा समूळ उच्छेद मात्र झाला नाहीं. कारण सध्यांसुद्धा महात्मा गांधींसारखे लोकोत्तर पुरुष " अस्पृश्यता ही हिंदुधर्मास लागलेली कीड आहे " म्हणून हकाटी करीत असतां त्यांनाही विरोध करणारे हरीचे कर्मठ लाल:अद्याप हयात आहेतच. स्वामी विवेकानंद आपल्या ओजस्वी वाणीनें ह्याच अस्पृश्यतेविरुद्ध, उच्चनीचभेदाविरुद्ध अत्यंत कळकळींचे बोल बोलून गेले. (त्यांचीं मागें दिलेलीं " खाजगीं पत्रें " पहा.) स्वामी रामतीर्थांनींही आपल्या दिव्यदृष्टीनें हेंच सांगितलें. पण त्याचा कितीसा उपयोग झाला ? अद्याप हा उच्च नीच भेद, हे स्पृश्यास्पृश्यत्व, ही खालच्या वर्गांची अनास्था हयात असून सुरूच आहेना ! हें पाहिलें म्हणजे मन उद्विग्न होतें, बुद्धिला गरगर फिरल्यासारखें वाटतें, व लेखणी पुढें काम करीनाशी होते. पण कोणच्याही सुधारणेचा इतिहास पाहिला, तरी जुन्यासच चिकटून राहण्याची आवड—जुन्या कल्पना, जुने आचारविचार, किंबहुना, जुनें तें सोनें ही भावना उराशी बाळगून बसण्याची conservative म्हणजे अनुदारवृत्तिच आपणांस बहुजनसमाजांत दिसून येतें. केवळ एकदांच केलेल्या प्रयत्नानें जग सुधारतें, तर ईश्वरास इतके अवतार घेण्याचेंच कांहीं कारण अथवा प्रयोजन नव्हतें. पण जनांचा हा स्वभावच जाणून, कधीं गोड बोलून, तर कधीं रागे भरून, कधीं प्रेमळपणें तर कधीं धाकदपटशा दाखवून, परमेश्वरास व त्याच्या भक्तांस समाजसुधारणेचें कार्य करायचें

असतें. व निरपेक्ष भावनेनीं ते तसें करीतही असतात. किंबहुना, त्या-कामीं होणारा छळ, निंदा, उपहास इत्यादि सोसूनही ते पित्याच्या प्रेमानें व आईच्या वत्सलतेनें हेंच सांगत असतात कीं, " बाबांनो, अजून तरी शुद्धीवर या. " महाराष्ट्रीय संतानींही तेंच केलें. अत्यंत कळकळीच्या बोलांत त्यांनीं जनांला उपदेश केला. इतकेंच नव्हे, तर पंढरीस नामाची पेठ वसवून, " नामाचि देती नामाचि घेती । होतो जयजयकार । पंढरि नामाचा बाजार ॥" ह्या पद्यांत म्हटल्याप्रमाणें त्या नामाच्या जयजयकारांत त्यांनीं सर्व भेदभाव बुडवून टाकलें. वाळवंटावर, चंद्रभागेच्या कांठीं, लाख दीडलाख यात्रेकरूंचा झेंडा नाचत असतां, त्या वारकऱ्यांचें वाऱ्या-वर विहरणारें रक्त निशाण—त्या निशाणाचा भगवा रक्त रंग सर्व जगाला हेंचि गोष्ट पुनःपुन्हा जाहीर करीत होता कीं, "भाग्यवंतांनो, या व ह्या रक्तरंगांत दंग व्हा. कारण, सर्व भेदभावाच्या केलेल्या होळीच्या ज्वालांचा हा रक्तवर्ण, ह्या संतांच्या निशाणावर फडकत आहे. त्यांतच सर्व संसाराचीच नव्हे, तर सर्व विश्वाचीही आसक्ति सुटलेला विरक्तीच्या वैराग्याचा भगवारंग मिसळून गेला आहे. व त्यांतच परमे-श्वराच्या ठायीं अनुरक्त झालेल्या भक्तिचा आरक्त रंग उसळून चमकत व झळकत आहेत ! अशा ह्या गोड मिश्रणाचें हे वारकऱ्यांचें निशाण वाऱ्यावर हंसत—खेळत—डुलत—आहे ! पहा ह्या निशाणाखालीं दृष्टी फेंका, म्हणजे तुम्हाला काय दिसून येईल ? त्याच रंगाच्या, भक्तिविरक्तिच्या रंगाच्या छटा ज्यांच्या अंगावर झळकत आहेत, ' व जयजय रामकृष्ण हरी ' ह्या ठेक्यावर पडणाऱ्या प्रत्येक पावलाखालीं,ज्यानीं भेदभावाच्या भुताला समाधी दिली आहे, असें शेकडो—नव्हे,हजारो वारकरी, हजारो संत, व हजारों भक्त तुम्हांस तेथें दिसून येतील. "वारकरी का धारकरी" असला वेडा वाद कसला माजवितां ? वारकरी तोच धारकरी व धारकरी तोच वारकरी हें तुम्हास समजत नाहीं काय ? " सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः " हें भगवंतांचें वचन विसरलांत काय ? मग जी तिथें स्थिती तीच इथें. वारकऱ्यांच्या हातांतील ती समत्वभावाची सूक्ष्म तरवार, त्या तरवारीचे भेदरलेल्या भेदभुतावर वार करणारे ते वारकरी, व त्या वारानें—सूक्ष्म पण तिखट तेजाच्या तळपत्या पात्याच्या त्या तरवारीच्या वारानें—भेकड व भ्याड अशा त्या भेदभावाच्या भुताच्या अंगातून ह्या निशाणावर उडालेलें रक्त

व त्यानें रंगलेला व विजयोत्साहानें वाऱ्याशीं झुंजणारा हा ध्वज ही तुम्हांला काय सांगतात ? ह्या ध्वजाशेजारींच खणखणीत नाद करणारा मृदंगही तुम्हास आपल्या ध्वनीनें हेंच सूचित करीत आहे. तरी हे सभाग्यांनो, या व ह्या संतांच्या बरोबरच आनंदानें नाचून-डोलून ह्या शेजारून वाहणाऱ्या चंद्रभागेच्या उदरांत त्या भेदभावाला जलसमाध द्या. कारण त्यासाठींच ती तेथें वाहत आहे ! अशाप्रकारचा दिव्य संदेश ते निशाण सांगत असे, व तो ऐकून हजारो जिव पंढरीच्या पेठेंत पुनीत होण्यासाठीं लोटत असत. कारण, " चहू वर्णासि नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर । " असा तिथें दंडक असून कोणीही यावें व ' उभाउभी ' भेटणाऱ्या विठ्ठलाच्या पायांवर मस्तक ठेवून पुनीत होऊन जावें, असें त्या पंढरीचें महिमान व उदार साम्राज्य आहे. त्या विठुरायाच्या नगरींत हा उंच, हा नीच, हा ब्राह्मण, हा चांडाळ, हा उत्तम, हा अधम, असा भेदभावच नाहीं ! "ऐसें तीर्थ कोणी दाखवा गोमटे । जेथें प्रत्यक्ष हें भेटे परब्रह्म ॥ " असें नामदेव पंढरीसंबंधीं साभिमान विचारतात तें ह्यासाठींच. तें परब्रह्म आणि त्या परब्रह्माची साळ्याभोळ्यांशीं प्रेमळ वागणूक पाहून कोणाचें बरें चित्त गहिंवरणार नाहीं ? आणि अशाप्रकारची प्रेमळ वागणूक मिळाल्यावर कोण बरें परधर्मांत जाईल ? खालच्या जातींना काय हृदय नाहीं, कां भावना नाहींत ? त्यांना वाटेल तसें पायाखालीं तुडवून, त्यांच्या सावलीचा सुद्धां विटाळ मानून, पुन्हा त्यांनीं हिंदुधर्मांत राहावें अशी अपेक्षा करणें किती धाडसाचें व मूर्खपणाचें आहे बरें ? पण तेंच त्याना मायेनीं वागविलें, प्रेमानें कुरवाळलें, व ममतेनें त्यांच्या पाठीवरून हात फिरविलात तर ते हिंदुधर्मासाठी प्राणसुद्धां देण्यास तयार होतील, हे कोणीही विसरूं नये. वास्तविक ही अगदी साधी गोष्ट आहे. पण साध्या तत्वांचाही सामान्य व्यवहारांत कित्येकांना विसर पडत असतो. ह्या प्रेमांत असलेली अद्भुत जादु देवांनीं व त्यांच्या भक्तांनीं सारखीच ओळखली होती व महमंदीधर्माच्या लाटेला परतवून लावण्यासाठी संत जेव्हां बद्धपरिकर झाले तेव्हां देवांनींही त्यांचा पाठपुरावा केला. पण कर्मठांना त्याचें काय ? त्यांनीं या कामीं-या पवित्र व उच्च कार्यामध्यें सुद्धां-संतांचा छळ करायचा तो केलाच ! पण अशा छळाला संत कस्पटासमान लेखीत असत. कारण " वीरविठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ " अशा छातीठोक निश्च-

याचें तेज ज्यांच्या आंतबाहेर भरून राहिलें आहे, असें ते ईश्वराचे शूर सैनिक होते. हजारो छळांचे वार अंगावर झेलीत हा झगडा जिंकणारे ते वीर होते! अर्थात् यामुळें ते तर कचरले नाहींतच; पण त्यांना छळणाऱ्या कर्मठांचा मात्र क्षुद्रपणा त्यानें चांगलाच व्यक्त झाला. इकडे ईश्वराच्या मनोदयाप्रमाणें, त्या छळाच्या अग्नींतून सज्जनसंतांचें शुद्ध सत्वसुवर्ण अगदीं बावनकशी कसें आहे हेंही सर्व जगाला जाहीर झालें, तेंही ठीकच झालें. म्हणूनच—"निंदक कामाचा, कामाचा। गडी आत्मारामाचा ॥" म्हणून संत त्यांतही आनंदच मानीत असतात. पण त्यामुळें क्षुद्रांचा क्षुद्रपणा लवमात्रही कमी होत नाहीं, हें आम्ही वर सांगितलेंच आहे. असो. यासंबंधीं—ह्या खालच्या वर्गाविषयींच्या कळवळ्याच्या झगड्यासंबंधीं असलेल्या महाराष्ट्रीय संतांच्या कामगिरीच्या खजिन्यांतून आम्ही दोनच उदाहरणें वाचकांपुढें ठेवतों, त्यावरून त्यांना इतर गोष्टींची व चालू झगड्याची चांगली कल्पना येणार आहे.

पहिलें उदाहरण एकनाथांचें घ्या. एकनाथांच्या सारखा गरीबागुरिबांच्या, महारापोरांच्या, किंबहुना, जीवमात्रांच्या दुःखानें दुःखी होणारा व त्यांच्या सुखानें सुखावणारा महात्मा जीव पुन्हा होणें नाहीं, हेंच खरें. बारा वर्षें ज्यांच्या घरीं भगवंतांनीं "गंगेचें पाणी" कावडीमध्यें आवडीनें भरलें व "स्वकरानें चंदन घासलें" त्या महाभागाची भगवद्भक्ति व भूतमात्राविषयीं—विशेषतः आबाळ झालेल्या खालच्या जातींविषयीं—किती बरें प्रेम असेल! किंबहुना, "भक्ति म्हणजे सर्वाभूतीं। सप्रेम भजनयुक्ति।" असा त्यांचा दंडकच होता. "जे कां रंजले गांजले। त्यासि म्हणे जो आपुले ॥" अथवा "ज्यासि आपंगिता नाहीं। त्यासि धरी जो हृदयीं ॥" अशाप्रकारचें प्रेमळ, वत्सल व भूतदयेनीं भरलेलें—विशेषतः मुक्या जीवांच्या, लाम्ह्या बाळांच्या व अस्पृश्य गणले जाऊन कधींही ममतेच्या प्रेमाची साउली न देखिलेल्या व उपेक्षेच्या—अनास्थेच्या—रखरखीत वाळवंटांत भाजून निघणाऱ्या अशा जीवांच्या दुःखानें दुःखित होणारे व त्यांच्या सुखासाठीं स्वतःच्या प्राणावरही तिलांजलि देण्यास तयार असलेले असें नाथ, छातीचे सुधारक होते. त्यांच्या सुधारकत्वाचा दाखला वेगळा नकोच आहे. अद्यापही "एकनाथी ब्राह्मण" म्हणून वेगळी जात दाखविली जाते. ह्या कर्मठांच्या उपकारानें (!)च तो धडधडीत वाचकांस दिसून येणार आहे—

पटणार आहे. असो. अशाप्रकारच्या नाथांनीं, कष्टानें कावडींत वाहून आणलेलें गंगोदक, तहानेनें तळमळणाऱ्या गाढवाच्या मुखांत घालून, त्या जगदात्म्यास संतुष्ट केलें. आईवांचून चुकलेलें व " आई आई " करून रडणारें महाराचें पोर कडेवर घेऊन, प्रेमगद्गद वाणींत व प्रेमाश्रूनें डबडबलेल्या नेत्रांनीं त्याकडे पाहत,त्याचे डोळे पुसून,त्याचें त्यांनीं समाधान केलें, व त्या चुकलेल्या चिमण्या राजसाला—" चुकलीया माये । बाळ हुरुहुरु पाहे ॥ " ह्या तुकोक्तीप्रमाणें कावऱ्याबावऱ्या नजरेनीं इकडेतिकडे पाहून " आईआई " म्हणून हंबरणाऱ्या त्या पाडसाला—नाथांनीं महारवाड्यांत जाऊन त्याच्या आईच्या ओटींत घातलें ! पण कर्मठ ब्राह्मणांना याहूनही चेव आणणारी अजूनही एक गोष्ट व्हावयाची होती व तीही झाली. मग काय विचारतां ? आधींच सुधारक, बाडगा, भ्रष्ट, अनाचार माजविणारा, म्हणून त्याचें नांव पडलें होतेंच. त्यांतच ह्या गोष्टीची भर पडून, त्या कर्मठांच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोंचली. तो प्रसंग असा कीं, नाथांच्या येथें एकदां श्राद्ध होतें. श्राद्धाला उत्तम, वैदिक व "यजन करितां कौतुकें। तिहीं वेदांचा माथा तुके ।" अशा पट्टीचे ब्राह्मण बोलावले होते. तो माध्यान्हीचा समय होता. घरांत पाकनिष्पत्ति पूर्ण झालेली होती. अद्याप ब्राह्मणांचें भोजन व्हावयाचें होतें. अशा सुमारास त्या घरावरून कांहीं महार चालले होते.अंगावर धड वस्त्र नाहीं, तोंडें गरिबीनें दीनवाणीं झालेलीं, अशातऱ्हेचे ते महार, नाथांच्या घरावरून जात असतां, घरांतील खमंग पक्कानांच्या सुवासानें आनंदित होऊन साहजीकच नाथांच्या दारांशीं ते क्षणैकच थबकले व " अहाहा ! असें सुग्रास अन्न आम्हांला सबंध जन्मांत तरी कुठलें मिळायला ? " अशातऱ्हेनें आपसांत बोलून बिचारे पुन्हां मार्गाला लागले ! त्यांचे ते साधेच, पण हृदयाची कालवाकालव करणारे शब्द,सहज दाराशीं आलेल्या नाथांच्या कर्णसंपुटांत शिरल्याबरोबर नाथांच्या डोळ्यांला टचकन् पाणी आलें ! "विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥" किंवा."यो मां पश्यति सर्वत्र सर्वंच मयि पश्यति " अशा उच्च अधिकाराचे व उच्च भूमिकेचे नाथ भक्तोत्तम होते. त्यांना साहजीकच प्रेमाचा गहिंवर आला व या "चालत्या बोलत्या देवांना " अन्न संतर्पण करून, पितरांना खराखरा संतोष देण्याचें त्यांनीं ठरविलें. लगेच त्यांनीं त्या महारांला परत बोलाविलें व त्यांना ती

सर्व सुग्रास पाकनिष्पत्ति वाढून ते आनंदानें भोजन करीत असतां, फारा दिवसांनीं भेटलेल्या पुत्रास पाहून आनंदित होणाऱ्या मातेच्या वत्सलतेनीं ते त्यांच्याकडे पहात राहिले. महारांचें जेवण संपत आलें, तोंच वरील कर्मठ ब्राह्मण तेथें येऊन हजर झाले. आपणाआधीं महारांना भोजन घालून स्वयंपाक विटाळला, हें पाहून त्या ब्राह्मणांच्या रागाचा पारा कोणच्या अंशावर चढला असेल, याचें शब्दचित्र आम्ही रंगविण्यापेक्षां ते वाचकांच्या कल्पने· वरच सोंपवावें हें बरें. आम्ही एथें एवढेंच सांगतों कीं, नाथासारख्या अधिकारी पुरुषानें त्यांची इतकी पायधरणी केली, "वेगळा स्वयंपाक करतों" म्हणून सांगून इतकीं आर्जवें केलीं, तरीसुद्धां ते न ऐकतां "स्नानसंध्या टिळे· माळा" करूनही "पोटीं क्रोधाचा उमाळा" बाळगणार ते ब्राह्मण, तावातावानें तसेंच निघून गेले ! पण त्यानें नाथांचें काय वाकडें झालें ? त्या कर्मठांना वाटलें कीं, आतां नाथांच्या श्राद्धांतील ब्राह्मणभोजनाचें काम अडून बसेल. पण तसें झालें काय ? तसें होणें शक्य होतें काय ? "ज्ञानिया आत्मा माझा" म्हणून छाती ठोकून सांगणाऱ्या भगवंताच्या साम्राज्यांत तरी तें शक्य नव्हतें ! नाथांचे प्रत्यक्ष पितर येऊन भोजन करून गेले ! व ब्राह्मणांचा गर्व परिहार झाला ! वाचक, विसाव्या शतकांतील वाचक, ही गोष्ट वाचून तुम्हांस आश्चर्य वाटेल व तुमचा यावर कदाचित् विश्वासही बसणार नाहीं. पण शेक्सपीअरच्या हॅम्लेटच्या बापाचें भूत येऊन त्याच्याशीं बोलतें, यावर विश्वास ठेवणाऱ्या वाचकांनीं यावर अविश्वास करण्याचें मुळींच कारण नाहीं. असो. याप्रमाणें नाथांच्या अद्भुत भक्तीच्या महिमानाला भुललेल्या देवांनीं, त्यांच्या धडाडीच्या समाजकार्यांत, त्यांचा योग्यवेळीं पाठपुरावा केलेला आहे. एकंदरींत, नाथांच्या सुकोमल हृदयाची लोको-त्तरता कांहीं विलक्षणच होती, ह्यांत शंका नाहीं. त्या प्रेमानें भरून जाऊन, खुद्द गणिकेच्या घरचीं सुद्धां एकदां पूजा स्वीकारणारे व सगळीकडे त्या जगदात्म्याचा वास पाहणारे "वासुदेवः सर्वमिति" असे ते "महात्मे" होते. त्यांची किंमत तत्कालीन क्षुद्र कर्मठांस कळली नसली, तरी प्रत्यक्ष प्रभूस ती मान्य होती, व त्यांच्या कर्तबगारीच्या तेजाची प्रभा आजही सर्वांना मार्गदर्शक होऊन राहिली आहे. खऱ्या गुणांचें कौतुक करणाऱ्या प्रेमळ पंतांनींही नाथांच्या या दिव्य कर्तबगारीचें वर्णन खालीलप्रमाणें केलें आहे:—

" भूताराधनयज्ञीं समदर्शी एक परम हा रमला ।
द्रवुनि म्हणे ' पित्रन्नें भोज्य, जगन्निंद्य पर, महार मला '॥१॥
अंत्यजतोक कडे घे उष्णीं ज्या फार लाळ शेंबुड तें ।
अद्भुत सुकृत न गातां साधूंची रीति आळसें बुडते ॥ २ ॥
भूतदया संसारीं एकोषंतास निरुपमा घडली ।
जडली आंगासीच क्षांति सदा, शांति तों गळां पडली !॥३॥"

असो. तर स्पृश्यास्पृश्य, उच्चनीच, हा भेदभाव बुडवून टाकून, दिव्य भक्तिभावाच्या अमृतसंजीवनीनें, अगदीं महारापोरापर्यंतचा सर्व समाज, आपल्या गोडवाणीनें व प्रेमळ प्रीतिनें एकत्रित करण्याच्या कार्याचा विडा उचललेल्या संतांच्या—महाराष्ट्रसंतमंडळांच्या—यादींतला हा एकच नमुना पाहिला असतां "God is Love" म्हणजे परमेश्वर प्रेमस्वरूप आहे, ही ख्रिस्ताची शिकवण, त्याच्याही आधींपासून असणाऱ्या हिंदुधर्मांत व विशेषतः श्रीकृष्ण,बुद्ध व महाराष्ट्रीय संत यांच्या रोमरोमांत कशी भिनून राहिली होती, हें उघड दिसून येणार आहे. ह्या संतांच्या दिव्य कामगिरीकडे पाहूनच ' अशा संतांच्या वचनांनीं व कर्तबगारीनें भारलेला समाज ख्रिश्चनधर्माकडे कसचा वळतो!' असे हताशपणाचे उद्गार कित्येक रेव्हरंडांना व सर अलेक्झांडर सारख्यांना अगदीं चालू काळांतसुद्धां काढावे लागले आहेत. (वे. नि. पा. ७३।७४ पहा). आणि जी सध्या स्थिती तीच—किंबहुना, त्याहून कितीतरी अधिक अशी स्थिती खुद्द त्या संतांच्या चालत्याबोलत्या मूर्ति समाजांत वावरत असतांना असली पाहिजे, हें उघड आहे. यावरून, यावनीधर्माच्या लाटेविरुद्ध उभा केलेला व त्या लाटेला परतवून लावणारा किंवा आपलें डोकें त्यावर आपटून घेऊन छिन्नभिन्न करविणारा, इतकेंच नव्हे, तर शेकडों वर्षांनंतर किरिस्तावांनाही त्याचा दरारा वाटावा असा बांध—असा अभेद्य तट—महाराष्ट्रीय संतांनीं आपल्या अमोघ वाणीनें व दिव्य व प्रेमळ कर्तबगारीनें समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत कसा उभारला होता, हें चांगलेंच दिसून येणार आहे. अस्तु.

ह्या कर्मठांच्या कर्मकटकटीचें कटु असें दुसरें उदाहरण म्हणजे चोखामेळा महाराचें होय. तो एकदां प्रभूच्या आग्रहास्तव पंढरिच्या देवळांत

विठ्ठलमूर्तीच्या दर्शनास गेला असतां बडव्यांनीं त्यास पाहिलें व देवाची मूर्ति भ्रष्टविली म्हणून रागावलेल्या–रागानें भ्रष्ट झालेल्या–त्या बडव्यांनीं गरीब बिचाऱ्या त्या महारास बडव बडव बडविलें ! बडवेच ते–बोलुन-चालुन बडवे. अर्थात् बडवण्यावांचून–गरीब जीवांना बडवण्यावांचून दुसरें तें काय करणार ! व दुसऱ्या कशाची त्यांपासून अपेक्षा करावी ? असो. अशा तऱ्हेनीं बडवून, विठ्ठलवियोगानें धायधाय रडणाऱ्या त्या विठ्ठलाच्या थोर भक्ताला त्यांनीं दाराबाहेर घालविलें–हांकुन दिलें व आपण आज एक मोठें शतकृत्य केलें या आनंदांत ते परत येऊन पहातात तों काय ! आपण त्या महारास दिलेल्या खरपूस माराचे वळ ह्या माहराच्या–प्रभूच्या अंगावर उठले असून, देवाच्या दोन्ही डोळ्यांतून टप्टप् गळणाऱ्या अश्रूंची संतत धार चालू आहे ! अहाहा ! किती ही भक्तवत्सलता व महाराची जात सुद्धां मला ब्राह्मणांइतकीच, किंबहुना, कांकणभर जास्तच कशी प्रिय आहे, हें दाखविण्याचा प्रभूंचा हा केवढा अट्टाहास ! दामाजीपंतासाठीं प्रत्यक्ष ‘ विठुमहाराचें ’ रूप घेऊन देवांनीं ह्याच गोष्टीचा दाखला दिला आहे ! पण आम्ही डोळे असून अंधळे अन् कान असून बहिरे आहोंत ! आम्हाला त्याचा काय उपयोग ? प्रत्यक्ष परमेश्वर जरी येऊन सांगू लागला, तरी आम्ही आमच्या मूर्ख समजुतीसच चिकटून राहणार ! त्या ‘ विठु-महारा’ च्या रूपानें विमोहित होऊन तो यवन पादशहा–बेदरचा बादशहा-सुद्धां ‘ विठु विठु ’ म्हणून वेडापिसा झाला, “ शेख महंमद अविंध । त्याचें हृदयीं गोविंद ॥” म्हणणारे शेख महंमदासारखे यावनी धर्मातले थोर आत्मे महाराष्ट्रधर्मातल्या थोर भाक्तिनें–पंढरिच्या त्या सुखसोहळ्यानें-भुलून जाऊन पांडुरंगाचे भक्त झाले, व इतर संतांच्याबरोबर आनंदानें पंढरीच्या वाळवंटावर हातांत हात घालून नाचले–ही खरोखर संतांच्या कर्तबगारीची हद्द झाली ! पण इतक्या शिगेस नेऊन भिडाविलेल्या कर्तब-गारीचें आम्हांस काय ! त्या कर्तबगारीनें सुद्धां अजूनही आमचे डोळे उघडत नाहींत ! खरोखर आम्ही जन्मांध खरेच आणि “ आंधळ्याभि जग सारेचि आंधळे ” हेंहि तितकेंच खरें. पण स्वतांच्या डोळ्यांत स्वतांच बोटें घालून आंधळ्या बनलेल्या–डोळे फोडुन घेतलेल्या–आम्हाला जरी कांहीं दिसलें नाहीं, तरी प्रगतिभास्कराचा प्रकाश सर्व अवनितलावर भरून राहण्याचा त्यानें कसा राहील ! त्याप्रमाणें तो प्रकाश सर्वत्र फांकलाच व

ऐक्याच्या–धर्मैक्याच्या व समाजैक्याच्या–अरुणरागरंगानें सुरंजित झालेल्या त्या प्रगतिभास्कराच्या कोमल प्रकाशांत, लवकरच महाराष्ट्रानें आपलीं आयुधें सरसावलीं व त्या तळपत्या तरवारींचें पाणी एकसहा मोंगलांना पाजून त्यांनीं लवकरच स्वातंत्र्याचें निशाण आपल्या गृहमंदिरावरून व देवमंदिरावरून फडकावलें. त्याची हकीकत पुढील भागांत सांगण्याचें आश्वासन देऊन, आतां संतांच्या कामगिरींतल्या चौथ्या गोष्टीकडे आपण आतां वळूं या.

ही चवथी गोष्ट म्हणजे अर्थात् शैववैष्णवांच्या झगड्याची होय. ह्या झगड्याचें पायीं, मुसलमानी धर्माची लाट हिंदुस्थानांत येण्याच्या सुमारास, कर्नाटकादि प्रांतांत कशा लाथाळ्या माजल्या होत्या, हें आपण मागें पाहिलेंच आहे. किंबहुना, महाभारतकाळींही हा झगडा कसा अस्तित्वांत होता व बुद्धधर्माच्या लाटेला प्रतिकार करण्यासाठीं, आपसांत दुही नको म्हणून, सौतीनें तो कसा मिटविला, तेंहि आपणास ठाऊकच आहे. परकीय शत्रूशीं झगडताना, अथवा कोणच्याहि विघ्नाविरुद्ध प्रयत्न करीत असतांना, आपसांत जर एकजूट असेल तरच तें कार्य होऊं शकतें, हा त्रिकालाबाधित सिद्धान्त आहे. “ `कीनें बुडतीं राज्यें । एकीनें कार्य साधतें । ” असें समर्थच आपणांस सांगत आहेत. “ संहतिः कार्यसाधिका ” हा ब्रीदमंत्रही तेंच सांगतो. “ Unity is strength ” किंवा “ United we stand, divided we fall ” हीं आंग्लवचनेंहि ह्याचीच निदर्शक आहेत. इंग्लंडवर चालून आलेल्या स्पेनदेशाच्या “ अजिंक्य आरमारा ” स इंग्लंडनें जिंकलें व त्याचा धुव्वा उडविला, तेव्हांही इंग्लंडातील सर्व धर्मपंथाचे लोक एक झाले होते, म्हणूनच तें कार्य साधलें, हें इंग्लंडचा इतिहास सांगत आहे. आपल्याकडेही शिवाजीच्या काळीं किंवा पेशव्यांचें वेळीं, ज्या ज्या वेळीं मराठ्याचा झेंडा दूरदूर देशावर नाचला त्या त्या काळीं, त्या मराठमंडळांत व त्या महाराष्ट्रांत एकीचेंच साम्राज्य वसत असलेलें तुम्हास दिसून येईल. आणि आतांसुद्धां पारतंत्र्याच्या गर्तेत पडलेला अभागी हिंदुस्थान वर न येण्यास जर कोणतें एकचएक कारण असेल, तर तें हा एकीचा अभावच होय. अर्थात् “ फोडा व झोडा ” ह्या तत्वाचा अवलंब करून राज्यकर्ते कोंबडीं झुंजवीत आहेत, व आम्हा दुधखुळ्या लोकांना अद्याप तें समजत नाहीं. असो.

तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, " ऐक्यांतच " खरी खरी " मौज " असून द्वैतांत दुःखाचाच वास आहे ! महाराष्ट्रीयसंतांना हें तत्व—हें त्रिकालाबाधित सत्य—माहीत होतें; आणि म्हणूनच यावनी-धर्माच्या लाटेविरुद्ध अभेद्य तटासारखे उभे राहण्याचें ऐवजीं, त्या समाज-तटाला जागोजाग पडलेलीं खिंडारें पाहून, त्यांचें मन उद्विग्न झालें, त्यांस फार वाईट वाटलें. खुद्द समर्थांच्या वेळींही थोडीशी तशीच स्थिती होती असें दिसतें. अर्थात् पुढील ओव्यांतून त्यांनीं ह्याचें काढलेलें शब्दचित्र वाचकांनीं अवश्य पाहावें. म्हणजे तत्कालीन परिस्थितीचा त्यांना बरोबर अंदाज होईलः ते म्हणतातः—

" जैसा प्रवाह पाडिला । तैसाच लोक चालिला । कोण वारील कोणाला ? । एक नाहीं ॥ १७ ॥ पृथ्वीचा झाला गव्हाटा । एकाहून एक मोठा । कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ?॥ १८ ॥ देव झाले उदंड । देवांचें मांडलें बंड । भूतां देवतांचें थोतांड । एकचि जाहलें ! ॥२०॥ मुख्य देव तो कळेना । कशास कांहींच मिळेना । एकास एक वळेना । अनावर ॥ २१ ॥ ऐसा नासला विचार । कोण पाहतो सारासार । कैंचा लहान कैंचा थोर । कळेचिना ॥ २२ ॥ शास्त्रांचा बाजार भरला ! । देवांचा गलबला झाला ! । लोक कामनेच्या व्रताला । झोंबोन पडती ॥२३॥ ऐसें अवघेंच नासलें । सत्यासत्य हारपलें । अवघें अनायक झालें । चहूंकडे ! ॥२४॥ मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला ! ।"...

( दासबोध—दशक ११—समास २ ).

याप्रमाणें मतामतांचा गलबला माजून अनायक अवस्था सगळीकडे माजली—विचार नासला व मग साहजीकच त्या नासक्या विचारांतून नानादेवतांच्या अभिमानाचे विषारी फवारे बाहेर पडूं लागले व आपा-पसांत यादवी माजून एकमेकांची टाळकीं सडकण्यापर्यंत वेळ येऊन पोंचली. याचा फायदा साहजीकच महंमदी धर्मास—एकेश्वरी मताची विजयध्वजा फडकावित येणाऱ्या यावनीधर्मास—मिळणार होता. कारण ही आपल्यांतली दुही, हें वैमनस्य, त्याच्या चांगलेंच पथ्यावर पडणार होतें. वास्तविक, सर्व चराचराचा नियंता, " गतिर्भर्ता प्रभुःसाक्षी निवासः शरणं सुहृद् " असा एकच परमेश्वर असून, केवळ लोकांच्या अभिरुचिस्तव एकाच

देवाचीं नाना रूपें–नाना अवतार आहेत, पण वास्तविक पाहतां "नेह नानास्ति किंचन।–" त्या एकाच परमेश्वरावांचून दुसरें कांहींच ह्या जगांत नाहीं, अशा प्रकारचें थोर तत्वज्ञान औपनिषदिक वेदांतानें केव्हांच सांगून टाकलें होतें. एकवेळ वेदांच्या काळीं असा झगडा माजला असता, तर तें शोभण्यासारखें तरी होतें. कारण अनेकत्वांतून एकत्वाकडे, अनेक देवांकडून एकाच प्रभूकडे त्यावेळीं प्रगति व्हावयाची होती. पण तशी प्रगती, होऊन उपनिषदांच्या उच्च तत्वज्ञानानें अत्युच्च भरारी मारली असतां, महाभारतकाळीं पुन्हां शैववैष्णवांचा झगडा लागावा हें विपरीतच. बरें, तोहि सौतीनें मिटवून टाकला, तरी तो कायमचा दबला न जातां पुन्हां त्यानें आतां ( महंमदी धर्माच्या आगमनप्रसंगीं ) वर डोकें करावें, हें त्याहूनही विपरीत दिसतें ! वास्तविक, उपनिषदांच्या तोडीचें तत्वज्ञान जींत भरलें आहे, किंबहुना, जी उपनिषदांचें सार असून, जिचा प्रस्थानत्रयींत समावेश झाला आहे, अशा भगवद्गीतेनें व त्याच्या गायक वासुदेवानें "येप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः । तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यावीधिपूर्वकम् ॥" व "अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च । नतु मामभिजानन्ति तत्वेनातश्च्यवन्ति ते ॥" अशाप्रकारें छातीठोक सांगून, धोक्याची इशारत दिली असूनही, पुनश्च त्याच वादाच्या व भांडणाच्या गर्तेत समाजानें पडावें काय ? अथवा होणाऱ्यासारखी बुद्धि होतें म्हणतात, तेंच खरें. नाहीं तर, असें नसतें तर, ज्या देवानें केवळ आमच्या अभिरुचिखातर नाना वेश, नाना रूपें, नाना सोंगें व नाना अवतार धारण केले, त्या देवाला विसरून, भस्मासुराप्रमाणें त्याच्याच डोक्यावर हात ठेवावयास जाण्यासारखें–त्या नानावेषांतच कां आम्ही रंगलों असतों, आणि रंगून भांडलों असतों बरें ? अथवा उच्च तत्त्वज्ञानाच्या तात्विक व शाब्दिक गप्पा मात्र आम्ही माराव्या, पांडित्य मात्र आम्ही करावें, पण तें प्रत्यक्ष आचरणांत उतरण्याची धमक आमच्या ठिकाणीं मुळींच नाहीं–तसें ते उतरण्याइतकें आमच्यांत ठसलेंच नाहीं–असें तर नसेलना ? अशीं नाना प्रकारचीं अनुमानें, नाना प्रकारचे विचार, वरील गोष्टीनें मनांत घोळूं लागतात–मन प्रसवूं लागतें–व जीव कावराबावरा होतो. पण तें कांहीं असलें तरी, अशाप्रकारचें अज्ञान सर्वांचेंच नसून, औपनिषदिक ऋषींसारखे, भगवान् श्रीकृष्णासारखे व महाराष्ट्रीय संतांच्यासारखे धीर गंभीर

वाणींत उपदेश करून समाजाचा गडगडणारा गाडा सांवरून धरणारे महात्मे आयत्यावेळेस निर्माण होतात, व ऐन संकटकाळीं तो प्रभू कोणाच्या ना कोणाच्या तरी रूपानें धांवून येतो, हें पाहून त्यांतल्यात्यांत समाधान वाटतें. इथेंहि तेंच झालें. समाजतटाला शैववैष्णवांच्या झग-ड्यांचीं जागोजाग पडलेलीं खिंडारें पाहून, तीं बुजविण्यासाठीं महाराष्ट्रीय संत धावून आले व " नासलेल्या " उर्फ नासक्या विचारांतून उडणारे ह्या झगड्याचे फवारे जागच्याजागीं दाबून, त्यांनीं त्या थोरल्या देवाची समाजाला गांठ घालून दिली." "मुख्य देव तो कळेना । कशास कांहींच मिळेना ॥" अशी खरोखरच त्यावेळीं " अनावर " स्थिती झाली होती. पण " जगीं थोरला देव तो चोरिलासे । गुरूवीण तो सर्वथाही न दिसे ॥ " ह्या समर्थोक्तीप्रमाणें समर्थांनीं व त्या आधींच्या साधूसंतांनींहि " अवघी एका-चीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न ? ॥ " हाच सर्व समाजाला उपदेश करून, आपापसांत झगडणाऱ्या दोन्हीहि पक्षांला–शैववैष्णवांना–जागच्या जागीं आपल्या अमोघवाणीच्या उपदेशानें दाबून धरून शुद्धीवर आणलें. " हरिहरा भेद । नाहीं, नका करूं वाद ॥ " किंवा, "तुका म्हणे हरीहरा । एका वेलांटीचा फेरा ॥ " इत्यादि तुकोबांचीं वचनेंहि हीच खटपट–हा झगडा मिटविण्याची खटपटच–दाखवीत आहेत. इतकेंच नव्हें, तर यवनपादशहाच्या भर दरबारांत मेलेली गाय उठवून, 'बडा अवलिया' म्हणून थक्क करून, प्रत्यक्ष बादशहाला आपलें पाय धरा-यला लावणाऱ्या नामदेवानें, राम व रहीम, मंदिर आणि मसजिद् ही कशी एकच आहेत व धर्माधर्माचा झगडा किती वेडगळपणाचा आहे, हें सिद्ध करून देऊन, अल्पप्रमाणावर कां होईना, पण हिंदुमुसलमानांची जी एकी घडवून आणली ती, व अशाच मागें उल्लेखिलेल्या हिरवळ जमिनी व शेख महंमदासारखे जातीनें अविंध असूनही हृदयानें गोविंद बनलेले महात्मे–ह्या सर्व गोष्टी महाराष्ट्रीय साधुसंतांच्या कर्तबगारीची हद्द दाखवीत आहेत! नाहीं तरी, खुद्द शत्रुपक्षांतल्या हृदयाला भेदभाव विसरण्यास लावून आत्मसात् करणें, ह्याहून कर्तबगारीचें थोर लक्षण तें कोणचें असणार ? सध्या सुद्धां महात्मा गांधी, रविंद्रनाथ टागोर, यासारख्या विभूतींच्या सहवासानें व दिव्य उपदेशानें व खुद्द आर्यावर्ताच्या उज्ज्वल अशा धार्मिक, राजकीय, सामाजिक, वाङ्मयात्मक, कलाकौशल्यविषयक वगैरे

इतिहासाच्या सखोल वाचनानें मिसेस बेझंट, अरुंडेल, इत्यादि गौरकाय पण हिंदी हृदयाच्या व्यक्ति ज्या दिसतात त्याचें तरी कारण हेंच, कीं मानवी कृत्रिम बंधनांचे पाश तोडून विश्वैक्याच्या, विश्वप्रेमाच्या, अध्यात्माच्या उच्च वातावरणांत विहरणाऱ्या ह्या चंडोलांचें मुग्धगान कित्येक हृदयांस साहजीकच भुलवीत, झुलवीत व खुलवीत असतें ! पण अशा हिरवळ जमिनी साहारा वाळवंटांत फारच थोड्या असतात. आणि यासाठींच सामान्यपणें पसरलेल्या गर्व, धुंदी, मद, कपट, इत्यादिकांच्या रखरखीत अशा वाळवंटांतून कोणच्याही समाजाला तरून जाण्यास अन्य उपायांचाच देशकालपरत्वें अवलंब करावा लागतो, हें वाचकांनीं केव्हांही विसरूं नये. महाराष्ट्रिय संतांच्या—भागवतसांप्रदायी वारकऱ्यांच्या नंतर येणाऱ्या समर्थांच्या महाराष्ट्रधर्मी शिष्यांना तेंच करावें लागलें. हें कसें, तें पुढील भागांत दिसून येईलच. पण तत्पूर्वीं जमीन नांगरून मशागत करून संतांनीं कशी ठेवली होती, तें वाचकांनीं ध्यानीं घ्यावें म्हणजे झालें. अर्थात् ती मशागत करतांना एकंदर चार प्रकारचे कांटेकुटे व दगडगोटे बाहेर काढून संतांना दूर भिरकावून द्यावे लागले आहेत. त्यातलाच शेवटचा कांटा व शेवटचा दगडगोटा म्हणजे हा शैववैष्णवांचा झगडा होय. साहजिकच, कांहीं उपदेशानें, कांहीं तपःप्रभावानें, व कांहीं भक्तीच्या जोरावर महाराष्ट्रीय संतांनीं हा झगडा जिंकलेला असून, शिव आणि विष्णु भिन्न नसून "शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः" ह्या प्रसिद्ध सोक्त्युक्तिप्रमाणें ते एकच कसे आहेत, हें त्यांनीं प्रत्यक्ष उदाहरणानें दाखवून दिलें आहे. उदाहरणार्थ, नागनाथाचें देऊळ फिरल्याच्या चमत्काराची गोष्ट पहा. नामदेवांचा वारकरी सांप्रदायिक मेळा ज्यावेळीं तीर्थयात्रा करीत नागनाथाच्या मंदिरांत आला व प्रभूपुढें आनंदानें भजनानंदांत दंग होऊन नाचूं उडूं लागला, त्यावेळीं त्या कैलासनाथाचें हृदयही आनंदानें कसें तांडव करीत असेल—कसें हर्षानें डोलत असेल—याची वाचकांनींच कल्पना करावी ! पण वर्णाश्रमधर्माच्या फाजील अभिमानानें भारलेल्या व शैववैष्णवांच्या झगड्याची बाधा होऊन त्या भुतानें झपाटलेल्या कर्मठ ब्राह्मणांना त्याचें काय ! त्यांना काय त्याची कल्पना येणार अथवा असणार ? "मर्कटा नारिकेल जैसें" तशीच त्यांची स्थिती ! "साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ।।" किंवा "भार्ग्ये

आले संतजन। झालें देवाचें दर्शन ॥" ह्याप्रमाणें आनंद मानून त्या ब्रह्मवृंदांनीं खरोखर आनंदाचा दिवाळीदसरा साजरा करायला हवा. पण तसें केल्यावर त्यांचा वर्णाश्रमाचा अभिमान व शैवभक्ति ती कसली ? त्यांनीं दसऱ्याच्या ऐवजी शिमगा व दिवाळीऐवजीं धुळवडच साजरी केली, व "शूद्रांची सावली आणि श्रीनागनाथाच्या देवळांत! शांतं पापम्! शांतं पापम्!" असें म्हणून त्या कर्मठ ब्राह्मणांनीं नामदेवादि गरीब बिचाऱ्या वारकऱ्यांना धक्के मारून देवळाच्या बाहेर घालविले—देवालयाच्या प्रांगणांतून हाकलून दिले! व आज आपण एक मोठें शतकृत्य केलें, ह्या आनंदानें तें तेथेंच पुष्करिणीवर संध्यावंदन करीत देवासंमुख बसले. पण इकडे काय चमत्कार झाला ? वाचक! विसाव्या शतकांतील वाचक! असल्या चमत्कारावर तुमचा विश्वासही कदाचित् बसणार नाहीं. पण असें बावरूं नका, व केवळ 'निसर्गधर्म' म्हणून कांहींतरी वेड्यासारखे बरळत सुटूं नका. कारण भूकंपाच्या धक्क्यानें पृथ्वीचीं कपाटें खालींवर सारणारी कोणी तरी दिव्य शक्ति त्या "भूतळीं रिगाली" असल्यावांचून कां ह्या गोष्टी शक्य आहेत ? केवळ मृत व चैतन्यहीन अशा मृत्तिकेला–matter ला–ही हालचाल करतां येणें शक्य आहे काय ? मुळींच नाहीं हें जर खरें, तर त्याची हालचाल करायला लावणारी—सर्व विश्वाला हालवून सोडणारी—दिव्यशक्ति त्यांत असलीच पाहिजे हें पांच वर्षांचें एकादें पोरही सांगूं शकेल. म्हणूनच, त्याच शक्तीला उद्देशून "अशक्य तो तुम्हां नाहीं नारायणा। निर्जिवा चेतना आणावया ॥" असें तुकोबा म्हणाले आहेत. असो. तर ती दिव्यशक्ति, ती आदिशक्ति, तो प्रभु, तो नारायण, तो विश्वंभर, तो कैलासनाथ, तो नागनाथ हृदयीं गहिंवरला, आपल्या भक्तांचा झालेला हा छळ पाहून त्याचें हृदय भरून आलें. अंबरिषाच्या छळामुळें दुर्वासांच्या मागें सुदर्शनचक्र लावणाऱ्या त्या विश्वमंगल प्रभूला प्रेमाचा गहिंवर आला व ब्राह्मणांची आज्ञा शिरसावंद्य मानून देवळामागें जाऊन—सगळीकडे देव पाहणाऱ्या त्या वारकऱ्यांनीं त्यांतच आनंद मानून—प्रेमळ भजनाचा गजर चालविलेला पाहून, नागनाथाचें हृदय कळवळलें—भोळा भक्तवत्सल शंकर आपल्या भक्तांच्या भजनानें संतुष्ट होऊन त्यांच्या रक्षणास धावला. त्याला त्या कर्मठ ब्राह्मणांचा संताप आला व त्याचाच उद्रेक कडकड वाजणाऱ्या देवळाच्या भिंतींत होऊन देऊळ फिरलें, व रागावलेल्या देवानीं—महादेवानीं

ब्राह्मणांकडून तोंड फिरवून त्यांनीं तें आपल्या भक्तांकडे—नामदेवादि वारकऱ्यांकडे केलें! अहाहा! प्रभूच्या ह्या भक्तवत्सलतेला सीमा नाहीं हेंच खरें! असो. तर ह्या गोष्टीनें भगवंतांनीं त्या कर्मठ ब्राह्मणांचा फाजील वर्णाश्रमधर्माभिमानच केवळ मारला नाहीं, तर विठ्ठलाचे वारकरी व विष्णूचे सेवकदास शंकरासही कसे तितकेच प्रिय आहेत, किंबहुना, शिव आणि विष्णु हीं एकाच देवाचीं दोन रूपें असून त्यांत भेदभाव कसा नाहीं व "मृत्योःस मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति" ह्याप्रमाणें भेदभाव मानून, 'नानामतांचा गलबला' करणाऱ्याचा आपणास कसा राग येतो व "सर्वत्र समदर्शिनः" अशा भक्तांचे आपण कसे भुकेले आहोंत, हेंच देवांना इथें दाखवावयाचें होतें. असो.

याप्रमाणें शैववैष्णवांचा झगडा मिटविण्याचा जो चौथा मुद्दा, त्यांतही आमच्या महाराष्ट्रीय संतांना यश आलें, कारण "सत्यसंकल्पाचा दाता भगवान्" त्यांच्या पाठीशीं उभा होता. येणेंप्रमाणें भक्ति, भाषा, भेदभाव, इत्यादि सर्व 'भ'काराच्या भेगा त्यांनीं बुजवून टाकून व भुतें गाडून टाकून, महाराष्ट्रिय जनतेच्या छातीचा विशाल कोट महंमदीधर्माविरुद्ध तयार केला. त्यावर धडका घेऊन महंमदीधर्मानें आपला कपाळमोक्ष कसा करून घेतला, हेंच आतां पाहणें आहे. तें आपण आतां पुढील भागांत पाहूंच. पण तत्पूर्वी आपणांस भागवतसांप्रदायी महाराष्ट्रीयसंतांच्या वरील एकंदर उदात्त कामगिरीवरून एकदां शेवटची विहंगम दृष्टी फिरवून, त्यांतून कोणकोणचीं तत्त्वें बाहेर पडतात—निघतात तें पाहिलें पाहिजे.



# भाग ११ वा



याप्रमाणें पहातां पाहिल्या धडाक्याला आपणाला ही गोष्ट उघड उघड दिसून येते कीं, वरील संतांची अलौकिक व तडफीची कामगिरी म्हणजे स्वदेश, स्वभाषा, व स्वधर्म यावर कोसळूं पहाणाऱ्या एका जबरदस्त संकटास—यावनीधर्माच्या प्रचंड लाटेस—परतवून लावण्यासाठीं चिकाटीचा व

शिकस्तीचा केलेला प्रयत्न होय. अर्थात् तो राजस नसून सात्विक होता, प्रत्यक्ष नसून अप्रत्यक्ष होता, चढाईचा नसून स्वसंरक्षणाच्या पद्धतीचा होता. पण विस्कळित झालेल्या तत्कालीन समाजाची प्रथम सावरासावर करून, त्यांच्या मनोभूमिकेंतील देश–धर्म–भाषा–विघातक असे कांटेकुटे साफ करून, ती मनोभूमिका चांगली नांगरून मशागत करून ठेवून, सर्व समाजाची अंतःकरणें एकाच भावनेनीं भरून टाकायची, स्वधर्म–स्वभाषा–व स्वराष्ट्र यांच्या अभिमानाच्या रज्जूनें ती सर्व हृदयें एकत्र सांधायचीं, तीं इतकीं कीं, त्यांचा अच्छेद्य व अभेद्य असा एक गट बनावा, हीच कामगिरी प्रथम संतांना साहजीकच करावी लागली. कारण सात्विकाच्या पायावरच राजस गुणांची इमारत भव्य व दिव्य अशी उठत व झळकत असते ! कारण कोणच्याही चळवळीला प्रथम भगवंताचें सात्विक अधिष्ठान लागत असते तरच ती चळवळ यशस्वी होते, ही गोष्ट विसाव्या शतकांतले–नास्तिकवाद प्रबळ झालेल्या विसाव्या शतकांतले–सुद्धां ह्यूमसाहेबासारखे पंडित सांगतात असें जर आपण वृद्ध पुढाऱ्यांच्या तोंडून आजही ऐकतों, तर त्यावेळीं–महाराष्ट्रसंतमंडळाच्या व समर्थांच्यावेळीं–तर काय विचारायलाच नको. समर्थांनीं चक्क सांगितलेंच आहे कीं:—

" सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें ।
परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ! ॥ "

अर्थात् या " भगवंताच्या अधिष्ठाना " च्या बळावरच संतांनीं आपल्या सामर्थ्याचें भगवें निशाण कसें फडकविलें, त्याचा दिव्य व उज्वल इतिहास आम्ही वर दिलाच आहे. भक्तिगुणाच्या प्रसाराचें कामीं त्यांनीं भगवंताचें अधिष्ठान राखलें हें सांगणें, म्हणजे काळोख्या पंधरवड्यांत अंधार असतो असें सांगण्यासारखेंच आहे. पण इतर ज्या तीन गोष्टी त्यांनीं केल्या, महाराष्ट्रभाषाभिमान जाज्वल्य रितीनें प्रज्वलित केला, भेदभावाच्या व उंचनीच ह्या कल्पनेच्या भुताला पंढरीच्या वाळवंटावर जी समाधी दिली, व शैववैष्णवाच्या झगड्यानें " स्मार्त आणि वैष्णवीं । उरलीं सुरलीं नेलीं आघवीं । ऐसी पाहतां गाथागोंवी । उदंड जाहली ! ॥ " असें जें उद्दंड देवांचें व 'भूतादेवतांचें थोतांड ' माजलें होतें तें मोडून 'देव तेथून एक' असा जो हरिनामाचा गजर चारी दिशांना दुमदुमविला, त्या सर्व बाबतींत संतांनीं घेतलेल्या

"भगवंतांच्या अधिष्ठाना"च्या दृढ बैठकीचें कोणासही खरोखर कौतुकच वाटणार आहे. किंबहुना, खुद्द भक्तिगुणाचा नटनाच शिकवितांना सुद्धां हेंच अधिष्ठान शुद्ध व सात्विक स्वरूपांत कसें हवें—ढोंगी व दांभिकपणाचें असून कसें चालणार नाहीं—तेंही पण त्यांनीं आपल्या प्रभूविषयींच्या सत्य प्रेमाच्या प्रत्यक्ष आचरणानें व दांभिकावर व ढोंगी भोंदूवर जागोजाग कोरडे ओढून दाखवून दिलें आहे. असो.

तसेंच ह्या कामीं "भगवंतांचें अधिष्ठान" घ्यायचें म्हणजे नुसते टाळ कुटायचे नसून, अंगीकृत कार्यासाठीं सर्वस्वार्पणाची दिव्य विरक्ती—'देहीं उदारत्व' राखण्याची तयारी पाहिजे, हेंच त्यांच्या भगव्या निशाणावरून सूचित होत आहे! "देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्व अर्पावें शेवटीं। प्राण तोही वेंचावा॥" या दासांच्या किंवा "तुका म्हणे व्हावें देहासी उदार। रखुमादेवीवर जोडावया॥" ह्या तुकोबांच्या उक्तीप्रमाणें "आम्ही हरीचे भुषावया" म्हणून स्वताच्या प्राणधनावरसुद्धां खऱ्या कार्यकर्त्यानें कशी सदैव तिलांजुलि देऊन छातीठोक उभे असले पाहिजे, हाही गोड धडा संतांनीं येथें शिकविला आहे.

वर सांगितलेंच आहे कीं, महाराष्ट्रीय संतांची कामगिरी स्वदेश, स्वधर्म, व स्वभाषा ह्यांच्यापायीं आधींच तटे लागलेल्या समाजांतल्या व्यक्तींना उचलून नेण्यासाठीं—आपल्या प्रचंड ओघांत वाहून नेण्यासाठीं—म्हणून जो यावनीधर्माच्या जबरदस्त लोंढ्याचा पूर उसळून या हिंदभूत, ह्या आर्यदेशांत, ह्या भारतवर्षांत वाहूं लागला होता, त्यास थोपवून धरण्याची होती. महंमदीधर्माचें तें एकेश्वरी मत व "अल्लाहो अकबर" अशी गर्जना, त्यांच्यांतील जातीभेदाच्या कैचीचा अभाव, जयिष्णु, वर्धिष्णु आणि प्रभाविष्णु असून धर्मांतराबरोबर सुखसर्वस्वाच्या शीतल चंद्रप्रकाशाचा आस्वाद कसा मिळतो तें दाखवण्यासाठीं जागोजाग मशिदीवरून, राजवाड्यावरून, सैनिकांच्या उत्तुंग तंबूवरून वाऱ्याशीं विहरणारें हिरव्या चांदाचें तें महंमदी निशाण, हें पाहून कोणाचा बरें जीव भुलणार नाहीं? त्यांतच स्वधर्म, स्वभाषा, व स्वदेश, या बाबतींत स्वतःच्याच समाजाकडून होणारी छळणा, अवहेलना, अपमान

आणि उपहास हें पाहून, ह्याची कल्पना मनांत आल्याबरोबर, ह्याचें दृश्य डोळ्यापुढें उभे राहिल्यावर तर कोणाचें बरें हृदय अधिकच वेगानें त्या महंमदीधर्मास कवटाळण्यास धांवणार नाहीं ? कारण वाचक, लक्षांत ठेवा कीं, मुसलमानांनीं जबरदस्तीनें जरी हजारों जीवांना बाटवून महंमदी धर्माची दीक्षा दिली असली, तरी आपखुशीनेंही त्या धर्मांत जाऊन धर्मांतर करणारेही त्यावेळीं कित्येक लोक निघाले. समर्थ म्हणतातः—

" कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पिरासीच भजती । कित्येक तुरुक होती । आपले इच्छेनें ॥ " अर्थात् असें कां व्हावें याचा विचार करणें साहजीकच समाजाच्या धार्मिक पुढाऱ्यांकडे—महाराष्ट्रीय संतांकडे—आलें—त्यांना त्याचा विचार करणें भागच होतें. त्यांनीं चौफेर दृष्टि फिरविली, तेव्हां त्यांना—

" पृथ्वीमध्यें नाना शरीरें । उदंड दाटलीं लहानथोरें । पालटतीं मनोविकारें । क्षणक्षणां ॥ १ ॥ जितुक्या मूर्ति तितुक्या प्रकृति । सारिख्याच नसती आदिअंतीं । नेमचि नाहीं पहावें किती । काय म्हणोनि ॥ २ ॥ कित्येक म्लेंच्छ होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले । देशभाषेनें रुधिले । कितीएक ॥ ३ ॥ "

असाच देखावा दृष्टीस पडला. अर्थात् असें कां व्हावें, समाजाला अशी ही गळती कां लागावी, क्षणाक्षणाला बुद्धीचे रंग व आचाराचें ढंग पालटणारी जनता कां निर्माण व्हावी, त्यांच्या छातीटोक हृदयाचा बांध 'आदिअंतीं सारिखाच' कां नसावा, ह्याचा विचार करून पाहणें संतांना साहजिक प्राप्तच होतें. कोणत्याहि पदार्थाविषयीं मन विटण्यास व अन्य वस्तूचा स्वीकार होण्यास दोन कारणें होत असतात. एक, त्या वस्तूंत कांहीं दोष असणें, व दुसरें, त्या वस्तूहून अधिक सुंदर व आकर्षक अशी वस्तु दृष्टीस पडणें. पैकीं एकाच्या अभावीं दुसरें तितकें लंगडें पडतें, हें उघड आहे. पण दोहोंचाही जोर जर एकाच वेळीं किंवा एकापाठोपाठ एक झाला, तर मागून पुढून लावलेल्या एंजिनानें आगगाडीचे मधले डबे जसे भराभर खेचले व ढकलले जातात, तशीच स्थिति समाजांतल्या सामान्य लोकांचीच नव्हे, तर कित्येकदां मोठमोठ्या शहाण्या व बुद्धिवंत पंडितांचीहि होते. इथेंहि तेंच झालें. महंमदीधर्माचें वर वर्णिलेलें आकर्षण एकीकडे समाजाला खेंचींत असतां, खुद्द त्या समाजाला लागलेल्या चार

प्रकारच्या किडीनें, त्रस्त झालेल्या मनाला आलेला परिस्थितीचा वीट त्यास तिकडेच ढकलीत होता. अर्थात् ह्या मागील एंजिनची गति प्रथम मारून काढल्याशिवाय एकदम पुढल्या एंजिनला कधींच हात घालतां यायचा नाहीं असा विचार करून, प्रथम त्या कार्यास संत कसे लागले व केवळ मागचें एंजिनच मारून न राहतां पुढच्या इंजिनची ओढही कमी करून लटकी पाडण्यासाठीं, महंमदी एकेश्वरीमताप्रमाणें, इकडे पंढरिचा विठ्ठल हें एकच सर्वांचें आराध्यदैवत कसें आहे, व अन्य देव मानले तरी त्या सर्वांत भेदभाव कसा नाहीं, हें त्यानीं दाखवून देऊन, " मक्कामदिनेचें माहात्म्य पंढरीपैठणास आणून, " तसेंच जातीभेदाचे कर्कश पाश सैल करून, भेदभावाच्या भुताला भगवंताच्या भक्तींत तर अजिबात समाध देऊन, त्यांनीं—त्या महाराष्ट्रीय संतांनीं–महमदीधर्माच्या तोंडीस तोंड कशी केलेली आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. नुकताच ठाण्याच्या रा. भाव्यांचा " शिवकाल व सद्यःकाल " हा लेख केसरींत येऊन गेला. त्यांतही हीच गोष्ट सांगितलेली वाचकांना स्मरत असेलच. असो.

तर याप्रमाणें समाजाला लागलेली गळती कां लागावी याचा विचार करतां संतांना असें दिसून आलें कीं, यावनीधर्मसत्तेचा पूर त्यावेळीं घो घो करून या देशांत वाहूं लागला, त्यावेळीं राजकीय बाबींप्रमाणेंच ह्या धार्मिक व सामाजिक बाबतींत ,हिंदुस्थानांतील जनसमाजाच्या हृदयतटाला मोठमोठीं खिंडारें आणि भगदाडें पडलीं असून, त्यांतून तो पूर मारे वेगानें वहात आहे, व आपल्याबरोबर हिंदुधर्मांतले कित्येक जीव वाहून नेत आहे. राजकीय सत्तेच्या काय किंवा धार्मिक सत्तेच्या काय महापूराचा एकदां बेफाम प्रवाह सुरूं झाला, म्हणजे त्यास निसर्गाचे कृत्रिम अडथळे—नैसर्गिक पर्वतांच्या रांगांचे तट–कितीवेळ अटकाव करूं शकणार ! त्या महापुराला जागच्याजागीं थोपवून धरून परतवून लावण्यास जनसमाजाच्या मानसिक वृत्तीचाच खंबीर तट लागत असतो. पण तो तसा मुळींच नसून, आपापसांतलि लाथाळ्यांनीं तो अगदीं खिळखिळा झाला होता, इतकेंच नव्हे, तर त्यास जागोजाग खिंडारें आणि भगदाडें पडलीं होतीं, हें वर सांगितलेंच आहे. अर्थात् हीं खिंडारें व भगदाडें प्रथम बुजवून टाकल्याशिवाय व तटाची नीट डागडुजी केल्याशिवाय तो भक्कम होणार नाहीं, व यावनीधर्माशीं अटीतटीची

ःकर खेळण्याचें सामर्थ्य त्या तटाचें ठायीं येणार नाहीं, हें पाहून, महा-
ाष्ट्रीय संतांनीं प्रथम तेंच काम हातीं घेतलें व तें कसें चिकाटीनें, तड-
ीनें व शिस्तीनें शेवटास नेलें हें पाहणें मोठें मनोरंजक व बोधप्रद आहे.
अर्थात्, हें पाहून कोणास बरें त्या संतांच्या स्वधर्म–स्वभाषेवरील नितांत
ेमाचें कौतुक वाटणार नाहीं ? कारण, ह्याच प्रेमानें वेडे होऊन त्यांस
विरोधकांशीं जागोजाग झगडा करावा लागला आहे. अर्थात् आधींच
यांचा ‘ सत्यसंकल्प ’ व त्यांतच त्यांस ‘ भगवंताचें अधिष्ठान ’ मिळा-
यावर त्यांस पूर्ण ‘ सामर्थ्य ’ येऊन तो त्यांचा संकल्प का बरें पार
डणार नाहीं–का बरें पुरा होणार नाहीं ? किंबहुना, तसा तो न होईल
तर जगांत जगदीशच नाहीं, असें म्हणावें लागेल. अर्थात् तो जगदीश
आहे, व त्यानें अर्थातच त्यांचें ‘सर्व मनोरथ पूर्ण ’ केलें, हें उघड आहे!

पण असें करायचें–महाराष्ट्रभाषा व महाराष्ट्रधर्म यांच्या प्रेमानें वेडे
होऊन विरोधकांशीं जागोजाग झगडा करायचा–म्हणजे महाराष्ट्रीय संतांना
ूर्वीच्या आचारविचारांत व वागण्यासवरण्यांत केवढी प्रचंड सुधारणा
करावी लागली आहे, याची कल्पनाही कदाचित् कित्येकांस आज येणार
नाहीं. पण त्या कामीं आम्ही इतकेंच सांगतों कीं, धार्मिक व सामाजिक
बाबतींत त्यांनीं पेटविलेली सुधारणेची मशाल अद्यापही विझली नसून
आर्यसमाजिस्ट, प्रार्थनासमाजिस्ट, इत्यादि सर्व नवीन धर्म-
ंथ व कै. न्या. रानडे, विद्वद्वर्य रामकृष्ण गोपाळ भांडारकर
ासारखीं सर्व नररत्नें–समाजाची धार्मिक व सामाजिक उन्नति व्हावी
यांसाठीं तळमळणारे सर्व जीव–अजूनही ती मशाल डोक्यावर घेऊन आनं-
दानें नाचत आहेत व तिच्या प्रकाशांत आपला व आपल्या अनुयायांचा
मार्ग चोखाळीत आहेत ! आणि असें असूनही, आश्चर्याची गोष्ट ही कीं,
मोल्सवर्थ साहेबासारखे एरवीं कुशलबुद्धीचे लेखक आपल्या “ मराठी
कोशा”च्या “प्रस्तावनेंत” म्हणतात कीं— “ कांहीं लोक म्हणतात कीं,
तुकारामानें हिंदुधर्माची सुधारणा केली. परंतु त्याच्या अभंगावरून तसें
म्हणण्याला कांहीं आधार सांपडत नाहीं ! ” असें म्हणून उपरिनिर्दिष्ट
साहेबांनीं आपल्या ह्या विधानाच्या पुष्टिसाठीं कांहीं तरीच खुळचटासारखीं
कारणें जोडलीं आहेत ! पण त्यानें पुष्टी न येतां सूजच आलेली दिसत
आहे ! व ती सबंध उतारा देऊन श्री. फडक्यांनींही पण आपलेंहि मत

तसेंच—त्या साहेबासारखेंच—असल्याचें ध्वनित केलें आहे, हीहि तितक्याच आश्चर्याची गोष्ट होय. ( वे. नि. पा. ७२—७३ पहा ). उद्यां हे विद्वान् " तुकारामांनींच काय, पण कोणीच महाराष्ट्रीय संतांनीं हिंदुधर्माची सुधारणा केली नाहीं. " असेंही प्रतिपादूं लागतील. किंबहुना, त्या संत मंडळांतल्या म्होरक्यांपैकीं एकासंबंधीं तें विधान करून, तसें त्यांनीं आजही प्रतिपादन केलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु, ज्ञानेश्वरापासून सुरूं झालेल्या भागवतसंप्रदायी संतमंडळांनींच केवळ नव्हे, तर समर्थ रामदासस्वामीप्रणीत अशा महाराष्ट्रधर्मी कार्यकर्त्या विरक्तांनीं व मोरोपंतादि कविमंडळांनेंही, स्वधर्म—स्वभाषेचा जाज्वल्य अभिमान धरून, केवढी तडफीची व शिकस्तीची सुधारणा ह्या धार्मिक व सामाजिक बाबतींत घडवून आणलेली आहे, त्याचा समग्र व सुंदर इतिहास—विशेषतः महाराष्ट्रीय संतांची दिव्य कामगिरी—आम्ही मागें सविस्तर रीतीनें कथन केलीच आहे. त्याची एथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. पण आम्ही एवढेंच विचारतों कीं, केवळ वरच्या जातींनाच मोक्षाचा अधिकार आहे अशा तऱ्हेची असलेली अहंमन्य पंडितांची घमेंड उतरून, " चहू वर्णांसि नामाधिकार । नामीं नाहीं लहान थोर । " अशातऱ्हेचा छातीठोक दंडक त्याविरुद्ध उघड उघड प्रतिपादणें, इतकेंच नव्हें, तर अठरापगड जाती प्रभूस सारख्याच प्रिय असून, उच्चनीच भेदाचीं भुतें त्या विठ्ठलाच्या वाळवंटांत चाललेल्या भक्तिगुणाच्या नटनाचांत सारखीच विरून जातात हें प्रत्यक्ष सोदाहरण सर्व जगास पटवून देऊन, परधर्मांत जाऊं पहाणारा शूद्रवर्ण आपल्या उदारमतवादित्वानें व प्रेमळ वागणुकीनें मागें खेंचून धरणें, ही कांहींच सुधारणा नव्हे काय ? तसेंच, दैवीवाणीच्या भलत्याच भुताची भुररी ज्या अहंमन्य पंडितांच्या अंगीं भरून राहिली होती, त्यांचा तो गर्व उतरून, संस्कृताच्या तोडीला प्राकृत भाषा नेऊन बसवून, मुक्तिचें मंदिर सर्वांस सारखेंच व सर्वांस खुलें करणें व भक्तिमुक्तीची मिरास एका विशिष्टवर्गाची नसून आचांडाळ जनता तिची अधिकारी आहे असें छातीठोक प्रतिपादन करणें, ह्याला सुधारणेवांचून आपण दुसरें काय नांव देणार ? आणि ही जर सुधारणा नसेल, तर उपनिषदांच्या, भगवद्गीतेच्या, गौतमबुद्धाच्या—कोणाच्याच कामगिरीला तुम्हाला सुधारणा म्हणता येणार नाहीं. आणि ती जर सुधारणा असेल,तर आमच्या महाराष्ट्रीय संतांची

कामगिरीहि तितक्याच तोडीची हिंदुधर्मसुधारणा आहे ह्यांत तिळप्राय शंका नाहीं. दुसरें असें पहा कीं, महाराष्ट्रीयसंतांची ही कामगिरी म्हणजे जर हिंदुधर्मसुधारणा नसती—अगदी सरळ सुतासारखा जर त्यांचा मार्ग व उपदेश जुन्या तत्कालीन मतास धरून असता—तर ती कामगिरी बजावणाऱ्या व तो मार्ग अनुसरणाऱ्या बिचाऱ्या संतांचा छळ असा जागोजाग कां झाला असता ? अर्थात् ती सुधारणाच होती. कारण सुधारकांचाच छळ होत असतो—मग ती सुधारणा कितिहि हितपरिणामी कां असेना. अशाच सुधारणेच्या व सत्यप्रतिपादनाच्या पायीं ख्रिस्त, ग्यालिलियो, सॉक्रेटीस, तुकाराम, इत्यादि महात्म्यांना अनन्वित छळ भोगावा लागला आहे, व कित्येकांस तर आत्मबलिदानसुद्धां त्यापायीं करावें लागलें आहे व तें त्या महाभागांनीं आनंदानें केलेंहि पण आहे. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा सुधारकांचाच छळ होत असतो व महाराष्ट्रीय संतांचा झालेला छळ—किंबहुना, ‘ एकनाथी ब्राह्मण ’ म्हणून आजहि दाखविली जाणारी वेगळी ब्राह्मणाची जात-सर्व जगाला हेंच दाखवीत व सांगत आहे कीं, छळाचे वार अंगावर झेलीत कार्य करणारे नाथादि महाराष्ट्रीय व अन्यदेशीय संत, हे छातीचे सुधारक वीर होते व त्यांची कामगिरी म्हणजे हिंदुधर्मांत सुधारणा घडवून आणणारी अशी क्रांतिकारक कामगिरी होती. अर्थात् अशातऱ्हेची कामगिरी बजावीत असतां ज्ञानेश्वर, नामदेव, चोखामेळा, एकनाथ, तुकाराम, रामदास, मोरोपंत, इत्यादि महाराष्ट्रीय संतमंडळांना व कविमंडळाला किती छळ, किती अपमान, किती उपहास व किती निंदा सहन करावी लागली आहे, तें प्रसंगोपात्त आम्ही मागें सांगितलेंच आहे. असो.

स्वधर्म, स्वभाषा, व स्वदेश यांच्या उन्नतीप्रीत्यर्थ महाराष्ट्रीय संतांनीं बजावलेल्या कामगिरीसंबंधीं, उपरिनिर्दिष्ट चुकीचें विधान सोडून दिल्यास, आमच्याप्रमाणेंच श्री. फडके व मोल्सवर्थसाहेब यांचें मत आहे, हें त्यांच्या खालील उद्गारांवरून दिसून येईल. पैकीं श्री. फडके म्हणतात:—“ ह्या ( मुसलमानी ) दांडग्या, जोरदार, जनप्रिय, धर्माचा तडाखा हिंदुधर्माला बसला, त्यानें आणखी सुधारणा झाली. ( यावरून ‘तुकारामादिकांनीं हिंदुधर्मांत सुधारणा केली नाहीं’ हा उपरिनिर्दिष्ट आक्षेप उघडच खोटा ठरतो व तोही श्री. फडके यांच्या तोंडून परस्परच ठरतो हें लक्षांत ठेवण्यासारखें

आहे). आजपर्यंत वेदांतमतें संस्कृतांत होतीं....रामानुज, मध्व, यांनीं ग्रंथ केले ते सारे त्याच भाषेंत. कोणी त्याचा अर्थ करून लोकांना सांगेल तेव्हां समजणार. ही अडचण आतां फार भासूं लागली. तेव्हां तें ज्ञान सर्व चालू भाषेंत, मराठींत वगैरे आणण्याचा तडाखा सुरूं झाला. बाराव्या शतकांत योगीराज ज्ञानेश्वर, नामदेव; चौदाव्या आणि पंधराव्या शतकांत उद्धवचिद्धन, एकनाथ, तुकाराम, रामदास, रंगनाथ, मुक्तेश्वर, वामन; आणि सतराव्या शतकांत श्रीधर, महिपति, मोरोपंत, अमृतराय वगैरे कवी, योगी, ज्ञानी उत्पन्न झाले; त्यांनीं सारें संस्कृतवाङ्मय मराठी भाषेंत आणलें. भाषांतरें करून वेदांतज्ञान सर्व लोकांना सुलभ केलें. महाभारतांतल्या कथा ऐकून व समर्थरामदासांच्या प्रत्यक्ष उपदेशाच्या जोरावर शिवरायांनीं महाराष्ट्रांत मराठी राज्य स्थापिलें, आणि गोब्राह्मणप्रतिपाल करून हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन केलें. तोच कित्ता पहिले रावबाजी यांनीं ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीकर ह्यांच्या सहवासानें गिराविला आणि हिंदुराज्याचे झेंडे अटकेपर्यंत नाचविले. मराठी भाषा वाढली, ती सर्व वैराग्य, ज्ञान, भक्ति, वेदांत यांच्या सावलींत. मराठी कवींचा सर्वांचा हेतू धर्मजागृति, धर्मबुद्धि, परोपकार. ज्ञानोबाच्या मठांत, तुकारामाच्या टेंकडीवर, समर्थांच्या सज्जनगडावर, वामनाच्या गंगाकांठच्या झोंपडींत, मराठी भाषेचें पोषण झालें......संस्कृतविद्यागंगेच्या ओघांत स्नान करण्याचें काम फार श्रमाचें होऊं लागलें, तें थोडक्यांनाच साधे; ह्यासाठीं त्या प्रवाहाला बांध घालून मराठी काव्यरूप कालवे बांधून स्त्रीशूद्र वगैरे लोकांच्या, ज्ञानापासून लांब, दूर असलेल्या, अंतःकरणरूपी शेतांना पाणी देऊन ती सर्व बागाईत करण्याचा उन्नत उपक्रम ह्या संतांचा होता. ह्याचें रूपक तुकारामानीं केलें आहे तें पहा. "ह्या वेदांतसंग्रहरूप मराठीभाषेच्या देवळाचा पाया योगीराज ज्ञानेश्वरांनीं घातला. नामदेवभक्तानें सर्व आवार बांधिलें, जनार्दनस्वामींचा शिष्य एकनाथ या भगवद्भक्तानें त्या देवळावर निशाण लाविलें, आणि माझ्यासारख्यानें कळस चढवून देवळाला शोभा आणली."* ह्यांत सर्व कवी, संत आणले नाहींत म्हणून त्याशिवाय दुसरे कोणी नव्हते

*टीपः—( हें वर्णन किती तंतोतंत लागूं पडतें हें आम्हीं महाराष्ट्रीय-संतांच्या मागें वर्णिलेल्या कामगिरींवरून लक्षांत येईलच !—लेखक )

असा अर्थ घ्यावयाचा नाहीं. सारांश मराठी भाषेची वाढ, मराठी राज्याची वाढ, आणि त्यांचा परिणाम—हिंदु धर्माचें पुनरुज्जीवन ह्या गोष्टी एकाच कालीं झाल्या. मोल्सवर्थसाहेब काय म्हणतात पहा:—
" माझा असा पक्का समज झाला आहे कीं, अगदीं आद्य मराठी ग्रंथकार घेतले, तर त्यावेळीं हिंदुस्थानांत धर्मसंबंधानें जी एळबळ उडाली होती तिच्याशीं या ग्रंथकारांचा संबंध लागतो. " इ. ( वे. नि. पा. ६८।७० ) श्री. फडके पुढें म्हणतात:—

" पेशवाईत सुद्धां अनंतफंदी, माणकेश्वर वगैरे कवी झाले आणि ह्या काव्यभाषांतराचा अखेर झेंडा मोरोपंतानें व रामजोशांनीं लावला. " रामजोशी यांनीं सर्व सामान्य जनांस अत्यंत प्रिय जो लावणी छंद त्यास तमासगिराच्या डफावरून काढून हरदासाच्या मृदंगावर आणून बीभत्सशृंगारास जो उद्दीपक व्हावयाचा, त्यासच आपल्या काव्यप्रभावानें श्रोतृजनांच्या हृदयांत वैराग्यवृत्ति बळकट बाणविण्यास साधनीभूत केला.* " ( निबंधमाला-वक्तृत्व ) तुकारामानें आपल्या साध्या प्रेमळ वाणीनें भक्तीचें वेड लोकांस लावलें, पंढरीक्षेत्राचें महात्म्य वाढाविले आणि शूद्रादिक जातींना मागें खेंचून घेऊन हिंदुधर्मांत राखलें. "असल्या तुकोबारायाचे अभंग उठतां बसतां म्हणणाऱ्या लोकांच्या मनावर, ख्रिस्तीधर्मांतील तत्वज्ञानाचा नैतिक-भाग उच्चतर आहे, ही गोष्ट ठसविणें बहुतेक अशक्य आहे. " ( अलेक्झांडर ग्रँट ). यज्ञयागाचा काळ निदान पूर्वकाळीं होता तसा पुन्हां येणें शक्य दिसत नाहीं. त्या कर्मठपणाला डावेपणा आला होता. तो ह्या मराठी कवींनीं बहुतेक संपुष्टांत आणला आणि त्याचा डाळ पुन्हां केव्हांही शिजूं नये अशी तजवीज केली ! " ( वे. नि. पा. ७३।७४ ). असो.

वरील उतारा आम्ही मुद्दामच सविस्तर दिला आहे. त्यावरुन महाराष्ट्रीय संतांची कामगिरी किती विविधतेची, किती धडाडीची आणि किती व्यापक होती, हें वाचकांच्या तेव्हांच लक्षांत येणार आहे. असो.

---

* टीप:—हे रामजोशाचें परिवर्तन मोरोपंतांच्या उपदेशानें कसें झालें तें श्री. पांगारकरांनीं आपल्या ' मोरोपंतांच्या चरित्रांत ' चांगलें सांगितलें असून जिज्ञासु वाचकांस तें आमच्या ' कविसंसार ' नाटकांतहि पहावयास मिळेल.

वरील सर्व कामगिरींत महाराष्ट्रभाषेचा जाज्वल्य अभिमान धरून संस्कृतांतलें परमार्थज्ञानभांडार सर्व संतांनीं सामान्य जनतेला खुलें करून दिल्याची कामगिरी खरोखरच चित्तास डोलविणारी व चिरस्वरूपाची आहे. त्या मराठी भाषेच्या अभिमानाच्या भरांत, " ये मराठीचिये नगरीं। ब्रह्मविद्येचा सुकाळ करी । " किंवा " माझा मराठाचि बोल निकें । परी अमृतातेंहि पैजा जिंके ।" अशा तऱ्हेची छातीठोक वाणी मराठी भाषेच्या आद्य अभिमानी कवीच्या—ज्ञानेश्वरांच्या—तोंडून कशी बाहेर पडली तें आम्ही मागें सांगितलेंच आहे. तसेंच त्यांच्या खालील ओव्याहि या-कामीं वाचण्यासारख्या आहेत. आपल्या 'ज्ञानेश्वरी' ग्रंथाच्या शेवटीं ते म्हणतातः—

"व्यासादिकांचे उन्मेख । रहाटती जेथ साशंक । तेथ मीही रंक एक । चावळी करी ॥ ९ ॥ परी गीता ईश्वरु भोळा । ले व्यासोक्तिकुसुम-माळा । तरी माझिया दुर्वादळा । ना न म्हणे कीं ॥ १७१० ॥ आणि क्षीरसिंधूचिया तटा । पाणिया येति गजघटा । तेथ काय मुरकुटा । वारिजत असे ? ॥ ११ ॥ पांखफुटे पाखिरूं । नुडे तरी नभींच थिरूं । गगन आक्रमी सत्वरूं । तो गरुडही तेथ ॥ १२ ॥ राजहंसाचें चालणें । भूतळीं जालिया शहाणें । आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ? ॥ १३ ॥ कीं आपुलेनि अवकाशें । अगाध जळ घे पै कलशें । चुळीं चूळपणा ऐसें । भरूनि न निघे ? ॥ १४ ॥ दिवटीच्या आंगी थोरी । तरी ते बहु तेज धरी । वाती आपुलिया परी । आणीच कीं ना ? ॥ १५ ॥ तेंवि व्यासादिक महामती । वावरो ये इये ग्रंथीं । मा आम्ही ठाको हे युक्ती । न मीळे कीर ॥ १७ ॥ अरुण आंगा जवळिके । म्हणोनि सूर्यातें देखें । मा भूतळींची न देखे । मुंगी काई ? ॥ १९ ॥ यालागीं आम्हां प्राकृता । देशिकारें बंधें गीता । म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ १७२० ॥ "

ज्ञानेश्वरमहाराजांचा स्वभाव एकनाथादि सर्वच साधूप्रमाणें अत्यंत विनयशील व नम्र होता. पण त्याचबरोबर त्यांना मराठी भाषेची तरफ-दारीहि पण तितक्याच उज्ज्वलतेनें करायची होती. अर्थात् आपणांकडे कमीपणा घेऊन, नम्रपणेंच कां होईना, पण आपला—म्हणजेच—मराठी भाषेचा—त्या कामीं असलेला हक्क त्यांनीं किती तेजस्वी वाणींत सांगितला

आहे, हें त्यांच्या वरील ओंव्याच सांगत आहेत! अशाप्रकारचा तेजस्वी व तडफीचा, पण तितकाच नम्र, असा मराठी भाषेचा खंदा गडी तिचा पुढारी म्हणून मिरविण्यास किती बरें शोभत आहे! असो.

अशाप्रकारची दिव्य कामगिरी बजावणाऱ्या महाराष्ट्रीय संतांसंबंधीं व पंढरीसंबंधीं गुणग्राहक अशा पंतांनीं 'सन्माणिमाला'दि काव्यांतून फारच सुंदर विवेचन केलें आहे. त्यापैकीं प्रत्येकासंबंधीं विशेष महत्त्वाची अशी एकएक तरी आर्या शेवटीं दिल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. त्यावरून संतांच्या कामगिरीची उदात्तता व स्वरूप ध्यानीं येऊन त्यावर प्रकाशही चांगला पडणार आहे! ऐका तर पंत काय म्हणतात तें:—

" पंढरि! तुजमाजि सदा भगवत्कीर्तन महोत्सव व्यक्त।
भक्त स्त्रीशूद्रजनहि बहु अंत्यज यवनही तदासक्त॥
वीणा ताल मृदंगध्वनि विठ्ठल रामकृष्ण हा घोष।
तोष श्रवणीं देशी श्रीपंढरि! हरिसि सर्वही दोष॥
पुंडलिकानें केला ऐसा कोणीही धर्मनय नाहीं।
कीं दीनबंधु घेती भेटुनि पाहोनि शर्म नयनाहीं॥
नमनें स्मरणें स्वयशःश्रवणें निःशेष दोष वारावे।
हा पांडुरंगदंडक! जीव जड प्राज्ञ सर्व तारावे!!॥
सत्संगमींच नाना दुःखार्त तथापि चित्त रंगतसे।
जलनिधितरंग वातें, सत्संगें उठति चित्तरंग तसे॥
पुण्यश्लोकशिखामणि विठ्ठलपदभक्त बोधला गावा।
ऐशा प्रेमळ साधुस्मरणें निजवस्तु शोध लागावा॥
जो भक्तिसरित्पूरीं षड्रींची सर्व वाहवी सेना॥
रुचला मनास बहुताचि तो भगवद्भक्त नाहवी सेना॥
लाजविलेंचि निजयशें दुग्धाब्धितरंग रंगनाथानें।
भक्तिज्ञानें ज्याची मति पोशी जेविं अंगना थानें॥
हरिविजयग्रंथातें मग आधीं श्रीधरासि वंदीन।
शिववंदनकामांहीं लंघावा प्रथम देवनंदी न॥

भक्तिप्रताप लोकीं अत्यद्भुत याचि नामदेवाचा ।
परमप्रिय भक्तसखा कीं आत्मा आप्तकाम देवाचा ॥
ग्रंथ श्री भागवत श्री रामायण करी सुविस्तर ते ।
जरि न रचिता दयानिधि * केवळ जडजीव तरि कसें तरते ! ॥
ज्याचे अभंग लागति खळहृदया जोंवि बाण रामाचे ।
ज्या परवाद न मोहिति शर जैसे ईश्वरास कामाचे ॥
श्री नामदेवतुकया तदभंग प्रभुसि गोड घांस तसे ।
गहिंवरतसे परिसता नाचतसे, पांडुरंग हांसतसे ! ॥
भगवद्भक्ति कराया बहु जडजीवांसि जो तुका शिकवी ।
त्याच्या दुसरा धरणीवरि येईल कोण हो तुकासि कवी ? ॥
द्विज ' सावधान ' ऐसें सर्वत्र विवाहमंगळीं म्हणती ।
तें एक रामदासें आयकिलें त्या असो सदा प्रणती ॥
सर्वत्र रामनवमीपरमोत्सव परमधर्म चालविला ।
द्विजतर्पण—संकीर्तनयोगें कलिकाल दूर घालविला ॥
शिवराजास ज्ञानद जो जैसा याज्ञवल्क्य जनकास ।
तरले भवार्णवीं बहु दृढतर ज्याची धरूनि जन कांस ॥
साधूंचे यश गाया, प्रेमें देवूनिया सुभा केला ।
निःसंशय ताराया जड, महिपति विठ्ठलें उभा केला ॥
काम न वामनाचित्तीं मोक्षाचा कृष्णभक्तिवांचून ।
भगवद्भजनाचि केलें अनुदिन, किमपि न तदन्य वाचून ॥
केली श्रीगीतेची व्याख्या बहु भक्ति जींत गाजविली ।
साजविली साधुसभा, भाषाकविकवनशक्ति लाजविली ! ॥
वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेंहिं डोलविला ।
प्रभुनें, भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ! ॥

---

* एकनाथ.

श्रीमुक्तेश्वर कविवर, यातें कोण न शुभेच्छु वंदील ? ।
बंदी लक्ष जयाचें ज्याचें यश भव्य जेंवि मंदील ॥ ''

असो. ह्या पंतांच्या आर्या देतां देतां फार लांबल्या.पण तरीही पंतांच्या कामगिरीकडे पाहून, थोर पुरुषांस सहज अशा विनयानें पंतांनीं जरी स्वतांस वरील मणिमालेंत गोविलें नाहीं तरी , त्यांचे स्थान निस्संशय त्यांतच आहे हें कोणीही रसिक कबूल करील. आणि म्हणूनच परशुरामपंत तात्याप्रमाणेंच आम्हीही म्हणतों कीं:—

" घाली प्रभुच्या कंठीं सन्मणिमाला रचोनि जो भावें ।
तेणेंही त्या सत्तममालेंताचि तत्समान शोभावें ! ॥ १ ॥ ''

असो.

सरतेशेवटीं आम्हांस इतकेंच सांगायचें कीं, ही महाराष्ट्रीयसंतांची भागवतधर्मीय कामगिरी म्हणजे इमारतीचा पाया सुदृढ करण्याची, शेतजमनि नांगरून मशागत करण्याची, समाजवृक्षास लागलेल्या किडींचें निर्मूलन करण्याची, समाजतटाला पडलेलीं खिंडारें बुजविण्याची—अशी कामगिरी असून, तिचा उपयोग पुढें येणाऱ्या महाराष्ट्रधर्मास अतीशयच झाला आहे—किंबहुना, याकामगिरीच्या भक्कम पायावरच पुढली प्रचंड व टोलेजंग इमारत आपल्या संपूर्ण वैभवानें उभी राहिली आहे ! अर्थात् तिच्या दिमाखाला भुलून मूळ पायाला विसरून कसें चालेल ? किंबहुना, त्या पायावांचून पुढील इमारत उभीच राहणें शक्य नव्हतें हें लक्षांत घेऊन, हा अच्छेद्य व अभेद्य संबंध ध्यानीं आणूनच, ( रा॰ राजवाड्यांसारख्या आंधळ्या इतिहाससंशोधकांनीं ' ज्या शिडीच्या साह्यानें चढून वर आलों तिलाच लाथ मारण्यासारखे ' कृतघ्नपणाचे कितीही उद्गार काढले असले तरी), मोल्सवर्थ साहेबांनीं—" शिवाजीराजाच्या पूर्वी २०० वर्षांत मराठी भाषेमध्यें ह्या देशांत जे ग्रंथ झाले त्यांच्यायोगानें शिवरायाच्या व त्याच्या समकालीन लोकांच्या मनांत हिंदुधर्माचें पोषण झालें; आणि मुसलमानाविषयीं द्वेष उत्पन्न होऊन शिवाजीचें बंड जे यशस्वी झालें, त्याच्या कारणापैकीं एक मुख्य कारण हे ग्रंथ आहेत, याविषयीं मुळींच शंका नाहीं ''—असे जे उद्गार आपल्या " मराठी कोशाच्या प्रस्तावनें ''त पान २७ वर काढले

आहेत ही खरोखर संतांच्या कामगिरीच्या वर्णनाची हद्द झाली! तेव्हां आतां पुढील भागांत आपण ह्या भागवतसांप्रदायी संतांच्या भरभक्कम कामगिरीच्या पायावर उठलेली रामदासांच्या महाराष्ट्रधर्माची भव्य व टोलेजंग इमारत पाहूं या.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमाला

पुष्प ११ वें.

# भारतवर्षांचा धार्मिक इतिहास !

## ( उत्तरार्ध ).

लेखक

गंगाधर रामचंद्र साने, बी. ए., बी. टी.



प्रथमावृत्ति ] किंमत २ रुपये. [ सन १९३३

# अर्पणपत्रिका.

भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासाची उज्ज्वल
परंपरा आजतागायत कायम ठेवण्यासाठीं
झटणाऱ्या आणि झगडणाऱ्या सर्व
साधुसंतांना, वीरांना, आणि
हुतात्म्यांना हा

**उत्तरार्ध**

अत्यंत प्रेमानें व भक्तिभावानें
सादर समर्पित आहे.

लेखक.



# अभिप्राय.



धुळ्याचे समर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव आपल्या अभिप्रायांत म्हणतातः— श्रीराम

आपल्या भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासाचे भाग १२ ते २० आपण पाठविले ते मी साद्यन्त मननपूर्वक वाचले. आपल्या विचारांशीं माझ्या विचारांचें बरेंच सादृश्य असल्यामुळें मला आपलें विवेचन एकंदरींत आवडलें. क्वचित् मतभेदाला जागा असेल, कोठें वर्णन समर्पक असेल, तर कोठें जास्त रंग भरलासा वाटेल, पण पुस्तक संपवून खालीं ठेवतांना जो समाधानाचा शेवटचा उद्गार मुखावाटे निघाला, तोच अखेरीस खरा म्हटला पाहिजे. श्रीसमर्थांच्या शिकवणीचें आपण जें विस्तृत विवेचन केलें आहे, तें मार्मिक असून त्यायोगें श्रीसमर्थांच्या अंतरंगाची वाचकांस ओळख होण्यास विशेष साहाय्य होईल, असें मला वाटतें...शेवटच्या चार भागांत विद्यमान समाजाचें आपण जें शब्दचित्र काढलें आहे, तें बरेंचसें यथार्थ आहे. ग्रंथाचा आपण केलेला उपसंहार योग्य आहे. तो शब्दशः खरा आहे, खरा टरणारा आहे. श्रीसमर्थांची कृपादृष्टि पुनरपि महाराष्ट्राकडे वळल्यावांचून राहणार नाहीं. त्यांना गत्यंतरच कोठें आहे? पण हें सर्व, आपण म्हणता त्याप्रमाणें, आपणा सर्वांवर अवलंबून आहे. आपला ग्रंथ महाराष्ट्रांतील जातिवंत तरुणांना विचार करावयास लावील, याबद्दल मला शंका नाहीं. कळावें,

धुळें.
१८५५ आश्विन शु॥ १ } शंकर श्रीकृष्ण देव.

———— ————

॥ श्रीगोपालकृष्णाय नमः ॥

# लेखकाचें हृद्गत.

प्रिय वाचक, प्रस्तुत ग्रंथ ( पूर्वार्ध व उत्तरार्ध ) १९२५ च्या ऑगस्ट महिन्याच्या अखेरीअखेरीस मुंबापुरीस लिहून समाप्त झाला. त्यानंतर त्याचा पूर्वार्ध ५ वर्षांनीं म्हणजे १९३० च्या डिसेंबरमध्यें प्रसिद्ध झाला, व उत्तरार्ध मूळ लिहिल्यापासून ८ वर्षांनीं आज जसाच्या तसा आपल्या हातीं देत आहे. गेल्या आठ वर्षांत धार्मिक इतिहासाचे दृष्टीनें कांहीं कमजास्त गोष्टी झाल्या आहेत—व त्या सर्वांस माहीतच आहेत;—तथापि स्थूल मानानें प्रस्तुत ग्रंथातील विवेचन आजही लागू पडण्यासारखें आहे. असें म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुत उत्तरार्ध कसा काय झाला आहे हें पाहणें अर्थात सहृदय रसिकाचें काम आहे. त्याना तो पसंत पडल्यास मी आपणांस धन्य समजेन. कारण, "रसज्ञहो काय तुम्हावीना मी । करूं जगीं घेउन काव्य नामी" असें कविवर्य टिळक म्हणतातच. असो.

माझ्या विनंतिवरून, वेळांत वेळ काढून, धुळ्याचे समर्थभक्त श्रीयुत शंकर श्रीकृष्ण देव यांनीं देवाप्रमाणेंच सहृदयतेनें प्रेमळ व मार्मिक अभिप्राय प्रस्तुत उत्तरार्धास घाडून दिला, याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. त्यांच्या "दासबोधाच्या प्रस्तावनेचा" मला फार उपयोग झाला, तसेंच कै. सीतारामपंत फडके यांच्या "वेदांत निदर्शना"चाही पूर्वार्धाप्रमाणेंच या उत्तरार्धांतही फार उपयोग झाला, हें येथें कृतज्ञपणें नमूद केलें पाहिजे. खुद्द समर्थमाउलीच्या व त्यांच्या "दासबोधा"च्या व इतर संतवाङ्मयाच्या उपकाराला तर सीमाच नाहीं! पण त्या गोड उपकाराखालीं असेंच नेहमीं राहावें असें वाटतें! यापेक्षां अधिक काय सांगूं?

सरते शेवटीं—

> "एथ न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
> करूनि घ्या हें तुमतें । विनवीतसे ॥ "—

या ज्ञानोबांच्या शब्दांत सर्व रसिक वाचकांना विनंति करून हें अल्प निवेदन पुरें करतों.

**माठे यांचा वाडा, जुन्नर.**
**१८५५, कार्तिक शुद्ध १**
**ता. २०-१०-३३.**

**सर्वांचा नम्र,**
**गं. रा. साने.**

प्रस्तुत पुस्तकाच्या पूर्वार्धावरील

# वेंचक अभिप्राय.

(१) ता. ३०-१२-३० चा 'केसरी' म्हणतोः—

" या पुस्तकांत वैदिक कालापासून महाराष्ट्रांत संत मंडळींनीं जी कामगिरी केली तेथपर्यंतचें वर्णन देण्यांत आलें आहे. भारतवर्षांत धर्ममतें कोणतीं होतीं व त्यांचीं उत्क्रांति कशी होत गेली याचा ठोकळ इतिहास सामान्य मतांच्या वाचकांला या पुस्तकांत खात्रीनें सांपडेल. इतिहासाबरोबरच त्यांतील मतांच्या ग्राह्याग्राह्यतेबद्दलहि लेखकांनीं चर्चा केली आहे, ती मार्मिक आहे. पुस्तकांत दिलेले वेंचे निवडक, व त्या वेंच्यांस बनविलेलीं कोंदणेंही सुंदर साधलीं असल्यानें लेखकाच्या भाषेबद्दल वाचकांचा चांगला ग्रह होतो. वेदकाळ, उपनिषदें, गीता, महाभारत, जैनधर्म, शंकराचार्य, यवनधर्मप्रसार, शीखधर्म, संतांची कामगिरी एवढ्या विस्तृत इतिहास क्षेत्राचें सिंहावलोकन लेखकानें मोठ्या कुशलतेनें घडवून आणलें आहे. पुस्तक आश्रयार्ह आहे. "

(२) 'आनंदा'चा फेब्रुवारी १९३१ चा 'आपटे अंक' म्हणतोः—

"वेदकाळापासून तहत महाराष्ट्रांतील भागवतधर्माच्या युगापर्यंत तत्त्वज्ञानविषयक जी दर्शनें झालीं त्यांचा संक्षिप्त पण सुस्पष्ट इतिहास ह्या पुस्तकांत दिला आहे. भाषा आवेशयुक्त असून ठायीं ठायीं उत्कृष्ट अवतरणें दिल्यानें ग्रंथ वाचनीय झाला आहे. "

(३) मार्च १९३१ चें "वऱ्हाडशाळापत्रक" म्हणतेंः—

"प्रस्तुत पुस्तकांत श्री. साने यांनीं भारतवर्षांतील धर्मविषयक कल्पनांचा संगतवार इतिहास दिलेला असून त्यावरून भारतवर्षीयांच्या धार्मिक विचारांचें कसें विकसन होत गेले याची यथायोग्य कल्पना येऊं शकते. प्रस्तुत रुक्ष विषयहि त्यांनीं अत्यंत मनोरंजक व सुलभ पद्धतीनें विशद केला असल्यानें पुस्तक शेवटपर्यंत वाचावेसें वाटतें. पुस्तकाचा उत्तरार्धही असाच मार्मिक व उद्बोधक होईल अशी आशा बाळगण्यास कोणतीच हरकत नाहीं. "

( ४ ) फेब्रुवारी १९३१ चा "भारतमित्र" म्हणतोः—

"श्री. साने यांनीं आजपर्यंत जीं निरनिराळीं उपयुक्त पुस्तकें लिहून महाराष्ट्रसारस्वताच्या सेवेस सादर केलीं आहेत, त्या सर्वांत या पुस्तकाचा नंबर बराच वर लागेल. प्रस्तुत पुस्तकांत वैदिक कालापासून १७ व्या शतकापर्यंत भारतवर्षांत धार्मिक हालचाली कसकशा झाल्या व धार्मिक कल्पनांचा उदय व विकास कसकसा होत गेला याचा सुसंगत इतिहास उत्तम रीतीनें संकलित केला आहे. भाषा सुरेख असून कागद छपाई वगैरे चांगली आहे. एकंदरींत प्रस्तुत पुस्तक संग्राह्य आहे. उत्तरार्ध लवकरच प्रसिद्ध होवो."

( ५ ) ता. २७-१-३३ चा "वैनतेय" म्हणतोः—

ज्याला आज आपण हिंदुधर्म म्हणतो तो आजही एकरूप नाहीं, पण तो ज्या अनेक स्थित्यंतरांतून उत्क्रांत होत आला ती त्याची वेगवेगळीं रूपेंही आजच्या त्याच्या कोणत्याही विशिष्ट स्वरूपा-पासून भिन्न होती, ही गोष्ट प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनानें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखी आहे...भारतधर्माच्या दीर्घ इतिहासापैकीं ज्ञातकाळांतील या धर्माच्या परिवर्तनांची सटीक नोंद हाच प्रस्तुत ग्रंथाचा विषय होय. त्याची संपूर्ण व सोपपात्तिक चर्चा अर्थातच या २२० पृष्ठांच्या पुस्तकांत होणें शक्य नाहीं. तथापि सामान्य वाच-कांना नजरेसमोर धार्मिक स्थित्यंतरांची रूपरेषा उभी करण्यास तें पुरेसें आहे. धर्मांत कानामात्रेचा फरक ज्यांना खपत नाहीं त्यांनीं हीं स्थित्यंतरें पाहून विचार केला तर धर्माच्या अपरिवर्तनशीलते-विषयीं त्यांच्या दृढ समजुतींतही परिवर्तन झाल्याशिवाय राहणार नाहीं."



श्री

# " महाराष्ट्रसाहित्यसेवक ग्रंथमाले " ची माहिती, पुस्तकें व नियम.

**प्रारंभः**—'माले' चा प्रारंभ सन १९२२ च्या जून महिन्यांत झाला.

**उद्देशः**—( १ ) पौराणिक, ऐतिहासिक, धार्मिक, सामाजिक, पारमार्थिक, चरित्रात्मक वगैरे विषयांवर ललित ( काव्य, कादंबरी व नाटक ), तसेंच निबंधात्मक उच्च व चटकदार वाङ्मय निर्माण करणें.

( २ ) व तेंही होताहोईतों अज्ञात पण गुणवान् अशा लेखकांच्याकडून करणें.

**विकासः**—आतांपर्यंत 'मालें'त ११ पुष्पें गुंफिलीं गेलीं आहेत, तीं अशीं:—

( १ ) **कमला !** श्री. गं. रा. सानेकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. प्रो. ल. ग. लेलेशास्त्री यांची मार्मिक प्रस्तावना; 'मुकुंदराय' कवि, 'ज्ञानप्रकाश,' व 'स्वराज्य' यांचा उत्तम अभिप्राय. किं. ८१०.

( २ ) **भगवान् श्रीकृष्ण !**—तूर्त शिल्लक नाहीं.

( ३ ) **अलौकिक आत्मयज्ञ व कविसंसार**—तूर्त शिल्लक नाहींत.

( ४ ) **लीला !** श्री. गं रा. सानेकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. 'केसरी' म्हणतो " पुस्तकाची भाषा गोड व आकर्षक असल्यामुळें वाचतांना कंटाळा येत नाहीं." किं. १ रु. ( प्रती फारच थोड्या शिल्लक. )

( ५ ) **भारतीय संग्राम !**—श्री. गं. रा. सानेकृत कौरवपांडवांची समग्र हकीकत. प्रो. ल. ग. लेलेशास्त्री, श्री. ल. ब. भोपटकर, प्रो. श्री. नी. चापेकर, व 'केसरी' इ. चे उत्तम अभिप्राय. 'डे. व्ह. ट्रा. सोसायटी' व इंदूरच्या 'म. ग्रं. मंडळा' कडून बक्षीस. सचित्र द्वितीयावृत्ति ! किं. १८४ रु.

( ६ ) **हिरकणी !**—श्री. य. गो. जोशीकृत स्वतंत्र सामाजिक कादंबरी. दोन चित्रांसह २०० पृष्ठें. 'मुकुंदराय' कवि, मनोरंजन,' इ. चे उत्तम अभिप्राय. किं. १ रु. ( प्रती फारच थोड्या शिल्लक ).

( ७ ) **सायुज्यसोपान !** श्री. गं. रा. सानेकृत पारमार्थिक चटकदार ग्रंथ, ह. भ. प. साखरेबुवांची गोड प्रस्तावना, प्रो. शं. वा. दांडेकर, 'केसरी,' 'नवाकाळ,' 'बलवंत,' 'माला' चित्रमय-

जगत ' ' प्रजापक्ष ' यांचे उत्तमोत्तम अभिप्राय, इंदूरच्या ' म. ग्रं. मंडळा ' कडून बक्षीस. किं. २ रु.

( ८ ) मुरारी !-श्री. वि. वा. भिडेकृत शिवकालीन ऐतिहासिक कादंबरी. ' केसरी, ' ' ऐक्य ' यांचे उत्तम अभिप्राय किं. २ रु.

( ९ ) भारतवर्षाचा धार्मिक इतिहास ! ( पूर्वार्ध )-श्री. गं. रा. सानेकृत वेदकाल ते भागवतसंप्रदायापर्यंत सचित्र चटकदार विवेचन. प्रो. चापेकर, प्रो. लेलेशास्त्री, व श्री. माटे यांचेकडून प्रशंसन. शिवाय, केसरी, आनंद, वैनतेय, वऱ्हाडशालापत्रक, भारतमित्र, इ. कांचे उत्तम अभिप्राय. किं. २ रु.

( १० ) प्रपितामहाच्या पदावर ! श्री. वि. वा. भिडेकृत शिवकालीन, उद्बोधक, रहस्यमय, चटकदार व स्फूर्तिप्रद कादंबरी. किं. २८८ रु.

( ११ ) भारतवर्षाचा धार्मिक इतिहास.—( उत्तरार्ध ) किं. २रु. श्री. गं. रा, साने कृत ' भा. व. धा. इतिहासाचें ' समर्थांच्या महाराष्ट्र धर्मापासून आज तागायतचें सचित्र, चटकदार व उद्बोधक विवेचन ! धुळ्याचे समर्थभक्त श्री. देव यांचा मार्मिक अभिप्राय ! किं. २ रु.

पुढील कार्य—' यमुना ' ' पावित्र्यप्रभाव ' ' मानवी हृदय ' ' दिव्य आत्मार्पण' रम्यरामायण' इ. चटकदार पुष्पें यापुढें प्रसिद्ध होतील.

ग्राहकांसाठीं—( १ ) १ रु. प्र. फी. भरून कोणासही ' माले ' चे मेंबर होतां येते. ( २ ) ' माले ' चे मेंबर होणारास सर्व नवीं जुनीं पुस्तकें ३ किं. स मिळतात. ( ट. ख. नि. ) इतरांस भर आकार. (३) 'माले' चें कोणतेंही पुष्प खलास झाल्यास त्याबद्दल आम्ही जबाबदार नाहीं. पुन्हा तें छापल्यावर पाहिजे त्यास मिळेल. ( ४ ) ' माले ' चीं पुष्पें साधारणपणें वर्षांतून दोन ( जानेवारी व जुलैमध्यें ) प्रसिद्ध होतात.

लेखकांसाठीं—( १ ) लेख सुवाच्य, शाईनें, कागदाच्या एकाच अंगास लिहिलेला असावा. ( २ ) ' माले ' च्या उद्देशास धरून लेख असावा. ( ३ ) पसंत, लेखास सवडीप्रमाणें स्थळ व परिस्थितीप्रमाणें मदत मिळेल.

जाहिरातींसाठीं—( १ ) जाहिरातीचे दर साधारणत: पुढीलप्रमाणें

आहेतः—( अ ) एकवेळचें—पूर्ण पान १० रु. अर्धे पान ६ रु. पाव पान ३ रु. ( ब ) कायम ( निदान दोन खेपेस ) देणें असल्यास पूर्ण पान ८ रु. अर्धे पान ४ रु. पाव पान २ रु. ( २ ) परगांवच्या जाहिरातदारांनीं जाहिरातीसोबत निदान निम्मी रक्कम आगाऊ पाठविली पाहिजे. ( ३ ) बाकीच्या रकमेबद्दल व्ही. पी. केली जाईल. (४) जाहिरात सुवाच्य व स्पष्ट असावी, (५) ती किती पानांत द्यायची ते स्पष्ट कळवावें. ( ६ ) मालेचीं पुष्पें जानेवारी व जूनमध्यें साधारणतः निघत असल्यामुळें त्याचे आधीं १ महिना आम्हांस जाहिरात मिळेल अशा बेतानें ती पाठवावी.

( १ ) बुकसेलर्ससाठीं—परगांवीं सर्व माल रोखीनें अगर व्ही. पी. नें. पाठविला जातो. ( २ ) साधारणतः कोणत्याही पुस्तकावर कमीत-कमी २५ टक्के कमिशन दिलें जातें.

एजन्सीसाठीं—( १ ) मालेचा प्रसार करण्यास एजंट्स पाहिजेत. ( २ ) जाहिराती, कायम वर्गणीदार, व किरकोळ ग्राहक मिळवून देणें अशीं एजन्सीचीं त्रिविध अंगें आहेत. ( ३ ) प्रत्येक अंगास कमीत-कमी २५ टक्के कमिशन मिळेल. ( ४ ) परगांवचा सर्व व्यवहार रोखीनें अगर व्ही. पी. नें एजंटाचे नांवें केला जाईल.

सूचनाः—कोणत्याही बाबतींत अधिक खुलाशासाठीं जोडकार्ड पाठवावें, अगर उत्तरास तिकिटें धाडावीं.

पत्ता—गं. रा. साने, संपादक, साठेवाडा, जुन्नर.

---

# अनुक्रमणिका.

# भारतवर्षाचा धार्मिक इतिहास.



## भाग १२ वा.

मागील तीन भागांतून आपण मराठी संतांच्या भागवत सांप्रदायाची बिनमोल कामगिरी पाहिली. अर्थात् ती प्रत्यक्षतः—उघड अशी फारशी दिसणारी नव्हती. दारू ठासण्याचें काम तितकेंसे दिसत नाहीं, पण त्याच दारूला तोडा लावून त्याचा 'धडाडधुम्' असा आवाज झाला कीं, रस्त्यानें बेफिकीरीनें चाललेला मनुष्यमुद्धां दचकून आणि थबकून आश्चर्यानें 'आ' वासून पाहूं लागतो; इमारतीचा पाया भरला जात असतां त्याचें विशेष महत्त्व न वाटतां त्याकडे दुर्लक्ष करणारा मनुष्यच त्या पायावर ताजमहालासारखी भव्य प्रासादतुल्य उत्तुंग इमारत उभी राहिली, व तिचे गगनचुंबी मनोरे आकाशाला भिडायला जाऊं लागले, कीं साहजीकच त्या इमारतीपाशीं क्षणैक थांबून तिचें कौतुक केल्याशिवाय राहत नाहीं; काळ्या जमिनीवरून उन्हातानांतून खांद्यावर आसूड टाकून त्या जमिनीची मशागत करणाऱ्या नांगऱ्याकडे उपेक्षेनें प्रेक्षण करणाऱ्या मनुष्याची नजर ज्यावेळीं त्याच शेतावर हिरवीं पिवळीं धान्याचीं कणसें चमकूं लागून त्यावर स्थिर होते त्यावेळीं त्याची दृष्टि आनंदानें नाचूं लागावी यांत आश्चर्य कसचें ! हाच भेद आणि हाच फरक भागवत सांप्रदायी संतांच्या कामगिरींत व महाराष्ट्रधर्म सांप्रदायी रामदासांच्या कामगिरींत आहे. पण त्यानें वर सांगितलेल्या उदाहरणांतल्या पहिल्या प्रतीचें काम करणारांचें म्हणजे दारु ठासणाराचें, पाया भरणाराचें, अथवा शेत नांगरणाराचें कामाचें महत्त्व त्यानें तिळमात्रही कमी होत नसून उलट त्यांच्यावांचून पुढील देखावा दृष्टीस पडणेंही दुरापास्त होतें हेंही आम्ही मागें सांगितलेंच आहे. मुसलमानी सत्तासागरावर महंमदी धर्माचे विचारवारे जेव्हां घोंघावूं लागले व त्यामुळें महंमदी सत्तासागर खवळून जाऊन आपल्या प्रचंड व पर्वतप्राय लाटांच्या तडाक्यांत हिंदुधर्माची तरती नौका पार बुडवून टाकतो कीं काय असा जेव्हां प्रसंग येऊन ठेपला, त्यावेळेस आपल्या विचारांचीं वल्हीं मारून आणि विवेकाचे सुकाणूं संभाळून त्या प्रचंड झंझावातांतून हिंदुधर्माचें रक्षण समर्थ अशा समर्थांनीं केलें आहे.

पण त्याच्याही आधीं त्या हिंदुधर्माच्या नौकेला आपसांतल्या यादवीची व बेकीची पडलेलीं भोकें बुजवून टाकून ती नाव प्रथम तरती ठेवण्याचें अत्यंत महत्वाचें, जोखमीचें व जबाबदारीचें कार्य महाराष्ट्रीय संतांनीं—भागवतसंप्रदायी साधूंनीं केलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ते जर तें कार्य न करते तर त्या हिंदुधर्म—नौकेंत यावनीधर्माचें पाणी शिरून ती नौका आपल्या मरणानें मेली असती हें नक्की समजावें. अर्थात् अशा तऱ्हेचा दुर्धर व दुःखद प्रसंग ज्यांनीं टाळला त्यांच्या महत्तम कामागिरीचें कौतुक कोण करणार नाहीं व त्याचें महत्त्व कोण जाणणार नाहीं!

पण इतकें असलें तरी, वर सांगितल्याप्रमाणें समर्थांच्या आधींच्या संतांचीं कामगिरी उघडपणें दिसून अगदीं सहजगत्या डोळ्यांत ठसण्याइतकी उघड नव्हती. ती अप्रत्यक्ष व सात्विक स्वरूपाची होती. एका हातीं कुराण व एका हातीं तरवार घेऊन हिंदुस्थानभर नंगा नाच घालणाऱ्या रगेल यवनांच्या तरवारीस तरवार अजून भिडायची होती!

" हुंब्यासि हुंबा लावून द्यावा। टोणप्यास टोणपा आणावा।
लौंदापुढें उभा करावा। दुसरा लौंद॥
धटास आणावा धट। उद्धटास पाहिजे उद्धट॥
खटनटासी खटनट। अगत्य करूनी॥
जैशास तैसा जेव्हां भेटे। तेव्हां मजालसी बरी थाटे "—

अशा प्रकारचा 'मजालसी' चा थाट अद्याप दृष्टीस पडायचा होता! राजकारणानें रंगलेलें वाङ्मय व राजकारणाची उलाढाल प्रत्यक्षतः करणारे राष्ट्रीय संत अद्याप निर्माण व्हावयाचें होतें. पण त्यांतही समर्थसमकालिन जे तुकोबा त्यांच्या वाणीवर समर्थसमकालीनत्वाचा परिणाम होऊन समार्थांच्या वरील उद्गाराप्रमाणेंच—

" विंचू देव्हाऱ्याशीं आला। देवपुजा नावडे त्याला॥
एथ पैजराचें काम। अधमासी तो अधम॥ "

किंवाः—"दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकांचें॥
धर्मनीतीचा हा ऐक व्यवहार। सांगतसे सार निवडोनी॥ "

" मऊ मेणाहूनी आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदूं ऐसे॥
भले तरी देऊ गांडीची लंगोटी। नाठाळांचे पाठी हाणूं सोटा॥ "

अशा तऱ्हेचे जाज्वल्य उद्गार व—

“ वेढावेढारे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ ”

अशा प्रकारची धार्मिक स्वरूपानें कां होईना पण लढाईची भाषा त्यांच्या वाणींत मधून मधून दृग्गोचर होते; असो. तथापि एकंदरींत भागवतसंप्रदायी अशा वारकरी पंथाच्या साधूंच्या वाङ्मयांत, आचारांत, व उपदेशांत समर्थांप्रमाणें उघड व प्रकट असें राजकारण खेळतांना दिसत नाहीं आणि म्हणूनच कांहीं तरळत्या कल्पनेच्या व वरवर पाहणाऱ्या विद्वान् मानवांना समर्थ हे एकटेच देशोद्धारक व राष्ट्रोद्धारक असे संत वाटतात. पण ही कशी चूक आहे व समर्थपूर्वसंतांच्या कामगिरीचें महत्त्व किती आहे तें आम्ही वर सांगितलेंच आहे. कारण यावनी समशेरीशीं समशेर भिडवणाऱ्या हाताला स्फुरण चढेल असे बोल व तो हात बळकट बनवण्याचा उपदेश जरी त्यांनीं केला नाहीं, तरी ती तळपती तरवार धरणारा हात ज्या देहाचा त्या देहाविषयीं बेगुमान वृत्ति बाणविण्याचें अलौकिक कार्य पूर्वींचे संत करून गेले. देहाच्या काय किंवा समाजाच्या काय बाह्य शत्रूंपेक्षा अंतःशत्रूंशीं झगडा करणेंच मोठें कठीण व जिकीरीचें काम असतें. वरच्या इमारतीपेक्षां पाया भरण्याचें, पीक कापणीपेक्षां जमीन नांगरण्याचेंच काम कष्टाचें, कालावधींचें व जिकीरीचें असतें. अर्थात् अशा प्रकारचें अलौकिक कार्य करून, आडरानीं भरलेल्या जगाला मार्गाला लावून, पुढें येणाऱ्या समर्थांसारख्या ‘ संतांचे मार्ग झाडून ’ त्यावरील काटेकुटे दूर करून—भागवतसंप्रदायी वारकरी संतांनीं फारच दिव्य कामगिरी करून ठेवली, व त्या मागून येणाऱ्या महाराष्ट्रधर्मी समर्थांना त्याचा फार उपयोग झाला. अर्थात् ज्या चार प्रकारची कामगिरी दासपूर्वसंतांनीं केली म्हणून मागें आम्ही वर्णन केलें आहे त्या चार प्रकारच्या कामगिरीनंतर येणारा ‘महाराष्ट्र—धर्म’ म्हणजे त्या चार कामांच्या चौकोनी व शोभिवंत मखरांत बसवलेली मंगलमय गणराजाची मूर्ति असून महंमदी धर्म व महंमदी सत्ता यानीं धुंदकारलेल्या व त्या रूपानें अवतरलेल्या सिंदुरासुराचा नाश करण्यासाठींच जणूंकाय तिच्या हातांत त्रिशूळ विराजमान झाला आहे ! गणराजाचे ते हजारों गण, त्यांची ती शरीराची पिळदार गोटी व त्यावर ओसं-

डणारें तें दिव्यतेज, पीतांबराची जणो कुस्तीसाठींच मारलेली ती कांस, व हातामध्यें तळपणाऱ्या त्रिशूळाची ती फेंक, व कांहीं वेळ झालेल्या झटापटी- नंतर लवकरच त्या मंगलमयप्रभूंनीं सिंदुरासुराचा लोळवलेला मुडदा, ह्याचें चित्र डोळ्यापुढें उभें राहिलें म्हणजे त्यांत महाराष्ट्रधर्माची प्राण- प्रतिष्ठा करणाऱ्या समर्थांच्या कामगिरीचें प्रतिबिंब फार उत्कृष्टपणें पहाव- यास सांपडतें. तें कसें तें वाचकांना लवकरच कळेल. पण तोंवर त्यांनीं वरील रूप डोळ्यांत सांठवून ठेवावें! अशात-हेनें चार प्रकारच्या कामगिरीच्या चौकटींत बसवलेली ही महाराष्ट्रधर्माची मंगलमूर्ति आहे. अथवा, भागवतधर्मीय वारकरी संतांच्या चार प्रकारच्या कामगिरीची चार चाकें असलेल्या बळकट रथांत महाराष्ट्रधर्माची दीक्षा घेतलेले शिवबा अर्जुनाच्या जागीं शोभत असून महाराष्ट्रधर्माचे द्रष्टे, प्रणेते व उपदेष्टे समर्थ रामदास त्या रथाच्या अग्रभागीं बसलेल्या भगवान् श्रीकृष्णासारखे शोभत होते असेंहि म्हणतां येईल! आपण मागें राहून, सर्व सूत्रें हलवणाऱ्या पण प्रत्यक्ष शस्त्र हातीं क्वचितच घेणाऱ्या भगवंता- प्रमाणेंच समर्थांनींहि केवळ बुद्धिकौशल्याच्या जोरावर, क्वचित् विर- क्तीचा संन्यास आठवलेल्या शिवबाला, त्या त्या प्रसंगीं महाराष्ट्र- धर्माच्या भगवद्गीतेचें उपदेशामृत पाजून, त्याच्या हातूनच हा डाव जिंकला आहे. समर्थांचें हें सूत्रचालकत्व, त्यांनीं केलेली जागृति व त्यांचा उपदेश यांचें स्पष्टतर चित्र आम्ही लवकरच रेखाटणार आहोंत! तत्पूर्वी वरील उपमाही वाचकांनीं ध्यानीं ठेवावी एवढीच आमची विनंति आहे! तर अशाप्रकारें भागवतधर्मीय कामगिरीच्या चार प्रकारच्या चाकांवर उभ्या राहिलेल्या बळकट रथांत, जागृत झालेल्या जनतेचे राजकीय पुढारी शिवबा व धार्मिक उपदेष्टे समर्थ रामदास यांची—या गुरुशिष्यांची जोडी नरनारायणांप्रमाणें शोभत होती. त्या दिव्य रथाची—हिंदुधर्माच्या त्या दिव्य रथाचीं चाकें आपसांतल्या दुहीनें व अज्ञानी जुलमानें कशीं मोडून पडलीं होतीं व भागवतधर्मीय संतांनीं तीं पुन्हां बळकट व दुरुस्त करून कशी बसवलीं त्याचाही वृत्तांत लक्षांत ठेवण्यासारखा असून तो आम्ही मागें सविस्तर सांगितलाच आहे, व त्यावरून त्याचें महत्त्व वाचकांस समजून येणार आहे. असो. पण अशा या रथांवर पुनः पुन्हा होणाऱ्या यावनी रुस्तेच्या व यावनी धर्माच्या हल्ल्यांना वेळींच

तोंड देण्यास धनुर्धारी पार्थाप्रमाणें शिवबा व त्या रथाला सुरक्षितपणें हाकणारे भगवंताप्रमाणें समर्थ मिळाले नसते तर त्या रथाची धडगत नव्हती. किंबहुना, त्याच्याही आधीं त्या रथाच्या मोडलेल्या चाकांना वेळींच सावरून धरून, त्यांना दुरुस्त व बळकट करून, तो रथ जर धार्मिक एकोप्यानें हालता चालता असा भागवतधर्मीय संतांनीं ठेवला नसता तर त्या रथाचा ताबा केव्हांच परक्या यवनांच्याकडे जाऊन त्या रथांत पुढें शिवबासारख्या वीराची मंगलमय मूर्ति विराजमान होण्या-ऐवजीं एखाद्या अवरंगजेबाची दाढी हालतांना दिसली असती ! अर्थात् हीं दोन्ही संकटें दूर करणाऱ्या वारकऱ्यांची व धारकऱ्यांची कामगिरी ही परस्परपूरक व एकमेकांना सहाय्यकच कशी झाली आहे हें आतां वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. असो, तर अशाप्रकारें भागवतधर्म व महाराष्ट्रधर्म यांची तुलना करतां पहिल्याची कर्तबगारी सात्विक, निवृत्तिपर, व आंतल्या तयारीची-अंतस्थ सुधारणेची होती, तर दुसऱ्याची कर्तबगारी सात्विकाच्या—निवृत्तिच्या—व अंतर्निष्ठतेच्या पायावर उभार-लेली राजस वैभवाची, प्रवृत्तिपर शोभेची व बाह्यशोभेच्या डौलाची होती; खुद्द त्या त्या धर्माच्या पूजिल्या जाणाऱ्या देवांकडे जरी आपण क्षणैक नजर फिरविली, तरी पंढरीच्या वाळवंटावर कटिवर कर ठेवून विटेवर उभा राहिलेला विठोबा व रावणाच्या बंदीशाळेंत पडलेल्या 'देवांचें बंध तोडण्या'साठीं धनुष्यबाण सरसावून सज्ज झालेले रामराय हाच फरक—हाच दोन्ही धर्मांतला फरक—आपणांस दाखवीत आहेत, असेंहि एखाद्यास विनोदानें म्हणतां येईल ! पण हा फरक कालमहात्म्याचा व केवळ वरवरचा होता हें उघड आहे. कारण पंढरीस विठोबाच्या दर्श-नास गेलेल्या समर्थांनीं जेव्हां " येथें कां रे उभा श्रीरामा ? " या आपल्या प्रसिद्ध अभंगांत त्या विठूला पृच्छा केली व आपलें धनुर्धारी रूप दाख-विण्याची प्रार्थना केली. त्यावेळीं भगवंतांनीं तेंही आपलें रूप समर्थांना तत्काळ दाखविलेलें आहे ! अर्थात् देशकालपरिस्थितीप्रमाणें प्रभू आपलें रूप धारण करीत असून, त्यास भजणारे दोन्ही धर्म व त्या धर्मांचा पाठ-पुरावा करणारा प्रभू कसा एकच आहे हें त्यांनीं येथें उत्कृष्ट दाखवून दिलें आहे. भागवतसंप्रदायी प्रभूच्या हातीं शस्त्र नसण्याचें कारण त्या संप्रदा-याच्या संतांना आपसांतला झगडा प्रथम जिंकायचा होता व अशावेळीं

शास्त्रचा उपयोग क्वचित्च करावा लागतो; किंबहुना, तो टाळवेल तितका टाळावाच लागतो. कारण त्यानें आपसातच विनाकारण नाश होण्याचा, व त्यामुळें आपला पक्ष दुबळा पडण्याचा संभव असतो. पण तेंच परक्याशीं झगडतांना मात्र 'वयं पंचाधिकंशतं' हें न विसरतां आपल्या पक्षाच्या व आपल्या धर्माच्या रक्षणार्थ परक्याच्या तरवारीस तरवारच भिडवावी लागते आणि म्हणूनच महाराष्ट्रधर्मी प्रभू रामरायाच्या हातीं धनुर्बाण विराजत आहेत! अशाच प्रकारचा फरक कालमहात्म्यानें उत्तरेकडील शिखपंथांत पडल्याचें आपणांस ठाऊकच आहे. कारण केवळ शांततेसाठीं व सद्धर्मप्रसारासाठीं विश्वप्रेमाच्या कल्पनेनें हातांत प्रभूच्या नामाची स्मरणी घेतलेल्या आद्यगुरु नानकाच्या ह्या धर्मांतील गुरु गोविंदसिंगास घटकाभर ती स्मरणी बाजूस ठेवून हातीं तरवार घ्यावी लागली व आपल्या शिष्यांच्या म्हणजे शिखांच्या लढाऊ जमाती बनवाव्या लागल्या त्या ह्यासाठींच. टाळमृदंगाचा ध्वनि सोडून समशेरीची खणाखणी समर्थांना करावी लागली तीही हेंच दाखवितें. हा कालमहात्म्याच्या परिणाम व परिस्थितीचा फरक आहे. पण दोहोंतही एकच तत्त्व आपणांस दिसतें व तें म्हणजे जुलमाचा अतिरेक फार दिवस टिकाव धरून राहत नाहीं व सहनशीलतेलाही कांहीं मर्यादा आहे. निदान ती समाजाच्या बाबतींत तरी हमखास आहेच आहे. अर्थात् तिचें आतिक्रमण झाल्याबरोबर शिखाप्रमाणेंच महाराष्ट्रीय जनता वारकऱ्याची धारकरी कशी बनली, जुलमाचा कळस त्या काळीं कसा झाला होता हें आम्ही लवकरच समर्थांच्याच शब्दांत सांगणार आहोंत. पण तत्पूर्वी सार्वत्रिक मुद्यांच्या उद्घाटनांत आम्हांस हाही एक शेवटचा पण पहिल्या प्रतीचा मुद्दा सांगावसा वाटतो कीं, हातीं माळ घेतलेल्या गुरुनानकाइतकें व त्यांच्या शिष्याइतकेंच हातांत कृपाण घेतलेल्या गुरुगोविंदसिंगाच्या व त्याच्या लढाऊ शीखजमातींच्या हृदयांत 'सत्श्री अकाल' ह्या मंत्राचें प्रेम दुमदुमत होतें; व पंढरीच्या वाळवंटावर टाळमृदंगाच्या ध्वनीच्या ठेक्यावर नाचणारे वारकरी हातांतली टाळ टाकून देऊन, पायांत रणदेवतेचे चाळ बांधून, वीरश्रीची बागेश्री गात रणक्षेत्राच्या धारातीर्थावर समशेरीच्या तालावर नाचले, तरी दोघांच्याही हृदयांत त्याच प्रभूची मंगलमय मूर्ति विराजमान झालेली होती.

कारण धर्म, पंथ, किंवा चळवळ कोणचीही असो तिला ' भगवंताचें अधिष्ठान ' आधीं असलें पाहिजे. किंबहुना, त्या सात्विक पायावरच कोणचीही इमारत उभी राहिली पाहिजे हें वारकरी संप्रदायाचे भागवत संत तर विसरले नव्हतेच, पण महाराष्ट्र धर्माच्या राजस वैभवाची मिरास लुटणारे समर्थही विसरले नव्हतें आणि म्हणूनच त्यांची चळवळ एवढी समर्थ होऊन यशस्वी झाली हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आजच्या विसाव्या शतकांतही ह्यूमसाहेबांनीं ह्याच इशारा दिलेला आहे; पण त्याचा विचार चालू काळचा विचार करतांना आपण पुढें करूं. असो. येणेंप्रमाणें महाराष्ट्र धर्माचें साधारण स्वरूप रेखाटल्यावर त्याच्या विशेष स्वरूपाकडे वळावयाचे आधीं, त्या दोन्हीला जोडणारा व दोन्हीवरही सारखाच प्रकाश पाडणारा असा मधला विश्रांतीचा दिव्य दुवा म्हणजे त्या महाराष्ट्रधर्माचे द्रष्टे, प्रणेते व उपदेष्टे जे समर्थ रामदासस्वामी महाराज त्यांचें चरित्र होय. ह्या उज्वल चरित्रावर आपण विहंगम नजर फिरवून त्यांतील ठळक ठळक प्रसंग प्रथम पाहूंया. कारण तेच आपणास उपयोगी आहेत. असो.

पैकीं पहिला प्रसंग म्हणजे ' सावधान ' होण्याचा घ्या. मोरोपंत म्हणतात:—

" द्विज ' सावधान ' ऐसें सर्वत्र विवाह–मंगलीं म्हणती।
तें एक रामदासें आयकिलें त्या असो सदा प्रणती ॥."—

श्रीसमर्थांची १२ वर्षांची ती बालमूर्ति बोहोल्यावर–लग्नाच्या बोहोल्यावर उभी होती. समोर ५।७ वर्षांची एक पोर अंतरपटाच्या पलिकडे हातांत वरमाला घेऊन उभी होती; ब्राह्मणांनीं मध्यें अंतरपाट धरला असून त्यांचीं मंगलाष्टकें मारे धूमधडाक सुरू होती. दोन्हीही मुलें अल्पवयस्कच. पण समर्थांची ती बालमूर्ति तेजस्वी होती ! लहानपणापासून विरक्तिची वृत्ति बाणून हरिभक्तीचा खेळ खेळणाऱ्या ह्या नारायणाला त्याच्या वृद्ध मातेनीं कसाबसा बोहोल्यावर उभा केला होता. पण समर्थांसारखे अवतारी पुरुष वयाची वाट पहात बसणारे नसतात ! "तैसी दशेची वाट न पहातां। वयसेचिया गांवा न येतां। बालपणींच सर्वज्ञता। वरी तयातें ॥ " असें ज्ञानेश्वरांनीं अशा विभूतिबद्दल योग्यच म्हटलें आहे. साहजीकच

'सावधान' असे शब्द ऐकल्याबरोबर, ती तेजस्वी बालमूर्ति खरोखरच खड-बडून सावध झाली व आपल्या भावी कार्याचें दर्शन जणों आतांच होऊन समर्थांनीं लग्नमंडपांतून जी धूम ठोकली ते परत तेथें आलेच नाहींत ! ज्या वयांत खरोखर बालक्रीडेचा काळ त्या वयांत समर्थ 'सावध' झाले ! कां बरें ! इतक्या अल्पवयांत समर्थ कां बरे सावध झाले ! कारण ते सर्वजन्म संसार करून आणि पोराबाळांचें लेंढार वाढवून म्हातारपणीं मरतांमरतां सावध होणाऱ्यांपैकीं नव्हते. सबंध महाराष्ट्र ज्यांनीं आपल्या ओजस्वी आणि तेजस्वी वाणीनें गदगदून हालवून सोडला व त्यास ' सावध ' केलें, त्यांनीं बालवयांतच 'सावध' व्हावें हेंच उचित नव्हे काय ? समर्थ त्या वेळीं दिसण्यांत पोर होते पण ते थोराहूनही थोर होते. 'लहान मूर्ति पण थोर कीर्ति' अशा अधिकाराची ती बालमूर्ति होती ! स्वत: बेसावध असून दुसऱ्याला 'सावधान' तेचा उपदेश करणाऱ्या ब्राह्मणांनीं—केवळ यंत्राप्रमाणें मंगलाष्टकें म्हणणाऱ्या त्या भूदेवांना त्या बालमूर्तीनीं सावध होऊन 'सावध' केलें व प्रत्यक्ष उदाहरणानें त्यास कित्ता घालून दिला !

समर्थ खरोखरीच अवतारी पुरुष. नाहींतरी अवतारी पुरुषाची व्याख्या हीच कीं, अशा पुरुषाच्या क्रिया अगदीं बाल्यावस्थेंतसुद्धां सामान्य बालकाहून भिन्न दिसून उच्च, उदात्त, अशा आयुष्याचा पाया त्यांच्या अल्पवयांतच घातला जातो, व वाढत्या वयाबरोबर ज्यांच्या कर्तबगारीची कमान शुक्लपक्षांतल्या चंद्रकलेप्रमाणें कलेकलेनें वाढत जाते व आयुष्याच्या अस्ताचे वेळीं अस्तगिरीवर विराजणाऱ्या पौर्णिमेच्या पूर्ण-चंद्राची प्रभा त्यांच्या कार्यक्षेत्रांवर पसरलेली असते ! अर्थात् अशा पुरु-षांचीं चरित्रें नेहेमींच आदरणीय व अनुकरणीय असतात. कारण केवळ अवतारी पुरुष एवढ्याच शब्दसमुच्चयानें दबकून जाण्याचें कारण नाहीं. कारण,

" यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं ममतेजोंशसंभवम् ॥ "

असें भगवंतांचें स्पष्ट सांगणेंच आहे. अर्थात् अशा प्रकारची स्थिति ही एकदम कुणासच प्राप्त होत नाहीं—ती ' अनेकजन्मसंसिद्ध ' असते. व " जें एकास करतां आलें तें दुसऱ्यास आलेंच पाहिजे, जें एकास

होतां आलें तें दुसराही होईलच." या रामतीर्थांच्या-'राम बादशहा'च्या वचनावर विसंबण्यास मुळींच हरकत नाहीं. प्रत्येकास परमेश्वर होता येईल-किंबहुना प्रत्येकजण केव्हांना केव्हां परमेश्वरस्वरूप होणारच आहे हें लक्षांत ठेवून व "पशुका होत पन्हय्या नरका कुछ नहि होत । नर करनी करेसो नरका नारायण होत !" ह्या प्रसिद्ध वचनास न विसरतां प्रत्येकानें आपणांकडून होईल तितका धडाक्यानें प्रयत्न करण्यास मुळींच हरकत नाहीं. हेंच थोरांचीं चरित्रें आपणांस सांगत आहेत. लॉंगफेलो नांवाचा आंग्लकवीही आपणांस हेंच सांगतो कीः—

"Lives of great men all remind us
We can make our lives sublime." असो.

गर्वाच्या धुंदीनें धुंदकारलेल्या मुसलमानी सत्तेचे जे बार त्याकाळीं उडत होते त्यांपुढें हिंदुधर्माचें व हिंदूंच्या देशाचे बारा वाजण्याची वेळ आली होती. "देश हिंदुचा, हाय! तयाचा मालक म्लेच्छ ठरे" याप्रमाणें खरोखरच त्यावेळीं स्थिति झाली होती. अर्थात् महाराष्ट्राची ती बारा वाजण्याची वेळ टाळण्यासाठीं, वयाच्या बाराव्या वर्षीच, लग्नाचा बार उडत होता तो उडवून देऊन, समर्थांनीं लग्नमंडपांतून पोबारा केला! समर्थ जे तेथून निघाले ते प्रथम नाशिकपंचवटीस येऊन त्यांनीं बारा वर्षे पुरश्चरण केलें! व भावी कार्यास प्रभू रामरायाचा आदेश घेतला! कारण भावी आयुष्यांत जी प्रचंड खळबळीची चळवळ, जो उत्साह, जी जनता-जागृति त्यांस करावयाची होती त्यास "सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥" ह्या त्यांच्याच भावी उक्तीप्रमाणें ते भगवंताचें अधिष्ठान आधीं मिळविल्यावांचून कसें बरे राहतील? कारण "आधीं केलें मग सांगितलें" अशा तोडीचे ते संत होते! नित्य नदीजलाचें शीतल स्नान करून, नमस्कारानें गुटगुटीत गोटी बनलेल्या ज्यांच्या पिळदार शरीरावर ब्रह्मचर्याचें व रामभक्तीचें तेज ओसंडत आहे अशी ती चोवीस वर्षे वयाची तेजस्वी मूर्ति-समर्थांची ती तेजस्वी मूर्ति, वाचक, तुमच्या डोळ्यांपुढें उभी राहत नाहीं काय? ह्या वेळीं आणि पुढेंही तीर्थयात्रेच्या काळांत समर्थांनीं आपली उपजीविका कशी बरें केली असेल? कां बरें? त्यांत एवढा संकोच कशाचा? "ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागितली

पाहिजे भिक्षा । ' ओंभवति ' या पक्षा । रक्षिलें पाहिजे ।। " असें त्यांनींच सांगितलेलें आपणांस ठाऊक असता ही शंकाच नको. " असतांना भिक मागु नको । नसल्यावर सांगणें कशाला । गाव तुझा भिड धरूं नको । " अशा तऱ्हेचा उपदेश दुसराहि एक संतकवी करीत आहे तो या साठींच. " भिक्षा पात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें ।। " हें खरें, पण अशा लाजिरवाण्या जिण्याची स्थिति समर्थांची होती काय ? त्यांना तर प्रत्यक्ष लग्नमंडपांत उभे करून त्यांच्या दोन हाताचे चार हात करण्यास त्यांची मातोश्री उत्सुक होती. पण समर्थ तेथून पळाले होते. कारण यवनांच्या दास्यांत—बंदिखान्यांत लोळणाऱ्या महाराष्ट्राला त्या यवनदास्यशृंखलेंतून मुक्त करण्यासाठीं ज्यांचा अवतार ते स्वताच 'चतुर्भुज' होऊन पायात लग्नशृंखला कशी बरे अडकवून घेतील ? अर्थात् स्वत: ज्यानें बेडी तोडली तोच दुसऱ्याच्या बेड्या तोडणार हें उघड नाहीं काय ? अशा तऱ्हेच्या समर्थांना खरोखर घरीं काय कमी होते ! पण त्यांनीं घरोघर भीक मागण्याच्या लज्जेस जी मुळींच भीक घातली नाहीं त्याचें कारण भिकेस लागलेल्या महाराष्ट्राला भाग्याचा भगवंत बनविण्याचें कंकण त्यांनीं आपल्या हातांत—लग्नाचें कंकण तोडून निघालेल्या हातांत—बांधलें होतें ! मग त्याना कशाची गुमान असणार ? अशाच तऱ्हेचे दिव्य भिकारी देशासाठीं फाकिरी पत्करून त्याला स्वातंत्र्याचे अधिकारी बनवीत असतात. पण 'ओंभवति' या पक्षाचे रक्षण करून समर्थांनीं जी घरोघर झोळी फिरवली त्यांत त्यांचा सर्व तऱ्हेचे लोक परीक्षून सोडण्याचाही एक गुप्त हेतू होता हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. आणि याच तत्वावर त्यांनीं आपल्या शिष्यांच्या बाबतींतही पुढे भिक्षेचा पुरस्कार केलेला असून त्यांस त्यांनीं मोठा उज्वल उपदेश केला आहे. त्यांतील कांहीं वचनें आम्ही लवकरच सांगणार आहोंत. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, समर्थांना कंदमुळावर आपली उपजीविका करतां आली नसती असें नाहीं. पण वरील कारणास्तव त्यांनीं ' मधुकरी ' वृत्ति स्वीकारली व खरोखरीच ' मधुकर ' वृत्ति स्वीकारून मधुकराप्रमाणें ठायींठायीं असणाऱ्या लोकसमुदायांची वृत्ति परीक्षून सोडली ! अर्थात् अशा तऱ्हेने मधुकरीच्या चार तुकड्यांच्या मोबदल्यांत ज्यानें महाराष्ट्राच्या पदरांत स्वराज्याची भिक्षा घातली त्या भिक्षेकऱ्याचें, त्या गोसाव्याचें, त्या मधुकऱ्याचें कोणास बरे कौतुक वाटणार नाहीं ?

कारण तो खरोखरीच 'मधुकरी' असून त्यानें स्वराज्य मधूनें महाराष्ट्राचें तोंड अखेर गोड केलें आहे! अशाचे कोण बरे कोड करणार नाहीं ? असो.

याप्रमाणें १२ वर्षे नाशिकपंचवटीस पुरश्चरण करून समर्थांची स्वारी तीर्थयात्रेस व तीर्थयात्रामिषानें देशपरिभ्रमणास निघाली. बारा वर्षे पायीं तीर्थयात्रा करून समर्थांनीं सर्व देश पालथा घातला. पण तो उघड्या डोळ्यांनीं व उघड्या कानांनीं घातला ! बारा ज्योतिर्लिंगें, चार धाम, व टायींठायींचीं तीर्थक्षेत्रें पहात ते हिंडले. त्यांत त्यांना काय दिसून आलें ? सूक्ष्म व अंतर्भेदी अशा त्यांच्या अवलोकनशक्तीच्या उज्वल दृष्टीला काय दिसलें ? यावनी सत्तेनीं धुंद झालेल्या महंमदी धर्मानुयायांनीं जागोजाग घातलेला नंगानाच त्यांच्या दृष्टीस पडला. " तीर्थक्षेत्रें तीं मोडिलीं । ब्राह्मणस्थानें भ्रष्ट केलीं । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ॥ " या एकाच ओवींत तत्कालीन मुसलमानांच्या अत्याचाराचा हाःहाकार समर्थांनीं किती हृदयस्पर्शी वार्णीत रेखाटला आहे.

" म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुता दिवसांचें माजलें बंड ॥" आणि या बंडाचा अतिरेक समर्थांच्या काळीं झालेला पाहून त्या तेजस्वी देशभक्तास किती संताप आला असेल व त्या संतापाच्या भरांतच " धर्मासाटीं मरावें । मरोनि अवघ्यास मारावें । मारतां मारतां घ्यावें । राज्य आपुलें ॥ " अशातऱ्हेचा उज्ज्वल उपदेश अगदीं सहज स्फूर्तीनें त्यांच्या मुखावाटे कसा बाहेर पडला असेल याचा वाचकांनीच विचार करावा. कारण ते मेल्या आईचें दूध प्यायलेले नव्हते. शरीरसामर्थ्याचें, ब्रह्मचर्याचें, रामभक्तीचें, बुद्धिकौशल्याचें, व उदंड कष्ट करण्याचें तेज त्यांच्या नसांनसांतून भिनून राहिलें होतें ! अर्थात् " उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारोनि जातसे ॥ " ह्या त्यांच्याच वचनाप्रमाणें ते खरोखरीच एखाद्या मर्दाप्रमाणें मोटमोटी खस्तीचीं कामें करून गेले आहेत. इतकेंच नव्हे, तर आपल्या जीवाची शर्थ करून त्यांनीं स्वधर्म व स्वराष्ट्र यांचा उद्धारही केलेला पुढें आपणांस दिसणार आहे. पण अशा तऱ्हेच्या तेजस्वी तडफीचे हिरे त्यावेळीं किती होते ? समर्थांच्या पर्यटणांत वरील प्रकारच्या विचारांनीं मुसमुसलेलें व भारलेले तरुण त्यांना किती दिसले?

याचें उत्तर फार खेददायक आहे. आणि मुसलमानांच्या अत्याचारांपेक्षांहि समाजाच्या ह्या शारीरिक व मानसिक अंतर्गत नामर्दपणाकडे पाहून समर्थांचें हृदय फाटून गेलें! समाजांत जो एकप्रकारचा भ्याडपणा, दुबळेपणा, व आत्मविश्वासाचा अभाव जागोजाग प्रगट होत होता तो पाहून त्यांना खरोखरच चेव आला व निराळ्या कारणानें कां होईना पण "गांडीवं स्रंसते हस्तात् त्वक्चैव परिदह्यते । नच शक्नोम्यवस्थातुं, भ्रमतीव च मे मनः ॥" अशा प्रकारची अर्जुनाप्रमाणें महाराष्ट्रजनतेची किंबहुना, सर्व आर्यावर्ताची जी भ्याड भागुबाईसारखी स्थिति झाली होती, ती पाहून खरोखरच त्यांना सात्विक संतापाची चीड आली व त्या भरांतच "क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप" अशातऱ्हेची भगवंताप्रमाणेंच खणखणीत वाणीची सिंहगर्जना त्यांच्या मुखांतून बाहेर पडली. सिंहाचे छावे असून, कोंकरांसारखे दीन झालेल्या लोकांची स्थिति त्यांना पाहवेना व "मुहूर्तं ज्वलितं श्रेयो नच धूमायितं चिरं" ह्या न्यायानें "बेहत्तर आहे ह्या स्वधर्म--स्वराष्ट्रकार्यांत मेलांत तरी, पण कुत्र्याच्या मोतीनें मरूं नका!" अशातऱ्हेचा तडफीचा उपदेश—मेलेल्या हाडानाही जिवंत करणारा उपदेश त्यांनीं जागोजाग केलेला असून, प्रयत्नांची पराकाष्ठा करून त्यांनीं सबंध महाराष्ट्रदेश आपल्या तेजस्वी वाणीनें हलवून सोडला, खडबडून जागा केला, त्याला लागलेल्या आलस्य, मोह, भीरुता इत्यादिकांच्या मोहनिद्रेतून गदगदून हलवून उठवला व त्याच्या करवीं स्वधर्मस्वराष्ट्र—प्रतिष्ठापनेचें दिव्य व अलौकिक कार्य करविलें. तें करण्यासाठीं त्यांनीं ज्या महाराष्ट्रधर्माची व रामदासी—सांप्रदायाची स्थापना केली त्याचा वृत्तांत आम्ही पुढें देणारच आहोंत. त्या आधीं आपण त्यांचें देशपरिभ्रमण व तीर्थयात्रा पाहून संपवूं या. असो.

तर याप्रमाणें ठायीठायींचीं तीर्थक्षेत्रें व पावनभूमींचें दर्शन घेत हिंडणाऱ्या व आपल्या अंतर्भेदी दृष्टीची फेक चौफेर फेकणाऱ्या समर्थांना एकंदर दोन प्रकारचीं संकटें, दोन प्रकारच्या अनिष्ट गोष्टी, समग्र हिंदुस्थानभर दिसून आल्या. एक मुसलमानांचा धार्मिक, राजकीय, व नैतिक अत्याचार; व दुसरें त्याहूनही वाईट गोष्ट म्हणजे एकंदर हिंदु समाजांत

शिरलेला म्याडपणा आणि कमकुवतपणा. त्यांपैकीं मुसलमानांनीं माजविलेल्या अत्याचाराचें वर्णन खुद्द दासबोधांत सुद्धां मधूनमधून साहजीकच दृग्गोचर होत आहे. पाहिलेल्या अनान्वित प्रकारांचा उल्लेख त्यांनीं स्वहस्तानें लिहिलेल्या स्फूर्तिप्रद लिखाणांत आल्यावांचून कसा राहील ! "तिसऱ्या दशकांत संसाराचें जें चित्र काढण्यांत आलें आहे त्याचा शेवट परचक्र येऊन कांता धरून नेऊन भ्रष्टविण्यांत केला आहे." ("दासबोधाची प्रस्तावना" पा. ४९). कै. हरीभाऊंनीं तोताराम गोंधळ्याच्या तोंडीं घातलेल्या पोवाड्यांत सुद्धां खुद्द पार्वती शंकरास हेंच म्हणते कीं "देति पतिव्रता प्राण । कां हो झाकितां हे नयन ? ।।" देवी पार्वती आपल्या पतीस म्हणते "महाराज, आतां किती अंत पहाणार ? अजून कुठवर डोळेझांक करणार ? पतिव्रतांचे पाटिराखे परमेश्वर, आपणांस हा छळ उघड्या डोळ्यांनीं पाहवतोना ? महाराज, पहा, ह्या हिमालयाच्या शिखरावरून—ह्या कैलासपर्वतावरून खालीं आपल्या आर्यभूमीकडे नजर फेका, म्हणजे तुम्हाला काय दिसतें ? पाषाणाचेंहि हृदय द्रवेल अशा प्रकारच्या ह्या दीन पतिव्रतांच्या किंकाळ्या तुम्हाला ऐकूं येत नाहींत काय ? खाटकांच्या सुऱ्यांला पटापट बळि पडणाऱ्या ह्या गोमातांचे करुण विलाप आणि दीन हंबारव, अंबारमणा, तुमच्या कर्णसंपुटांत शिरत नाहींत काय ? ब्राह्मणांचा आणि साधुसंतांचा हा जागोजाग होणारा छळ तुम्हाला दिसत नाहीं काय ? जागोजागचीं मंदिरें उध्वस्त होऊन त्या जागीं मशिदी उभारल्या जात आहेत तें, देवा, आपणांला दिसत नाहीं काय ? यवनांच्या धर्मच्छलानें गांजलेल्या व असहाय झालेल्या दीन प्रजेनीं फोडलेला टाहो, प्रभो, तुम्हालां ऐकूं येत नाहीं काय ? मग महाराज, आतां किती अंत पहाणार ? त्या पतिव्रतांचे त्या दीन गायींचे, त्या साधुसंतांचे, त्या गोब्राह्मणांचे, व समग्र प्रजेचे डोळे, महाराज, आतां केवळ तुमच्याकडे लागून राहिले आहेत, तें तुम्हाला दिसत नाहीं काय ? पहा, महाराज, त्या दीन डोळ्यांकडे पहा, करुण रसानें डबडबलेल्या त्या दीन डोळ्यांकडे पहा व अशी डोळेझांक करूं नका ! "येऊंद्या तुम्हाला हो करुण नका झाकुं आपुलं नयन ।। " अहाहा ! वाचक ! किती हृदयस्पर्शी ही प्रार्थना ! ती ऐकून कोणाचें बरें हृदय द्रवणार नाहीं ? "अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयं "

ह्या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें तत्कालीन जनतेची ती केविलवाणी स्थिती पाहून दगड सुद्धां रडायला लागतील आणि कठोर वज्राचें हृदयसुद्धां पिळवटून निघेल. मग आमचा महेश्वर,आमचा गिरिजारमण तर काय, कोंवळ्या अंत:करणाचा भोळा महादेव होता ! साहजीकच "ऐकुनिया मातेच्या बोला। भोळा शंकर जागा झाला ॥." समग्र देशाच्या-हिंददेवीच्या तर्फे खुद्द आपल्या प्रियपत्नीनें काढलेले तें हृदयस्पर्शी चित्र पाहून शंकर खडबडून सावध झाले, त्यांचें हृदय भरून आलें, व "सांग कुठें घेऊं अवतार। करितो दुष्टांचा संहार ॥ " अशी सहजस्फूर्तीची वाणी त्यांच्या मुखांतून बाहेर पडली ! त्यावर गिरिजेच्या सांगण्यावरून तो गिरिजारमण आपल्या अनुयायांसह निघाला व शिवनेरी किल्यावर शिवाची स्वारी शिवबाच्या रूपानें अवतरली. ही कल्पना किती गोड, किती हृदयस्पर्शी, किती भावनोद्दीपक व किती हृदयाला उदात्तपणा देणारी आहे बरें ! कारण खरोखरच:—

" कलियुगीं हे मोंगल राक्षस। केला गाईब्राह्मणांचा नाश ॥
गोरगरीबांचा छळ करिती । पतिव्रतांच्या इज्जती घेती ॥
अहो घरची बाइल ओढून नेती। आम्हां टकटका बघाया लाविती॥।
चरचरा गाई धरून कापिती। अन् घटघटा आइच रगात पिती॥"

अशाप्रकारची त्यावेळीं स्थिती झाली होती—मुसलमानांचे अत्याचार अगदीं कळसाला जाऊन पोचले होते !

" येक देव दुराचारी। फोडिला बळें ॥ ६–६–३४
येक देव जापाणिला। येक देव उदकीं टाकिला।
येक देव नेऊन घातला। पायातळीं ॥ ६–६–३५
काय सांगो तीर्थमाहिमा। मोडोनि गेला दुरात्मा॥ ६–६–३६'

अशा तऱ्हेचे खेदाचे व संतापाचे उद्गार समर्थ दासबोधांत काढीत आहेत. पण त्यांच्या सारखा सात्विक संताप कितीकांचा त्या काळीं होत होता ? आपल्या पवित्र मंदिराच्या व देवांच्या रक्षणासाटीं प्रत्यक्ष आपल्या पंचप्राणावर उदक सोडण्यास त्याकाळीं छातीचे आणि तडफीचे वीर किती होते ? किंबहुना, ' घरची बाईल ' सुद्धां

'ओढून नेली' जात असतांना केवळ हातपाय जोडून त्या देखाव्या-कडे 'टकटका बघणाऱ्या' शेंदाड शिपायांचा, भ्याड भागुबाईचा, नामर्द नरपुंगवांचा, आणि दुबळ्या दुनियेचा त्याकाळीं सुळसुळाट झाला होता. तो पाहून कोणासही सात्विक संतापाची चीड येऊन त्याच्या तोंडून तिवार धिःकाराची वाणी बाहेर पडावी अशाच शरमेची आणि खालीं पहावयास लावणारी ती गोष्ट होती! अर्थात् त्यामुळें मद्दड मेंदू झालेल्या माणसांना विजेच्या झटक्याप्रमाणें तीव्र आणि जळजळीत उपदेशाचे झटकेच बसावयाला पाहिजे होते! आणि तोतारामासारख्यांनीं तेही झटके देऊन जनतेला जागृत करून त्याच्या 'जिनगानींवर थू' करण्यास कमी केलें नाहीं! "अरे आपल्या आयाबहिणी तरी सांभाळा। कां त्या बी देता मोंगलाला ॥ गेली लाज तुमची कार। थूः तुमच्या जिनगींवर!" अशा तऱ्हेचे उद्गार 'इरेसरीनें' म्हटलेल्या पोवाड्यांत तोतारामाच्या तोंडून अगदीं सहज असे बाहेर पडले आहेत! असो.

पण याहूनही एक जबरदस्त व्यामोहाच्या अडचणीची धोंड समर्थांच्या आणि समर्थांसारख्या देशकार्यकरत्या जित्या जिवांच्या मार्गांत-शिवाजीच्या मार्गांत-पडलेली होती आणि ती म्हणजे यवनदास्य शृंखलाबद्ध अशा मोठ-मोठ्या मराठ्या सरदारांचीही व त्यापायीं नादानबनलेल्या सामान्य जनांची! पण "अर्थस्य पुरुषो दासः" म्हणून भीष्माचार्यांसारख्या ज्ञानी पंडितास सुद्धां जेथें महाभारतकालीं भूल पडली होती तेथें घाटगे, निंबाळकर, या सारख्या मराठा सरदारांची दिशाभूल व्हावी ह्यांत काय आश्चर्य आहे? अर्थात् "आम्हीं काय कुणाचे खातो रे। तो राम आम्हांला देतो॥" अशातऱ्हेच्या उपदेशांनीं समर्थांना त्यांना शुद्धीवर आणावें लागलें आहे. पण याहूनही जोरदार व झणझणीत अंजन चाकणच्या फिरंगोजी नरसाळ्या-सारख्या किल्लेदारांच्या डोळ्यांत घालून 'सरजा शिवाजी'नें त्यांचीं मनें कशी फिरवलीं व आपल्या कार्याला अनुकूल करून घेतली ते तोतारा-मांनीं चांगलें सांगितलें आहे. तो म्हणतोः—

"गड दुसरा तो चाकण। घ्येवा ऐसं झालं मन ॥
तिथं नरसाळा तो फिरंगोजी। गडकरी खरा सूर गाजी ॥
त्याला पाठविलं सांगून। काय ऐका हो शिवरायानं ॥

जे जे मोंगलांचे चाकूर । थूःरे थूः त्यंच्या जिनगानीवर ॥
तुम्ही शूर मर्द फिरंगोजि । कुठं अभिमान तुमचा गेलाजी ।
करितां कुणाची तुम्ही चाकरी । करा करा विचार थोडा तरी ।
अर गाय आपली माता खरी । पर मोंगल तिची मान चरचरा चिरी ॥
कुठं गेली तुमची ईरेसरी । करितां त्या दुष्टाची चाकरी ॥
गेली लाज तुमची कार ! । थूः तुमच्या जिनगानीवर ॥
अर कोणी बुडविली आपुलीं घर । कोणी अणून बसविला मोंगल वर ।
गेला कार सारा विचार । थूः तुमच्या जिनगानीवर॥ " इ.–

अर्थात् जातीचे खरे शूर, जवानमर्द सरदार, पण यवनांच्या चाकरीच्यापायीं कसे अगदीं नादान आणि कुचकामाचें बनून गेले होते. त्यांचें तेज त्यापायीं विलीन आणि नष्ट झालें होतें, त्यांचा स्वाभिमान ठार झाला होता ! किंबहुना, आपण मराठे आहोंत, सिंहाचे छावे आहोंत, ह्याचाही त्यांस विसर पडला असून तोंडावर भाकरीचा तुकडा टाकणाऱ्या यवनांच्या आज्ञेनें एखाद्या कुत्र्याप्रमाणें वाटेल त्याच्या अंगावर भुंकून तुटून पडण्यासही ते कमी करीत नसत. स्वत्वाला विसरायला लावणारी आणि स्वताच्याच देशबंधूंची नरडी फोडणारी ही परवशतेची नादान परिस्थिती पाहून कोणाचें बरें हृदय फाटून जाणार नाहीं ? मग स्वराज्यासाठीं–स्वधर्मासाठीं–गोब्राह्मणप्रतिपालनासाठीं–अहर्निश तळमळणाऱ्या शिवबासारख्या हिऱ्याला आणि समर्थासारख्या साधु पुरुषाला तें पाहून काय बरें वाटलें असेल ? वाचक ! त्यांच्या मनोवृत्तीशीं क्षणैक आपल्या वृत्तीचें तादात्म्य करा म्हणजे तुम्हाला त्याचा प्रत्यय येईल. असो. पण अशाही संकटाला त्या नरनारायणानीं–त्या गुरुशिष्याच्या जोडीनें तोंड दिलें आणि तेंही संकट त्यांनीं उलथून पाडलें. असो.

तसेंच, समर्थांना आपल्या तीर्थयात्रेच्या परिभ्रमणांत अजून एक गोष्ट दिसून आली व ती म्हणजे लोकांचीं मनेंच तेवढीं नादान् आणि दुबळीं बनलीं नसून–त्याचा परिणाम म्हणूनच कीं काय—त्यांचीं शरीरेंही अगदीं दुर्बळ बनलेलीं होतीं—किंबहुना, बाह्यतः लठ्ठ दिसणाऱ्या

शरीरावर सुद्धां खऱ्या शक्तीचें जें तेजस्वी तेज चमकायला पाहिजे व जी बेगुमान वृत्ति अशा शरीरावर खेळायला पाहिजे ती मुळींच दिसत नसून तिचा अत्यंताभावच जिकडे तिकडे दिसत होता. शेदोनशे लोकांच्या गांवकऱ्यांच्या जमावाला चारदोन मुसंडेही उधळून लावीत असत ! किती ही नादान परिस्थिति ! त्या मुसंड्यांच्या मुसंडीतलें तेज त्या जमावांपैकीं एकाच्या तरी अंगीं असेल तर शपथ ! सगळे लोक अगदीं नादान आणि शेळपट बनून गेले होते. अर्थात् समर्थांसारख्या तेजस्वी ब्रह्मचाऱ्यास ही स्थिती कशी बरें पाहवेल? कारण, अगदीं धार्मिक-दृष्ट्या विचार केला तरी—"नायमात्मा बलहीनेन लभ्यः"—असें श्रुतिवचन आहे. ज्याचें ठिकाणीं बळ नाहीं, तेज नाहीं, ओज नाहीं, स्वताच्या आत्म्याचे ठायीं असलेली तेजस्विता आणि बेगुमान वृत्ति ज्याला क्षणाक्षणाला प्रतीत होत नाहीं, "हा एक कक्षेत छावा गजाचा; दुजीमाजि तो सिंह केकावतो" अशातऱ्हेच्या स्वताच्या बळाची जाणीव ज्यांच्या आत्म्याला होत नाहीं, "घालूनि अकलेचा पवाड। व्हावें ब्रह्मांडाहूनि जाड।" अशातऱ्हेची भरारी ज्यांच्या शक्तियुक्तिची जोड मारीत नाहीं, त्यांनीं नेहमीं "करंटे" च राहावें आणि "करंटपण" भोगावें ह्यांत काय आश्चर्य ? "Cowardice is sin म्हणजे "भीरुता हें पाप आहे" अशा अर्थाचे उद्गार महात्मा गांधींनीं आपल्या "यंग इंडियां"त काढलेले आम्हांला पूर्ण स्मरतात, त्यांचा तरी अर्थ हाच आहे. आणि खरोखरच भीरुता म्हणजे पाप आहे, किंबहुना, भीरुतेसारखें दुसरें पाप नाहीं. ह्या भीरुत्वाचा अंश जोंवर यत्किंचित् तरी आपल्या ठायीं आहे तोंवर आपण आपल्या आत्म्याच्या शुद्ध स्वरूपापासून दूरच आहोंत, आपणांस त्याची प्राप्ति झाली नाहीं, असें बेशक समजावें. कारण खरा ब्रह्म-निष्ठ पुरुष कशालाच भीत नसतो "आनंदं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन" असें वचनच आहे; तो काळालासुद्धां डरत नाहीं—किंबहुना, काळच त्याला चळचळां कांपून त्यांच्या पायावर लोळण घेत असतो. "वीर विठ्ठलाचे गाढे। कळिकाळ पायां पडे" अशा तऱ्हेचे ते 'विठ्ठलाचे गाढे वीर' असतात. भागवत सांप्रदायांतील छातीठोक भक्तवीरांची हकीकत आम्ही मागें दिली आहे, त्यावरून हीच गोष्ट वाचकांस दिसून येणार आहे. पण सत्वाची ओळख विसरलेल्या,

स्वार्थासाठीं हपापून वाटेल तिथें तोंड घालणाऱ्या, किंबहुना, स्वताची बाईल सुद्धां ओढून नेली जात असतां त्याकडे टकटकां बघत राहणाऱ्या—त्याचा कांहींच प्रतिकार न करणाऱ्या—नादान नरपुंगवानीं भरलेल्या तत्कालीन भारतवर्षाला त्याचें काय ! तो त्यापासून दूरदूरच पळत होता ! यावरून त्याचामानसिक व शारीरिक किती अधःपात झाला असेल याचा वाचकांनींच विचार करावा. पण हें समर्थासारख्या तेजस्वी देशभक्तांस कसें पाहवेल ! ज्या धर्मकारणाचे आणि राजकारणाचे खेळ त्यांना पुढें खेळायचे होते त्याला असली शेळपट, व वाघाची डरकाळी ऐकल्या बरोबर शेपूट घालून पळणाऱ्या कोंकरासारखी जनता काय कामाची ! " अरे हा धकाधकीचा मामला । कैसा सोसे अशक्ताला ! " असें ते म्हणतात तें या साठींच. साहजीकच त्यांनीं जागोजाग तालीमखाने उघडून त्यांत बजरंगबलीची स्थापना केली व " आधीं शरीर कमवा " असा तत्कालीन तरुणांना त्यांनीं उज्वल उपदेश केला. कारण दणदणीत, तेजस्वी, व पिळदार शरीरांत मनही तसेंच सुदृढ, गुटगुटीत, गोटीसारखें असतें व कमकुवत मनाचा कंगालखाना बनलेले शरीरही वाटेल त्याच्या ठोकरीनें उडवून लावण्यासारखें नादान बनतें, हें त्यांना पूर्ण ठाऊक होतें ! असो.

वरील सारख्या परिस्थितीच्या समाजांतच, तीर्थयात्रा व देशपरिभ्रमण करतां करतां, समर्थांना अजून एक वर्ग दिसून आला व तो म्हणजे हातानें काडीइतकीही कृति न करतां—किंबहुना, कधीं कधीं तर त्याच्या उलट कृती करून—स्वदेशप्रेमाच्या, स्वधर्मलालसेच्या आणि स्वार्थत्यागाच्या नुसत्या लंब्याचवड्या गप्पा मारणारांचा ! आपल्या वृष्टीनें भूमातेला आर्द्र करणारे जसे कांहीं मेघ असतात तसेंच ' गर्जंति केचित् वृथा ' या मासल्याचेही कांहीं मेघ आकाशांतून फिरत असतात. अर्थात् अशांच्या नुसत्या गडगडाटानें संतप्त भूमीचा दाह कसा शांत होणार ! याच दुसऱ्या मासल्याचे मानवी मेघ, ज्यांच्यांत मुळींच 'पाणी' नाहीं व त्या सकस पाण्याच्या अभावीं ज्यांचा देह ' पांढरा फटक ' पडला आहे, असे मानवी मेघ, आर्यावर्ताच्या आकाशप्रांगणांतून इतस्ततः मारे ऐटीनें हिंडत होते व आपल्या कोरड्या गर्जनेनें दिक्प्रांत

दणाणून सोडीत होते ! पण त्यांचा काय उपयोग होता ? " बोलाचीच कढी बोलाचाचि भात। जेवूनिया तृप्त कोण झाला ? " असें तुकोबा उगीच कां विचारीत आहेत ? अशा पांढऱ्या पायांच्या व पिकुटलेल्या देहाच्या मानवी मेघांच्या शुष्क गर्जनेंतून एक तरी खऱ्या कर्तबगारीचा थेंब खालीं भूदेवीच्या अंकावर पडेल तर शपथ ! मग यावनीछलानें संतप्त झालेल्या मायभूमीचा दाह त्यानें कसा शांत होणार ?—स्वातंत्र्य व स्वानंदसौख्याची तहान लागलेल्या तृषित जनताचातकाच्या तोंडांत त्यानें मधुरजलाचा अमृतवर्षाव कसा होणार ? समर्थांना अशा लोकांचा साहजीकच कंटाळा आणि खेद वाटे, किंबहुना चीडसुद्धां येई ! 'आधीं केलें मग सांगितलें' अशा समर्थांना ' नुसतेंच सांगणाऱ्या ' या वाक्पंडितांची—या वाग्वी-रांची कींव यावी हें किती साहजीक आहे बरें ? "प्रचीतीविण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें । तोंड पसरोनि जैसें सुणें । रडोनि गेलें ॥ " असें तें यासाठींच म्हणतात. जिकडे पहावें तिकडे " सांगोचि जाणती सर्वे । कर्ता कोणी असेचि ना " किंवा, " करंटे मिळाले सर्वे । जो तो बुद्धीच सांगतो " असा देखावा पाहून समर्थांना काय वाटलें असेल—त्यांना किती उद्वेग आला असेल बरें ? म्हणूनच ते म्हणतात कीं—" सांगावें तें आपणाला । आपणू करितां बरें ॥ " बोलण्याप्रमाणें कृति करण्यांत किती अद्भुत सामर्थ्य आहे त्या विषयींचे या कर्मयोग्याचे दिव्य बोल पुढें ओघाओघानें वाचकांना वाचायला मिळणारच आहेत ! असो.

या शिवाय स्वतांच्या दीडदमडीच्या स्वार्थासाठीं देशावर अंगार ठेव-णारे ' सूर्याजी पिसाळा ' सारखे पिसाळलेले आग्यावेताळच नव्हेत, तर " जे कां व्यर्थ परार्थहानि करिती ते कोण कीं दुर्मति ? " अशा प्रका-रचे दुर्मति लोकही प्रत्येक गांवास असलेल्या महारवाड्याप्रमाणें समर्थांना आपल्या तीर्थयात्रेंत व देशपरिभ्रमणांत मधूनमधून दिसून आले. पण अशा प्रकारच्या दुष्ट दुर्जनांना " जाणजाणोनि धरावें । जवळीं दुरी ॥ " असा जरी त्यांचा उपदेश आहे, तरी पण "हें कळोंचि न द्यावें" इतकेंच नव्हे, तर खऱ्या लोकसंग्रहकर्त्यानें अशाही लोकांना ' ढका ' न लावतां " सज्जनापरीस आळवावें । महत्त्व देऊनि ॥ " अशीच त्यांची सांगी

आहे. कारण, करणार काय ? आणि रागावणार तरी कुणावर ? "आपलेच दांत आणि आपलेच ओठ ! " असो.

याप्रमाणें, आपल्या बारा वर्षांच्या तीर्थयात्रेंत अत्यंत सूक्ष्मावलोकन करणाऱ्या समर्थांना विविध प्रकृतीचे व विविध रंगाढंगांचे लोक, आणि देशाची दैन्यावस्था आढळून आली ! देहानें आणि मनानें नामर्द व षंढ बनलेली, स्वार्थासाठीं हपापलेली, यवनदास्यशृंखलेंत सत्वाला मुकलेली, देशभक्तीच्या व धर्मभावनेच्या कोरड्या गप्पा मारणारी,—जिवंत मढीं आपणाभोंवतीं वावरतांना पाहून, व त्यांतच देशाला आग लावणारे आग्यावेताळ बघून समर्थांचें हृदय कसें फाटून गेलें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी ! क्षणाक्षणाला देशासाठीं आणि धर्मासाटीं तळमळणाऱ्या—जळणाऱ्या आत्म्याला हा देखावा पाहून हृदयाच्या आंतरिक वेदना किती होत असतात, हें, वाचक ! तुम्हाआम्हासारख्या गाद्यागिरद्यांवर लोळणाऱ्या सुखलोलुपांना कोठून कळणार ? " जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे " हेंच खरें. तशी तळमळ ज्यावेळीं हृदयास लागेल त्यावेळेसच याची जाणीव होणार आहे ! आणि त्यांतूनही कल्पना हवीच असेल तर चालू शतकांतल्या समर्थतुल्य लोकमान्यांचे अगदीं अंतकाळचे सुद्धां उद्गार—" १८१८ ते १९१८ ! हाय ! १०० वर्षें ! कोण ही गुलामगिरी ! "—हे उद्गार वाचा,म्हणजे तें कळून येईल ! असो.

याप्रमाणें आपला तीर्थयात्रेचा व देशपरिभ्रमणाचा १२ वर्षांचा प्रवास संपवून समर्थांची स्वारी चाफळ खोऱ्यांत कृष्णाकांठीं येऊन राहिली ! त्यावेळीं एकंदर देखाव्यानें, पाहिलेल्या एकंदर प्रकारानें, समर्थ एवढे तडफीचे आशावादी—यत्नवादी कर्मवीर खरे, पण त्यानाही पहिल्या सपाट्याला निराशेनें, विषण्णतेनें आणि खेदानें घेरलें. आणि त्यांत आश्चर्य तरी काय आहे ? वर वर्णिलेला, चालू प्रकरणांत दिग्दर्शित केलेला देखावा पाहून कोणहि दिङ्मूढच होऊन जावा असाच तो देखावा नव्हता काय ? साहजीकच " उदास वाटतें जीवीं । आतां जावें कुणीकडे । " अशाप्रकारचे उदासवाणे बोल समर्थांच्या मुखांतून प्रथम बाहेर पडले ! " कुठें जाऊं नये, कुठें येऊं नये, काय हा देखावा, करूं तरी काय ! काय करावें, म्हणजे या लोकांची उन्नति होईल ! "

ह्याच एक विचार त्यांना रात्रंदिवस अस्वस्थ करूं लागला ! कारण परिस्थिति तशीच भयाण होती ! पण " एकांत मानला ज्याला । त्याला साधे हळूंहळूं " ही त्यांचीच शिकवण त्यांना पूर्ण माहीत होती, रामोपासनेचें दिव्य तेज ही त्यांच्या आंतबाहेर भरून राहिलें होतें; यासाठीं 'रामघळी'च्या एकांताचा वास या साधूनें पसंत केला व तेथें 'अखंड विचारांची चाळणा' सुरू करून रामघळीच्या आश्रयानें राहिलेल्या या रामदासानें देशांत कांहींच 'राम' राहिलेला नाहीं हें पाहून, त्यास रामभक्तीचें बाळकडू पाजून इतरही गोष्टी हळूंहळूं शिकवून त्यास कसा ताजातवाना केला, हें पाहणें मोठें बोधप्रद आहे ! कारण, " ब्राह्मण बुद्धिपासूनि चेवले । आचारापासूनि भ्रष्टले । गुरुत्व सांडोनि जाहले । दास दासांचे ।। कित्येक दावलमलकांस जाती । कित्येक पिरासीच भजती । कित्येक तुरुक होती । आपुले इच्छेनें ।। ऐसा कलियुगींचा आचार । कोठें राहिला विचार ? पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ।। हें ब्राह्मणासी कळेना । त्यांची वृत्ति वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ।। " अशातऱ्हेनें " राज्य नेलें म्लेंछक्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अरत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ।। " अशा तऱ्हेची वटवाघुळासारखी स्थिती सर्व समाजाचे जे मुख त्या खुद्द ब्राह्मणांची– 'वर्णानां ब्राह्मणो गुरुः' म्हणवणाऱ्या व म्हणून मिरवणाऱ्या ब्राह्मणांची–त्याकाळीं झालेली होती. अर्थात् "मुख ऐसें कुश्चळ दिसे । पोटीं विष्ठा भरली असे।" हें वचन पिंडब्रह्मांडीं, व्यष्टिसमष्टीस, व्यक्तिस व समाजांस सारखेंच त्याकाळीं लागू होतें. याशिवाय " नाना मतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला " याप्रमाणें कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत राहिला नसून समाजाला शास्ता नाहींसा होऊन त्याची वाताहात झाली होती व यवनधर्माच्या व यावनी सत्तेच्या वैभवाच्या वावटळींत सांपडलेल्या जनतेचे पाय भूमीपासून उचलले गेले होते व समाज त्यांत गिरक्या खात होता ! या विषण्ण देखाव्याकडे पाहून समर्थ क्षणैक खिन्न झाले व त्यांच्या मुखांतून " उदास वाटते जिवीं । आतां जावें कुणीकडे । " असे उद्गार बाहेर पडले हें साहजीकच आहे. पण तो निराशेचा आघात क्षणैकच होता. समर्थांनीं शेवटीं एकांताचा आश्रय घेऊन, अशाही परिस्थितीला कसें सांवरून घेतलें व उचलून धरलें, व चोहोंकडून आकाश फाटलें होतें

तरी त्यांतूनच त्यांनीं कसा मार्ग काढला, हें समजणें अत्यंत बोधप्रद असून तें आपण आतां पुढील भागांतच पाहूं. कारण समर्थांना विषण्णता आली आहे व बारा वर्षांच्या अवलोकनानें शिणलेले डोळें विचारासाठीं मिटून घेऊन ते चाफळखोऱ्यांत कृष्णाकांठीं एकांतात रामघळीमध्यें चिंतन करीत बसले आहेत. यासाठीं कांहीं काळ आपण त्यांना देहानें तरी निदान विश्रांति देऊं—कारण स्वदेशाला स्वातंत्र्य मिळेपर्यंत ते मनानें विश्रांति घेणें केव्हांच शक्य नव्हतें !

---

# भाग १३ वा.



निराशेच्या खोल दरींत बुडून खेद, विषण्णता, इत्यादिकांचा अंधःकार डोळ्यापुढें नाचत होता म्हणून विघ्नविनाशक विचार—विनायकाचें वरदान मागण्यासाठीं डोळें मिटून एकांतांत बसलेल्या समर्थांनीं हळूहळू आपले नेत्र उघडले. आजुबाजूस भीषण देखाव्याची अंधारी परिस्थिति नाचत असली, तरी त्यांतच त्या देखाव्याच्या दरींतून त्यांनीं वर पाहिलें तों स्वधर्माच्या स्वराज्यसूर्याच्या आशेची अरुणरागरंजित सुवर्णकिरणें प्रयत्नाच्या पर्वतशिखरावर दूर आणि उंच अशी चमकतांना त्यांना दिसलीं; त्याबरोबर " उदासीन हा काळ कोठें न कंठे " ह्या विषण्ण विचारांचें धुकें पार वितळून जाऊन, आशेनें पल्लवित व प्रफुल्लित झालेल्या त्यांच्या मुखावर स्मित विलसूं लागलें व त्या सूर्याचे सुवर्णकिरण खुद्द निराशेच्या खोल दरींत सुद्धां आशेच्या रूपानें आधूनमधून चमकतांना पाहून तर त्यांस विशेषच उल्लास वाटला व आधींच दुर्दम्य कर्तबगारीचें समर्थ चांगलेंच नेटानें कार्यास लागले व हां हां म्हणतां त्यांनीं आपल्या कार्यक्षमतेचें ' विश्वरूपदर्शन ' समग्रमहाराष्ट्राला करून स्वजनांना आनंदित व यवनांला थक्कित करून सोडलें; तें कसें, तें आपण आतां ओघाओघानें पाहूंच.

पण समर्थांना खुद्द निराशेच्या दरींत कोणच्या आशेचें किरण चमकतांना दिसले ! कोणच्या एकाच धाग्याच्या आधारावर समर्थ आपले संबंध जाळें

ाविणण्यास तयार झाले?बारा वर्षांचा पुरश्चरणाचा व बारा वर्षांचा तीर्थयात्रेचा काळ समर्थांनीं उघड्या डोळ्यांनीं व उघड्या कानांनीं घालविला होता हें आम्हीं मागें सांगितलेंच आहे. " नाना पुरश्चरणें करावीं । नाना तीर्थाटणें फिरावीं । " एथवरचे समर्थांचें आयुष्यक्रमण आपण पाहिलें. या पुढील " नाना सामर्थ्यें वाढवावीं । वैराग्यबळें ॥ " ही समर्थांची कर्तबगारी आतां आपणांस पाहणें आहे. कारण धुळ्याचे रा. देव म्हणतात त्याप्रमाणें समर्थांच्या समग्र चरित्राचा समावेश ह्याच एका ओवींत होतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. समर्थांनीं समग्र देशभर केलेल्या पर्यटणांत स्वदेशाची अवस्था पुरी जाणलेली होती. नादानपणा, पंगुपणा दुबळेपणा, स्वत्वहानी, सामर्थ्यहानी, स्वार्थलोलुपता, इत्यादि व्याधींनीं व दोषांनीं राष्ट्रपुरुषाच्या देहाला ग्रासलें होतें, हें त्यांना पूर्ण ठाऊक होतें. पण त्यांत आशेला एकच जागा होती; एकच आशेचा किरण त्यांत चमकत होता ! पाहिलेल्या भयाण परिस्थितीच्या भीषण अंधःकारांत प्रथम जरी तो त्यांना दिसला नाहीं व उदासीन खेदाची झडप जरी त्यांच्यावर प्रथम अगदीं साहाजिकपणें पडली तरी हळूंहळूं डोळे उघडून पाहिल्यावर त्यांत तो आशेचा किरण तळपतांना त्यांना दिसून आला ! व भावी कार्यसिद्धीच्या आनंदानें त्यांच्या मुखांवर आनंद विलसूं लागला!असा कोणचा तो आशाजनक आनंदाचा किरण ! अशी कोणची ती अनुकूल परिस्थिति ! मुमूर्षू राष्ट्रपुरुषाच्या देहांत असें कोणचे चैतन्याचे ठोके त्यांना ऐकूं आले ! त्या राष्ट्रपुरुषाची नाडी समर्थांनीं आपल्या विचाराच्या हातांत घेतली असताना ह्या आगंतुक रोगांना उडवून लावणारे कोणचे चैतन्याचे ठोके समर्थांना ऐकूं आले ! वाचक, तें ठोके महाराष्ट्रीय संतांच्या आजवरच्या कामगिरीनें महाराष्ट्रजनतेंत असलेल्या व खेळणाऱ्या स्वधर्मप्रेमाचें—हरिभक्तीचें होत; कारण "दावलमलकाला जाऊन पीराची उपासना करणारे " कांहीं " वेडे पीर" जरी महाराष्ट्रीय समाजांत दितस असले तरी तें' गांव आहे तेथें महारवाडा आहे ' ह्या न्यायानेंच केवळ दिसत होते. अर्थात् महारवाडा म्हणजे जसा गांव नव्हे, तसेंच वरील वेडेपीर म्हणजे महाराष्ट्रीय जनता नव्हे, हें वाचकांनीं विसरूं नये. सबंध महाराष्ट्रीय जनतेचीं सर्व सामान्य अंतःकरणें

महाराष्ट्रीय भागवत सांप्रदायी संतांनीं आपल्या दिव्य व अलौकिक कामगिरीनें मारून टाकली होती; इतकेंच नव्हे, तर शूद्रवर्णांतील खालच्या लोकांस सुद्धां आपल्या प्रेमळ प्रभुभजनानें व प्रेमळ वागणुकीनें त्या संतांनीं परधर्मापासून मागें खेंचून धरलें होतें. अर्थात् समाजाच्या अंतरंगांतल्या ह्या विषारी आत्मघातक रोगाला मारून काढल्यानंतर यावनी धर्माच्या व यावनी सत्तेच्या बाह्य आघातानें शरीरावर व मनावर सुद्धा बसणारे घाव बुजवून टाकणें फारसें कठिण नव्हतें. ह्या बाह्य दोषांच्या व्याधी दूर करणें तितकेंसें अवघड नव्हतें; कारण प्रभुप्रेमाची, भगवद्भजनाची, व कथाकीर्तनांची गोडी अद्याप सामान्य समाजांत कायमच होती—त्या प्रेमाचे, त्या भक्तीचे शुद्ध रक्त समाजाच्या हृदयांत सारखें खेळत असून त्याच्या चैतन्याचे ठोके हातांत नाडी घेतलेल्या समर्थांना त्या राष्ट्र-पुरुषाच्या नाडींतून खणखणींत ऐकूं येत होते. साहजीकच, आशेला अजून जागा होती. व हीच आशा हाताशीं धरून, ह्याच शुद्ध रक्ताच्या जोरावर, प्रसंगीं परक्यांच्या दुष्ट रक्ताचा रक्तपात सुद्धां करण्यास न डगमगणाऱ्या बाणेदार "महाराष्ट्रधर्मा"ची प्रतिष्ठापना समर्थांनीं केली. साहजीकच, हा महाराष्ट्रधर्म भागवत धर्माप्रमाणेंच हरिभक्तिच्या पायांवरच उभा राहिला होता, हें त्याच्या दासप्रणीत खालील सूत्रांवरून कोणाच्याही लक्षांत येणार आहे. या धर्माच्या असलेल्या तीन अंगांची अथवा तीन मजल्यांची समर्थ खालील ओंव्यांतून ओळख करून देत आहेत:—

" मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।
तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ १२–५–४.
हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण ।
वर्तायाचें लक्षण । तेंही असावें ॥ ११–६–४.

हरिकथा निरूपण । बरेंपणें राजकारण ।
प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ १२–२–२९ "—

अर्थात्, समाजाच्या आत्म्याच्या अंतरंगांत ज्या शुद्ध विनिर्मल अशा प्रभुप्रेमाच्या भक्तीचा झरा वहात होता त्यालाच प्रथम समर्थांनीं हात घालावा व त्या झऱ्याकाठीं समग्र समाजाला एकत्र करून, त्यास त्या

झऱ्याचें निर्मल उदक प्रथम पाजून, त्या जीवनानें जगणाऱ्या जीवांना ताजेतवाने करून, मगच राजकारणाचा व चतुरस्रतेचा खुराक समर्थांनीं सर्वांना सारख्याच स्नेहानें व प्रेमानें खाऊं घालावा, हें किती साहजकि आहे बरें ? कारण, अध्यात्माच्या पायावरच व्यक्तिच्या काय किंवा समाजाच्या काय, कर्तबगारीची भव्य व दिव्य इमारत शोभिवंतपणें उठत असते. आणि म्हणूनच समर्थांचा दासबोध हा ग्रंथ म्हणजे प्रवृत्तिनिवृत्तींचें एक गोड मिश्रण आहे ! आणि " भक्ताचिया साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ " अशा तऱ्हेच्या समर्थकृपेचें तेजस्वी व रसाळ वचनामृत समर्थांनीं सर्व जीवांना वाढलेलें आहे—त्या अमृताचा स्रोत सुन्न झालेल्या राष्ट्रपुरुषाच्या देहांत सोडून देऊन त्याची प्रसुप्त अशी आंतरिक शक्ति व गुप्त चैतन्य जागृत केलें, त्या राष्ट्राला त्यांनीं खडबडून जागे केलें, व आपल्या प्रचीतीच्या बोलांनीं त्याचें ठायीं आत्मविश्वास उत्पन्न करून त्याच्याकडूनच या महाराष्ट्राचें ' आनंदवनभुवन ' त्यांनीं बनविलें आहे ! अर्थात् अशा दिव्य व राष्ट्रीय ग्रंथाच्या आधारेंच आपण त्यांच्या 'महाराष्ट्रधर्मा'ची आतां अधिक सविस्तर ओळख करून घेऊं या.

कोणच्याही इमारतीचें आपण जसें प्रथम बाहेरून दर्शन घेऊन परीक्षण करतों व त्याला मजले किती आहेत, त्याची लांबी रुंदी काय, त्याचा पाया भक्कम आहे कीं नाहीं, त्याला वापरलेला मालमसाला कसा आहे, इत्यादि गोष्टी पाहून मग जसे आपण आंत प्रवेश करून आंतली रचना व सोयीगैरसोयी व व्यवस्था पाहतो. तसेंच इथेंही करायला पाहिजे, असो. तर याप्रमाणें पहातां आपणांस पहिल्या धडाक्याला कोणची गोष्ट आकर्षून घेत असेल तर ती त्याच्या—महाराष्ट्रधर्मप्रासादाच्या—भरभक्कम पायाची होय ! हा पाया अर्थातच अध्यात्मिक होता, हें वर सांगितलेंच आहे—किंबहुना, समर्थांचा तसा ठाम विश्वास होता; त्यांना त्याची दिव्य प्रतीति होती व दूरदृष्टीची जाणीवही होती, हें त्यांच्या खालील ओव्यांवरून कळून येणार आहे. ते म्हणतात:—

**" आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।**
**जो समर्थाचाही समर्थ । देवा सोडविता २१ ॥**

त्याचे आम्ही सेवकजन । सेवेकरितां झाले ज्ञान ।
तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥ २२ ॥
करी दुर्जनाचा संहार । भक्तजनांसी आधार ।
ऐसा हा तो चमत्कार । रोकडा चाले ॥ २९ ॥
मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोन जातें ।
कृपा केलिया रघुनाथें । प्रचीत येते ॥ ३० ॥
रघुनाथभजनें ज्ञान झालें । रघुनाथभजनें महत्व वाढलें ।
म्हणोनिया तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥
हें तों आहे सप्रचीत । आणि तुज वाटेना प्रचीत ।
साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२ ॥ "—

( दासबोध—दशक ६ समास ७ ).

अर्थात् अफझुलखानासारख्या 'दुष्टांचा संहार' प्रसंगीं आपल्या 'भक्तजनांस आधार' देऊन, प्रभु रामराय करीत असतात, व हांहां म्हणतां वैभवाच्या शिखरावर आपल्या भक्ताला नेऊन बसवितात—त्या वैभवगिरीच्या पायऱ्या तो भक्त झटाझट व झपाझप चढत असतो—अशी ही 'रोकडी प्रचीत' असल्याचें समर्थ आपणांस सांगत आहेत तें अर्थात् तत्कालीन शिवबाच्या चढत्या वाढत्या भाग्योदयाला अनुलक्षूनच आहे हें उघड आहे ! तेव्हां साहजीकच "आधीं काय ? देश कीं आदेश ?" असा प्रश्न केला असतां आधीं परमात्म्याचा आदेश ग्रहण करा व मग देशाकडे वळा म्हणजे तुम्हांस तुमच्या कार्यांत यशच मिळेल व तुमचें तेज पडेल असें समर्थांचें निक्षून सांगणें आहे ! 'येथें अभाव धरिल्यास पतन पाविजेल' असेंही ते आपणांस बजावीत आहेत. कारण हे त्यांचे प्रचीतीचे बोल आहेत ! आंतबाहेर त्या प्रभुप्रेमाच्या भक्तीनें गुंगून जाऊन त्याचें तेज अंगींप्रत्यंगीं ओसंडू लागल्यावर मग जगांत अशी कोणची मुर्दाड गोष्ट आहे कीं ती होणार नाहीं ? अशा पुरुषाला मग अशक्य काय आहे ? ज्या लक्ष्मीच्या वैभवानें सर्व जग धुंद झालें आहे, त्या 'लक्ष्मीचा पति'—प्रत्यक्ष लक्ष्मीवल्लभ आपलासा केल्यावर—त्याची जोड आपणांस मिळाल्यावर मग विश्ववैभवाची वैजयंति आपल्या गळ्यांत

रुळूं लागेल, व ' सकळ सुखें वोळंगू ' लागतील यांत काय आश्चर्य ! पण त्या रमावल्लभाला सोडून जर तुम्ही केवळ लक्ष्मीच्याच मागें लागाल, तर ती वैभवसुंदरी तुमच्या पासून दूरदूरच पळेल, हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे. कारण " न मागे तयाची रमा होय दासी " असा त्या चंचल लक्ष्मीचा चमत्कारिक नियम आहे, हें सर्वांनीं लक्षांत ठेवावें. यासाठीं त्या प्रभूचीच कांस धरावी म्हणजे मग त्या लक्ष्मीच्या इंद्रादिक घरकुल्यांचा थाट इथेंच या भूलोकीं दिसून भूवरच स्वर्ग आणला गेल्यासारखें होणार आहे, असे समर्थ सांगतात. यासाठींच ते म्हणतातः—

" तया नारायणाला मनीं । अखंड आठवावें ध्यानीं ।
मग ते लक्ष्मी तया पासोनी । जाईल कोठें ? ॥ १५–१०–२४"

म्हणूनच ते पुढें म्हणतात:—

" अंतरीं असतां नारायण । लक्ष्मीस काय उणें ।
ज्याची लक्ष्मी तो आपण । बळकट धरावा ॥ ३७–५–२४"

म्हणजे झालें. असो.

पण त्या नारायणाला अखंड ध्यानीं आठविण्याचें अजून एक कारण आहे. व तें म्हणजे ज्या विघ्नविनाशक विनायकाचें वरदान मागायचें तो विचार–विनायक तरी अखंड नारायणाच्या ध्यानानेंच साधक भक्तांवर प्रसन्न होत असतो. अर्थात् त्या हृदयस्थ आत्मारामाच्या कृपेवरच विचारांचें वरदान प्राप्त होतें. त्यावांचून सर्व धूळच धूळ ! समर्थही हीच गोष्ट आपणांस सांगतातः—

" आत्माराम सकळां पाळी । अवघें त्रैलोक्य सांभाळी ।
तया एकेविण धुळी । होय सर्वत्रांची ॥ २४ ॥
जेथें आत्माराम नाहीं । तेथें उरों न शके कांहीं ।
त्रैलोक्याचें प्राणी सर्वही । प्रेतरूप ॥ २५ ॥
आत्मा नसतां येतीं मरणें । आत्म्याविण कैचें जिणें ।
वरा विवेक समजणें । अंतर्यामीं ॥ २६ ॥
समजणें जें विवेकाचें । तेंहि आत्मयाविण कैचें ? "

म्हणून तें म्हणतातः—"कोणी एके जगदीशाचें । भजन करावें ॥२७॥"
( –दशक १६ समास १० )

अर्थात् " उपासना प्रगट झाली । तरी हे विचारणा कळली । याकारणें पाहिजे केली । भक्ति देवाची ॥ " असें दास त्याच्याच पुढें म्हणत आहेत ते योग्यच आहे.

पण समर्थ रामराय प्रभूची उपासना करण्याची एवढींच कारणें नसून अजूनही त्याला एकदोन कारणें आहेत. पैकीं एक म्हणजे जगदेकराय व त्रैलोक्यविजयी अशा धनुर्धारी रामरायाचा–त्या कोदंड-पाणी प्रभूचा पाठिराखेपणा असल्यावर–आपल्या नितांत भक्तीनें तो आपणांस मिळाल्यावर मग––अहाहा ! त्या स्थितीची नुसती कल्पना मनांत आली,तरी सात्विक सामर्थ्याच्या त्या प्रतीतिनें अंग थरारून जातें-सात्विकाच्या रोमांचांनीं देह पुलकित होतो ! आपल्या नितांत भक्तीनें त्या प्रभूचा पाठिराखेपणा, त्या प्रभूच्या कृपेचें छत्र, त्या प्रभूचे अभय-कर आपल्या मस्तकीं असल्यावर मग–मग काय कमी आहे ? " मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोनि जातें । कृपा केलिया रघुनाथें । प्रचीत येते।।" असा तर हातोहात प्रत्यय येतोच;पण रामरायाच्या बळकट कृपेच्या आश्रयावर स्वताही बलवान् व समर्थ झालेल्या त्या भक्ताचें ठायीं इतकें अलोट सामर्थ्य येतें कीं, त्याच्याकडे कालाची कराल दृष्टीही वळण्यास कचरते व वांकड्या नजरेनीं त्याकडे पाहण्याची प्राज्ञा सर्व त्रैलोक्यांत कोणाचीही नसते ! "समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळीं कोण आहे ।"असें समर्थ विचारतात तें यासाठींच;कारण, तें पुढें कारण सांगतात कीं, 'जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥'–तो दासाभिमानी राम आपल्या दासाची, आपल्या नितांत भक्ताची व निस्सीम उपासकाची कधींच उपेक्षा करीत नाहीं. " सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा । उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ।" याप्रमाणें आपल्या भक्ताचा पाठिराखेपणा करण्यास प्रभु रामराय सदैव समर्थ व तत्पर असतात, किंबहुना त्या कामीं त्या रामरायाची भक्त-वत्सलता व भक्तप्रेम किती अलौकिक आहे याची ओळख करून देतांना समर्थ म्हणतात कीं, एकवेळ मातेचें प्रेम कमी होईल पण भक्तवत्सल प्रभूच्या प्रेमाला अंतच नाहीं ! याप्रसंगींच्या कांहीं ओंव्या दिल्यावांचून

आमच्यानें पुढें जाववत नाहीं! तर ऐका, समर्थांची या प्रसंगाची अमृततुल्यवाणी ऐका:—

" पाहतां देवाचे कृपेसी। मातेची कृपा कायसी!।
माता वधी बाळकासी। विपत्तिकाळीं॥
देवें भक्त कोण वधिला। कधीं देखिला ना ऐकिला।
शरणागतासि देव झाला। वज्रपंजरु॥
देव अनाथांचा कैपक्षी। नानासंकटापासून रक्षी।
धांविन्नला अंतरसाक्षी। गजेंद्राकारणें॥
देव कृपेचा सागर। देव करुणेचा जलधर।
देवासि भक्ताचा विसर। पडणार नाहीं॥
देव प्रीति राखो जाणे। देवासि करावें साजणें।
जिवलगे अवघीं पिसुणें। कामा न येति॥
सख्य देवाचे तुटेना। प्रीति देवाची विटेना।
देव कदा पालटेना। शरणांगतासी॥--
" म्हणोनि सख्य देवाशीं करावें। हितगुज तयासी सांगावें"

असें तें शेवटीं म्हणतात तें किती साहाजिक आहे बरें? वरील उतारा समर्थांच्या स्वानुभवाच्या कळकळीनें भरला असून तो अत्यंत हृदयस्पर्शी झाला आहे असें कोण म्हणणार नाहीं! असो.

तर याप्रमाणें समर्थ अशा प्रभु रामचंद्राच्या कृपाछत्राची साउली—त्या साउलीची जोड आधीं मिळवा म्हणजे दुःख, क्लेश, त्रास, चिंता, इत्यादि रखरखीत अशा तापद वाळवंटावरून जाताना तुम्हांस मुळींच त्रास होणार नाहीं, कारण—" मग तो होऊ नेदी शीण। आड घाली सुदर्शन॥" या तुकोक्तीप्रमाणें इथेंही स्थिति आहे, हेंच समर्थांना येथें निक्षून सांगावयाचें आहे. पण तेंच जर पाठीवर वज्रगंभीर अशा प्रभुरामरायाचे तीक्ष्ण बाण नसतील, देवांचें बंध तोडणारा तो रामराय जर सायुध पाठीशीं उभा नसेल, तर मोकळ्या मैदानांत सांपडलेल्या त्या जिवाला कुणीही कुटावें—कुटून काढावें—हें अगदीं साहाजीक आहे. आणि म्हणूनच अशा त्रिलोकैकवीर अशा समर्थाची पाटी पाहिजे ही एक गोष्ट व त्या प्रभुप्रेमाच्या प्रसादावांचून कोणतेंच कार्य तडीस

जाणार नाहीं ही दुसरी गोष्ट—या दोन्हीही गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. समर्थ म्हणतातः—

" उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेवीण निराश्रयो ।
उदंड केलें तरी जयो । प्राप्त नाहीं ॥ १६-१०-२९
समर्थाची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी ।
याकारणें उठाउठी । भजन करावें ॥१६-१०-३०—
अर्थात् "सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचे
परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ "

असें समर्थ कां म्हणतात तें आतां वाचकांच्या पूर्ण लक्षांत आलें असेल असें आम्हांस वाटतें. त्या भगवंताच्या अधिष्ठानावांचून, त्या उपासनेच्या आश्रयावांचून, सर्व सामर्थ्यें, सर्व चळवळी, आणि सर्व खटपटी व्यर्थ आहेत; आणि त्या आज कशा लंगड्या पडय आहेत हें पाहिलें म्हणजे, " उदंड केलें तरी जयो । प्राप्त नाहीं ॥ " असें कां, याचा बरोबर उलगडा होऊन समर्थांच्या वरील बोलाची सत्यता पटते. न्यायमुर्ति रानडे हे प्रार्थनासमाजिस्ट असतील; पण नुकत्याच झालेल्या " वसंत व्याख्यानमाले"च्या "अर्धशतसांवत्सरिक उत्सावा"मध्यें त्यांच्या—त्या थोर महात्म्याच्या कर्तबगारीचे जे पोवाडे गाईले गेलें व जीं स्तुतिस्तोत्रें म्हटलीं गेलीं त्याच्या मुळाशीं कोणी जाण्याचा यत्न केला काय? इतकीं व्याख्यानें झालीं, पण एकाही वक्त्यानें त्या महात्म्याच्या कर्तबगारीच्या कमानीचा मध्यबिंदु कोणचा होता, ह्याचा उल्लेख केला असेल तर शपथ ! हा मध्यबिंदु—ह्या कर्तबगारीचें अधिष्ठान—न्यायमूर्ति रानड्यांच्या दिव्य अधिकाराचा व अधिकारी वाणीचा पाया, वाचक, ह्या भगवंताच्या अधिष्ठानांत होता, हें तुम्ही केव्हांही विसरूं नका ! विशेषतः विसाव्या शतकांतल्या तरुण पिढीला आम्हाला हें सांगावयाचें आहे व सांगावेसें वाटतें कीं, तरुणांनों, न्यायमूर्ति रानड्यांच्या कर्तबगारीचें तेज ह्या त्यांच्या भगवद्भक्तींत व कळकळीच्या प्रभुप्रेमांत होते ! त्यांची ती मधुर वाणी, काठिण प्रसंगींही अचल व अढळ राहणारी ती एकनाथतुल्य शांतवृत्ति, व त्यांचे ते कळवळ्याचे विचार, या सर्वांचा उगम ह्या भगवद्भक्तींत आहे ! त्यांच्याठायीं असणाऱ्या त्यांच्या स्वभावाचे

अलौकिक गुण व त्यांच्या कळकळीचें तेज हें आंतरिक होते. ते प्रार्थनासमाजिष्ट असतील, पण त्यांच्या हृदयांत त्या प्रभुप्रेमाच्या लाटा इतक्या उसळत असत कीं, प्रभुप्रेमानें गुंगून जाऊन वारकऱ्यांची दिंडी समोरून जातांना पाहिली कीं, त्याच्याशीं तन्मय होऊन त्यांच्या डोळ्यावाटे भक्तिप्रेमाचे अश्रु खळखळां वहात असत,व त्यांचा कंठ सद्गदीत होत असे! ही भक्तिप्रेमाची अलौकिक जादु आजकालच्या किती महात्म्यांपाशीं व किती पुढाऱ्यांच्या पाशीं आहे बरें ? " जेथें जातां तेथें तूं माझा सांगाती। चालविशी हातीं धरूनियां॥"असें प्रेमगद्गदवाणींत बोलणारे किती पुढारी जीव सांपडतील ? निव्वळ वाक्पांडित्याचें प्रदर्शन करणारे पुढारी पैशा पासरी सुद्धां आज मिळूं शकतील पण त्यांच्यांत खऱ्या कळकळीचे व कर्तबगार तेजाचे असे पुढारी हाताच्या बोटावर मोजण्याइतके तरी सांपडतील कां नाहीं याची शंकाच आहे व त्यांतही प्रभुप्रेमाच्या दिव्य दर्शनाचा आनंद लुटणारा व त्या प्रेमगद्गदवाणींत सर्वांची हृदयें सारखीच आकर्षून घेऊन चटका लावून सोडणारा असा एखादाच निघेल, असें आम्हांस वाटतें. मग " उदंड केलें तरी जयो। प्राप्त नाहीं ॥ " असें व्हावें ह्यांत काय आश्चर्य आहे ? वाळूच्या पायावर उभारलेली इमारत कधीं फार दिवस टिकली आहे काय ? असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा ह्या भगवद्भक्तीच्या अधिष्ठानावांचूनच्या क्रिया ह्या साहजिकच लंगड्या पडतात व"कुंकुम सेंदुर केलें। कांतहीनेनें॥" अशा त्या दिसतात हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे. ज्या कर्तबगारीच्या कपाळीं भक्तीचा कुंकुमतिलक नाहीं, ती कशीशीच दिसतें यांत शंका नाहीं ! आणि म्हणूनच तें भगवंताचें अधिष्ठान राखा व मिळवा म्हणजे तुम्ही अलोट सामर्थ्याचे धनी व्हाल,हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे ! काय ? यावर तुमचा विश्वास बसत नाहीं ? समर्थांच्या काळीं एकपट तर चालूं काळीं त्याच्या दसपट अविश्वासी लोक—विशेषतः स्वतःला सुशीक्षित समजल्या जाणाऱ्या जनतेतले लोक—आहेत; पण त्या दोघानाही समर्थांचा एकच निरोप आहे. ते म्हणतात:—

" हें तों आहे सप्रचित। आणि तुज वाटेना प्रचीत ? " काय ? मी एवढे प्रचीतीचे छातीठोक बोल सांगत असतां, त्या प्रभूचे अद्भुत

महिमान वर्णीत असतां, तुला त्याचा विश्वास वाटत नाहीं ? आणि तूं त्या रामरायाला भजणार नाहीं म्हणतोस ? " तूं एक मानवी रंक । न भजसी तरी काय गेले ? ॥ " त्यानें त्या प्रभूच्या यशोदुंदुर्भीच्या निनादांत तुझी टिमकी कोण ऐकत बसतो ? पण वेड्या, त्या रामरायाच्या कृपेची मौज पाहायची असेल व खऱ्या भगवद्भक्ताच्या मागेपुढें प्रभू कसे धांवत असतात व संकटांला दुरीच्यादुरीं पळवून लावून त्या भक्ताचे कोडकौतुक ते कसें करतात,–" मनीं धरावें तें होतें । " आणि "विघ्न अवघेंचि नासोनि जातें । " अशी मौज मग रघुनाथकृपेनें कशी लुटायला सांपडते—याचा प्रत्यक्ष अनुभव पाहायचा असेल, तर मी तुला एवढेंच सांगतो कीं, मी तर तुला स्वानुभवाचेच बोल सांगत आहे, पण तूं सुद्धां " साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥".– एकदां त्या दिव्य साक्षात्काराचें दर्शन घेऊन प्रत्यक्ष प्रत्ययाची—त्या प्रत्ययाच्या परिचयाची मौज तर पहा, म्हणजे तूंही मजसारखाच ही गोष्ट सर्व जगाला सांगत सुटशील–जाहीर करशील–कीं, खऱ्या भगवद्भक्त राष्ट्रकार्यपुरुषानें हातांत माती धरली तरी त्याचें भगवत्कृपेनें सोनें होऊन जातें, अशी त्या प्रेमळाच्या अनन्यभक्तीच्या सृष्टींत व्यवस्था आहे ! किंबहुना, देव आणि भक्त या दोघांचें सामर्थ्य एकवटल्यावर त्या देवाभक्तांच्या सामर्थ्यापुढें प्रत्यक्ष कराळकाळाचीही प्राज्ञा चालणें मुष्कीलीचें होतें; मग इतर क्षुद्र झुंगुरट्यांची काय कथा ?—

" दोन्ही सामर्थ्यें एक होतां । काळासी नाटोपे सर्वथा ।
तेथें इतरांची काय कथा । कीटकन्यायें ? ॥ "—

हें लक्षांत ठेव यापेक्षां मी अधिक काय सांगू ? असो.

याप्रमाणें ' मुख्य हरिकथा निरूपण ' करून त्याच्या भरभक्कम पायावरच पुढल्या २।३ मजल्यांची इमारत उठवायची हें येणेंप्रमाणें निश्चित होऊन येथवर पटवून दिल्यावर "तें कसें करावें" ? असा प्रश्न साहजिकच पुढें उभा राहतो. अर्थात् त्याचा नमुना हवा, त्याकामीं मार्गदर्शक उपदेश हवा, व तोही दासबोधांत आपणांस जागोजाग दृष्टीस पडतो. त्यांत मुख्य गोष्ट एकच लक्षांत ठेवायची—कथेकऱ्यानें एकच गोष्ट ध्यानीं आणायची–ती ही कीं, आपल्या चटकदार कथाप्रबंधानें व तालमान-

गानानें व अलोट भक्तिसामर्थ्यानें लोकांचीं हृदयें आपणाकडे खेंचून घेऊन त्यांना करुण, वीर, इत्यादि उचित रसांत वाहवून, त्यांच्या हृदयांत खळबळ उडवून देऊन, ' चटक लागली लोकांला ' असें केलें पाहिजे, व आपण जेथें जाऊं तेथें, किंबहुना आपला पत्ता ठाऊक नसतांही तो धुंडून काढीत, आपल्या पाठोपाठ हजारों श्रोतृवृंदांच्या झुंडीच्या झुंडी आल्या पाहिजेत, म्हणजे मगच पुढच्या गोष्टी सुलभ होऊन त्याचा पाया घातला गेला असें होणार आहे. कारण, केवळ भगवद्भक्ति हाच ह्या कथेचा पहिला व शेवटचा उद्देश नसून, प्रभुकृपेच्या जोरावर व अधिष्ठानावर राजकारणाची भव्य व टोलेजंग इमारत समर्थांना उठवून द्यायची होती, त्यासाठीं हजारों, नव्हे, लाखों लोकांची परीक्षा त्यांना करायची होती, व त्यांतूनच आपणांस मिळालेल्या हजारों विरक्त व निस्पृह शिष्यांना महाराष्ट्रांत पेरून, आपल्या व शिवबाच्या कार्याला कोण अनुकूल व कोण प्रतिकूल होतात—आहेत—व राहतात हें पाहायचें होतें. असो. तर ह्या उद्देशानें ही हरिकथा करावयाची असून, तो गुप्त हेतू केव्हांही विसरूं नये व दृष्टिआड करूं नये अशी समर्थांची इच्छा होती. पण असा जरी गुप्त हेतू असला; तरी कथा म्हणून जी करावयाची त्यांत मुळींच कमतरता पडूं देऊं नका, किंबहुना, त्यानें प्रत्यक्ष वैकुंठपीठसुद्धां हर्षानें डोलवून सोडा असेंच त्यांचें त्याकामीं सांगणें आहे. त्यासंबंधींच्या त्यांच्या कांहीं बहारीच्या ओंव्या खालीं देत आहोंत. त्यावरून वाचकांसही त्याची कल्पना येईल. ते म्हणतातः—

" वैभव कांता कांचन । ज्यासी वाटे हें वमन ।
अंतरीं लागलें ध्यान । सर्वोत्तमाचें ॥ २२ ॥
जयास घडीनें घडी । लागे भगवंतीं आवडी ।
चढती वाढती गोडी । भगवद्भजनाची ॥ २३ ॥
अंतरीं बैसला गोविंद । तेणें लागला भक्तिछंद ।
भक्तीविण अनुवाद । आणीक नाहीं ॥ २६ ॥
आवडी लागली अंतरीं । तैशीच वदे वैखरी ।
भावें करुणाकीर्तन करी । प्रेमभरें नाचत ॥ २७ ॥
भगवंतीं लागलें मन । तेणें नाठवे देहाभिमान ।

शंका लज्जा ते पळून । दूरी ठेली ॥ २८ ॥
तो प्रेमरंगें रंगला । तो भक्तिमदें मातला ।
तेणें अहंभाव घातला । पायातळीं ॥ २९ ॥
गात नाचत निःशंक । तयास कैसें दिसती लोक ।
दृष्टीं त्रैलोक्यनायक । वसोनि ठेला ॥ ३० ॥
ऐसा भगवंतीं रंगेला । आणीक कांहीं नलगे त्याला ।
स्वइच्छा वर्णू लागला । ध्यान कीर्ति प्रताप ! ॥ ३१ ॥

तर याप्रमाणें "हरुपें डोले वैकुंठपीठ" अशा तोडीची आणि अशा बहारीची कथा--त्या दिव्य कथेचि लूट चालली असतां कीर्तनकारानें. विशेषतः ह्या कलियुगांत—कीं ज्या युगांत मानवी राक्षस दीन दुबळ्यांचा छळ करतात व "कलौसंघशक्तिः" ह्या वचनाप्रमाणें कलियुगांत संघशक्तींत जोर असून त्या जोरावरच त्या मानवी राक्षसांना उलथून पाडायचें असतें—त्या कलियुगांत—कोणकोणच्या गोष्टीस जपलें पाहिजे, ज्या जनसमुदायाच्या जोरावर कार्य करावयाचें त्याला धका न लावतां, किंबहुना दुर्जनाशीं सुद्धां खळखळ न करतां सर्वांनाच आपल्या कीर्तनाचा चटका आपल्या गुणांच्या बहारीनें कसा लावावा व तो कसा लागतो तें समर्थ दशक १४ समास ४ मध्यें सांगतातः—

" कलियुगीं कीर्तन करावें । केवळ कोमळ कुशळ गावें ।
कठिण कर्कश कुटें सांडावें । एकीकडे ॥ १ ॥
खटपट खुंटून टाकावी । खळखळ खळाशीं न करावी।
खरें खोटें खवळों न द्यावी । वृत्ति आपुली ॥ २ ॥
गर्वे गाणें गाऊं नये । गातां गातां गळूं नये ।
गौप्य गूज गर्जों नये । गुण गावें ॥ ३ ॥
नाना नामें भगवंताची । नाना ध्यानें सगुणाची ।
नाना कीर्तनें कीर्तीचीं । अद्भुत करावी ॥ ५ ॥
चकचक चुकावेना । चाट चावट चाळवेना ।
चरचर चुरचुर लागेना । ऐसें करावें ॥ ६ ॥
जी जी जी जी म्हणावेना। जो जो जागे तो पावेना ।
जप जपों जनीं जनार्दना । संतुष्ट करावें ॥ ८ ॥

टक टक टक टक करूं नये । टाळाटाळीं टिकों नये ।
टमटम टमटम लावूं नये । कंटाळवाणें ॥ ११ ॥

याप्रमाणें खबरदारी घेऊन बहारीनें कीर्तन चाललें असतां काय बहार उडते, किती मौज येते व लोकांचीं अंतःकरणें त्यांच्या शरीर-मनांसकट कशीं आपणांकडे खेचलीं जातात—व आपल्या पाठोपाठ धावूं लागतात त्याचें समर्थही बहारीनेंच वर्णन करतातः—

" झिरपे झरे पाझरे जळ । झळके दुरून झळाळ ।
झळझळ झळकती सकळ । प्राणी तेथें ॥ ९ ॥
नाना नेटकें नागर । नाना नम्र गुणागर ।
नाना नेमस्त मधुर । रसाळ गाणें ॥ १५ ॥
ताल तंबुरे तानमानें । तालबद्ध तंतगाणें ।
तूर्त तार्किक तनें मनें । तल्लीन होती ॥ १६ ॥
थरथरां थरकती रोमांच । थै थै थै थै स्वरें उंच ।
थरि थरि थरारे नाच । प्रेमळ भक्तांचा ! ॥ १७ ॥
दक्ष दाक्षिण्य दाटले । बंदे प्रबंदे कोंदाटलें ।
दुम दुम दुम दुम दुमों लागलें । जगदंतर ! ॥ १८ ॥
धूर्त तूर्त धावोनी आला । धिग् बुद्धीनें धीग झाला ।
धाकें धाकें धोकला । रंग अवघा ॥ १९ ॥
पाप पळोन गेलें दुरीं । पुण्य पुष्कळ प्रगटे वरीं ।
परत परतों परी अंतरीं । चटक लागे ! ॥ २१ ॥
बरें बरें बरें म्हणती । बाबा बाबा उदंड करिती ।
बळें बळेंचि बळकाविती । कथेलागीं ! ॥ २३ ॥
रागरंगें रसाळ सुरंगें । रत अंतरें संगीतरागें ।
रत्नपरीक्षी रत्नामागें । धावती लोक ॥ २७ ॥
लवलवा लवती लोचन । लकलका लकलें मन ।
लपलपों लपती जन । आवडीनें ! ॥ २८ ॥ "

कोण बहार आहे ही ! ह्या लोकप्रियतेला तोड सांपडणें मुष्कील आहे ! अर्थात् अशा लोकप्रिय महात्म्यानें काय करावें ?ः—

वचनें वाउगी वदेना । वावरे विवरे वचना ।
वक्तृत्वें निववी जना । विनीत होऊनी ॥ २४ ॥
सारासार समस्ताला । शिकवूं शिकवूं सांगे जनाला ।
साहित्य संगीत सज्जनाला । बरें वाटे ॥ ३० ॥

इतकेंच नव्हे, तर आपल्या होणाऱ्या मानमान्यतेनें "मानेल तरी मानावें मनें।" परंतु 'मत्त न व्हावें ममतेनें।' असा समर्थ इशारा देत आहेत तो प्रत्येक हरदासानें व कथेकऱ्यानें लक्षांत ठेवावा, म्हणजे सर्व समाज त्याला डोक्यावर घेऊन नाचूं लागेल, व त्याला कुठें ठेवूं आणि कुठें नको ठेवूं असें त्यास होऊन जाईल ! अर्थात् अशा अलोट सामर्थ्याचें धनी झालेल्या व समस्त समाजाच्या मनाला व देहालासुद्धां आपला छंद लावलेल्या महंतानें—महंत रामदासानें—ह्या भरभक्कम पायावर पुढली राजकारणाची—हलुहलू राजकारण शिकाविण्याची—इमारत कशी झोकांत व शोभिवंत उठवून द्यावी तें आतां आपणांस पहाणें आहे.कारण, "मुख्य हरिकथा—निरूपण" झाल्यावर "दुसरें तें राजकारण" आहे, हें विसरून चालणार नाहीं. तर आतां तिकडेंच वळूं.

याप्रमाणें वळून पाहिलें असतां, समग्र दासबोधाचें सूक्ष्म अवलोकन, आलोचन व अवगाहन करून पाहतां असें दिसून येतें कीं, यापुढें पाहावयाच्या दोन गोष्टी ज्या राजकारण व चतुरस्रता, चातुर्य, अथवा सावधपण त्यांचा अतिशय निकट संबंध आहे. कारण राजकारणांत चातुर्य लागतें व चातुर्यानेंच राजकारण साधतें ! किंबहुना, चातुर्याच्या पायावरच राजकारणाची भव्य इमारत उठत असते. चतुरस्रतेच्या आणि सावधानतेच्या भक्कम मजल्यावरच राजकारणाचा डौलदार व शोभिवंत मजला चढत असतो. किंबहुना, आम्हास तर असेंहि वाटतें कीं,ह्या "महाराष्ट्रधर्म" रूप मंदिराचा पाया जर हरिकथा—निरूपण असेल, तर मधला मजला ह्या चातुर्याचा असून, वरील लखलखायमान कळस म्हणजे राजकारण होय ! हरिभक्तीच्या प्रारंभानें राजकारणाच्या शेवटास जाणाऱ्या ह्या कार्याचा मधला दुवा—अखंड दंडायमान असा मधला सांधा—म्हणजे ही चतुरस्रता होय. हा दुवा जर निखळेल, व ह्या सांध्यावर जर पायाचा दाब ठेवून विचाररूप निशाणवाला योग्य निशाण

दाखविणार नाहीं, तर हरिभक्तिच्या स्टेशनावरून निघालेली गाडी राजकारणाच्या वळणावर न जातां मध्येंच कोठें तरी घसरून पडेल अथवा भलत्याच दिशेस भरकटत जाईल व–भटकत राहील !–इतकें ह्या " तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ " ह्या गुणाचें महत्त्व व कौतुक आहे ! खुद्द दासबोधांत प्रत्यक्ष राजकारणावर असे एकंदर तीनच समास असून बाकीच्या ऐहिक समासांतून ह्या चतुरस्रतेची, ह्या सावधपणाची, ह्या विचारी विवेकाचीच महती जागोजाग वर्णिली व सांगितली आहे. त्यावरूनही आमचें वरील अनुमानच दृढ व बळकट होत आहे, असें आम्हांत वाटतें. तरी केवळ पारंपरिक पद्धतीचा अवलंब येथें न करतां, स्वतंत्र बुद्धीचा स्वीकार करून, प्रथम आपण ह्या चतुरस्रतेचें स्वरूप पाहून मगच त्यावर उभारलेल्या राजकारणाच्या कळसाकडे आपण आपली नजर वळवूं, म्हणजे झालें.

तर याप्रमाणें ह्या चतुरस्रतेचा, चातुर्याचा, व सावधानतेचा विचार करतां आपणांस हें चक्क दिसून येतें कीं, हरिभक्तिच्या जंक्शनवरून राजकारणाच्या स्टेशनाकडे जाण्यास निघणाऱ्या गाडीला ह्या चतुरस्रतेच्या सांध्यावरून वळवून योग्य दिशेनें न्यावी लागते,व समर्थांनाही ती तशीच न्यावी लागली व त्यांनीं उपदेशही पण तसाच केलेला आहे. महंतानें, निस्पृहानें, खऱ्या हरिदासानें, आपल्या अमोघ व अचूक अशा वाणीनें ठायींठायीं लोकांना रिघल्यावर, व त्यांना आपल्या निरूपणाची चटक लावून सोडल्यावर, आपणांभोंवतीं गोळा झालेल्या हजारों लोकांना राजकारणाला उपयोगी असें ज्ञान–देशकालपरिस्थितीचें व धर्माचें ज्ञान–हळुहळू देण्यास सुरवात करावी; स्वतःकडे नम्रता घेऊन, बावळा वेष धारण करून, कोणाच्याही अंतःकरणाला धक्का न लावतां, खुद्द दुर्जन लोकांशीं सुद्धां वितंडवाद न करतां, त्यांशीं मिळून जावें; व लोकांच्या चालीनें चालून व लोकांच्या बोलीनें बोलून, हळुहळू सर्व लोक शहाणें करावें, व त्यांना युक्तिबुद्धीनें भरावें; लोकांचें अंतर म्हणजे हृदय जाणून,त्यांतच जे शहाणे असतील त्यांना हाताशीं धरून, जागोजाग गुप्तमंडळ्या स्थापन कराव्या, व फड नासूं न देतां भजनमहोत्सवाचा तडाखा लावून त्यांतच ठायींठायींचे सर्व लोक शहाणे होतील, हुशार होतील, राजकारणाला

पात्र होतील, असें करावें; कोणी धिःकारले, अपमान केला तरी तिकडे लक्ष्य देऊं नये, तर उलट लोकांच्या कळवळ्यानें कामच करीत रहावें— " महंते महंत करावें । युक्तिबुद्धीनें भरावें । जाणते करून विखरावें । नाना देशीं ।। " ह्याप्रमाणें सर्व गोष्टी कराव्या, पण अर्थात् सत्ता परक्यांची असल्यामुळें त्या गुप्तरूपानें कराव्यात—असें समर्थांचें सांगणें व शिकवण होती. अशा तऱ्हेनें उदंड समुदाय करून सर्वत्र सत्तेचें गुप्त निशाण फडकवावें, पण त्या सर्व उपाधी आपण पसरलेल्या असल्या तरी आपण मात्र त्यांत सांपडूं नये, ह्यांतच थोरपणा आहे, असें समर्थांचें सांगणें आहे. या सर्व चातुर्याच्या खुणांत परांतर जाणून त्याप्रमाणें वागणें ही खूण सर्वश्रेष्ठ होय, ह्यांत शंका नाहीं. कारण हिचाच उल्लेख—ह्या परांतर जाणण्याचा व दुसऱ्यास न दुखवतां कार्य करण्याचाच उल्लेख—चातुर्याच्या सदराखालीं दासबोधांत जागोजाग सांपडतो. अर्थात् वर सांगितलेल्या गोष्टीही त्यांत आहेतच. हें थोडक्यांत चातुर्याचें व सावधपणाचें सार होय. ह्याकामीं वाचकांची अधिक खात्री पटविण्याठीं आम्ही कांहीं वेचक ओंव्या खालीं देत आहोंत, त्या त्यांनीं पहाव्या म्हणजे झालें समर्थ म्हणतातः—

" संकेतें लोक वेधावा । एकूण एक बोधावा । प्रपंचही सावरावा । यथायोग्य ।। प्रसंग समयो ओळखावा । धीर बहुत असावा । संबंध पडो न द्यावा । अतिपरिचयाचा ।। उपाधीस विस्तारावें । उपाधींत न सांपडावें । नीचत्व पहिलेंच घ्यावें । आणि मूर्खपण ।। दोष देखोन झांकावे । अवगुण अखंड न बोलावे । दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनि ।। फड नासोंचि न द्यावा । पडिला प्रसंग सावरावा । अतिवाद न करावा । कोणी येकासी ।। दुःख दुसऱ्याचें जाणावें । ऐकोन तरी वाटोन घ्यावें । बरें वाईट सोसावें । समुदायाचें ।। अपार असावें पाठांतर । सन्निधचि असावा विचार । सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ।। शांति धरून धरवावी । क्रिया करून करवावी । तऱ्हे सांडून सांडवावी । बहुतांकरवीं ।। पुसो जाणे सांगो जाणे । अर्थांतर करूं जाणे । सकळिकांचे राखों जाणे । समाधान ।। आधींच शिकोन जो शिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी । गुंतल्या लोकांस उगवी । विवेक बळें ।। उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनांस शिकवावे । उदंड समुदाय करावे । परि गुप्तरूपें ।।

लोकीं बरें म्हणाया कारणें । भल्यास लागतें सोसणें । न सोसितां भंडवाणें । सहजची होय ॥ जंववरी चंदन झिजेना । तंववरी तो सुगंध कळेना । चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काय कळे । उत्तम गुण देखतां निवळे । जगदंतर ॥ जनीं जनार्दन वोळला । तरी काय उणे तयाला । राजी राखणें सकळांला । कठिण आहे ॥ पेरिलें तें उगवतें । उसणें द्यावें ध्यावें लागतें । वर्म काढितां भंगते । परांतर ॥ हें अवघेंचि आपणापाशीं । येथे बोल नाहीं जनासी । शिकवावें आपुल्या मनासी । क्षणक्षणा ॥ खळ दुर्जन भेटला । क्षमेचा धीर बुडाला । तरी मौनेंचि स्थळत्याग केला । पाहिजे साधकें ॥ दुसऱ्याचें दुःखें दुःखी व्हावें । परसंतोषीं सुखी व्हावें । प्राणीमात्रास मेळवून घ्यावें । बऱ्या शब्दें ॥ बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावें । आपल्या परीच व्हावे । पारिखे जन ॥ उदंड धिक्कारून बोलती । तरी चळों न द्यावी शांती । दुर्जनासी मिळोन जाती । धन्य ते साधू ॥ स्वयें आपण कष्टावें । बहुतांचे सोशीत जावें । झिजोन कीर्तीस उरवावें । नाना प्रकारें ॥ आपणास चिमोटा घेतला । तेणें कासावीस झाला । आपणावरून दुसऱ्याला । राखीत जावें ॥ पेरिलें तेंचि उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें । तरि मग कर्कश बोलावें तें । काय निमित्त? ॥ आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें । या कारणें भजनास लावावें । बहुत जन॥ अपमानितां शिणो नये । निखंदिता कष्टों नये । धिक्कारिता झुरों नये । कदा काळीं ॥ कठिण शब्द बोलों नये । कठिण आज्ञा करूं नये । कठिणता धरूं नये । कांहीं केल्या ॥ आपण दुसरीयास करावें । तेणें सर्वेचि उसनें घ्यावें । जना कष्टवितां कष्टावें । लागे बहू ॥ म्हणोन दुसऱ्यास सुखी करावे । तेणें आपण सुखी व्हावे । दुसऱ्यास कष्टविता कष्टावें । लागेल स्वयें ॥ समजले आणि वर्तले । तेचि भाग्य पुरुष झाले या वेगळे उरले । ते करंटे पुरुष ॥ हें आपणाकडेंच येतें । राजी राखिजे समस्तांतें । देहासी बरें करावें तें । आत्म्यासी पावें ॥ नयनेंचि पहावा नयन । मनेंचि शोधावें मन । तैसाचि हा भगवान । सकळां घटीं ॥ अंतर्निष्ठ जो पुरुष । तो अंतर्निष्ठेनें विशेष । जगामध्यें जो जगदीश । तो तयास वोळे ॥ जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिस-

ळावा । राहराहीन शोध घ्यावा । परांतराचा ! ।। जगदीश आहे जगदंतरा । चेटकें करावीं कोणावरी ? । जो कोणी विवेकें विवरी । तोचि श्रेष्ठ ।। जो जगदंतरें मिळाला । तो जगदंतरचि झाला । अरत्रीं परत्रीं तयाला । काय उणें ?।। बुद्धि देणें भगवंताचें । बुद्धिविना माणुस कोचें । राज्य सांडून फुकाचें । भीक मागे ।। ..................धूर्त आणि विचक्षणा । तेचि शोधावें । धूर्तासी धूर्तपण कळलें । तेणें मनास मन मिळालें । परी हें गुप्त रूपें केलें । पाहिजे सर्वथा ! ।। याकारणें मुख्य मुख्य । तयासीं करावें सख्य । येणें करितां असंख्य । बाजारी मिळती ।। वेश धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा । सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूंच नये ।। नाना जिन्नस पाठांतरें । निवर्ती सकळांचीं अंतरें । चंचळपणें तदनंतरें । सकळाठायीं ।। एके ठायीं बैसोन राहिला । तरी मग व्यापचि बुडाला । सावधपणें ज्याला त्याला । भेटी द्यावी ! ।। जो बहुतास मानला । तो जाणावा शहाणा झाला । जनीं शहाण्या मनुष्याला । काय उणें ? ।। वेडे करावे शहाणे । तरीच जिणें श्लाघ्यवाणें । उगेंच वादांग वाढवणे । हें मूर्खपण ।। दुसऱ्याचे चालीं चालावें । दुसऱ्याचे बोलीं बोलावें । दुसऱ्याच्या मनोगतीं जावें । मिळोनिया ।। हेकाडास हेकाड मिळाला । तेथें गलबलाच झाला । कलह उठता चातुर्याला । ठाव कैचा ? ।।धक्के चपेटे सोसावें । नचि शब्द सोशीत जावें । पस्तावोन परावे आपले होती ।। प्रसंग जाणोन बोलावें । जाणपण कांहींच न घ्यावें । लीनता धरून जावें । जेथें तेथें ।। सावधपणें सर्व जाणावें । वर्तमान आधींच घ्यावें । जाऊं ये तिकडे जावे । विवेकेंसहित ।। कुग्रामें अथवा नगरें । पहावीं घरांचीं घरें । भिक्षामिषें लहानथोरें । परीक्षून सोडावीं!।। नाना जिन्नस पाठांतरें । निवर्ती सकळांचीं अंतरें । लिहोन देतां परोपकारें । क्षमा सांडावी ।। जैसें जयास पाहिजे । तैसें तयास दीजे । तरी मग श्रेष्ठ होइजे । सकळां मान्य ! ।। भूमंडळीं सकळां मान्य । तो म्हणूं नये सामान्य । कित्येक लोक अनन्य । तया पुरुषीं !।। ऐसीं चातुर्याचीं लक्षणें । चातुर्यें दिग्विजय करणें । मग तयास काय उणें । जेथें तेथें ? ।। जो बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी । ऐसी हे समर्थ पदवी । विवेकें होते ! ।। जाणत्याचे जाणावे प्रसंग । जाणत्याचें घ्यावे रंग । जाणत्याचे स्फूर्तीचे

तरंग । अभ्यासावें ॥ ... ... ... जाणता राखेल तैसे राखावे । लोक राजी ॥ काया बहुत कष्टवावी । उत्कट कीर्ति उरवावी । चटक लावून सोडावी । कांहीं एक ॥ हेतु समजोन उत्तर देणें । दुसऱ्याचें जीवींचे समजणें । मुख्य चातुर्याचीं लक्षणें । तीं हीं ऐशीं ॥ नेणपण सोडूं नये जाणपणें फुगूं नये । नाना जनांचें हृदय । मृदु शब्दें उकलावें !॥ ठायीं ठायीं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा । प्राणिमात्र बोलवावा । आप्तपणें ॥ उच नाच म्हणो नये । सकलांचें निववावें हृदय!।......... जगामध्यें जगमित्र । जिव्हेंपाशीं आहे सूत्र । कोठे तरी । सत्पात्र शोधून काढावें ॥ कथा होती तेथें जावें । दूरी दीनासारिखें बैसावें । तेथील सकळ हरद्र घ्यावें । अंतर्यामीं !॥ तेथें भले आढळती । व्यापक तेही कळों येती । हळुहळूं मंदगती । रीघ करावा !॥ धूर्तपण सकळ जाणावें । अंतरीं अंतर बाणावें । समजल्यावीण शिणावें । कासयासी ॥ झिजल्यावांचून कीर्ति कैची । मान्यता नव्हे कीं फुकाची । जिकडे तिकडे होते ची ची । अवलक्षणें ॥ राखावीं बहुतांचीं अंतरें । भाग्य येतें तदनंतरें !। ऐसी विवेकाचीं उत्तरें । ऐकणार नाहीं ॥ तो परोपकार करीचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला । मग काय उणें तयाला । भूमंडळीं ! ॥ सकळांसीं नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें । अखंड कोणी एकाचे उणें । पडोचि नेदी ॥ न्यायनीति भजन मर्यादा । काळ सार्थक करी सदा । दरिद्रपणाची आपदा । तेथें कैची!॥ उत्तम गुणें शृंगारला । तो बहुतांमध्यें शोभला । प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा!॥ अंतरासि लागेल ढका । ऐशी वर्तणूक करूं नका !। जेथें तेथें या विवेका । प्रगट करी ॥ जयास कोणाचें सोसेना । जयाची निष्किंचन वासना । धिक्कारिता धिःकारिना । तोचि महापुरुष ॥ कोणास कांहींच न मागावें । भगवद्भजन वाढवावें । विवेकबळें जन लावावे । भक्तीकडे !॥ ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या । संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं !॥ अखंड हरिकथेचा छंद । सकळांस लागे नामवेध । प्रगट जयाचा प्रबोध । सूर्य जैसा !॥ दुर्जनासी राखे जाणे । सज्जनांसीं निववूं जाणें । सकळांचे मनींचें जाणें । ज्याचे त्यापरी ॥ जेंथ तथ नित्य नवा । जनांस वाटे हा असावा !। परंतु लालुचचा गोवा । पडोचि नेदी ॥

जिकडेतिकडे कीर्ति माजे । सकळ लोकांस हव्यास उपजे । लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ! ॥ जिकडे जग तिकडे जगन्नायक । कळला पाहिजे हा विवेक ! ।...........उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहूंकडे । भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया !॥ जाणती परी आढळेना ॥ काय करितो तें कळेना । नाना देशींचे लोक नाना । येऊन जाती ! ॥ तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकविचारें भरावीं । कडोविकडीं विवरावीं । अंतःकरणें ॥ फड समजावीस करणें । गद्यपद्य सांगणें । परांतरासीं राखणें । सर्वकाळ !॥ जितुके कांहीं आपणांस ठावें । तितुकें हळुहळू शिकवावें । शहाणे करून सोडावे । बहुतजन ! ॥ धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला । नानाबुद्धि शक्ताला । म्हणोनि शिकवाव्या । कीर्ति पाहतां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं ! । केल्यावीण कांहींच नाहीं । कोठें तरी ॥ धीर सांडिता काय होतें । अवघें सोसावें लागतें । नानाबुद्धी नाना मतें । शहाणा जाणे ! ॥ ''

असो. याप्रमाणें या शहाण्याच्या, चतुर पुरुषाच्या,सावधान महंताच्या खुणा सांगतां सांगतां बऱ्याच लांबल्या ! अर्थात् त्या सर्वांत परांतर परीक्षून, त्यांशीं मिळून जाऊन, त्याकरवीं काम करण्याच्या हातोटीची महती विशेष आहे. किंबहुना, “ तस्मात् लोकीं वर्तता नये । त्यास महंती कामा नये !। '' असें समर्थांचें स्पष्ट सांगणेंच आहे. निःस्पृह माणसाच्या अलिप्ततेच्या व्याख्या समर्थांच्या व इतरांच्या सारख्याच आहेत. पण “ निस्पृहस्य तृणं जगत् '' ह्या व्याख्येशीं—निदान तिच्या उत्तान अर्थाशीं तरी—समर्थांचा नक्की विरोध असून त्या निस्पृहानें सुद्धां,“वेड्यास वेडें म्हणो नये । वर्म कदापि बोले नये । तरीच घडें दिग्विजयें । निःस्पृहासि॥'' हें लक्षांत ठेवलें पाहिजे असें समर्थांचें सागणें आहे;असो. पण ह्याप्रमाणें बावळावेषधारी निस्पृहाच्या वागणुकीनें जी मौज होते,त्याचें तें प्रत्ययाचे बोल,ते बेगुमानपणें उठून जाणें,ती लोकांना चटक लावणें,ते गुप्तपणानें भूमंडळावर फडकणारे भावी स्वात्रंत्र्याचें निशाण,आणि राजकारणाच्या डौलाचा तो थाटयाचें किती म्हणून वर्णन करावें ! त्याचें सुंदर आणि बहारीचें चित्र समर्थांनीं खुद्द आपल्या वागणुकींतून दिलें आहे. त्यांतल्या चटका लावून सोडण्याच्या कांहीं थोड्याच ओंव्या खालीं देतों.त्या वाचकांनीं पहाव्याः—

" नाना जिन्नस उदंड पाठ । वदों लागला घडघडाट ।
आव्हाटांची केली वाट । सामर्थ्यबळें ! ॥ १५ ॥
प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणें सकळांचीं अंतरें ।
निरूपणीं तदनंतरें । चटक लागे ! ॥ १६ ॥
नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें ।
उदासवृत्तीच्या गुमानें । उठोन जातो ! ॥ १८ ॥
प्रत्यय बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला ।
नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ! ॥ १९ ॥
परी तो कोठें आढळेना । कोणें स्थळीं सांपडेना ।
वेष पाहतां हीन दीना-। सारिखा दिसे ! ॥ २० ॥
उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।
तेथें यशकीर्ति प्रतापें । सीमा सांडिली ! ॥ २१ ॥
खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे ।
सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ! ॥ २४ ॥
अवघड स्थळीं कठिण लोक । तेथें राहणें नेमक ।
सृष्टीमध्यें सकळ लोक । धुंडीत येती ! ॥ २५ ॥
लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद झाले ।
भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ! ॥ २६ ॥
ठायीं ठायीं उदंड तावे । मनुष्यमात्र तितका झोंबे ।
चहूंकडे उदंड लांबे । परमार्थ बुद्धी ! ॥ २७ ॥
उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोरथोर ।
प्रत्ययानें प्राणिमात्र । सोडाविले ! ॥ २८ ॥
ऐसें कवाड उदंड जाणें । तेणें लोक होती शहाणे ।
जेथें तेथें प्रत्ययो बाणे । प्राणिमात्रासी ! ॥ २९ ॥
ऐशी कीर्ति करोनि जावें । तरीच संसारासी यावें ।
दास म्हणें स्वभावें । संकेतें बोलिलों ! ॥ ३० ॥

–( दशक १५, समास २ रा ).

किती मौज आहे ही ! मॅझिनीनें हेंच केलें. किंबहुना, पारतंत्र्याच्य
रौरव नरकांतून वर डोकें काढण्यासाठीं धडपडणाऱ्या प्रत्येक स्वातंत्र्यप्रि

उदयोन्मुख राष्ट्राच्या भागोदयाचा भविष्यकाळ जेव्हां समीप येऊन ठेपतो, तेव्हां स्वातंत्र्याच्या सुप्रभातींचीं मंगलगीतें अशाच ठिकाणीं गायिलीं जातात ! त्या स्वातंत्र्याच्या अरुणाची पहिली प्रभा व कोमल किरणें अशाच दऱ्याखोऱ्यांतून प्रथम पडत असतात ! अर्थात् हिंदुस्थानच्या चालू काळीं " महाराष्ट्रधर्माची" संपूर्ण प्राणप्रतिष्ठा झाल्यास त्याच्या भाग्याचा व स्वातंत्र्याचा सूर्य लवकरच उदयाला येईल असा आमचा ठाम विश्वास असल्यामुळेंच आम्हीं हा धर्म इतका सविस्तरपणें सांगत आहोंत, हें आतां वाचकांच्या लक्षांत आलें असेलच. असो. तर ह्याप्रमाणें स्वातंत्र्याची प्रभा दऱ्याखोऱ्यांतून फाकल्यावर व त्याची मंगलगीतें वन्य देवता गाऊं लागल्यावर, मग स्वातंत्र्याचा सूर्य उदयाचलावर येण्यास कितीसा वेळ लागणार ? भीरुता, आलस्य, मोह, नादानपणा, इत्यादि भीषण रात्र संपून, त्यांचे काळेकुट्ट ढग स्वदेशाच्या क्षितिजापासून दूर झाल्यावर, व हरिनामाच्या गजराची, रामनामाच्या भजनमहोत्सवाची, व उदंडकष्ट, कार्यकुशलता, व चतुरस्रता ह्यांची सुमंगल प्रभात फाकल्यावर—ह्या ' पुण्याची पहाट फुटल्यावर '—मग चिन्मय अशा स्वातंत्र्यसूर्याचें मंडल स्वदेशाच्या क्षितिजावर झळकण्यास कितीसा वेळ लागणार ? एका आधुनिक कवीनें हीच कल्पना खालील गोड कवितेंत घातली आहे:—

" देश हिंदुचा हाय तयाचा मालक म्लेंछ ठरे । परि परमेशा फार दिवस हे रुचेल केवि बरें ॥ मग आर्यदेशतारणा । अधममारणा । कराया रणा । परदास्यरात्रिनाशाला । शिवनेरीं श्रीमान आला । स्वातंत्र्यसूर्य उदयाला।—"

अर्थात् स्वातंत्र्याचा सूर्य म्हणजे प्रत्यक्ष शिवबाच होत हें काय सांगायला पाहिजे ? ह्या सूर्याच्या तानाजी येसाजी बाजीसारख्या प्रखर किरणांच्या तळपत्या फेकींनें यावनी सत्तेची व यावनी छळाची दुर्दम्य निशा पार हटत चालली होती ! अफजुलखानाचा वध नुकताच झालेला होता. शिवबाचा भाग्यसूर्य भराभर मध्यान्हीकडे धांवत होता ! त्या तेजाकडे पाहून समर्थांना किती आनंद झाला असेल, बारा वर्षांच्या आपल्या तीर्थयात्रेंत व देशपरिभ्रमणांत पाहिलेल्या दुबळ्या व असहाय चित्रावर ही स्वातंत्र्याची सफेती चढतांना पाहून त्यांच्या शिणलेल्या डोळ्यांना किती सुख वाटत

असेल व शिवबाला कुठें ठेवूं आणि कुठें नको ठेवूं, असें त्यांस कसें झालें असेल, ह्याची खरी कल्पना समर्थांसारख्या शिणलेल्या जीवासच येणार आहे ! असो. ह्याच प्रसंगीं समर्थांची व शिवाजीची भेट झाली ! ती "चाफळ खोऱ्यांत शिंगणवाडीस एका औंदुबराच्या वृक्षाखालीं झाली अशी दंतकथा आहे." ("दा. प्रस्तावना" पृ. १९) अर्थात् ह्या भेटींत शिवबाच्या कौतुकाच्या रूपानें, महाराष्ट्रधर्माचें तिसरें अंग जें राजकारण, तेंच सर्व बाहेर पडलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां त्यांतील कांहीं वेचक ओंव्या खालीं देतों म्हणजे झालें; समर्थ आपल्या लाडक्या प्रेमळ व कर्तबगार शिष्याची पाठ थोपटीत व कौतुक करीत त्यास म्हणतातः—

" नाना वस्त्रें नाना भूषणें । केलें शरीरशृंगारणें ।
विवेकविचारें राजकारणें । अंतर शृंगारिजे ॥
समयासारिखा समय येईना । नेम सहसा चालेना ।
नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥
अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें ।
हट निग्रहीं न पडावें । विवेकी पुरुषें ॥
बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजा भोवानी ।
परंतु विचार पाहोनी । कार्य करणें ॥
अखंडचि सावधाना । बहुत काय करावी सूचना ।
परंतु कांहीं एक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥
म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुता दिवसांचें मांजलें बंड ।
या कारणें अखंड । सावधान असावें ॥
महायत्न सावधपणें । समयीं धारिष्ट धरणें ।
अद्‌भुतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ! ॥
यश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणांसी नाहीं सीमा ।
नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ! ॥
देवाचा कैंपक्ष घेणें । ब्राह्मणांची चिंता वाहणें ।
बहुत जनांस पाळणें । देणें ईश्वराचें ! ॥
धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
झाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ! ॥ "

( दशक १८ समास ६ ).

असो. याचप्रमाणें " जे सत्कीर्तीचे पुरुष । तोचि परमेश्वराचे अंश । धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥ " अथवा " राजे राज्य सोडून गेले । भगवंताकारणें हिंडले । कीर्तिरूपें पावन झाले । भूमंडळीं ! ॥ " अशा प्रकारचें इतरत्रही शिवबाचे कौतुक आधूनमधून चमकत असून राजकारणाचे डाव कसे खेळावेत याचा उपदेश "वनौकसा अपि लौकिकज्ञा वयम् " म्हणणाऱ्या कण्वाप्रमाणेंच म्हणणारे समर्थ—राजकारणांत मुरलेले समर्थ—जागोजाग करीत असून तो शिवबास व त्याच्या तत्कालीन सेवकांस अत्यंत उपयोगी असून, कोणच्याही काळीं वाचून त्याचें मनन करावें अशाच तोडीचा असल्यामुळें त्यांतून कांहीं मोजक्या ओव्या खालीं देत आहे त्या वाचकांनीं पहाव्या. ते सांगतात:—

" प्रसंग समयो ओळखावा । धीर बहुत असावा ।
संबंध पडों न द्यावा । अतिपरिचयाचा ! ॥
तऱ्हे भरोंच नये । सुचावे नाना उपाय ।
नव्हे तेंचि करावें कार्य । दीर्घप्रयत्नें ! ॥
करणें असेल उपाय । तरी बोलोन दाखवूं नये ।
परस्परेंचि प्रत्ययें । प्रचीतीसि आणावा ! ॥
राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच न द्यावें ।
परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥
लोक पारखून सोडावे । राजकारणें अभिमान झाडावे ।
पुन्हा मेळवून घ्यावे । दुरिल्यादुरी ॥
हिरवटासी दूरीं धरावें । कचरटासी न बोलावें ।
संबंध पडतां सोडून जावें । एकीकडे ॥
अखंड राहतां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते ।
याकारणें विश्रांती ते । घेताचि नये ! ॥
चोर भांडारी करावा । घसरतांच सांभाळावा ।
गोंवा मूर्खपणाचा काढावा । हळू हळू ! ॥
कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परि ते कळों न द्यावी ।
कळकटपणाची पदवी । असोंचि नये ! ॥
ऐकोनि आवडी लागावी । देखोनि बळकटचि व्हावी ।

सलगीनें आपली पदवी । सेवकांमध्यें ॥
नष्टासी नष्टच योजावे । वाचाळासी वाचाळ आणावे ।
आपणावरी विकल्पाचे गोंवे । पडोंचि नेदी ॥
कोणी एक काम करिता होतें । न करितां मागें पडतें ।
याकारणें ढिलेपण तें । असोंचि नये ! ॥
जो दुसऱ्यावरि विश्वासला । त्याचा कार्य भाग बुडाला ।
जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ! ॥
मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करावें ।
कित्येक खलक उगवावे। राजकारणामध्यें ! ॥
दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे ।
सज्जनापरीस आळवावें । महत्व देऊनी ! ॥
जनामध्यें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटपट ।
या कारणें ते वाट । बुझून टाकावी ! ॥
गलिमाच्या देखता फौजा । रणशूरांच्या फुरफुरती भुजा ।
ऐसा पाहिजे कीं राजा । कैंपक्षी परमार्थी ! ॥
जयास देखतां दुर्जन धाके । बसवी प्रचीतीचे तडाखे ।
बंड पाषांडांचे वाखे। सहजचि होती ! ॥
हीं धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें ।
ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊंच नये ! ॥ ''

याप्रमाणें सांगून पुढें " हुंब्यासि हुंबा लावून द्यावा " इत्यादि मागें सांगितलेला " मजालसीचा थाट " समर्थांनीं सांगितला आहे, व शेवटीं ते म्हणतात, " ऐसें असे राजकारण । सांगतां तें असाधारण । सुचित असतां अंतःकरण । राजकारण जाणे ! ॥ "—किती गोड आणि तेजस्वी हा उपदेश आहे बरें ! खऱ्या राजकारणी पुरुषानें त्याचें वाचन व चिंतन करावें तितकें थोडेंच, असें या ठिकाणीं निःसंशय वाटल्यावांचून राहत नाहीं ! असो.

याप्रमाणें " महाराष्ट्रधर्मा " चीं मुख्य जीं तीन अंगें—' हरिकथा-निरूपण, सर्व विषयीं सावधपण, व नेमस्तपणें राजकारण, ' त्यांचा विचार येथवर झाला. ह्याच " महाराष्ट्रधर्मा " चें

चौथेहि एक अंग असावें असें, " चौथा अत्यंत साक्षेप। फेडावे नाना आक्षेप, । " या समर्थांच्या उद्गारावरून स्पष्ट वाटतें. आणि तें उघडच आहे. हें चौथेहि एक अंग त्यांत असावें, व समर्थांनीं त्याचा उल्लेख व समावेश त्याच धर्मांत करावा, हें साहाजिक आहे. कारण नाना मतांचे व विविध प्रकृतींचे लोक खऱ्या कार्यकर्त्या देशभक्ताला व धर्मोपासकाला त्याच्या ठायींठायींच्या परिभ्रमणांत भेटावेत, हें सहाजीकच आहे. अर्थात् ह्या सर्वांचें समाधान केल्याशिवाय व त्यांचीं हृदयें आपल्या वाक्चातुर्यानें व वाक्पटवानें आपलींशीं केल्याशिवाय समुदायाला घेऊन कार्य करूं जाणाऱ्या कोणाही महंताला पुढें जातांच येणार नाहीं,हें उघड आहे. समर्थांनीं आपल्या जिवंत व जातिवंत कर्तबगारीच्या हयातींत अशा कितीतरी आक्षेपांचें व शंकांचें निरसन व समाधान केलें असलें पाहिजे, हें काय सांगायला पाहिजे ? पण त्यांनीं आपल्या हयातीपुरतेंच हें काम न करितां आपल्यामागें कीर्तिरूपानें चिरस्थायी राहणाऱ्या आपल्या दासबोधांतही हें कार्य जागोजाग केलेलें आहे, किंबहुना, श्रोत्यावक्त्यांच्या संवादरूपानेंच हा ग्रंथ लिहिला असून " मागा श्रोतीं आक्षेपिलें " त्याचें अमुक अमुक हें उत्तर घ्या व निरुत्तर व्हा, असें त्यांनीं जागोजाग सांगितलें आहे. उदाहरणार्थ, " मागा हरिकथेचें लक्षण । श्रोतीं केला होता प्रश्न । सावध होऊन विचक्षण । परिसोत आतां " ही १४ व्या दशकाच्या ५ व्या समासाची पहिली ओंवी हेंच सांगत आहे व हाच थाट दासबोधांत जागोजाग दृष्टीस पडत आहे. समोर जिज्ञासु, विचक्षण, व शंकित असे श्रोते बसले आहेत, व समर्थांचे त्यांच्या शंका व आक्षेपनिरसनपूर्वक कथन व निरूपण चाललें आहे अशा थाटाचा हा ग्रंथ आहे, तोही समर्थांच्या महाराष्ट्रधर्माचें वरील चौथें अंगच दाखवित आहे. अगदीं दासबोधाच्या प्रारंभासच–" श्रोते पुसती कोण ग्रंथ ? । काय बोलिलें जी येथ? । श्रवण केलियानें प्राप्त । काय होतें ? ॥ "–अशा तऱ्हेचा पहिल्या दशकाच्या पहिल्याच समासांत प्रश्न असून समर्थ त्याचें उत्तर देत आहेत असा देखावा दृष्टीस पडतो, तोही हेंच दाखवितो. असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, खऱ्या ज्ञानप्रसारेच्छु देशभक्तानें वा

धर्मभक्तानें ह्याला कंटाळून चालणार नाहीं, इतकेंच नव्हे, तर उलट उत्साहानें व नित्यनूतन आवडीनें त्यानें हें कार्य केलें पाहिजे, असें समर्थांचें सांगणें आहे. लोक पुनःपुन्हा विसरून तेच तेच प्रश्न करितात व कंटाळा आणतात, तसेंच कांहीं फाजील चिकित्सक भलतेच प्रश्न करून, भलत्याच विचारसरणीचा अवलंब करून, ती पुढें मांडतात, पण त्यामुळें खवळून जाऊन रागास येऊं नये, तर अत्यंत शांतपणें त्यांचें समाधान करावें, " अन्याय थोर अथवा अल्प। क्षमा करीत जावे ॥" व त्यांच्या शंकांचें उत्तर देऊन आपल्या कोटिक्रमानें त्यांना निरुत्तर करावें, पण ह्या " उपाधीस कंटाळूं नये " असें समर्थांचें सांगणें आहे. ते म्हणतात कीं खुद्द मलाही तसेंच करावें लागलें आहे:—

" कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें ।
विवरलेंचि विवरावें । पुन्हा निरूपण ! ॥ १ ॥
तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें ।
कां जे बिघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ! ॥ २ ॥ "
( दशक ११ समास ५ वा ).

ह्या त्यांच्या ओंव्या हेंच सांगत आहेत, व इतर कार्यकर्त्या पुरुषांनींही हेंच करावें, " न्यायें निष्ठुर बोलणें " क्वचित् करावें लागलें, तरी तें होता होईल तों टाळावें; व क्वचित् केल्यास " न्यूनपूर्ण क्षमा केलें। पाहिजे श्रोतीं । " " प्रसंगें बोलिलों स्वभावें । क्षमा कीजे ! ॥" इत्यादि नम्र वचनानें सज्जनांना संतुष्ट करावें, असें त्यांचें सांगणें आहे. पण मुख्य गोष्ट म्हणजे—

" नाना किंतु निवारिले । नाना संशयो छेदिले ।
नाना आशंका फेडिले । नाना प्रश्न ! ॥ "—

हाच दंडक व हाच नियम येथें पाळला पाहिजे, असें समर्थांचें निक्षून सांगणें आहे. कारण मागील तीन अंगांप्रमाणेंच ह्या चौथ्या अंगाचा, किंबहुना, खुद्द महाराष्ट्रधर्माचा व तत्प्रतिपादक समर्थांचा ह्या सर्व बाबतींत जर कोणचा एकच एक हेतू असेल, तर तो " अनन्य राहे समुदाव । इतर जनांस उपजे भाव । ऐसा आहे

अभिप्राव । उपायांचा ॥ " हाच होय ! अर्थात् सर्व समुदाय अत्यंत भाविकपणानें आपणाशीं अनन्य रहावा, त्याचें चित्त चांचल्यानें इतरत्र भटकूं नये, व याप्रमाणें आपल्या ओजस्वी, तडफेच्या, पण तितक्याच गोड व नम्र बोलानें हजारों जनवृंद आपल्या भजनीं लागल्यावर, बोटावर खेळणाऱ्या भिंगरीप्रमाणें त्या कार्यकर्त्या समाजाला वाटेल तिकडे भिंगरीप्रमाणें फेकतां यावें, हाच समर्थांचा वरील सर्व उपदेशांत—महाराष्ट्रधर्माच्या चारी अंगांच्या निरूपणांत—उद्देश आहे, हें वाचकांनीं आतां ताडलें असेलच ! पण हें व्हायचें कसें ? ही गोष्ट प्रत्येक मनुष्यास शक्य आहे काय ? स्वार्थलंपट, नादान, अशक्त, भीरु, विषयलोलुप, आळशी, इत्यादि दुर्गुणांनीं ग्रस्त अशा सामान्य समाजाच्या समुदायाला हें मुळींच शक्य नाहीं. तर त्याला विरक्त, निःस्पृह, तेजस्वी, व निधड्या छातीचेच कार्यकर्ते अलौकिक असे वीर पाहिजेत ! प्रत्यक्ष रणांगणावरचे शौर्य दाखविणारे वीर नव्हेत, पण त्याच बरोबर प्रसंग पडल्यास गुप्तरूपानें कार्य करणाऱ्या ह्या रामदासाच्या कुबडींत गुप्त रूपानें असणाऱ्या गुप्तीनें तेजस्वीपणानें बाहेर पडण्यासही मुळींच कचरूं नये, अशा तडफीचे कार्यकर्ते विरक्त वीर—देशासाठीं व धर्मासाठीं वैराग्याची व त्यागाची भगवी छाटी अंगावर चढाविलेले ब्रह्मचारी जवान—समर्थांना पाहिजे होते ! कारण " हा धकाधकीचा मामला । कैसा सोसे अशक्ताला । सर्व बुद्धी शक्ताला । म्हणोनि सांगाव्या ॥ " अशी त्यांची सांगी होती ! पण केवळ शक्तिसंपन्नच नव्हे तर ज्ञान, वैराग्य, निःस्पृहता, सावधानता, चातुर्य, युक्ति, इत्यादि गुणांनींही ते युक्त असले पाहिजेत, असें समर्थांचें सांगणें होतें ! कै. ना. गोपाळ कृष्ण गोखले यांचा " भारत—सेवक—समाज " एके काळीं ह्यांच तत्त्वावर निघण्याच्या बेतांत होता हें त्यांचे रा. साने यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून दिसून येत आहे. किंबहुना, परदास्यपंकांत लोळणाऱ्या जनतेची कींव येऊन, त्यांच्या उद्धारार्थ तळमळ लागलेला व त्यासाठीं खटपट करणारा कोणीही जळत्या जिवाचा देशभक्त व धर्माभिमानी, अशाच शिष्यांचा व कार्यकर्त्यांचा समूह अथवा पसारा आपणांभोंवतीं निर्माण करून, त्याकडून सुप्त झालेल्या समाजाला जागृतीच्या चैतन्याचे विजेचे झटके देऊन " उत्तिष्ठत ! जागृत ! प्राप्य वरान्नि-

बोधत!" ह्या प्रमाणें जनताजागृति करण्यास पहाणार हें उघड आहे! अर्थात् अशा प्रकारच्या शिष्याचे व महंताचे ठायीं कोणते गुण प्रामुख्यानें झळकले पाहिजेत म्हणजे तो दिग्विजय करण्यास समर्थ होईल, ही माहिती चालू काळांतही अत्यंत उपयुक्त असल्यामुळे ती आपण समर्थांच्या तोंडूनच आतां पुढील भागांत ऐकूं! म्हणजे झालें.

---

# भाग १४ वा.



समर्थ रामदासस्वामींच्या वेळीं राष्ट्र इतकें नादान आणि दुबळें बनलेलें असतांही, समर्थांनीं त्याच्या उद्धाराचा प्रयत्न कां बरें केला? केवळ शरीरानेंच नव्हे, तर मनानेंही षंढ बनलेली जनता त्यांच्या आवर्ती-भोंवर्तीं नाचत असतां व त्यांना आजुबाजूस दिसत असतां, अशा मुमूर्षु राष्ट्रपुरुषाच्या देहांत सुद्धां तें चैतन्य ओतण्यास कां बरें तयार झाले? कारण, राष्ट्रें कधींही मरत नसतात (Nations never die) हा सिद्धान्त त्यांना ठाऊक होता, हेंच याचें उत्तर आहे. प्रत्येक राष्ट्रांत व प्रत्येक देशांत 'जनी जनार्दन' ह्या न्यायानें एक प्रकारची चिच्छक्ति व चैतन्य भरलेलें असतें, कधीं तें प्रगट असेल तर कधीं तें सुप्तावस्थेंत दिसेल. पण अशा गुप्तरूपानें वास करणाऱ्या त्या चैतन्याला, त्या चिच्छक्तीला, जागृत करणारा तडफेचा व तेजस्वी उपदेशक—बोलघेवडा नव्हे, तर खरा कार्यकर्ता व कर्मवीर असा उपदेशक—मिळाल्यास तें राष्ट्र खडबडून जागें झालेंच पाहिजे! किंबहुना, 'आधीं केलें मग सांगितलें' अशा 'प्रचीतीचे बोल' बोलणारा सामर्थ्यवान् निःस्पृह वक्ता भेटल्यास त्याच्या तेजस्वी बोलानें राष्ट्रेंची राष्ट्रें हलून जातात व जादूच्या कांडीनें भारलेल्या पिशाचाप्रमाणें अथवा एखाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें त्या खऱ्या कवच्या नादाच्या पुंगीवर समाज हंसत, झुलत, व डोलत, तो कार्यकर्ता मार्गदर्शक नेईल तिकडे आनंदानें पण तितक्याच परवशपणें जात असतो, हें गोड सत्य समर्थांना माहीत होतें! व म्हणूनच—

"गुप्त तेंचि प्रगटवावें। असाध्य तेंचि साधावें।
कानडेंचि अभ्यासावें। निरंतर!॥

असा त्यांचा उपदेश आहे. एकदां आग लावून दिल्यावर ती भडकून सगळीकडे पसरलीच पाहिजे. यासाठीं आग लावून द्या, पुढचें काम फार सोपें आहे. " वन्हि तो चेतवावारे । चेततांचि चेततो ! । "– असें त्यांचें सांगणें असून, प्रत्यक्ष त्यांनींही आपल्या उज्ज्वल रामभक्तीच्या, दुर्दम्य देशभक्तीच्या, व अलोट उत्साहाच्या चैतन्याचा अग्नि समग्र महाराष्ट्रांत पेटवून दिला, आपल्या दहा हजार शिष्यशाखांच्या द्वारा त्या अग्नीच्या ज्वाळा व झळ देशाच्या अगदीं कोनाकोपऱ्यांत सुद्धां जाऊन भिडून, तेथला नादानपणाचा पाचोळा सर्व जळून जावा अशी व्यवस्था केली ! अर्थात् समर्थासारख्या सद्गुरूंनीं–" शिष्यास गुरुत्व प्राप्त " करून देणाऱ्या समर्थांनीं–" उपदेश करी बहुतजना । अंकित सद्गुरूचा ॥" अशा तोडीचे शिष्य कसे निर्माण केले, व त्यांच्या कडून सर्व समाज कसा हालता बोलता केला, हें पाहणें मोठें कौतुकाचें आहे ह्यांत मुळींच शंका नाहीं ! खुद्द समर्थांनीं १२ वर्षें पुरश्चरण करून व रामप्रीति संपादन करून, १२ वर्षें तीर्थयात्रा कशी केली, त्यांत त्यांना कोणकोणचे भिषण देखावे दिसले, व त्यावर उपाय म्हणून राष्ट्राची नाडी हातांत घेऊन त्याची परीक्षा करणाऱ्या ह्या धन्वंतऱ्यानें त्यावर कोणच्या ' हेमगर्भ ' मात्रेचा उपाय योजला, त्याचा विचार मागील दोन प्रकरणीं येऊन गेलाच आहे ! आतां आपणांस त्या मात्रेचे वळसे घरींदारीं नेऊन पोंचाविणारे परिचारक, त्या उत्साहाची आग ऊर्फ वन्हि जागोजाग चेतवून सोडणारे चळवळये, व प्रसुप्त व सुन्न अशा राष्ट्रपुरुषाच्या देहांत चैतन्याचा झोत आपल्या अमोघ वाणीनें सोडून देणारे खरे रामदासी, त्या रामदासांनीं कसे निर्माण केले, त्या कामीं कोणकोणचीं लक्षणें त्यांनीं ठरविलीं, तें पाहणें आहे ! असो.

गेल्या भागाचे शेवटीं आम्हीं सांगितलेंच कीं, समर्थांचा ह्या महाराष्ट्र-धर्मप्रवर्तनात एकच हेतू होता, व लोकसंग्रहाच्या अधिष्ठानावर विराजमान होणाऱ्या त्या धर्माचा तो हेतू योग्यच होता–कीं–" अनन्य राहे समुदाव । इतर जनींस उपजे भाव । ऐसा आहे अभिप्राव । उपायांचा ॥ "–अर्थात् जे उपाय करायचे त्यानें हजारो, नव्हे, लाखो लोकांचा समुदाय अनन्य राहिला पाहिजे, एवढेंच नव्हे, तर तो

पाहून इतरही शेंकडो लोकांना त्याविषयीं आस्था, आवड, किंबहुना चटक उत्पन्न व्हावी, व ह्या मार्गाला आपण जावून मिळावें, असें त्यास वाटलें पाहिजे, अशा प्रकारचा अंतर्बाह्य थाट व वैभव त्यांत डुलत व खुलत असलें पाहिजे, असें समर्थांचें सांगणें असून, त्यांनीं आपल्या महाराष्ट्रधर्माच्या चारी अंगांचें जें विवरण केलें आहे, त्याचें सविस्तर प्रतिपादन गेल्या भागांत येऊन गेलेंच आहे. पण अशा प्रकारच्या चारी अंगांची तेजस्वी तडफ जनतेंत जागृत करायची म्हणजे त्याला त्या तत्त्वप्रतिपादकाचे ठायीं कांहीं विशिष्ट गुण असावे लागतात, व तसे ते असले तरच समाज ऊर्फ जनता जागृत होऊन त्याकडे आकर्षिली जाते, हें उघड आहे. अर्थात् समाजाचें हृदय काबीज करून, तें आपणाकडे कायमचें खेंचून घेण्यासाठीं, शिष्याचे ठायीं प्रथम दोन गोष्टी असल्या पाहिजेत, असें समर्थांचें सांगणें आहे. ते म्हणतात:—

" आतां समुदायाकारणें । पाहिजेत दोनीं लक्षणें ।
श्रोतीं येथें सावधपणें । मन घालावें ॥ ३६ ॥
जेणें बहुतांस घडे भक्ती । ते हे रोकडी प्रबोधशक्ती ।
बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥
मागा बोलिले उत्तम गुण । तयास मानिती प्रमाण ।
प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चाले ॥ ३८ ॥
बोलण्या सारिखें चालणें । स्वयें करोनि बोलणें ।
तयाचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं ! ॥ ३९ ॥
जें जें जनासी मानेना । तें तें जनही मानीना ।
आपण एकला जन नाना । सृष्टीमध्यें ॥ ४० ॥
म्हणोन सांगाती असावें । मानत मानत शिकवावें ।
हळुहळू शेवटा न्यावें । विवेकानें ! ॥ ४१ ॥
परंतु हीं विवेकाचीं कामें । विवेकी करितील नेमें ।
इतर बापुडे भ्रमें । भांडोंच लागती ॥ ४२ ॥
बहुतांशीं भांडता एकला । सेनेवांचून पुरवला ।
या कारणें बहुतांला । राजी राखावें ! ॥ ४३ ॥

( दशक १२, समास १० ).

हा सर्व उतारा फार महत्त्वाचा असून आधुनिक महात्म्यांनीं विशेषतः त्यांतील उत्तरार्धाचें सेवन केल्यास खरोखरच त्यांच्या ‘ भ्रमाच्या भांडणाला उतारा पडेल असें आम्हांस वाटतें. असो. सांगण्याचा भाग इतकाच कीं, वरील ओव्या फार महत्त्वाच्या असून त्यांत समर्थांनीं दोन तीन गोष्टी फार मुद्याच्या सांगितल्या आहेत, हें वाचकांच्या लक्षांत आतां आलें असेलच. समर्थ म्हणतात, ज्याला समुदाय करावयाचा आहे, आपल्या भोंवतीं हजारो जनसंमर्दाचें जाळें विणून त्यांत परकीय सत्ता व परधर्माचा जुलूम ह्यांना पकडून नाहींसें करावयाचें आहे, लाखो लोकांचें वलय ज्याला आपल्या भोंवतीं भिंगरीसारखें फिरवावयाचें आहे, अशा त्या महंताच्या-त्या कार्यकर्त्या पुरुषाच्या-मनाची मधली बैठक अत्यंत खंबीर, तेजस्वी, व स्थिर असली पाहिजे, अत्यंत वेगानें गरगर फिरणाऱ्या चाकाचा मध्यबिंदु जसा स्थिर असतो—सर्वांना फिरायला लावून व सर्वांबरोबर फिरून आपण पुन्हा जसा निश्चलच असतो—भासतो—वा—दिसतो—त्याप्रमाणेंच खऱ्या महंताच्या कामागिरीची कर्तबगारी उठून दिसली पाहिजे असें समर्थांचें सांगणें आहे! अर्थात् असें व्हायला, त्या मध्यबिंदुप्रमाणेंच अत्यंत चलायमान असून अचल दिसायला, अशा महंताला व अशा कार्यकर्त्या पुरुषाला दोन गोष्टींची अत्यंत जरूर आहे, असें समर्थ म्हणतात. अशा त्या दोन गोष्टी कोणच्या? ज्यांच्या जोरावर सर्व समाज त्या महंताभोंवतीं भिंगरीसारखा फिरत असतां त्याच्या मध्यबिंदुप्रमाणें जो स्थिरच दिसेल—सर्व समाजाचा सूत्रचालक, प्रवर्तक, व आंदोलक असूनही जो ध्रुवासारखा अढळ भासेल—असे ते दोन गुण कोणचे बरें? अर्थात् त्या दोन गुणापैकीं एक म्हणजे, समाजचे समाज हालून जातील व कार्यप्रवीण होतील असे तेजस्वी तेजाचे बोल, व विजेच्या कडकडाटाप्रमाणें छातींत घुसून जाऊन तेथील केरकचरा व मळ धुऊन काढून तीं हृदयें शुद्ध व कार्योन्मुख करणारा जाज्वल्य उपदेश होय. “जेणें बहुतास घडे भक्ती। ते हे रोकडी प्रबोधशक्ती!।” असें समर्थ म्हणतच आहेत. अर्थात् भक्ति म्हणजे नुसती ईश्वरभक्ति नव्हे, तर तिच्या पायावर अधिष्ठित झालेली देशभक्ति! ही ज्यामुळें सुचते व घडते अशा प्रकारची जागृति देणारे ते जागृतीचे बोल असतात—ती प्रबोधशक्तीची दिव्य वाणी

असते ! आलस्य, मोह, वैभव, इत्यादिकांच्या आमिषांची ' अंगाई गीतें ' गाऊन परदास्याची विवशी ह्या जीवाला परदास्याच्या पाळण्यांत निजवायला पहात असतें; अर्थात् "उठा, जागे व्हा, ही पहा स्वातंत्र्याची प्रभा बाहेर फाकली आहे; हा पहा स्वातंत्र्याचा सूर्य क्षितिजावर झळकत आहे; हे पहा त्याचे पहिलेवहिले कोवळे किरण सर्वत्र विखुरले आहेत!" अशा तऱ्हेची जागृतीची भेरी, जागृतीचें रणशिंग, व जागृतीची तुतारी, समाजांतील निद्रिस्त जीवांच्या कानांशीं वाजवून, त्यांना जागृत करणारे व त्यांच्या हातीं समशेरी देऊन परदास्याच्या शृंखला तटातट तोडण्यास लावणारे जे जिवंत बोल—कीं, ज्या बोलांच्या पखवाजांतून एकीकडून रामभक्ती व दुसरीकडून देशभक्तीचा ध्वनि सारखा घुमून घुमून निघत आहे, असे ते खणखणीत बोल—म्हणजे प्रबोधशक्ति होय ! हा एक गुण झाला; व दुसरा गुण म्हणजे "बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे॥" अर्थात् तें मनोगत हातीं घेण्याचें चातुर्य व कळाकुसरी साधली पाहिजे, हा दुसरा गुण होय ! ह्या दुसऱ्या ' बहुतांचें मनोगत हातीं ' घेण्याच्या गुणाचें महत्त्व किती आहे, हें महाराष्ट्रधर्माच्या चतुरस्रतेच्या अंगांत त्याचा प्रामुख्यानें उल्लेख आलेला आहे यावरूनच सिद्ध होत आहे. कोणाच्याही अंतःकरणास ढका न लावता कार्य करणें, ' परांतरास न लावावा ढका ' असें वागणें ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं ! घरच्या चार माणसांच्या संसारांत सुद्धां सर्वांच्या सतारीच्या सुरेल तारा लागत नाहींत, मग घराबाहेर पडल्यावर तर काय, बोलायलाच नको ! हजारो जातींचे, हजारो पेशांचे, व हजारो स्वभावांचे लोक भेटणार ! त्या सर्वांना खुष ठेवून, त्यांच्यावर आपली छाप बसवून, त्यांना आपल्या गुणांची चटक लावून, आकाशप्रांगणांतून तुटणाऱ्या तेजस्वी ताऱ्याप्रमाणें, आपल्या अध्यात्मिक वैभवाच्या प्रकाशानें झगझगत गांवोगांव फिरत राहणें, व सर्व समाज आपलासा करणें, ही गोष्ट सोपी नाहीं ! " कठिण आहे जनार्दना । राजी राखणें ! ॥ " असें समर्थ म्हणतात तें उगाच नाहीं. एवढे लोकमान्य टिळक, पण संतापाच्या भरांत " हा म्हातारचळ कां पोरखेळ ? " " हे आमचे गुरुच नव्हत ! " इत्यादि प्रकारचे उद्गार त्यांनीं कित्येकदां काढून मवाळांना व सुधारकांना त्यांनीं

दुखाविले आहे, व कित्येकांच्या मर्मावर तर इतके तीव्र वाग्बाणांचे आघात त्यांनीं केले कीं, ते जन्मभरसुद्धां विसरणें शक्य नाहीं. अर्थात् हा दोष जर त्यांचे ठायीं नसतां तर ह्याहूनहीं मोठा असा विद्वानांचा कार्यकर्ता संघ त्यांस मिळून, देशाचें एकंदर पाऊल पुढेंच पडलें असतें, असें जे देशांतील कित्येक वयोवृद्ध पुढारी सांगतात, त्यांत मुळींच अर्थ नाहीं असें नाहीं. " दुर्जनांशीं मिळोनि जाती । धन्य ते साधू ।। " असें रामदासांनीं उगाच कां म्हटलें आहे ? हा गुण कै. न्या. रानडे यांच्या ठायीं किती उत्कटत्वानें वसत होता, याचा मासला त्यांच्या तर चरित्रांत सांपडेलच; पण खुद्द नरसोपंत केळकरांनी लिहिलेल्या "टिळक-, चरित्रां"तही आपणांस तो वाचावयास सांपडतो व त्याप्रसंगीं निःपक्षपाती केळकरांनीं टिळकांची मुळींच तरफदारी न करतां थोरपणाचें माप पुरेपूर रानड्यांच्याच पदरांत टाकलें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! असो.

तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, असा हा दुसरा गुण फार दुर्मिळ व म्हणूनच तितकाच महत्वाचा आहे, ह्यांत मुळींच शंका नाहीं ! यासंबंधीं पुष्कळशा ओव्या आम्हीं चतुरस्रतेचें निरूपण करतांना मागें दिल्याच आहेत. यासाठीं, येथें फक्त एकच महत्त्वाचा असा ५।७ ओव्यांचा उतारा देतों म्हणजे झालें ! समर्थ म्हणतातः—

" वर्तायाचा विवेक । राजी राखणें सकळ लोक ।
हळुहळूं पुण्यश्लोक । करीत जावें !।। २३ ।।
मुलांचे चालीनें चालावें । मुलांच्या मनोगतें बोलावें ।
तैसें जनास शिकवावें । हळुहळू !।। २४ ।।
मुख्य मनोगत राखणें । हींच चातुर्याचीं लक्षणें ।
चतुर तो चतुरांग जाणे । इतर ते वेडे ! ।। २५ ।।
वेड्यास वेडे म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये ।
तरीच घडे दिग्विजय । निःस्पृहासी ! ।। २६ ।।
उदंड स्थळीं उदंड प्रसंग । जाणोनि करणें यथासांग ।
प्राणिमात्रांचा अंतरंग । होऊन जावें ! ।। २७ ।।
मनोगत राखोन जातां । परस्परें होय अवस्था ।
मनोगत तोडितां व्यवस्था । बरी नव्हे ।। २८ ।।

या कारणें मनोगत । राखील तो मोठा महंत ! ।
मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ! ॥ २९ ॥

( दशक १३, समास १० ).

याशिवाय " आतां समुदायाकारणें " इत्यादि वरील ओंव्यांत याचा उल्लेख आला आहेच. तोही महत्त्वाचा आहे, हें आम्ही तेथेंच सांगितलें आहे. असो. ही झाली ' मनोगत हातीं ' घेण्याची व्यवस्था ! पण प्रबोधशक्तीचें काय? 'प्रबोधशक्ति' म्हणजे काय तें कळलें. पण ही शक्ति अंगीं कशी यायची ? अथवा ती अंगीं कशी बाणवून घ्यायची ? कोणाच्या शब्दांत असें सामर्थ्य वास करतें ? हें सामर्थ्य जन्मतःच असतें कीं आपल्या गुणांवर कमावितां येतें ? इत्यादि अनेक प्रश्न येथें या बाबतींत उभे राहातात, त्यांचें उत्तर काय ? त्यांचें उत्तर समर्थांनीं दिलें आहे काय ? होय वाचक ! त्यांचेंहि उत्तर समर्थांच्या मार्गदर्शक ग्रंथांत दिलेलें असून तें मी तुम्हांस सांगतों. "धीर धरा धीर धरा तकवा। हडबडूं गडबडूं नका ! । " एवढीच आमची तुम्हांस त्या कामीं विनंति आहे. ऐका, समर्थ काय म्हणतात ते. ते सांगतातः—

" रूपलावण्य अभ्यासितां न ये । सहज गुणास न चले उपाय ।
कांही तरी धरावी सोय । आगंतुक गुणाची ! ॥ १ ॥
काळें माणूस गोरें होईना । ओंढाळास यत्न चालेना ।
मुक्यास वाचा फुटेना । हा सहज गुण ! ॥ २ ॥
आंधळें डोळस होईना । बहिरें तेंहि ऐकेना ।
पांगुळ पाय घेईना । कांहीं केल्या ! ॥ ३ ॥
कुरूपतेचीं लक्षणें । किती म्हणोन सांगणें ।
रूपलावण्य या कारणें । पालटेना ! ॥ ४ ॥ "

( द. १४, स. ६ ).

याप्रमाणें सहजगुण जे आहेत, ते सहजात असल्यामुळें दुर्मिळच नव्हेत, तर अलभ्य आहेत. आणि ' बुद्धि देणें ईश्वराचें । बुद्धिविना माणूस काचें । ' ह्या वचनाप्रमाणें नैसर्गिक बुद्धिची तरतरी, धडाडी, तडफ, सूचिग्राहकता, इत्यादि गुण सर्वत्र सारखेच दिसतील असेंहि नाहीं. नाहीं तर सगळेच शिवाजी, रामदास, अथवा नाना फडणीस झाले असते.

पण तसे जरी नसले, तरी एकंदरींत चातुर्य, हुशारी, शहाणपण, चतुरस्रता, अक्कल, 'आपला मगज राखणें' हें गुण, जन्मजात फारसे नसून ते मुख्यत्वें स्वतःच्या कष्टानेंच प्राप्त होणारे आहेत, असें समर्थांचें सांगणें आहे. नाहींतरी, दैहिक सौंदर्याला जर आंतरिक शृंगाराची जोड नसेल तर "गोरा गोमटा अन् कपाळ करंटा" अशा त्या बाह्य लावण्याची तरी काय शोभा ? समर्थ म्हणतात,—

"देह नेटकें शृंगारिलें । परी तें चातुर्येंवीण नासलें ।
गुणेंवीण साजिरें केलें । बाष्कळ जैसें ! ॥ ९ ॥
चातुर्यें शृंगारें अंतर । वस्त्रें शृंगारें शरीर ।
दोन्हींमध्यें कोण थोर । बरें पहा ! ॥ १८ ॥
बाह्यात्कारें शृंगारिलें । तेणें लोकांच्या हातांस काय आलें ? ।
चातुर्यें बहुतांस रक्षिलें । नानापरी ! ॥ १९ ॥"

(दशक १४ समास ६).

आणि शिवाय वर सांगितल्याप्रमाणें हे 'आगंतुक गुण' पुष्कळसे प्राप्त करून घेतां येतात. मग त्यांवांचून कां बरें उगाच राहावें, व राजाचें वैभव भोगण्याचें सामर्थ्य असतां भणंगाभिकाऱ्याची भाग्यदेवता काय म्हणून पसंत करावी ? :—

"अवगुण सोडितां जाती । उत्तम गुण अभ्यासितां येती ।
कुविद्या सांडून अभ्यासिती । शहाणे विद्या ! ॥ ५ ॥
मूर्खपण सांडितां जातें । शहाणपण शिकतां येतें ।
कारभार करितां उमजतें । सकळ कांहीं ! ॥ ६ ॥
ऐशी प्रचीत येते मना । तरी स्वहित कां कराना ? ।
सन्मार्गें चालतां जाणा । सज्जनां मानें ! ॥ ७ ॥
मान्यता आवडे जीवीं । तरी कां उपेक्षा करावी ? ।
चातुर्येंवीण उंच पदवी । कदापि नाहीं ! ॥ ८ ॥"

(दशक १४ समास ६).

असें समर्थ म्हणतात'ते यासाठींच; आणि "अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर । " इत्यादि सर्वच सौंदर्याचा अंतर्बाह्य थाट असेल तर तो नको थोडाच आहे ! पण मुख्य गोष्ट आंतर शृंगाराची

असल्यामुळे ती यत्न–साध्य आहे, हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे! पण हें ओज, हे तेज, हें सामर्थ्य, ही कळकळीची खरी तार वक्त्याच्या आवाजांत केव्हां छेडली जाते व तिचा प्रतिध्वनि श्रोत्यांच्या हृदयांत केव्हां घुसतो बरें ? अर्थात् गाद्यागिरद्यांवर लोळून होणारें व्यासपीठावरील वक्तृत्व म्हणजे नाटकी राणा भीमदेवाचें आवेशपूर्ण भाषण होय ! त्या वक्त्याच्या वाक्गंगौघाला खरी किंमत, खरी पावनता, खरी शुचिता, आणि खरी लोकोद्धारकता, तेव्हांच येते कीं जेव्हां, तो वाक्गंगौघ त्या वक्त्याच्या सक्रिय कर्तबगारीच्या भगीरथानें आपल्या पाठोपाठ वाहून आणला असेल तेव्हां, जेव्हां ते बोल प्रचीतीचे असतील तेव्हांच होय ! म्हणूनच " आतां समुदायाकारणें " ह्या प्रारंभीच्या मुद्देसूद उताऱ्यांत " प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चाले ।। " असें म्हणून समर्थांनीं त्याच्याच पुढच्या ओंवींत "बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करोनि बोलणें । तयाची वचनें प्रमाणें । मानिती जनीं ! ।। " अर्थात् " जैसें मुखें ज्ञान बोले । तैसींच सर्वे क्रिया चाले । " अशा प्रकारच्या मनुष्याच्याच कळकळीच्या बोलाला किंमत आहे, आणि ती किंमत फार मोठी आहे–त्या किंमतीची योग्यता–खरीखरी योग्यता–आजही पुष्कळांना कळत नाहीं, असें म्हणणें भाग आहे ! कारण, तसें नसतें तर निष्क्रिय वाक्पांडीत्य ज्याच्या त्याच्या जिव्हाग्रीं इतकें खेळतें ना, व लोकही इतके थंडगार रहातेना ! " करुनियां दावीं । त्याचे पाय माझे जीवीं ! ।। " म्हणणारे तुकोबा वेडे होते काय ? " बोले तैसा चाले । त्याचीं वंदावीं पाउलें ! ।। " असें त्यांनींच म्हटलें आहे तें उगीच नाही–कांहींतरी ओळ भरावयाची म्हणून हें त्यांनीं लिहिलेलें नाहीं ! पारतंत्र्याच्या रौरवनरकांत पिचत पडलेल्या विसाव्या शतकांतल्या अधःपतित समाजाला ' जसा उच्चार तसा आणि तसाच आचार ' ह्यांत केवढी जादू भरलेली आहे, ह्याची कदाचित् कल्पनाही होणार नाहीं. पण म्हणून त्याचें महत्त्व–"यः क्रियावान् स पंडितः" ह्या तत्त्वाचें महत्त्व–मुळींच कमी होत नाहीं. " बोल बोलता वाटे सोपे, करणी करतां टीर कांपे " ही म्हण हेंच सांगते–ह्या तत्त्वाप्रमाणें वागणें किती कठिण आहे व म्हणूनच महत्त्वाचें आहे हेंच दाखवीत आहे ! "वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रिया आधीन झालों देवा !।। " अशा

त-हेचा कबुलीजबाबच बहुतेकांना—वाक्पाटवानें जगास झुलविण्याचा यत्न करणाऱ्यांपैकीं शेकडा ९९ लोकांना—द्यावा लागतो; त्याचें तरी कारण हेंच कीं, बोलतो तसें वागणें, ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाहीं—ती सुळावरची पोळी आहे! अगदीं क्षुल्लक गोष्टीचें आचरण घेतलें, तरी त्यांत सुद्धां आलस्य, मोह, इत्यादि शत्रूंला जिंकावें लागतें. त्यांना जिंकून त्यावर आपल्या अध्यात्मिक बळानें थै थै नाचावें, तेव्हांच लोकांत वाहवा व कीर्ति होते. लोक कांहीं खुळे नाहींत! खरा कर्मवीर कोण व नुसता वाक्पंडित कोण ह्याची पारख जनतेला पूर्ण असते.—व म्हणूनच अशा वाचिवीर्य अशा पाचोळ्यांना एका बाजूला किनाऱ्यावर फेकून देऊन, खऱ्या वजनदार व कार्यकर्त्या वक्त्याचेंच वक्तृत्वतारूं जनतासागर डौलानें आपल्या छातीवर मिरवीत असतो! कितीही मोठा पंडित झाला, तरी ज्या कामीं तो लंगडा पडेल, त्याचें आचरण कुचराईचें होईल, तेवढ्यापुरतें त्यास खड्यासारखें टिपून काढण्याचेंही समाजाला प्रसंगीं समजतें, हें कोणीही विसरूं नये! अर्थात् जसा उच्चार तसा आचार, हीच खरी मोठेपणाची, थोरवीची, पांडित्याची, व विद्वत्तेची कसोटी असून, त्या कसोटीवर घासून जो हीणकस ठरणार नाहीं, तोच बावनकशी तेजानें तळपत राहील, हें काय सांगायला पाहिजे? ही परीक्षेची कसोटी जनतेच्या हृदयांत पुरेपुर ठसलेली असून, "प्राप्ते परीक्षासमये काचः काचो मणिर्मणिः" ह्या म्हणीप्रमाणें हिरा आणि गारगोटी ह्याची परीक्षा तिजजवळ झाल्यावांचून राहत नाहीं! एवढे न्या. रानडे, पण विधवाविवाहावर व्यासपीठावरून व्याख्यानें देऊन शेवटीं त्यांनीं वडिलांच्या वैतागास बळी पडून एका कुमारिकेशींच लग्न लाविलें कीं नाहीं? अशा जनतेच्या आक्षेपाला समर्पक उत्तर खुद्द त्यांचें त्यांनाही देतां आलें नाहीं; मग इतरांची काय कथा? हें उदाहरण देण्यांतला हेतू इतकाच कीं, उच्चार तसा आचार हें तत्त्व दिसायला जरी गोंडस दिसलें तरी त्याप्रमाणें आचरण करणें महाकर्म कठिण आहे—ती सुळावरची पोळी आहे! पण अशी सुळावरची पोळी खाऊन व लोखंडाचे चणे पचवून ब्रह्मपदीं नाचणारे कार्यकर्ते तडफदार वीरच समर्थांना हवे होते! खुद्द ते स्वतः अशा असामान्य कोटीच्या वीरांचे अग्रणी व मेरुमणी होते व

स्वदेशाच्या व स्वधर्माच्या पायावर व्हावयाच्या माळेंत इतरही मणी आपल्याच तोलाचे मिळावेत अशी त्यांची इच्छा होती ! म्हणूनच त्यांनीं आपल्या सर्व शिष्यांना कळकळीचा उपदेश केला, कीं बाबांनो—

" क्रियेवीण शब्दज्ञान । तेंचि श्वानाचें वमन ।
भले तेथें अवलोकन । कदापि न करिती ! ॥ "—

यासाठीं—

" जैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें ।
मग महंतलीळा स्वभावें । अंगीं बाणे ! ॥ "—

म्हणून—

" आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें ।
आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ! ॥ "

( ११–१०–१७ ).

कोणचीही गोष्ट करावयाची ती आपण आधीं स्वतः करा, तिचा स्वतः अनुभव घ्या, व मग दुसऱ्यास तिचा उपदेश करावयास जा, म्हणजे त्या तुमच्या उपदेशांत स्वानुभवाची कळकळ दिसून येईल, व त्या कळकळीचें तेज तुमच्या श्रोत्यांवर पडून, " दीपें दीपू लाविला! "अशी स्थिति होऊन जिकडेतिकडे उजेडच उजेड होईल, व मग अज्ञान व आलस्य ह्यांच्या घोर निद्रेचें नांवसुद्धां ऐकू येणार नाहीं ! पण तेंच जर तुम्ही केवळ गाद्यागिरद्यावर लोळून, नुसतें तोंडाचें पांडित्य करून तोंड-पाटिलकी कराल व उंटावरून शेळ्या हकायला पहाल,तर तुमच्या शब्दाला कवडीची सुद्धां किंमत न येतां तुमचें लोकांत हंसू होईल ! " लोकां सांगे ब्रह्मज्ञान आणि आपण कोरडा पाषाण " किंवा " आपण हंसे लोकांला अन् शेंबुड आपल्या नाकाला ! " असली हास्यास्पद स्थिति मात्र त्यामुळें तुम्ही आपली करून घ्याल—दुसरेंतिसरें तर कांहीं व्हायचें नाहीं; ह्यापेक्षां अधिक काय सांगू ? यासाठीं " क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ! । " किंवा " वर्तल्यावीण बोलावें । ते शब्द मिथ्या!॥ " हें लक्षांत ठेवून, " क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ " ( ११–५–१६ )—स्वतः क्रिया करा व मग ती दुसऱ्याकडून करायला

जा, तरच तुम्हांस यश येईल, असें समर्थांचें आपल्या शिष्यांस कळकळीचें सांगणें होतें! चालू काळच्या चळवळींनां व व्याख्यानांना यश न येण्याचें कारण " सांगोचि जाणती सर्व । कर्ता कोणी असेचिना!॥ " हेंच नव्हे काय? धुळ्याचे रा. देवही म्हणतात:—" आपलीं व्याख्यानें फोल कां होतात याचें कारण कांहीं निराळें शोधावयास पाहिजे काय? आचार, विचार, व उच्चार यांत एकवाक्यता पाहिजे. स्वत: केल्यावांचून दुसऱ्यास करण्यास सांगणें व्यर्थ होय! " ( दा. प्रस्तावना पा. ८ ) किंबहुना, " करंटे मिळाले सर्व । जो तो बुद्धीच सांगतो । " अशा रीतीनें केवळ वायफळ व निष्क्रिय बडबड करणाऱ्या पंडिताला समर्थांनीं करंटा म्हटले आहे, ही खरोखर दूषण दानाची हद्द झाली!यासाटींच ते पुढें म्हणतात कीं, " सांगावें तें आपणाला । आपणू करितां बरें!॥." अशा तऱ्हेच्या करंट्यांचा सुकाळ समर्थकाळीं बराच झाला होता असें दिसतें. आणि चालू काळांतही आपणांस अशाच शुष्क घनगर्जितांचा ध्वनिच ऐकावयास मिळतो. त्यांत स्वानुभवाच्या कळकळीचे बोल बोलणारा एखादाच! किंबहुना, "दैवयोग कैसा फिरला " ह्या पद्यांत तर एका आधुनिक कवीनें काळाची करणी कशी उलट फिरत आहे, त्याचें सुंदर चित्र काढलें आहे! तो म्हणतो:—

" नीच जारिणी जी कुलटा । धर्मसतींना ती उलटा ॥
शिकवि लावुनी लल्लाटा । भळभळीत कुंकूं! ॥
नित्य मद्यप्राशन करुनी । लोळतो गटारांतूनी ।
परि निषेध तो व्याख्यानीं । सांगतो जनांतें! ॥
भोजनांत ज्या गोमांस । नाहीं तरी लागे निरस ।
धेनुरक्षणाचा ध्यास । काय आव घाली! ॥
तुकाराम एकनाथ । नाटकास आला ऊत ।
थेटरांत साधू येत । दारु पीत आतां! ॥ "— इत्यादि,

असो. तर अशा उलट्या कृतींच्या बोलक्या बोलघेवड्यांचें फुसके बोल कोण ऐकणार? व त्या बोलांचा तोल तरी कसा राहणार? कारण, ते बोल सखोल नसल्यामुळें ते फोलच व्हावेत, यांत कांहीं मग आश्चर्य आहे काय? यासाठीं असले " श्वानवमनवत् " बोल न बोलतां, त्या बोलांच्या झोलावर सर्व जनता तरून जाईल अशा सामर्थ्याची—

सक्रिय तेजाची—तार त्या बोलाच्या झोल्याला बळकट बांधलेली—त्या तारेनीं तो झोला विणलेला—असूं द्या, म्हणजे सर्व समाज हांहां म्हणतां तुमच्या पाठोपाठ येऊन त्यावरून तरून जाईल व लौकरच स्वधर्माचें व स्वराज्याचें मंदिर गांठील, असें समर्थांचें सांगणें आहे !

असो. येणेंप्रमाणें " महाराष्ट्रधर्मा " चीं जीं तीनचार अंगें त्यांची जोरदार उठावणी करायला कार्यकर्त्या शिष्यांचे ठायीं " ऐसा जो महानुभाव । तेणें करावा समुदाव । " ह्याप्रमाणें समुदाय करायला जी " पाहिजेती दोनी लक्षणें " त्या दोन लक्षणांचा—' प्रबोधशक्तीचा ' व ' बहुतांचें मनोगत हातीं घेण्याचा '—विचार येथवर झाला ! पण हे दोन गुण तरी काय सहजासहजीं अंगीं येतात अथवा अंगीं बाणतात ? ही गोष्ट मुळींच शक्य नाहीं ! जनतेला आपल्या तेजस्वी पण तळमळीच्या वाणीनें खडबडून जागें करणें, व जनतेच्या कळवळ्यांनीं कळवळून जाऊन स्वतःचा मानापमान, सुखदुःख, सर्व विसरून जाऊन, किंबहुना, तें जनतेच्याच चरणीं वाहून,तिच्या उद्धारासाठीं अहर्निश खटपट करणें, ही गोष्ट व्हायला हृदयांत तशीच तळमळ लागायला पाहिजे—जनतेशीं एकजीव होऊन तिच्या दुःखानें दुःखित होऊन " उदास वाटतें जीवीं ।। आतां जावें कुणाकिडे ।। तूं भक्तवत्सला रामा ! । बुद्धि दे रघुनायका ! ।। " अशा तऱ्हेची तळमळ मनाला लागून कळवळ्याची करुण हांक त्या दयाघनाला क्षणक्षणाला मारावी लागते !—ती एकाच ठायीं राहून, पंचपक्वान्नांचें भोजन करून, गाद्यागिरद्यावर लोळून, कूपमंडूकवृत्तीनें आपण व आपलीं बायकापोरें एवढाच संसार मानून, यांत गुरफटून जाणाराच्या ठायीं कधीं तरी उद्भवणें शक्य आहे काय ? " पुत्र कलत्र आणि दारा । इतुकाचि मानूनिया पसारा । " त्या रजोगुणाच्या राजस थाटांत चैन उडवणाऱ्या व परकी सत्तेपुढें गोंडा घोळून, " देतिल तुकडा तो चघळावा, धन्य वरी त्या माना ।। " अशा नीच अवस्थेला ज्याचें मन जाऊन पोंचलें, त्याला देशाची दैन्यावस्था काय कळणार,व त्याचें हृदय तरी आपल्या हजारों देशबांधवांसाठीं काय तळमळणार ? खायला कांहीं मिळत नाहीं म्हणून राजद्वारीं हकाटी करणाऱ्या लोकांना, " मग तुम्ही दूधभात कां खात नाहीं ? " असें विचारणाऱ्या ' दुधखुळ्या ' राजाप्रमाणें ज्यांची गत,

त्यांनीं देशोद्धार व धर्मोद्धार कसचा करावा आणि तो त्यांच्या हातून कशाचा होतो ? त्याला अंतरींची तळमळ, स्वानुभवाचें परीक्षण, व जळत्या जिवाची जळजळ लागावी लागते, व त्यानें अहर्निश हृदय जळावें लागतें, तेव्हां ह्या गोष्टी होत असतात ! हा मार्ग सुखाचा नाहीं, गाद्यागिरद्यांवर लोळून हें व्हायचें नाहीं, किंबहुना, हें व्हायचें म्हणजे गाद्यागिरद्या आपोआपच सुटतात ! " कीर्ति पाहतां सुख नाहीं । सुख पाहतां कीर्ति नाहीं! " हा मार्ग कष्टाचा आहे,त्रासाचा आहे, तळमळींचा आहे ! ह्या मार्गावर गुलाबाचीं फुलें पसरलीं नसून, त्याखालच्या कांट्यांनीं खचलेला हा मार्ग आहे ! पण खऱ्या जळत्या जिवाच्या कार्यकर्त्या पुरुषाला तोच सुखाचा आणि मानाचा मार्ग वाटत असतो ! कारण, " कष्टें करोनि पाविजे फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ ! ।" किंवा " कष्टेविण फळ नाहीं । कष्टेविण राज्य नाहीं । केल्यावीण होत नाहीं । साध्य जनीं ! ॥ " हें त्यास ठाऊक असतें. " कौपर " नामक एका विख्यात आंग्लकवीनेंही हेंच सांगितलें आहे कीं, दुःखाचा, त्रासाचा आणि क्लेशाचाच राजमार्ग सुखाच्या नगरीला जाऊन पोंचत असतो. तो म्हणतो—

" The path of sorrow and that path alone,
Leads to the land where sorrow is unknown".

अर्थात् हें विधान ऐहिक व पारलौकिक अशा दोन्ही विषयांसंबंधीं सारखेंच लागूं आहे, हें सांगणें नकोच. असो. तर अशा रीतीनें वैभवाचा राजमार्ग हा काट्यांकुट्यांनीं भरलेला असतो, ह्याची प्रत्येकानें खात्री बाळगावी ! पण वर सांगितलेंच कीं, खऱ्या जळत्या जीवाला हा कठिण मार्गही सुखाचा आणि मानाचाच वाटत असतो—किंबहुना, तों जों जों ह्या मार्गावर एक एक पाऊल अधिकाधिक टाकीत जाईल, तों तों त्याच्या हृदयींच्या तळमळीची आग कमी तर व्हायची राहोच, पण अधिकच भडकल्यावांचून राहणार नाहीं, असाच कोणच्याही देशांतला व कोणच्याही काळांतला पारतंत्र्याचा देखावा असतो ! फार काय सांगावें, एखाद्या सुखलोलुपाला सुद्धां जर आम्ही पुढें सांगणाऱ्या लक्षणांच्या अथवा गुणांच्या मार्गानें नेलें, तर त्याच्या सुद्धां हृदयाची

तळमळ होऊन ' पॅरिसहून येणाऱ्या कडक इस्तरीवांचूनच्या कपड्यानें देह शृंगारणें ज्याला पूर्वी लज्जेचें वाटत होतें तोच " राष्ट्रहितास्तव भगवी कफनी घे आतां तरी ती " ह्या वचनाप्रमाणें खादीसारख्या साध्या कपड्यानें आपल्या देहाचा शृंगारसाज करण्यास तयार होईल ' इतकें अलोट सामर्थ्य ह्या मार्गांत आहे! असो. अशा प्रकारच्या तळमळीनें हृदय जळणाऱ्या समर्थांनीं आपल्या शिष्यांचेंही हृदय तसेंच जळावें यासाठीं, हृदयांत देशभक्तीचा व धर्मप्रेमाचा अग्नि पेटवून, जनतेच्या कळवळ्याचें स्नेह त्यावर ओतून, त्याला देशपरिभ्रमणाच्या वाऱ्याची फुंकर घालून, तो अग्नि सारखा फुलवित ठेवावा, व इतरही अमोलिक गुणांचें इंधन त्यांत सारखें घालीत असावें, असें आपल्या शिष्यांना सांगितलें आहे! पण हृदयांत पेटणाऱ्या वन्हीपासून तो त्यांत पडणाऱ्या कळवळ्याच्या स्नेहापर्यंत व इतर गुणांच्या इंधनापर्यंत सर्वच शेगडीची तयारी करून देण्यास समर्थोपदिष्ट खालील गुण समर्थ आहेत. फक्त मनुष्यानें बाहेर पडायला हवें; तेवढा तो पडला म्हणजे झालें, हेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे. असो.

याप्रमाणें बाहेर पडलेल्या शिष्यांच्या हृदयांत परिस्थितीच्या जाणीवेची आंच अधिकाधिक लागत जावी व ' हें विश्वचि माझें घर ' अशी त्याची दृढ भावना होऊन, आपल्या बांधवांच्या क्लेशांचा कळवळा येऊन, त्यांच्या उद्धारासाठीं त्यांनीं अहर्निश झटावें,व त्या कामीं सर्व लाजलज्जा गुंडाळून ठेवावी, ( व अंगांत एकप्रकारची तरतरी व हुशारी रहावी, ) ह्यासाठीं समर्थांनीं पहिल्या सपाट्याला आपल्या शिष्याला परिभ्रमण व त्यांतच भिक्षावृत्ति यांचा आश्रय करावयास सांगितला आहे! अर्थात् ' आधीं केलें मग सांगितलें ' ह्या समर्थांच्या पद्धतीप्रमाणें याकामीं समर्थांनीं स्वताचेंच उदाहरण शिष्यांच्या डोळ्यांपुढें ठेवून, त्याचें पाठोपाठ येण्यास त्यांस त्यांनीं सांगितलें आहे. अर्थात् असें केल्यानें आपल्याप्रमाणेंच आपल्या शिष्यांचेंही ठायीं ' केल्यानें देशाटण ' केवळ 'चातुर्य फार ' येऊनच राहणार नाहीं, तर त्याजबरोबर घरोघर होणाऱ्या परीक्षेनें व अवलोकनानें त्यांच्या हृदयांत स्वकार्याची जळती ज्योत अधिकच तीव्रतेनें तेवत राहील, अशी त्यांची खात्रीच होती! म्हणूनच ते सांगतातः—

" निःस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होय ! ॥ ५ ॥
आठा दिवसां धान्य मिळविले । तरी तें कंटाळवाणें झालें ।
प्राणी एकाएकी चेवले । नित्यनूतनतेपासूनी ! ॥ ७ ॥
नित्यनूतन हिंडावें । उदंड देशाटन करावें ।
तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ! ॥ ८ ॥
अखंड भिक्षेचा अभ्यास । तयास वाटेना परदेश ।
जिकडे तिकडे स्वदेश । लोकत्रयीं ! ॥ ९ ॥
भिक्षा मागतां किरको नये । भिक्षा मागतां लाजों नये ।
भिक्षा मागतां भागों नये । परिभ्रमणें ! ॥ १० ॥
भिक्षेनें ओळखी होती । भिक्षेनें भ्रम चुकती ।
सामान्य भिक्षा मान्य करिती । सकळ प्राणी! ॥१३॥
भिक्षा म्हणजे निर्भय स्थिती । भिक्षेनें प्रगटे महंती ।
स्वतंत्रता ईश्वरप्राप्ती । भिक्षागुणें !॥ १४ ॥
भिक्षेस नाहीं अडथळा । भिक्षाहारी तो मोकळा ।
भिक्षेकरितां सार्थक वेळा । काळ जातो ! ॥ १५ ॥
भिक्षेऐसें नाहीं वैराग्य । वैराग्यापरतें नाहीं भाग्य ।
वैराग्य नसतां अभाग्य । एकदेशी ! ॥ १९ ॥
ऐशी भिक्षेची स्थिति । अल्प बोलिलों यथामति ।
भिक्षा वांचवी विपत्ति । होणार काळीं !॥ २२ ॥ "

अर्थात् " भिक्षापती तो लक्षापती " ही व्यावहारिक म्हण सर्वांना माहीत आहेच; असो. तर अशा रीतीनें स्वतः वांचून दुसऱ्यालाही वांचवण्यासाठीं प्रयत्नांची शिकस्त करणाऱ्या रामदासानें "विसंबो न ये झोळीसी । कांहीं केल्या ! ॥ " असें समर्थांचें स्पष्ट सांगणें आहे ! पण आम्ही मागेंच सांगितल्याप्रमाणें व वरील उताऱ्यांतही दिसून येत आहे त्याप्रमाणें, ह्या भिक्षेच्या उपदेशांतही समर्थांचा एक गुप्त हेतू होता—समर्थांना एक गूढ कार्य साधावयाचें होतें ! अगदीं भिक्षेकऱ्याची भिक्षा मागणें पण तीसुद्धां समर्थांनीं फुकट मागण्यास सांगितली नाहीं. कारण, ऐतखाऊपणा हा आळसाला उत्तेजन देणारा आहे, व त्याची तर समर्थांना अत्यंत चीड होती ! " आळसें कार्यभाग नासतो ! " हें त्यांना पुरेपुर ठाऊक होतें. मग अशा आळशीपणाला ते कसें उत्तेजन देतील

बरें ? " वार लावून बैसला । तरी तो पराधीन झाला । तैशीच नित्यावळिला । स्वतंत्रता कैची ? ॥" असें ते यासाठींच विचारीत आहेत. "A vacant mind is the abode of Satan" म्हणजे " रिकामें मन हें सैतानाचें अधिष्ठान" होय हें सत्य त्यांस माहित होतें. अशा सैतानाधिष्ठित मनांत मग साहाजिकच अनेक विचार वसतीस येतात, व ते देहाची व मनाची सारखीच खराबी करतात, हें त्यांना ठाऊक होतें. अर्थात् मग ते तंगडीवर तंगडी टाकून आळशासारखे लोळण्याला कसें बरें उत्तेजन देतील ? उपयोग न करतां म्यानांत पडून राहिलेली तरवार लौकरच गंजून जाते, पाण्याचा प्रवाह सारखा वहात राहिला नाहीं तर लवकरच त्याला वास मारूं लागतो, दुर्गंधीची घाण येऊं लागते, तीच गोष्ट शरीराची व मनाचीही आहे ! त्यांच्या उपयोगाची वाढ जर अव्याहतपणें सुरू राहिली नाहीं व त्यांना जर सारखे कामांत बांधून घातलें नाहीं, तर त्यांनाही अशाच दुर्गुणांच्या दुर्गंधीची घाण येऊं लागते–शरीर सुजूं लागतें व मग कुजूं लागतें आणि दोन्हींही थोडक्याशा धक्यानें आणि दंग्यानें बुजूं लागतात, ही गोष्ट समर्थांना ढळढळीत दिसत असतांना ते असल्या आळसाला कसें बरें उत्तेजन देतील ? यासाठींच त्यांनीं एकसारखे भिक्षा मागत परिभ्रमण करण्यास सांगितलें असून, " एके स्थळीं राहो नये " असा त्यांचा स्पष्ट आदेश आहे ! इतकेंच नव्हे तर " भिक्षा मागतां किरकों नये ! भिक्षा मागतां लाजों नये । भिक्षा मागता भागों नये । परिभ्रमणें ! ॥ " असा त्यांचा आपल्या शिष्यांना कळकळीचा उपदेश आहे ! भिक्षा मागत असतांना किरकीर करूं नका, लाजूं नका, किंवा देशाचे देश हिंडतांना दमूनही जाऊं नका; कारण हें स्वदेशाचें व स्वधर्माचें काम आहे, आपल्या लाडक्या शिवबाच्या कार्यांत आपणांस त्यास होईल ती मदत करायची आहे ! अहाहा ! किती हा उदात्त आणि उज्वल उपदेश ! " ही काय पोटासाठीं भिक्षा झाली ? किती अनंत उपकार ह्या दीन राष्ट्रावर त्या सत्पुरुषाचे आहेत कीं, भिक्षा मागण्यास देखील त्यांनीं कांहीं विनाकारण शिकविलें नाहीं. ही जर पोटासाठीं भिक्षा असती, तर मिळेल तितके झोळीतच ओतावें असें त्यांनीं सांगितलें असतें; पण ते म्हणतातः—

" कांहीं भिक्षा आहे म्हणावें । अल्पसंतोषी असावें ।
बहुत आणितां घ्यावें । मुष्टी एक! ॥ १४–२–२० ॥ "
( दा. प्र. पा. ८ ).

अर्थात् ही पोटासाठीं भीक नव्हती ! कारण " ज्याला पोटासाठींच भिक्षा मागावयाची आहे, त्याला हिंडावयासच कशास पाहिजे? कोणत्याही एखाद्या मोठ्या शहरीं राहून, प्रत्यहीं निरनिराळ्या पांच घरीं भिक्षा मागितली तरी पोट भरेल ! त्याला लोकांची परीक्षा करून काय, करावयाचें आहे? मूठभर धान्य धर्मनिष्ठाच्या हातून मिळालें काय किंवा धर्मभ्रष्टाच्या हातून मिळालें काय, सारखेंच. दात्याच्या अंतःकरणामुळें धान्याला थोडाच गोडपणा किंवा कडवटपणा यावयाचा आहे? " ( " दा. प्रस्तावना " पृ. ९ ) पण असला हल्लींच्या अधःपतित रामदाशांच्या सारखा मुरदाडपणाचा हेतू समर्थांचा नव्हताच मुळीं ! त्यांना अत्यंत थोर कार्य करायचें होतें, व म्हणूनच त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें आपल्या शिष्यांना उज्ज्वल आणि कळकळीचा उपदेश केला आहे ! ते म्हणतातः—

" कुग्रामें अथवा नगरें । पहावीं घरांचीं घरें ।
भिक्षामिसें लहान थोरें । परीक्षून सोडावीं ! ॥
नित्यनूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें ।
तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ! ॥
ठाईं ठाईं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा ।
प्राणी मात्र बोलवावा । आप्तपणें ! ॥ "

हाच, हाच तो समर्थांचा गूढ हेतू ! " कोणत्याही गांवांत जाण्यापूर्वी बाहेरूनच तेथें कोण कसे आहेत, कोण कसे आहेत, ह्याचा शोध घेऊन ठेवावा. धर्मनिष्ठ कोण, धर्मभ्रष्ट कोण, वाचाळ कोण, कार्यकर्ते कोण, दांभिक कोण, निष्ठावंत कोण, केवळ स्वार्थ पाहणारे कोण, परमार्थ पाहणारे कोण, इत्यादि तपास करावा व मग शहरांत प्रवेश करावा......अशा तऱ्हेनें सर्व महाराष्ट्रभर–किंबहुना–आर्यावर्तभर संचार करून, बऱ्यावाईट लोकांचा शोध करून ठेवावा. खेडेगांव असो किंवा शहर असो, त्याचें परीक्षण केल्यावांचून सोडूं नये; इतकेंच नव्हे तर त्या भिक्षेच्या मिषानें

प्रत्येक घर आणि घर परीक्षून सोडावें." ("दासबोध-प्रस्तावना" पृ.९) अर्थात् गोब्राह्मणप्रतिपालनासाठीं व स्वदेश-स्वधर्म-रक्षणासाठीं शिवबाचे जे धडाडीचे प्रयत्न त्याकाळीं म्लेंच्छाविरुद्ध सुरू होते, त्या प्रयत्नांच्या सत्तेचें, रघुनाथभक्तीचें, राजकारणाचें व चतुरस्रतेचें गुप्त निशाण हातांत घेऊन सर्व कार्यकर्त्या महंतांनीं व कळवळ्याच्या शिष्यांनीं गांवोगांव फिरावें व "ठाईं ठाईं उदंड तांबे। मनुष्यमात्र तितुका झोंबे!।" अशा प्रकारची मौज करून सोडावी, असें समर्थांचें आपल्या शिष्यांना प्रथमचें सांगणें आहे! अर्थात् "उपासना करूनिया पुढें। पुरवलें पाहिजे चहूंकडे!।" हेंच त्यांचें सांगणें आहे. "एकेठायीं बैसोन राहिला। तरी मग व्यापचि बुडाला। सावधपणें ज्याला त्याला। भेटी द्यावी!॥" हाच त्यांचा उपदेश आहे! कारण "सृष्टिमध्यें बहुत लोक। परिभ्रमणें कळे कौतुक!।" असा त्यांचा स्वानुभवाचा सिद्धांत आहे! पण इतका व्याप, इतका आटोप, इतका पसारा, आणि इतकी उपाधी, यांचा विस्तार माजवला असतांही त्या 'लालुचेच्या गोंव्यांत' आपण कसें सांपडूं नये, त्यापासून कसें अलिप्त राहावें, याचें चटकदार वर्णन चित्तास भुलवितें, मनास झुलवितें, बुद्धीस डोलवितें व आत्म्यास खुलवितें, व "धन्य रामदास! धन्य महाराष्ट्र!" असे उद्गार सहजच आपल्या मुखावाटे बाहेर पडतात! इतक्या उदंड पसाऱ्यांत आपण कसें अलिप्त राहावें याचें चटकदार वर्णन समर्थ जागोजाग करतातः—

"पुतें कोणाकडे पाहेना। पुतें कोणाशीं बोलेना।
पुतें एके स्थळीं राहेना। उठोन जातो!॥
जातें स्थळ तें सांगेना। सांगितलें तेथें तरी जाईना।
आपली स्थिति अनुमाना। येवोंचि नेदी!॥
एवं कल्पिता कल्पेना। तर्किताही तर्केना।
कदापि भाविता भावेना। योगेश्वर!॥
प्रत्यय बोलोन उठोन गेला। चटक लागली लोकांला।
नाना मार्ग सांडून त्याला। शरण येती!॥
परी तो कोठें आढळेना। कोणे स्थळीं सांपडेना।
वेष पाहतां हीनदीना-। सारिखा दिसे!॥
ठायीं ठायीं भजन लावी। आपण तेथून चुकावी।

मत्सर मताची गोंवी । लागोंच नेदी ! ॥
तेथें कोणाचें चालेना । अणुमात्र अनुमानेना ।
कट घालून राजकारणा । लोका लावी ! ॥
जेथें तेथें नित्य नवा । जनांस वाटे हा असावा ।
परंतु लालुचेचा गोंवा । पडोंचि नेदी ! ॥
कोठेंच पडेना दृष्टी । परी ठायीं ठायीं त्याच्या गोष्टी ।
वाग्विलासें सकळ सृष्टी । वेधिली जेणें ! ॥ "—

किती मौज आहे ही! ह्या अलिप्ततेंत, ह्या निस्पृहपणांत, किती मौज भरली आहे, त्याची एकाच ठायीं बसून, ' अतिपरिचयादवज्ञा ' करून घेणाराला काय कल्पना येणार ? त्याला ' जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ' एवढेंच उत्तर आहे! असो; तर अशा प्रकारच्या थाटदार, निःस्पृह-विरक्ताचें अजून थोडेंसें वर्णन ऐका:—

" आवडी लागली बहुतजना । तेथें कोणाचें कांहीं चालेना ।
दळवट पडिला अनुमाना । येईल कैसा ! ॥
जाणती परी आढळेना । काय करितो तें कळेना ।
नाना देशींचे लोक नाना । येऊन जाती ! ॥
किती लोक ते कळेना । किती समुदाय आकळेना ।
सकळ लोक श्रवण मनना—। मध्यें घाली ! ॥ "

पण इतकें करूनही "जैसा अंतरात्मा ठायींचा ठायीं । गुप्त जाहला ! ॥" त्याप्रमाणें सगळ्यांत असून नसल्यासारखी ही अलिप्तपणाची स्थिति अंगीं बाणवून घ्या, असें समर्थांचें सांगणें आहे. यांत एकंदर तीन हेतू दिसतात. एक तर लोकांना चटक लागावी व आपला हव्यास त्यांना लागावा. अर्थात् असें झालें कीं, आपला कार्यभाग झाला ! कारण " बहुतीं शोधून पाहिलें ।' बहुतांच्या मनास आलें । तरी मग जाणावें साधलें । महत्कृत्य ! ॥ " अर्थात् वरील निःस्पृह व बेगुमान वृत्ति—" उदास वृत्तिच्या गुमानें । उठोन जातो ! ॥" ही वृत्ति—म्हणजे लोकांना आपणापासून तोडण्याची नाहीं, एवढेंच नव्हे, तर स्वतःलाही त्यांच्यापासून तोडण्याची नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! " सगट लोकांचा जिव्हाळा । सोडूंचि नये ! ॥ " हें सांगण्याचा हेतू हाच आहे ! किंबहुना, असा निःस्पृह योगी " खनाळामध्यें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे । " हें खरें; पण तिथें

तो कशाला जातो ? तिथें जाऊन तो काय करतो ? "सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ! ॥" हेंच याचें उत्तर समर्थांनीं दिलें आहे ! अर्थात् ही चटक, ही आवड, परस्पर लागण्यासाठींच हा उद्योग आहे! दुसरें कारण प्रसिद्धच आहे, व तें त्याच्या गुप्त उद्योगासंबंधीं आहे तेंच. "उदंड करावें राजकारण । परि गुप्तरूपें ! ॥–" कां बरें ? तर सत्ता परक्यांची होती ! अर्थात् त्या पापी सत्तेच्या डोलाऱ्याला उलथून पाडण्याचा कारभार गुप्तपणेंच केला पाहिजे हें उघड आहे ! यावनी सत्तेची पापी इमारत मुळासकट उडवून देण्यासाठीं तिच्याखालीं भुयार तयार करून सुरुंग भरण्याचें व तोडा लावण्याचें काम इंग्लंडांतल्या व्यावहारिक "Gunpowder plot" प्रमाणें–गुप्तपणेंच व्हावयास पाहिजे होतें. पण इंग्लंडातल्या 'गायफॉक्स'चा कट उघडकीस आला आणि समर्थांचा आला नाहीं, याचें कारण ते 'गायतोंडे' नव्हते; त्यांच्या 'अकलेचा पवाड' फार मोठा होता, व श्रीरघुनाथजींची त्यांना पाठी होती ! असो. वरील निःस्पृह विरक्तीचें तिसरें कारण अर्थात् तत्त्वज्ञानात्मक व पारमार्थिक आहे–कर्तव्यासाठीं कर्तव्याचा उपदेश करून सुखदुःखापासून अलिप्त राहण्यासाठीं आहे. अर्थात् हाच विचार करून, त्यांनीं–त्या कार्यकर्त्या पुरुषांनीं–अलिप्त राहिलें पाहिजे, असें समर्थ म्हणतातः—

> " उद्वेग अवघे तुटोन जाती । मनास वाटे विश्रांति ।
> ऐसी दुर्लभ परब्रह्मस्थिति । विवेकें सांभाळावी ! ॥ २६ ॥
> आपणांस उपाधी मुळीं नाहीं । ऋणानुबंधें मिळालें सर्वही ।
> आल्यागेल्याची क्षिती नाहीं । ऐसें झालें पाहिजे! ॥ २७ ॥
> उपाधी कांहीं रहात नाहीं । समाधानाएवढें थोर नाहीं ।
> नरदेह प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणां ! ॥ ३० ॥ "
>
> ( द. १९ स. ८ ).

अर्थात् अशाप्रकारच्या मनुष्यानें मग "कांहीं गलबला कांहीं निवळ । ऐसा कंठीत जावा काळ । तेणेंकरितां विश्रांतीवेळ । आपणांसि फावे ! ॥"

पण याप्रमाणें 'फावलेल्या विश्रांतीवेळीं' विश्रांति घेऊन, पुन्हां ताजेतवानें झालेल्या महंतानें "नाना प्रकारींचे दंगे । चंचळामध्यें ॥" आहेत, परंतु "निर्गुणीं हें कांहींच न लागे । " ही गोष्ट लक्षांत ठेवून, त्या ब्रह्मभावनेच्या बळावर, पुन्हा आपल्या कार्याच्या घोडदौडीला सुरवात

केली पाहिजे, त्याकामीं आळस मुळींच करतां कामा नये, हातपाय जोडून उगीच स्वस्थ बसूं नये, तर लोकाहितासाठीं उदंड कष्ट करीत असावें, ही समर्थांची आपल्या शिष्यांना तिसरी कळकळीची शिकवण आहे! याकामीं त्यांच्या जागोजाग अससेल्या ओंव्या फार वाचनीय आहेत! ते म्हणतात:—

“ आळस उदास नागवणा। आळस प्रयत्न बुडवणा॥
आळसें करंटपणाच्या खुणा। प्रगट होती!॥
आळसे राहिला विचार। आळसें बुडाला आचार।
आळसें नव्हे पाठांतर। कांहीं केल्या!॥
आळसें नित्यनेम राहिला। आळसें अभ्यास बुडाला।
आळसें आळस वाढला। असंभाव्य!॥
आळसें गेली धारणा धृती। आळसें मलिन झाली वृत्ती।
आळसें विवेकाची गती। मंद जाहली!॥
आळसें आळस केला। तरी मग कारभारचि बुडाला।
अंतरेहत चुकत गेला। समुदायाचा!॥
जुन्या लोकांचा कंटाळा आला। तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला।
जितुकें होईल तितुक्याला। आळस करूं नये!॥
देहाचा अभ्यास बुडाला। म्हणजे महंत बुडाला।
लागवेगीं नूतन लोकांला। शाहाणे करावे!॥
आळसें काम नासतें। हें तों प्रत्ययास येतें।
कष्टाकडे चुकविते। हीनजन!॥ ”—

पण असें करून कसें चालेल? कष्टांवाचून कधीं कोणाला या जगांत फळ मिळालें आहे काय? “न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशंति मुखे मृगा:” हें वचन प्रसिद्धच आहे! मग कष्टाला कंटाळूत कसें चालेल बरें? किंबहुना, “आधीं कष्ट मग फळ। कष्टचि नाहीं तें निर्फळ!।” हाच देखावा आपणांस घरींदारीं दिसत नाहीं काय? आणि करंट्याचें लक्षण तरी दुसरें काय आहे? हेंच. आळशी, दुश्चित, तोच मूर्ख:व तोच करंटा, असेंच समर्थांचें सांगणें आहे; हींच कष्टाची महती व करंट्याची स्थिति समर्थांनीं पुढील ओव्यांतून सांगितली आहे. ते म्हणतात:—

" कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं ।
केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ! ।
आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंवीण केवळ । वृथा पुष्ट ! ॥
आधीं कष्टाचें दुःख सोसिती । ते पुढें सुखाचें फळ भोगिती ।
आधीं आळसें सुखावती । त्यांसि पुढें दुःख ! ॥
इहलोक अथवा परलोक । दोहींकडे सारखाच विवेक ।
दीर्घसूचनेचें कौतुक । कळलें पाहिजे ! ॥
जिहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले ।
येर ते बोलताचि राहिले । करंटेजन ॥ "

अर्थात् समर्थांचें याकामीं शेवटचें व छातीठोक हेंच सांगणें आहे कीः—

" केल्यानें होत आहेरे । आधीं केलेंचि पाहिजे ॥
येत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ! ॥ "—

मग उगाच धीर सोडून व हातपाय जोडून निदैव्यासारखें कां बरें बसावें ? कष्ट करा पण कष्टी होऊं नका, कारण, जे कराल तें होईल असें सामर्थ्य तुमच्यांत आहे, प्रत्यक्ष परमेश्वरपदापर्यंत पोहोंचण्याचा सुद्धां अधिकार, मगदूर,व सामर्थ्य असलेल्या माणसानें दुबळेपणाच्या गोष्टी सांगाव्यांत ह्याहून लाचारपणाची आणि नामुष्कीची गोष्ट ती कोणची ! त्याच्या माणुसकीला हें मुळींच शोभत नाहीं, हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे. ते म्हणतातः—

" देहें जैसें केलें तैसें होतें । यत्न केल्या कार्य साधतें ।
तरी मग कष्टानें तें । काय निमित्त? ॥ १७-७-३०
धीर सांडिता काय होतें । अवघें सोसावें लागतें ।
नानाबुद्धी नाना मतें । शहाणा जाणे ! ॥ १९-१०-२०
काम नासणार नासतें । आपण वेडे उगेंच पाहतें ।
आळशी हृदय शून्य तें । काय करूं जाणे ? ॥ १९-१०-२१
येरवी काय राहतें । होणार तें होऊन जातें ।
प्राणिमात्र अशक्त तें । पुढें आहे ! ॥ १९-१०-२६
आधींच तकवा सोडिला । मध्येंच धिंवसा सांडिला ।
तरी संसार हा शेवटला । कैसा पावे ? ॥ १९-१०-२७' '

यासाठीं, " परंतु धीर सोडावाना । कोणी एकें ॥ " हेंच समर्थांचें या कामीं शेवटचें व निक्षून सांगणें आहे! " धीरधरा धीरधरा तकवा । हडबडूं गडबडूं नका!।।–" बुद्धि ताल्यावर ठेवा, अक्कलबंद हुशार रहा, गडबडून न जातां विवेकाविचारपूर्वक उदंड कष्ट करा, म्हणजे फळ जातें कोठें ? तें तुमच्या हातीं पडलेंच पाहिजे, हाच स्फूर्तिप्रद आदेश समर्थांचा आपल्या शिष्यांला आहे !

साहजीकच अक्कल, हुशारी, शहाणपण, व विवेक–विचार यांची बैठक घालून त्यावरच आपल्या परिभ्रमणाची, निस्पृहतेची, व उदंड कष्टाची डौलदार इमारत उभारा, म्हणजे ती अशी झोंकदार उठेल कीं, त्याकडे सर्व जगानें टकमक पहातच राहावें, हा समर्थांचा आपल्या शिष्यांना चौथा आदेश आहे ! अक्कलबंदीचीं व अक्कलमंदीचीं कामें यांत किती तीव्र तफावत आहे, व अकलेच्या बळावर केवढें उत्कट कार्य साधतां येतें, तें समर्थ सांगतातः—

व्यापेविण आटोप केला । तो अवघा घसरताचि गेला ।
अकलेचा बंद नाहीं घातला । दूरदृष्टीनें ! ॥
एखादें मनुष्य तें शिळें । त्याचें करणेंचि बावळें ।
नाना विकल्पाचें जाळें । करून टाकी ! ॥
याकारणें चुको नये । म्हणिजे उदंड उपाय ।
उपायाचा अपाय । चुकतां होय ! ॥
अक्कलबंद नाहीं जेथें । अवघेंचि विस्कळित होतें तेथें ।
एके अकलेविण तें । काय आहे ? ॥
घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहूनि वाड ।
तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ! ॥
जेथें उदंड जाणीव । तेचि तितुके सदैव ।
थोडे जाणिवेनें निर्दैव । होती लोक ! ॥
व्याप आटोप करिती । धक्के चपेटे सोशिती ।
तेणें प्राणी सदैव होती । देखत देखतां ! ॥
थोर लहान बुद्धिपाशीं । सगट कळेना लोकांसी ।
आधीं उपजले तयासी । थोर म्हणती! ॥ "—

अर्थात् " जीवास आवडे संपत्ति । तरी शहाणें व्हावें ! ॥ " व अशा शहाण्या मनुष्याच्या कायिक, वाचिक, मानसिक वागणुकीचा विचार करावा–" जाणत्याचे जाणावे प्रसंग । जाणत्याचे ध्यावे रंग । जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग । अभ्यासावे ॥ " हेंच समर्थांना येथें शेवटीं या बाबतींत सांगावयाचें आहे. अर्थात् जी गोष्ट अक्कलहुशारीची तीच गोष्ट विवेकाची !–किंबहुना, त्या दोन्ही गोष्टी एकच आहेत. या विवेकाची महती समर्थांनीं जागोजाग सांगितली आहे:—

" न पाहतां उत्तम विवेक । अवघा होतो अविवेक ।
अविवेकें प्राणी रंक । ऐसा दिसे ! ॥ " १८-३-२

ह्या एकाच ओंवींत समर्थांनीं काय सांगितलें नाहीं ? सर्व सांगायचें तें सांगितलें आहे. म्हणूनच शेवटीं ते म्हणतातः—

" विवेकामध्यें सांपडेना । ऐसें तों कांहींच असेना ! "—

पण हा विवेक, हा विचार, ही धूर्तपणाची व दूरदृष्टीचीं कामें, ही अखंड चालना, गलबल्यांत होणें शक्य आहे काय ? मुळींच नाहीं ! त्याला शांत असा एकांतच पाहिजे ! आणि म्हणूनच त्यासाठीं एकांताचा आश्रय प्रत्येक महंतानें व कार्यकर्त्या पुरुषानें मधून मधून करावा, कारण एकांताची महती फार मोठी आहे, त्या ठिकाणीं गलबल्यापासून सुटलेला आत्मा शांत व प्रसन्न होतो, व कितीही अवघड अथवा कठीण कार्य असलें तरी त्याचा विचार हळूंहळूं सुचवून सर्व गोंवा काढून टाकतो, असें या एकांताचें महिमान आहे, आणि म्हणूनच जरूर तेव्हां त्याचा आश्रय करावा, ही समर्थांची आपल्या शिष्यांना पांचवी शिकवण आहे ! ते जागोजाग म्हणतातः—

" एकांतीं विवेक ठायीं पडे । एकांतीं यत्न सांपडे ।
एकांतीं तर्क वावडे । ब्रह्मांडगोळीं ! ॥
एकांतीं स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें ।
अंतरात्म्यासरिसें फिरावें । कांहींतरी ! ॥
जयास एकांत मानला । अवघ्या आधीं कळें त्याला ।
त्या वेगळा वडीलपणाला । ठावोचि नाहीं ! ॥
अखंड तजविजा चाळणा जेथें । पाहतां काय उणें तेथें ? ।
एकांतेविण प्राणियांतें । बुद्धि कैंची ? ॥

एकांतीं विवेक करावा । आत्माराम ओळखावा ।
येथून तेथवरी गोंवा । कांहींच नाहीं ! ॥
ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास ।
तेणें अखंड सावकाश । एकांत सेवावा ! ॥
जेथें तजविजा कळती । अखंड चाळणा निघती ।
प्राणिमात्रांची स्थिति । कळों येते! ॥ "—

अर्थात्—

" एकांत मानला ज्याला । त्याला साधे हळूहळू ! । " हीच गोष्ट समर्थांना येथें सांगावयाची आहे. म्हणूनच ते म्हणतात:—

" अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा ।
काळ सार्थकचि करावा । जनासहित! ॥ "

तसेंच ते अजून सांगतातः—

" अखंड एकांत सेवावा । ग्रंथमात्र धांडोळावा ।
प्रचीत येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ! ॥ "

---

# भाग १५ वा.



याप्रमाणें एकांतांत विचारांची चाळणा करून, कार्याचा निश्चय करून बाहेर पडलेल्या महंतानें व कार्यकर्त्या पुरुषानें कार्यावर झोड उटवावी, नुसतीं व्याख्यानें देऊं नयेत—तर प्रत्यक्ष कार्य करावें, हें तर खरेंच. पण तें करीत असतांना दुसऱ्यावर अवलंबून राहूं नये, व आपल्या पूर्वजांची फुकट प्रौढीही मारूं नये; तर स्वतःच्या कर्तबगारीनें आपण त्यांचे वंशज होण्यास लायख आहोंत हें सक्रिय पटवून द्यावें, असें समर्थांचें सहावें सांगणें आहे ! पूर्वजवैभवांच्या गुणगानानेंच केवळ कार्यभाग होत नसतो; किंबहुना, पाठीशीं पूर्वजवैभवाची थरारी असेल तर ठीकच, पण ती नसतांनाही, कोणच्याही कुलांतला मनुष्य आपल्या मनगटाच्या व बुद्धीच्या जोरावर नांव कमवूं शकतो, हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे ! स्वतःच्या सद्गुणावर हां हां म्हणतां कीर्तीचें शिखर गांठणारे वीर

तुमच्या आसपास दिसत असतां, व केवळ स्वपराक्रमावर कीर्तिमंदिरांत प्रवेश करून " मनुष्य हा स्वताच्या दैवाचा नियंता आहे " ही म्हण धडधडीत आपल्या पराक्रमानें सिद्ध करून देणारीं छातीचीं माणसें तुमच्या सभोंवार वावरतांना दिसत असतां, केवळ कपाळास हात देऊन तुम्ही पूर्वजांचे पोवाडेच गात बसणार काय ? तसें करणार असाल, तर तुमच्या सारखे हतभागी तुम्हीच, असा समर्थांचा स्फूर्तिप्रद उपदेश आहे! " दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषं " म्हणणारा महाभारतांतला कर्ण तुम्हाला कसली शिकवण देत आहे ? " किं जन्मना च महता पितृपौरुषेण । शक्त्या हि याति निजया पुरुषः प्रतिष्ठाम् ॥ कुंभा न कूपमपि शोषयितुं समर्थाः । कुंभोद्भवेन मुनिनांबुधिरेवपीतः ॥ " ह्या श्लोकाच्या कर्त्यानें अगस्तीचें उदाहरण तुमच्या डोळ्यापुढें ठेविलें असतां, परकी सत्तेच्या व परधर्माच्या जुलुमाच्या सागराला अगस्तीप्रमाणें आपल्या पराक्रमी तरवारींच्या एकाच घोटांत प्राशन करावयाचें सोडून, तुम्हीं असेंच नुसतें बडबडत राहाणार काय ? अरेरे:—

" उगीच करिती बडबड । परी करून दाखवणें अवघड ।
परस्थळ साधणें जड । कठिण आहे ! ॥
चौदा पिढ्यांचे पवाडे । सांगती ते शहाणे कीं वेडे ।
ऐकल्यानें घडे कीं न घडे । ऐसें पाहावें ! ॥ "—

केवळ बडबडीवर व पूर्वजांच्या वैभवाच्या गप्पावर ऐहिक वा पारलौकिक मोक्ष मिळता, तर हिंदुस्थानचे हल्लींचे लोक केव्हांच सुखी झाले असते. कारण तेथें अशा बडबडीला मुळींच कमतरता नाहीं, हें आम्ही मागें सांगितलेंच आहे. पण त्यानें काय होणार ! " रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येते । " पण तें कुणाच्या ? प्रत्यक्ष कार्य करील, चिकाटीनें कार्य करील, त्याच्या ! पाश्चात्य देशांतल्या जर्मनी, अमेरिका, फ्रान्स, इंग्लंड, डेन्मार्क इत्यादि देशांतल्या शास्त्रज्ञांचीं चिकाटीचीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे समर्थांची वरील ओळ किती सत्य आहे, याची प्रचीति येते. मग असें असतांना " डोळे झांकणी करावी ते । काय निमित्य ? ॥ " असें ते विचारीत आहेत, तें किती साहजीक आहे बरें ? अजून किती दिवस असेंच डोळे झांकून तुम्हीं पडणार ? " अग्नि प्रहासी लागला । आणि सावकाश निजेला ।

तो कैसा म्हणावा भला । आत्महत्यारा ! ॥ ''—परदास्याची, दारिद्र्याची, आणि अधःपाताची आग सर्व देशाला लागली असतां, डोळे मिटून पडण्याचा हा आत्मघातकी व्यवसाय तुम्ही कधीं सोडणार ? तुमच्या डोळ्यादेखत जपान, अमेरिका, इंग्लंड, जर्मनी, इत्यादि राष्ट्रं हां हां म्हणतां वैभवशिखर गांठीत आहेत, चिकाटीच्या यत्नानें कीर्तिमंदिरावर ध्वज फडकावीत आहेत तीं, अभागी हिंदुस्थाना, तुला दिसत नाहींत काय ? वैभवाचा, कीर्तीचा, आणि स्वातंत्र्याचा सूर्य सर्व जगावर फाकला असतांना, आणि इजिप्त, कोरिया-सारखीं राष्ट्रं स्वप्रयत्नानें स्वताचें नशीब काढीत असतांना, हे अभागी हिंदुस्थाना, तूं असाच किती दिवस कर्तव्यशून्यतेच्या झोपेंत लोळत पडणार ? असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, भाग्याची भरती ही सद्गुणांच्या संपत्तीवर अवलंबून असून, अवगुणांच्या अंधेऱ्या रात्रींच दुःखाचा काळोख माजत असतो, हें सर्वांनीं लक्षांत ठेवावें, असें समर्थांचें सांगणें आहे ! ते म्हणतातः—'' है सकळ गुणापासीं गती । सगुण भाग्यश्री भोगिती । अवगुणास दरिद्रप्राप्ति । येदर्थीं संदेह नाहीं ! ॥ '' ९–४–४. यासाठीं स्वतः कष्ट करण्यास तयार व्हा, निव्वळ बडबड करूं नका, पूर्वजांच्या पोकळ बढाया मारूं नका, किंवा दुसऱ्यावरही काम ढकलूं नका, कारण, '' जो दुसऱ्यावरीं विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला । '', असा समर्थांचा आपल्या शिष्यांना सहावा आदेश आहे !

पण याप्रमाणें पोकळ बडबड न करतां, अथवा पूर्वजांच्या पराक्रमाच्या पांचट गप्पाही न मारतां, कार्य करण्यास निघणाऱ्या मनुष्याच्या अंगावर मृत्यूचें संकट येऊन आदळलें तर त्यानें काय करावें ? '' मरावें परी कीर्तिरूपें उरावें ! '' हेंच याचें उत्तर नव्हे काय ? कारण अशा प्रसंगीं कच खाण्याच्या गोष्टी ह्या नामर्दांच्या आहेत ! पण समर्थांनीं सांगितलेलीं कामें ही अशा नामर्दांचीं होतीं काय ? 'उदंड खस्तिचीं कामें । मर्द मारोनि जातसे ! । '' नामर्द नव्हे; आणि खरा मर्द जो आहे, तो मृत्यूला मुळींच भीत नाहीं, एवढेंच नव्हे, तर आपल्या सत्कार्यांत येणाऱ्या मृत्यूला तो मातीच्या मोलानें मोजण्यास तयार होतो, हें आम्ही मागें एकदां सांगितलेंच आहे ! भागवतधर्मीय छातीठोक संतसुधारकांचा बाणा या कामीं कसा जळजळीत होता, व केवळ पंढरीच्या देवळांतल्या

वेठोबासाठींच नव्हे, तर हातीं घेतलेल्या चतुर्विध कामगिरीसाठीं ते कसे एकजात देहावर उदार होते, याचा साग्र व सुंदर इतिहास मागें येऊन लाच आहे! आमच्या देशांत देवभक्ति तीच देशभक्ति,—किंबहुना, विश्वांत कोंडून राहिलेल्या त्या विश्वंभराची पूजा विश्वांतील भूतमात्रांच्या सेवेनेंच होते, हा उच्च सिद्धान्त आमच्या धर्मांत प्रतिपादिला गेला असून, शा कामीं प्रत्यक्ष प्राणाचेंहि निर्वाण करण्याचा प्रसंग आला असतां " मरेंगा पर हटेंगा नहीं " ह्या म्हणीप्रमाणें " मराठ्यां " चें ब्रीद राखविणारी महाराष्ट्रीय संतांची दिव्य मालिका, ह्या हिंदभूच्या गळ्यांत १२ ते १८ शतकांपर्यंत झगझगीतपणें रुळत आणि झुलत होती, हें कोणीही विसरूं नये! अर्थात्, जगांत असणाऱ्या जगदीशाला प्रसन्न करून घेऊन त्याच्या सायुध सहायाच्या बळावर कोणचेंही धर्मकारण व राजकारण लढविलें जात असे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे! तेव्हां अशा तऱ्हेनें मृत्यूचें संकट आलें असतां, " तुझें कारणीं देह माझा पडावा! " हेंच त्या प्रभूजवळ मागणें मागितलें पाहिजे, हें उघड आहे! समर्थांनीं या कामीं—प्रभूसाठीं आत्मसमर्पण करण्याचें कामीं—फार हृदयस्पर्शी आणि थरारून सोडणाऱ्या ओव्या स्वानुभवाच्या कळकळीनें लिहिलेल्या आहेत!—देव आणि देश यांत ' व ' कारा पुढचाच ' श ' कार आहे, अर्थात् देवाच्या बळावरच देशकार्य झुंजवावयाचें आहे, किंबहुना, देव व देश एकच आहेत, विश्वांतच विश्वात्म्याचा वास आहे हें लक्षांत ठेवून, त्यासाठीं काय काय करावें, याचें खालील सुंदर वर्णन वाचा, म्हणजे वाचक, तुमचें चित्त तें वाचून महरून जाईल! समर्थ म्हणतात:—

" देवासी परमसख्य करावें। परम प्रीतीनें बांधावें।
आठवे भक्तीचे जाणावें। लक्षण ऐसें! ॥
देवाच्या सख्यत्वाकारणें। आपुलें सौख्य सोडून देणें।
अनन्यभावें जीवें प्राणें। शरीर तेंही वेंचावें! ॥
देवाच्या सख्यत्वासाठीं। पाडाव्या जिवलगासी तुटी।
सर्व अर्पावें शेवटीं। प्राण तोही वेंचावा! ॥
आपुलें अवघेंचि जावें। परी देवाशीं सख्य राहावें।
ऐशीं प्रीती जीवेंभावें। भगवंतीं लागावी! ॥

देव म्हणजे आपुला प्राण । प्राणासी न करावें निर्वाण ।
प्रेमप्रीतिचें लक्षण । तें हें ऐसें ! ॥
देव प्रीति राखों जाणे । देवासी करावें साजणें ।
जिवलगें अवघीं पिसुणें । कामा न येती ! ॥ "—

इत्यादि—( द. ४ स. ८ ).

हा समास मुळांतूनच वाचून पहावा, म्हणजे ह्याहूनही अधिक बहार दृष्टीस पडेल! पण त्यांत समर्थांना हेंच सांगायचें आहे कीं, देवासाठीं व देशासाठीं प्राणार्पण करावें लागलें तरी हटूं नये, जिवलगांच्या मोहावर सुद्धा लाथ मारून निघावें, व कोणाच्याच पाशांत न अडकतां, " सांडून आपली संसारकांता। करीत जावी देवाची चिंता! । ." आलेल्या मृत्यूला भिऊन पळून गेलात, म्हणून मृत्यू टळणार आहे काय !:—

" मृत्याभेणें पळों जातां । तरी मृत्य सोडिना सर्वथा ।
मृत्यास नये चुकवितां । कांहीं केल्या ! ॥ " ( ३-९-३८ ).

ही गोष्ट खोटी आहे काय? मग समरांगणावरून पळून जाण्यांत काय हंशील आहे ! " यदि समरमपास्य नास्ति मृत्योर्भयामिति युक्तमितोन्यतः प्रयातुम् । " असें अश्वत्थामा आपल्या सैनिकांना म्हणत आहे, तें यासाठींच ! पण हा मृत्यू कधीं कोणाला चुकला आहे काय ? त्याला चुकवून तुम्ही जाणार कुठें ? किंबहुना, आयुष्याच्या जाणाऱ्या एक एक दिवसानीं तुम्ही मरतच नाहीं काय ?—

" संसार म्हणजे सवोंचि स्वार । नाहीं मरणासी उधार ।
मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ! ॥ ( ३-९-१ ) "—

ही गोष्ट खोटी आहे काय ? ह्या जगांत काय शाश्वत राहणार आहे ? काळाच्या भीषण तडाक्यांत सर्वांचा सत्यानाश होत आहे, काळाच्या कराल करणीनें संपत्तीची उलटापालट व राष्ट्रांची उलथापालथ सुरू आहे ना ? मग ह्या देहाची तीन चिमट्या राख होऊन गेल्यावर मागें काय राहाणार ? :—

" एक भाग्यपुरुष मोडती । एक नवे भाग्यवंत होती ।
तैशीच विद्याव्युत्पत्ति । होत जाते ! ॥ २६ ॥
एक भरतें एक रितें । रितें तें मागुतें भरतें ।
भरतें तेंहि रितें होतें । काळांतरीं ! ॥ २७ ॥

ऐसी हे सृष्टीची चाली। संपत्ति दुपारची साउली।
वयसा तरी निघोन गेली। हळूंहळूं !॥ २८ ॥—
(द. १७; स. ७).

ही गोष्ट खरीना ? मग म्हातारपणीं उताणा पडून फुकट मरणार काय?"कीर्ति करून नाहीं मेले।ते उगेच आले आणि गेले। शहाणे होऊन भुलले। काय सांगावें?॥." तूं स्वतःला शहाणा म्हणवतोस ना ? मग हेंच कां तुझें शहाणपण?त्यापेक्षां:—"ऐसें जाणुनिया जीवें।याचें सार्थकचि करावें। जनीं मरोन उरवावें। कीर्तिरूपें ॥" असें कां बरें करीत नाहींस ? कारण यमाच्या रगाड्यात आणि कालाच्या रहाटगाडग्यांत फक्त कीर्तिवंताचेंच नांव तेवढें तगून राहतें हें विसरूं नकोस, असा समर्थांचा प्रत्येक कार्यकर्त्या मनुष्याला कळकळीचा उपदेश आहे! अर्थात्, मृत्यूस न जुमानण्यांची समर्थांची आपल्या शिष्यांना सातवी शिकवण आहे ! आणि ह्याच शिकवणीसाठीं नव्हे, तर सर्वच शिकवणीसाठीं, त्यांनीं जें अध्यात्मज्ञान आपल्या अमोलिक ग्रंथांतून जागोजाग प्रतिपादन केलें आहे, तें वाचून कोणीही एकतर विरक्त होऊन जाईल, किंवा संसारांत राहिलाच, तर निस्संशय देहाविषयीं बेगुमानवृत्ति धारण करून, देशाच्या उन्नतिसाठींच अहर्निश तळमळत राहील, यात तिळमात्र शंका नाहीं ! कारण समर्थांचे बोल तशाच तोडीचे आहेत ! असो.

यानंतरची आठवी शिकवण म्हणजे, " अंतरासि लागेल ढका। ऐसी करणी करूं नका। " ही होय. कारण, " जनीं जनार्दन म्हणोनि जना। राजी राखावें!॥ " असें समर्थांचें सांगणें आहे. अर्थात् जनार्दनाला आणि जनाला, जगदीशाला आणि जगाला, अथवा 'जगासकट जगदीशाला,' नराला आणि नारायणाला, विश्वाला आणि विश्वंभर विश्वात्म्याला, संतुष्ट करण्याचा एकच मार्ग आहे, कारण दोन्हीही एकाच चिद्वस्तूचीं रूपें आहेत! तीं कशीं, सर्व जग म्हणजे चिद्विलास कसा आहे, यासंबंधीं आम्ही आमच्या " सायुज्यसोपानां "त भरपूर विवेचन केलेलें असल्यामुळें, इथें थोडक्यांत इतकेंच सांगतों कीं, जशी पाण्याची गार, जसे सोन्याचे अलंकार, जसा मातीचा घट, आणि तंतूंचा पट, जसें पातळ तुपाचें थिजलेलें तूप, जसा बीजाचा वृक्ष व

वृक्षाच्या डहाळ्या, जसें कलिकेचें फूल, व पाण्याचे तरंग, तद्वतच जगदीशाचें हें जग आहे-विश्वंभराचें विश्व आहे! " Man is God playing the part of a fool ! "असें इमर्सनचें वचन याचेंच अनुवादक आहे! अर्थात् जगाला आलेला जगदीश,नरांच्या रूपानें नटलेला नारायण,विश्वाच्या रूपानें विलसणारा विश्वंभर, आपल्या स्वस्वरूपाला विसरलेला असतो, म्हणूनच तो " fool " ही पदवी पावतो; अर्थात् तो खराखुरा " fool " नसून केवळ त्या मूर्खाची-वेड्याची-भूमिका त्यानें घेतलेली आहे ! पण त्या भूमिकेशीं तो इतका तन्मय झालेला आहे कीं, त्यामुळें तो आपलें मूळचें स्वरूप पार विसरून गेला आहे ! यासाठीं त्याला स्वस्वरूपाची-आपण कोंकरूं नसून सिंहाचे छावे आहोत, परतंत्र नसून स्वतंत्र आहोंत, मृत्यूचे अंकित नसून अमर आहोंत,-याची जाणीव करून देऊन, तें आपलें मूळचें रूप प्राप्त करून घेण्याचा त्यास उपदेश केला पाहिजे! अर्थात्—" प्रपंचीं जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ! ॥ " किंवा, " ज्याचें, ऐहिक धड नाहीं । त्याचें परत्र पुसशी काई ? ॥ " ह्या वचनाप्रमाणें, ऐहिक स्वातंत्र्याच्या मुक्तिसुखाचे सोहळे अनुभवल्यावांचून एकाएकीं त्यास पारमार्थिक सायुज्यतेची जोड मिळणें कठिण आहे हें जाणून, त्याला परमार्थाच्या उपदेशाबरोबरच ऐहिक परिस्थितीचीही जोरदार जाणीव करून देऊन, पारतंत्र्याच्या रौरवनरकांतून शक्य तितकी लवकर त्याची सुटका होईल असा यत्न करणें हें ओघानेंच आलें, आणि म्हणूनच "पहिलें तें हरिभजन।"झाल्याबरोबर लगेंच "दुसरें तें राजकारण"समर्थांनीं सांगितलें आहे तें यासाठींच. अंतःकरणाला खची करणाऱ्या परिस्थितीचा विसर पडून,स्वातंत्र्याचें कार्य साधण्यासाठीं, एकप्रकारची धुंदी यावी, नशा चढावी, आणि माज यावा, म्हणून भागवतधर्मीय साधुसंतांच्या पासून अमृतालाही मागें सारणारी हरिनामाच्या गजराची आणि हरिभक्तीच्या भजनमहोत्सवाची मदिरा ह्या जनतामतंगजाला पाजण्याचा पायंडा पडला होता, तो समर्थांना अत्यंत फलप्रद वाटला, अत्यंत सयुक्तिक वाटला,व इतरही कित्येक,आम्ही मागें सांगितलेले फायदेही पण त्यांस त्यांत दिसून आले व ते स्वतःही भागवतधर्मीय संताच्या तोडीचे संत होते,

म्हणून त्यांनीं तोच पायंडा पुढें चालवावा, व जिकडेतिकडे हरिनामाच्या गजराचा घोष दुमदुमवावा, आणि आपल्या शिष्यांनाही त्यांनीं जागोजाग त्याचाच उपदेश करावा, हें किती साहजीक आहे बरें ? ते अत्यंत कळकळीनें म्हणतात:—

" कोणास कांहींच न मागावें। भगवद्भजन वाढवावें।
विवेकबळें जन लावावें। भक्तीकडे ! ॥
होईल तें आपण करावें। न होतां जनाकरवीं करवावें।
भगवद्भजन राहावें। हा धर्म नव्हे ! ॥
आपण करावें करवावें। आपण विवरावें विवरवावें।
आपण धरावें धरवावें। भजनमार्गासी ! ॥ "

याप्रमाणें समर्थांची शेकडो वचनें अशीं काढून देतां येतील, कीं ज्यामध्यें त्यांनीं हाच कळकळीचा उपदेश आपल्या शिष्यांना ठायीं ठायीं केला आहे कीं, बाबांनो, त्या प्रभूच्या भजनाला अंतर देऊं नका, इतकेंच नव्हे तर, तुम्ही मरून गेल्यावर मागें कोण भजन चालविणार ? यासाठीं एकएकटे भजन करूं नका किंवा करण्यास सांगूं नका, तर जागोजाग 'भक्तमंडळ्या आणि संतमंडळ्या स्थापून' नामघोषाचा गजर दुमदुमून जाऊं द्या. आणि त्या संस्था वर्षानुवर्षें आणि शतकानुशतकें चालतील व टिकतील अशी खबरदारी घ्या ! पण, पण, ह्या नुसत्या भजनानेंच कार्यभाग होणार नाहीं, त्याची धुंदी चढलेल्या हातांत राजकारणाची तळपती तरवार जर चमकली नाहीं तर (चालूंकाळच्या भजनीमंडळींच्या फडाप्रमाणें) तो समाज नुसता त्या रामनामाच्या मदिरेनें गुंगून आणि झिंगून पडेल ! मग त्याचा काय उपयोग ? मग ऐहिक वा पारलौकिक मोक्ष त्यास कसा मिळणार ? कारण " उद्धरेदात्मनात्मानं " किंवा "God helps those who help themselves" हें वचन ह्याचीच आठवण देत नाहीं काय ? यासाठीं, त्या धुंदीनें धुंधकारलेल्या हातांत स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं राजकारणाची तरवारही चमकेल असें करा, असें समर्थांचें त्यापुढचें साहजीकच सांगणें होतें—कारण ते उघडउघड राजकारणी संत होते—हें आपण मागें पाहिलेंच आहे. अर्थात् तसें होण्यास—राजकारणाची समशेर समाजाच्या हातीं तळपण्यास—समाजाला

या कामीं हळुहळू शिक्षण दिलें पाहिजे, स्वतः क्रिया करून त्याला करायला लावली पाहिजे, समाजाला आपल्या बाजूला ओढून घेतला पाहिजे, " नभामार्जी तारांगणें । तैसे लोक!।।"—चंद्राभोवतीं जसा नक्षत्रांचा मेळा फेर धरून तयार असतो, त्याप्रमाणें आपणांभोवतीं भिंगरीसारखी फिरणारी जनता तयार झाली पाहिजे, अर्थात् तें होण्यास त्या जनतेच्या चालीनेंच चालून, तिच्या अंतःकरणाला ढका न लावतां, तिच्या चुकांवर पांघरूण घालून, तिच्या मनाशीं मिळून जाऊन, तिच्यावर न रागावतांच हें कार्य केलें पाहिजे हें उघड आहे; आणि हेंच चातुर्य,हेंच शहाणपण, हीच सावधानता, आणि हीच चतुरस्रता होय, असें समर्थांचें कळकळीचें सांगणें आहे. साहजिकच राजकारणांतच नव्हे, तर खुद्द हरिभक्तिच्या कीर्तनरंगांत सुद्धां, हाच नियम पाळावा व रंगाचा भंग होऊं देऊं नये, तरच नामघोषाची मौज दृष्टीस पडेल असें समर्थ सांगतात. ते म्हणतातः—

" बहुतांचें समाधान राखावें । बहुतांस मानेल तें बोलावें ।।
विलग पडोंचि न द्यावें । कथेमध्यें ! ।। २० ।।

लोकांसी उदंडबाजी आणूं नये । लोकांचें उकलावें हृदय ।।
तरी मग स्वभावेंचि होय । नामघोष!।।२१।। " ( द.१२; स.९).

साहजीक " लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ! ।। "
असाच त्यांचा उपदेश आहे; कारण—

" सकळ जगदंतरींचा देव । क्षोभता रहावया कैंचा ठाव !।
जनावेगळा जनास उपाव । आणीक नाहीं ! ।। "

पण याच्याच उलट—

" जो जगदंतरें मिळाला । तो जगदंतरचि झाला ।
अरत्रीं परत्रीं तयाला । काय उणें ? ।। "

हीच 'विश्ववैभवाच्या वैजयंतीची' मौज लक्षांत ठेवून, लोकांना धक्का न लावतां कार्य करा, ही समर्थांची आठवी शिकवण आहे! ह्या आठव्या गुणाच्या गुणगाणांत आम्हीं जे इतकें रंगलों आहों, त्याचें कारण त्यांत तशीच मौज आहे! भगवंतांचा आठवा अवतार, देवकीचें आठवें

बालक, जितकें मोहक आहे, तितकाच हा आठवा गुण मनमोहक आहे! अर्थात् त्या 'आठव्या' प्रमाणेंच ह्या आठव्याची आठव ठेवून त्याची वारंवार आठवण काढा व त्यांस कधींही विसरूं नका, हेंच आमचें हिंद-भूच्या सर्व सुपुत्रांस करद्वय जोडून मागणें आहे! कारण समर्थांनीं वर्णि-लेली आठवी सख्यभक्ति जितकी प्रेमळ आहे, तितकेंच ह्या आठव्या गुणाचें त्यांनीं केलेलें वर्णनहि चित्तांस भुलविणारें आणि मनास डोल-विणारें आहे ह्यांत शंका नाहीं. किंबहुना, आठव्या भक्तीप्रमाणेंच ह्या आठव्या गुणाचाही जनतेला कधींच विसर पडूं नये, अशीच त्यांची इच्छा होती हें उघड आहे, व म्हणूनच त्यांनीं तो इतक्या सविस्तर रीतीनें जागोजाग प्रतिपादिला आहे;—त्यावांचून दासबोधाचें महाराष्ट्र-धर्मप्रतिपादक पान क्वचित्‌च सुनें जातें, तें तरी यासाठींच; आणि त्याचें कारण उघडच आहे. कारण, उपरिनिर्दिष्ट धर्म हा लोकसंग्राहक धर्म असल्यामुळें, " समुदाव पाहिजे मोठा। तरी तणावा असाव्या बळकटा। मठ करून ताठा। धरूंच नये!॥ " ( १९–९–२२ ) असें त्यांचें साहजिकच सांगणें आहे. शिष्यांनीं जिथें तिथें नम्रपणें जाऊन आणि लीनपणें वागून, " वचनें बोलावीं करुणेचीं! " हाच त्यांचा त्यांना उप-देश असे. असो. तर याप्रमाणें ह्या आठव्या गुणास सदा आठवावें, त्याची नित्य आठवण ठेवावी. कारण त्याचें महत्त्व अत्यंत असून हरि-भक्तिच्या मार्गावरून राजकारणाच्या स्टेशनाला जाण्यास निघालेल्या महाराष्ट्रधर्माच्या आगगाडीला सांवरून धरणारा सांधा हाच आहे, हें आम्ही मागें सांगितलेंच आहे. किंबहुना, " तिसरें तें सावधपण। सर्व विषईं॥ " ह्या ओळीवरून तर सर्व महाराष्ट्रधर्माच्या आंतबाहेर सम-र्थांची ही "सावधान, सावधान" अशी हाक कशी भरून राहिली आहे, हें चांगलें दिसून येतें व त्यावरूनही त्याचें महत्त्व चांगलेंच ध्यानीं येतें. शिवबाला केलेल्या उपदेशांतही ह्याच " सावधानतेचा " प्रामुख्यानें उल्लेख आहे, त्याचें तरी कारण हेंच! वयाच्या बाराव्या वर्षीच स्वतः सावध होऊन लग्नमंडपांतून पळालेल्या समर्थांसारख्या जागरूक जागल्यांनीं आलस्य, मोह, इत्यादिकांची निद्रा परदास्याच्या अंधाऱ्या रात्रीं सर्व जगाला लागली असतां व त्या काळोखाच्या काळरात्रीं परकी सत्तेचें

व परधर्माचे चोर समाजाला लुटायला स्वैर हिंडत असतां, ' सावध ', ' हुशियार ' म्हणून गस्त घालीत हिंडावें व ' भाई हुशार रहना बे। साहेब राजी रखना बे। " अशा तऱ्हेचा उपदेश करीत हिंडावें, हें किती साहजीक आहे बरें! असो; पण याठिकाणीं आपणांस ह्या आठव्या गुणाचा घोळघोळून आठव करण्याचा मोह आतां येथेंच आवरतां घेतला पाहिजे. कारण, एकतर महाराष्ट्रधर्माच्या चतुरंगांचें वर्णन देतांना त्यांपैकीं असलेल्या चतुरस्रतेच्या व सावधानपणाच्या—म्हणजेच ह्या आठव्या गुणाच्या—अंगाचें वर्णन करतांना आम्ही त्याचें भरपूर वर्णन मागें केलेंच आहे, व शिवाय आपणांस अजून पुढील तीनचार गुण पाहणें आहेत ! असो.

यानंतरचा नववा गुण म्हणजे परोपकाराचा होय ! हा गुण वरील आठव्या गुणापासून निघणारा आहे. ज्याला इंग्रजींत ' करॉलरी ' म्हणतात त्या न्यायानेंच ही गोष्ट होणार आहे. अर्थात् पहिल्यांतील अपूर्णता यानें पुरी होतें अथवा पहिल्याचा उत्तरार्ध हा दुसरा गुण आहे अथवा एकाच तत्त्वाच्या आठवा व नववा हे दोन गुण दोन बाजवा आहेत असेंहि म्हणतां येईल. भगवान् श्रीकृष्णामागून येणारा महात्मा गौतम बुद्धाचा नववा अवतार जसा शोभिवंत दिसतो, गीतेचा नववा अध्याय जसा मनोहर आहे, तसाच हा नववा गुणही चित्तहारक आहे—नव्यानवाळीनें हा नववा गुण नटलेला आहे ! आणि तो अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण लोकांच्या तोंडीं उरावयाचें व " सर्वांमुखीं मंगल बोलवावयाचें " हें काम कोरड्या गप्पांनीं होत नाहीं, त्याला प्रत्यक्ष परोपकाराच्या कृतीची जोड पाहिजे; तशी ती असेल तरच हें कार्य होणार आहे ! या गुणाचें महिमान किती आहे, तें व्यासांच्या पुढील श्लोकांवरून उत्तम रीतीनें दिसून येणार आहे; ते म्हणतातः—

" श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ! ॥ "—

अर्थात् परपीडनाचें पाप न करतां परोपकाराच्या पुण्याची जोड करा, परपीडेचा अंधार न पसरितां परोपकाराच्या ' पुण्याची पहाट फुटूं द्या ' म्हणजे मग मंगलमय प्रभूची ' मूर्ति प्रकटण्यास '—जगदाकाशाच्या

क्षितिजावर झळकण्यास कितीसा वेळ लागणार आहे ? हेंच समर्थांनाहीं आठव्या व नवव्या गुणांच्या समुच्चयेंकरून सांगावयाचें आहे, हें उघड आहे. शिवबासारखा चिन्मय स्वातंत्र्याचा अवतार अर्थात् अशाच वेळीं होतो हें काय सांगावयला पाहिजे ? यासाठीं लोकजागृति व लोकसंग्रह करण्यासाठीं समर्थांनीं सांगितलेल्या गुणांत साहजकिच ह्या परोपकाराच्या परमावधीच्या गुणाला गोंवून द्यावें, हें योग्यच आहे. कारणः—

" जो परोपकार करितचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला ।
मग काय उणें तयाला । भूमंडळीं ? ॥ १९–४–१० "

असें ते साहजीकच विचारीत आहेत. यासाठीं " बहुत जन वास पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे । " असें वागावें, असें त्यांचे सांगणें आहे; तसेंच तें म्हणतातः—

" जैसे जयास पाहिजे । तैसें तयास दीजे ।
तरी मग श्रेष्ठ होइजे । सकळां मान्य ! ॥ १५–६–२८

भूमंडळीं सकळां मान्य । तो म्हणूं नये सामान्य ।
कित्येक लोक अनन्य । तया पुरुषासी ! ॥ १५–६–२९

अर्थात् याप्रमाणें या परोपकाराच्या गुणानेंहि लोकसंग्रहाचेंच कार्य करावयाचें असून, तें किती उत्कृष्ट होतें तें यावरून दिसेलच. पण परोपकाराच्या नवव्या गुणांतच नव्हे, तर समर्थांनीं आतांपर्यंत सांगितलेल्या व पुढेंही येणाऱ्या गुणांत, लोकसंग्रह हाच आणि हाच एक प्रधान हेतू आहे; कारण लोकसंग्रह हा महाराष्ट्रधर्माचा प्राण आहे, हें कोणीही विसरूं नये. उघडच "आत्म्याविण देह वृथा । मढेंचि होय! ॥" १३-९-२६ हें काय सांगावयाला पाहिजे ? कारण केवळ पूर्वीची हरिभजनाची पद्धत समर्थांना नको होती. "सर्वत्र रामनवमी परमोत्सव परमधर्म चालविला।" असें मोरोपंत त्यांचे वर्णनांत म्हणत आहेत त्यावर ह. भ. प. ल. रा. पांगारकरही म्हणतात " यावरून इतकेंच समजावयाचें कीं रामनवमीच्या उत्सवास समर्थांच्या बोधामुळें उत्तेजन येऊन रामोपासना महाराष्ट्रांत अधिक फैलावली " ( मो. च. ३६९ ) ती इतकी कीं ' रामदास पुष्यें बायका रामनवमीचें व्रत ' करूं लागल्या. अर्थात् रामरायासारखे

धनुर्धर वीर आपल्याही पोटीं निर्माण व्हावें, अशी उदात्त आकांक्षा स्त्री-बृंदामध्यें उत्पन्न करण्याचें उत्कट कार्य समर्थांनीं व त्यांच्या शिष्यांनीं आपल्या अमोघ व तेजस्वी वाणीनें केलें आहे, आणि त्याप्रमाणें अलौकिक वीरही महाराष्ट्रास यावेळीं व पुढें लाभलेले आहेत; असो. जागोजाग भजनमहोत्सवाची व यात्रेची मौज दृष्टीस पडावी व त्यांत हरिभक्तिबरोबरच राजकारण विलसावें, अशी समर्थांची उत्कट इच्छा होती. अर्थात् ह्या गोष्टीला लोकसंग्रह अवश्य होता—नव्हे, तो त्याचा प्राण होता. अर्थात् महाराष्ट्रधर्मांचा प्राण, त्या धर्माचें व्यावहारिक आराध्यदैवत म्हणजे लोकसमुदाय होय ! तेव्हां साहजीकच "देव म्हणजे आपुला प्राण । प्राणासि न करावें निर्वाण" हें वचन जनास आणि जनार्दनास सारखेंच लागू आहे. आणि यासाठीं—

" शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ।
उणें पडो नेदावें । कोणि येकाचें ! ॥
आपलें अथवा परावें । कार्य अवघेंचि करावें ।
प्रसंगीं कामास चुकवावें । हें विहित नव्हे ! ॥ "

याप्रमाणें परोपकाराची पराकाष्ठा केल्यावर " आपल्या कार्यास तत्पर । लोक असती लहान थोर । " याप्रमाणें आपल्या कार्याला लोकसमुदाय मग साहजीकच लोटेल, व आपलें कार्य सुलभतर होईल, हें काय मग सांगायला पाहिजे ! यासाठीं परोपकाराच्या प्रेमळ रज्जूनें सर्वांना बांधून टाका, म्हणजे तीं तुमचींच आहेत, असा समर्थांचा आपल्या शिष्यांना नववा उपदेश आहे !

पण अशाही प्रेमरज्जूनें सहसा बांधले न जातां उलट ' गांव आहे तेथें महारवाडा आहे ' ह्या न्यायानें अपमानाचे, निंदेचे, आणि धिक्काराचे शब्द बोलून, त्या वाक्ताडनाचे घणाचे घाव डोकीवर मारणारे कांहीं निंदक, वावदूक आणि दुर्जन प्राणीही कार्यकर्त्या महंताला भेटण्याचा संभव आहे. पण अशा दुर्जनांचें कुशब्दताडनही सहन करून दया, क्षमा, शांतीनें त्यांना लाजवावें, म्हणजे त्यांचा त्यानाच पश्चात्ताप होऊन, ते अखेर तुम्हाला येऊन मिळतील, असा समर्थांचा, भागवतधर्मीय संतांप्रमाणेंच, आपल्या शिष्यांना उदात्त उपदेश आहे !

हा प्रसंग, ही मानासिक शक्तिपरीक्षा मोठी कठिण आहे, आणि मी मी म्हणणारे मोटमोठे कार्यकर्तेही येथें लटपटतात, हीही गोष्ट तितकीच खरी आहे ! पण समर्थ आपल्या शिष्यांना सांगतात कीं, बाबांनो, तुम्हांला त्याच्याहीवर चढावयाचें असेल, आणि खरे कार्यकर्ते व्हावयाचें असेल, तर तुम्हाला ही साधुत्वाची वृत्ति सोडून चालणार नाहीं! यासाठीं " उदंड धिक्कारूनि बोलती । तरी चळों न द्यावी शांती । दुर्जनाशीं मिळोन जाती । धन्य ते साधु! ॥ " हा उपदेश तुम्ही आपल्या हृत्पटलावर अखंड आणि सदैव कोरून ठेवा, यापेक्षां मी अधिक काय सांगू? शिष्यांनो, तुम्ही खरे जातिवंत हिरे आहांत कां पटकन् फुटून जाणारी काच आहांत, ह्याच्या परीक्षेची, तुमच्या साधुत्वाच्या कसोटीची, हीच वेळ आहे हें लक्षांत ठेवा, आणि दयाक्षमाशांतीचा सदैव अंगीकार करा ! या कामीं तुकाराममहाराजांचें उदाहरण व एकनाथ महाराजांचें चरित्र तुम्हीं अवश्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. किंबहुना, भागवतधर्मीय सर्व साधुसंत अशाच तोडीचे होऊन गेलें, आणि म्हणूनच त्यांना दिव्य कार्य करतां आले, हें विसरूं नका ! " तुका म्हणे तोचि संत । सोशी जगाचे आघात! ॥ " ही तुकोक्ति फार महत्त्वाची आहे! " हिरा ठेविता ऐरणी। वाचे मारिता जो घणीं ॥ तोचि मोल पावे खरा । " आणि "करणीचा होय चुरा ! ॥" हें तुम्ही न विसरतां, त्या कृत्रिम कांचेच्या हिऱ्याप्रमाणें व्हावयाचें, कीं जातिवंत अस्सल हिरा होऊन " धिक्कारिता धिक्कारेना ! " अशा तेजानें तळपत राहायचें, हें तुमचें तुम्हींच ठरवा. पण लक्षांत ठेवा कीं, अस्सल हिऱ्यांचेंच येथें काम असून त्यांचीच माळ मला भारतमातेच्या कंठीं घालावयाची आहे, व त्यांचेच तेज सर्वत्र फाकावें अशी माझी इच्छा आहे ! यासाठीं "क्षमाशीळ तयाच्या तुका । हानीच नाहीं!॥" हें पूर्ण लक्षांत ठेवा जो खरा क्षमाशीळ साधु आहे, त्याचें महत्त्व निंदकांच्या छळानें एक रेसभर तरी कमी होतें काय ? मुळींच नाहीं. उलट त्या दुष्टांचेंच हंसू होऊन, व तेच पुढें पश्चात्ताप पावून, आपणांस शरण येतात, असाच आजवरच्या जगांतील साधुसंतांचा अनुभव आहे. छळणारे निंदक छळून जातात पण कीर्ति मात्र त्या साधूची होते, व ती अखंड आणि चिरकाल टिकते ! अपमानाच्या भट्टींत तावूनसुलाखून

निघालेलें सज्जनांचें शुद्ध सत्वसुवर्ण कसाला लागून शंभर नंबरी ठरल्या-मुळें अधिकच तेजानें तळपूं लागतें, हें विसरूं नका! पानाच्या पिकाच्या पिचकाऱ्या मारून नाथांची परीक्षा घेण्यास निघालेला यवन, शेवटीं शर-मून नाथांना शरण आला ना? तुकारामाला छळणाऱ्या मंबाजीनें आणि रामेश्वरभटांनीं, शेवटीं त्या साधुवर्यांच्या चरणावरच लोळण घेतली ना? ह्या गोष्टी तुम्हांला काय सांगतात? “ धक्के चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे । पस्तावोनि परावे । आपले होती!॥” हाच सिद्धान्त त्या तुम्हांस सांगत नाहींत काय? यासाठीं “ दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती!॥ ” हें तुकोबांचें बिनमोल वचन लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागा, असा समर्थांचा आपल्या शिष्यांना कळकळीचा उपदेश व दहावी शिक-वण होती; आणि विचार करून पहातां, ती अत्यंत उदात्त व सखोल आहे, हें कोणासही कळून येणार आहे! जीझस ख्राइस्टला फांसावर लटका-वणारे लोकच, आज त्याला ईश्वरावतार मानून त्याच्यापुढें गुडघे टेकीत आहेत व स्वतःला तारण्याविषयीं त्याची प्रार्थना करीत आहेत,हा देखावा पाहिला म्हणजे काय वाटतें? साक्रेटिसाला विषाचा पेला चारला गेला असतांही,त्याची कीर्ति त्रिखंडांत आज गाजत आहे,ती काय दाखविते? ह्या सर्व गोष्टी एकच तत्त्व सांगतात कीं, लोकाना मिळवून घ्यायला क्षमे-सारखें दुसरें शस्त्र नाहीं! आणि यासाठींच, “ अन्याय थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावें!॥ ” व “ कदापि रागासि न यावें । क्षमा रूपें!॥ ” असा समर्थांचा दिव्य उपदेश आहे! असो.

यानंतरची अकरावी शिकवण विरक्तवृत्तीची होय! विरक्त वृत्ति आणि निःस्पृह वागणूक ही जवळजवळ सारखीच असून त्याचा आपण थोडक्यांत विचार करूं. कारण निःस्पृहपणाचा विचार मागें एकदां आपण केला आहेच. येथें इतकेंच सांगायचें कीं, समर्थांनीं आपल्या महाराष्ट्र, धर्माचें उद्दिष्ट इथेंहि दृष्टिआड केलेलें नाहीं! विरक्तवृत्ति कां धरायची? तर “ उदास वृत्तिस मानवे जन ” आणि “ स्वतः निःस्पृह असेना । त्याचें बोलणेंचि मानेना!॥” म्हणून. अर्थात् लोक-संग्रहाचा उद्देश समर्थांच्या डोळ्यापुढें कसा सारखा स्थिर होता, हें ह्यावरून उघड होतें! पण इथें हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, लोक-

संग्रह त्यावांचून होत नाहीं, व तो लोकसंग्रहाला सहायक होतो, म्हणूनच केवळ, अर्जुनाच्या त्रिदंडी संन्यासासारखा, हा गुण वरवर धारण करायचा नसून, तो मूळांतूनच पाहिजे, असेंच समर्थांना सांगावयाचें आहे! सबंध राज्याच्या उलथापालथी केल्या, तरी पुन्हा आपण आपली स्वतंत्र,मुक्त,आणि आनंदी विरक्त वृत्ति सोडतां कामा नये, तर उलट:—

" विवेके अंतरीं सुटला । वैराग्यें प्रपंच तुटला ।
अंतर्बाह्य मोकळा झाला । निस्संग योगी ! ॥ १२–४–१२
आस्था नाहीं त्रैलोक्याची । स्थिती बाणली वैराग्याची ।
येत्न–विवेक–धारणेची । सीमा नाहीं ! ॥१२–४–१४॥

अशा प्रकारचा खराखुरा थाट दृष्टीस पडला पाहिजे, हेंच समर्थांना येथें सांगावयाचें आहे ! म्हणून ते म्हणतात:—

" व्याप होईल तों रहावें । व्याप राहतां उठोन जावें ।
आनंदरूपें फिरावें । कोठें तरी ! ॥ १९–१०–२३
उपाधीपासून सुटला । तो निःस्पृहपणें बळावला ।
जिकडे अनुकूल तिकडे चालिला । सावकाश ! ॥१९–१०–२४

अशा प्रकारची मौज त्यांत क्षणाक्षणाला दिसली पाहिजे ! " वैराग्य-भाग्या"च्या भरांत एक लंगोटी, एक कुबडी, एक माळ, आणि एक झोळी, यावांचून सारें राज्य जरी कोणी अर्पण केलें तरी, " आस्था नाहीं त्रैलोक्याची !" अशा प्रकारची निःस्पृह वृत्ति चमकली पाहिजे– "तरीच महंत लीळा स्वभावें । अंगीं बाणे ! ॥" हें उघड आहे. असो.

सरतेशेवटीं, सर्व गुणांच्या समारोपादाखल समर्थ सांगतात, कीं ईश्वराच्या अवताराप्रमाणें, यांतील प्रत्येक गुण कार्यकर्ता आहे, मग सर्वांचा समुच्चय काय एक करणार नाहीं ? इतकेंच नव्हे, तर अत्यंत उत्कटत्वानें यांतला कोणचाही गुण तुमच्या ठिकाणीं नाचत असला, तरीसुद्धां तुम्हीं विख्यात व्हाल, हें लक्षांत ठेवा ! कारण, उत्कट गुणांत किंवा गुणाच्या उत्कटतेंत, तसेंच अलोट सामर्थ्य वास करीत असून, कडाडणाऱ्या विजेप्रमाणें तें लोकांचें चित्त निःसंशय आपल्या-बाजूला खेंचल्यावांचून राहणार नाहीं, हें निभ्रांत समजा ! पण एकच

एक गुण प्रामुख्यानें गाजावयाचा असेल, तर वरील विजेच्या कडकडाटानें गाजला पाहिजे, ती वीज ज्याप्रमाणें कडकड करीत भूमींत शिरून पाताळची गंगा वर आणते, त्याप्रमाणें कोणच्याही उत्कट गुणानें लोकांच्या हृदयांत घुसून तेथून सहानुभूतीचें निर्मल जल त्यांच्या नेत्रावाटे व मुखावाटे आणलें पाहिजे, आणि असें झालें तरच कीर्ति होते, हें लक्षांत ठेवा ! समर्थ म्हणतात—

" कांहीं एक उत्कटेविण । कीर्ति कदापि नव्हे जाण ॥
उगाच वणवण हिंडोन । काय होतें ? ॥ "—

यासाठीं " उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन । उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ! ॥ " असें कांहींतरी करा; कारण " उत्कट निःस्पृहता धरली । त्याची कीर्ति दिगंत फांकली । उत्कट भक्तीनें निवाली । जनमंडळी ! ॥ " असा अनुभव आहे. म्हणूनः—

" उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें ।
निःस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ! ॥ "

हाच पायंडा तुम्ही धरा, आणि कोणच्या तरी गुणाचा अगदीं कडेलोट उर्फ कळस केल्यावांचून राहूं नका, असें समर्थांचें आपल्या शिष्याना शेवटचें कळकळीचें सांगणें आहे ! याप्रमाणें तुम्ही जर ही शिकवण लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागाल तर—अहाहा !

" हे शिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वोळंगती ।
अंगीं बाणे महंती । अकस्मात ! ॥ १४–१–८० "

असा समर्थांचा आपल्या शिष्याना शेवटचा आशीर्वाद आहे ! अर्थात् अशाप्रकारची महंती अथवा महंतपदवी प्राप्त झाल्यावर, मग लोकसमुदायाला काय कमी आहे ? लोहचुंबकाच्या मागें ज्याप्रमाणें लोहाच्या टांचण्या लागतात त्याप्रमाणें मग " ठायीं ठायीं उदंड तावे । मनुष्यमात्र तितुका झोंबे ! । " असा थाट उडायला काय उशीर आहे ? अशा महंताच्या मुखांतून पडणाऱ्या आज्ञेची वाट पहात लोक आतुरतेनें तिष्ठत असतात; आणि " भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ! ॥ " याप्रमाणें त्याच्या गुप्तसत्तेचें निशाण जागोजाग फडकत असतां, " तेथें यश कीर्ति

प्रतापे । सीमा सांडिली ! ॥ "—मग त्या वैभवाला काय कमी ? सांगण्याचा भाग इतकाच कीं,

" सांग महंती संगीत गाणें । तेथें वैभवास काय उणें ।
नभामाजीं तारांगणें । तैसे लोक ! ॥ " १२-९-२७

याप्रमाणें वैभव आणि समुदाय यांचा भरपूर पुरवठा अशा महंताला मग साहजकिच होतो, हें काय वेगळें सांगायला पाहिजे ? पण अशा महंतानें काय करावें ?

" महंते महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावें ।
शहाणें करूनि विखरावें । नानादेशीं ! ॥ "--

अर्थात् सबंध देशाचा देश उठावणीस तयार होण्यासाठीं याप्रमाणें महंतांचे जाळें सर्व देशभर पसरायला हवें हें उघड आहे, आणि म्हणूनच " महंतें महंत करावें " अशा प्रकारचा उपरिनिर्दिष्ट उपदेश समर्थांनीं सर्व महंतांला केला आहे !

पण त्याजबरोबर समर्थांनीं कच्चया दिलाच्या, कच्च्या बुद्धीच्या, आणि कच्च्या आचाराच्या महंताला एक इशारतीची सूचना दिली आहे, ती सर्वांनीं अवश्य लक्षांत ठेवण्यासारखी आहे ! कारण समर्थांच्या जोरकस राजकारणाला आणि दणकट धर्माला लेचेपेचे वीर नको असून, आचार, विचार, आणि उच्चार, यांत पूर्ण वाकबगार आणि तरबेज असेच लोक हवे होते ! जोंवर उपरिनिर्दिष्ट गुण अंगीं बाणले नाहींत, जोंवर समर्थांची शिकवण अंगीं मुरली नाहीं, तोंवर आपल्या फुटक्या पाव्यांतून बदसूर काढून हंसें करून घेण्यांत काय अर्थ आहे ? आपल्या हातून व्यापआटोप होत नाहीं, आपल्या अंगीं अकलेचा तेवढा मगदूर नाहीं, आणि क्षणाक्षणाला 'हिमालयपर्वताएवढ्या' चुका जर आपल्या हातून होऊं लागल्या, लोकांत कसें वागावें, लोकांना कसें राजी राखावें, आणि राजकारणांत कसें खेळावें, हें जर आपणांस समजलें नाहीं, तर उगाच महंतपणाचा आणि राजकारणी पुरुषाचा डौल मिरविण्यापेक्षा आणि आव आणण्यापेक्षां गप्प बसणेंच उचित नव्हे काय ? कारण खोटें कुणालाच सहन होत नाहीं. लोकांपाशीं खऱ्याखोट्याचा निवाडा तेव्हांच

होत असतो. तकलुपी नाण्याच्या वरच्या झकाकीला कांहीं काळ दुनिया झुकली, तरी त्याचा बद्द आवाज लवकरच तिच्या ध्यानीं आल्या-वांचून रहात नाहीं! आणि मग त्या फाजितीला पारावार आहे काय ? यासाठीं समर्थांची खालील शिकवण व कळकळीचा उपदेश आधुनिक ' महात्म्यांनीं ' अवश्य ध्यानीं घ्यावा आणि उगाच नसत्या भानगडींत पडून कुसमुसत राहूं नये, किंवा वेड्यासारखें कांहींतरी बरळत आणि भकत सुटूं नये, अशी आमची त्यांस नम्र प्रार्थना आहे; कारण " मूर्खा-करितां चिवडा होय । मजालसीचा ! ॥ " असें समर्थांचें सांगणेंच नव्हे, तर अनुभवसिद्ध सिद्धान्त आहे; किंबहुना, त्यांचे कोणचेच बोल वायफळ नसून " हे प्रचीतीचे बोलिले । आधीं केलें मग सांगितलें । मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणी एके ! ॥ " अशा अनुभवाच्या बैठकीवर उभारलेले आहेत! असो. ऐका ते काय म्हणतात ते:—

" पाठ म्हणतां आवरेना । पुसतां कांहींच कळेना ।
अनुभव पाहतां अनुमाना— । मध्यें पडे ! ॥
जेथें नाहीं समजावीस । तेथें अवघी कुसमुस ।
पुसों जातां वसवस । वक्ता करी ! ॥
नाना शब्द एकवटले । प्रचीतिविण पाठ केले ।
परी ते अवघे व्यर्थ गेले । फड–प्रसंगीं ! ॥
घांसा मागें घांस घेतला । अवकाश नाहीं चावायला ।
अवघा बोकणा भरिला । पुढें कैसें ? ॥
समस्या पुरतां वंदिती । समस्या न पुरतां निंदिती ।
गोसावी चिणचिण करिती । कोण्या हिशोबें ? ॥
वैद्याची प्रचीत येईना । व्यथा परती होईना ।
आणि रागेजावें जना । कोण्या हिशेबें ? ॥
खोटें कोठेंचि चालेना । खोटें कोणास मानेना ।
याकारणें अनुमाना । खरें आणावें ! ॥
स्वयें आपणचि गुंते । समजावीस कैशी होते ।
नेणता कोणी एक ते । आपदाची आहे ! ॥

बळेंविण युद्धास गेला । तो सर्वस्वें नागावला ।
शब्द ठेवावा कोणाला । कोणें कैसा ? ॥
सोसवेना चिनचिन केली । तेथें तामसवृत्ति दिसोन आली ।
अवघी आवडीच उडाली । श्रोतयांची ! ॥
आशाबद्ध क्रियाहीन । नाहीं चातुर्याचें लक्षण ।
ते महंतीची भणभण । बंध नाहीं ! ॥
ऐसे गोसावी हळू पडती । ठायींठायीं कष्टी होती ।
तेथें संगतीचे लोक पावती । सुख कैचें ? ॥
जो जो लोक दृष्टीस पडला । तो तो नष्ट ऐसा कळला ।
अवघेच नष्ट एकला भला । कशावरूनी ? ॥
तस्मात् लोकीं वर्ततां नये । त्यास महंती कामा नये ।
परत्र साधनाचा उपाय । श्रवण करून असावें ! ॥
आपणांस बरें पोहतां नये । लोक बुडवावयाचें कोण कार्य । ?
गोडी आवडी वाया जाय । विकल्पचि अवघा ! ॥ ”

यासाठीं समर्थ पुढें थोडसा उपदेश करतातः—

“ अभ्यासें प्रकट व्हावें । नाहीं तरी झांकोनि असावें ।
प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ! ॥ ”

कारण—

“ मंद हळुहळु चालतो । चपळ कैसा आटोपतो ? ।
आरबी फिरवणार तो । कैसा असावा ? ॥
हीं धकाधकीचीं कामें । तीक्ष्ण बुद्धीचीं वर्मे ।
भोळ्या भावार्थे संभ्रमें । कैसें घडे ? ॥ ”—

अर्थात् किंचित धक्क्यानें किंवा दंग्यानें ज्यांचा जीव गुदमरूं लागतो आणि ज्यांच्या निश्चयाचा चुरा होऊन जातो त्या संभ्रम पावलेल्या भोळ्या भावार्थाच्या ‘ महात्म्यांनीं ’ राजकारणापासून दूरच राहावें, हेंच उचित नव्हें काय ? समर्थ पुढें म्हणतातः—

“ शेत केलें परी वाहेना । जबार केलें परी फिरेना ।
जन मेळविलें परी धरीना । अंतर्यामीं ! ॥
जरी चढती वाढती आवडी उठे । तरीच परमार्थ प्रगटे ।
धसधस करितां विटे । सगट लोक ! ॥

आपलें लोकांस मानेना । लोकांचें आपणांस मानेना ।
अवघा विकल्पचि मना । समाधान कैचें ? ॥
कारभार आटोपेना करवेना । आणि उगेंहि राहवेना ।
याकारणें सकळ जना । काय म्हणावें ? ॥—"

साहाजिकच समर्थ अशा 'महात्म्यांना' सांगतात.

" नासक उपाधीस सोडावें । वय सार्थकीं घालावें ।
परिभ्रमणें कंठावें । कोठें तरी ! ॥
परिभ्रमण करवेना । दुसऱ्याचें कांहींच सोसेना ।
तरी मग उदंड यातना । विकल्पाची ! ॥ "—असो.

समर्थ शेवटीं म्हणतात कीं:—

" आतां हे आपणांचपाशीं !। बरें विचारावें आपणांशीं ! ।" आणि तें काय ? आणि कसें करावें ? याचें उत्तर येयवर अनेक वेळां समर्थांनीं दिलेलें आम्ही आमच्या प्रियवाचकांस सांगितलेंच आहे ! तरी प्रस्तुत विषयाचा समारोप म्हणून पुनश्च एकदां संकलित रूपाने त्यांचा उपदेश थोडक्यांत वाचकांपुढें ठेवतों ! समर्थांच्या समग्र शिकवणीचें थोडक्यांत गोड सार खालीलप्रमाणें आहे:—

" उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास शिकवावे ।
उदंड समुदाय करावे । परी गुप्तरूपें ! ॥
अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग ।
लोक समजोन मग । आज्ञा इच्छिती ! ॥
अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें ।
आपला मगज राखणें । कांहीं तरी ! ॥
अचूक यत्न करवेना । म्हणोन केलें तें सजेना ।
आपला अवगुण जाणवेना । कांहीं केल्या ! ॥
खळ दुर्जन भेटला । क्षमेचा धीर बुडाला ।
तरी मौनेंचि स्थळत्याग केला । पाहिजे साधकें ! ॥
आपणांसि आहे मरण । म्हणोन राखावें बरेंपण ॥
कठिण आहे लक्षण । विवेकाचें ! ॥

जैसें मुखें ज्ञान बोले । तैशीच सर्वे क्रिया चाले ।
दीक्षा देखोनि थक्कित झाले । शुचिष्मंत ! ॥
आशा नाहीं त्रैलोक्याची । स्थिति बाणली वैराग्याची ।
यत्नाविवेकधारणेची । सीमा नाहीं ! ॥
सन्मार्गें जगास मिळाला । म्हणजे जगदीश वोळला ।
प्रसंग पाहिजे कळला । कोणी एक ! ॥
पतितपावनाचे दास । तेही पावन करिती जगास ।
ऐसी हे प्रचीत मनास । बहुतांच्या आली ! ॥
येथलि येथें अवघेंचि राहातें । ऐसें प्रत्ययास येतें ।
कोण काय घेऊन जातें । सांगाना का ? ॥ ''

म्हणून—

" शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें ।
उणें पडोंचि नेदावें । कोणा एकाचे ! ॥
अडलें जाणलेसें जाणावें । यथाशक्ति कामास यावें ।
मृदुवचनें बोलत जावें । प्राणीमात्रासी ! ॥
आळस अवघाच बुडवावा । यत्न उदंड करावा ।
द्वेष मत्सर न करावा । कोणी एकाचा ! ॥
आपण अवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें ।
या कारणें भजनास लावावें । बहुत जन ॥
या कारणें समुदाव । झाला पाहिजे महोत्साव ॥
हातोपातीं देवाधिदेव । ओळेसा करावा ! ॥
वेडे करावे शहाणे । तरीच जिणें श्लाघ्यवाणें ।
उगेंच वादांग वाढवणें । हें मूर्खपण ! ॥
दुसऱ्याचे चालीं चालावें । दुसऱ्याचे बोलीं बोलावें ।
दुसऱ्याच्या मनोगतीं जावें । मिळोनिया ! ॥
आधीं अंतर हातीं घ्यावें । मग हळुहळूं उकलावे ।
नाना उपायें न्यावें । परलोकासी ! ॥
झिजल्यावांचून कीर्ति कैची । मान्यता नव्हे कीं फुकाची ।
जिकडे तिकडे होते ची ची । अवलक्षणें ! ॥

ओस मुलुखीं काय पहावें । लोकांवेगळें कोठें रहावें ? ।
तऱ्हे खोटी सांडतें घ्यावें । कांहीं एक ॥ "

यासाठीं त्यांची शेवटची आणि एकच एक शिकवण सर्व लोकांना हीच आहे कीः--

जिकडे तिकडे कीर्ति माजे । सकट लोकांस ह्व्यास उपजे ।
लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ! ॥
परलोकीं वास करावा । समुदाय उगाच पहावा ।
मागण्याचा तगादा न लावावा । कांहीं एक ! ॥ "

किंबहुनाः—

" जिकडे जग तिकडे जगन्नायक । कळला पाहिजे हा विवेक । " हेंच त्यांचें शेवटचें सांगणें आहे. पण असा विवेक कितीकांना कळतो बरें ? " रात्रंदिवस विवेकी लोक । सांभाळीत जाती ॥ " पण हाच विवेक नसेल तर ? " अविवेकें प्राणी रंक । ऐसा दिसे ! ॥." अर्थात् हा रंकाचा रंकपणा भोगायचा, कां सगुणांची भाग्यश्री मिरवायची, हें ज्याचें त्यांनींच आपणांशीं ठरवावें. कारण—

" हें सर्व आपणाचपाशीं । येथें बोल नाहीं इतरांशीं ।" असें समर्थांचें शेवटचें आणि कळकळीचें सांगणें आहे ! अहाहा ! किती हा गोड, प्रेमळ आणि उदात्त उपदेश! रंकाचा राव आणि भणंगाचा भाग्यवान् बनवण्याचें सामर्थ्य असलेल्या ह्या दिव्य उपदेशाला माझे शतशः प्रणाम असोत, यापेक्षां वाचक, मी अधिक काय सांगू ? असो.

---

# भाग १६ वा.

याप्रमाणें दिव्य उपदेशामृत आपल्या शिष्यांना पाजणारे, इतकेंच नव्हे तर स्वतः त्याप्रमाणें अक्षरशः वागून अशा सर्व महंतांचे मेरुमणि शोभणारे, समर्थ खरोखरीच समर्थ होते. शारीरिक, बौद्धिक, आणि आत्मिक सामर्थ्याचा पुरोपुर निवास ज्याचें ठायीं असून वरील महाराष्ट्र-धर्मात जो तरबेज असेल, व जनतावृत्तिसागराच्या प्रचंड व पर्वतप्राय

लाटा ज्याला आपल्या सक्रिय वाक्चातुर्याच्या जोरावर उसळवतां येतील, तोच समर्थ होय, ह्यांत शंका नाहीं ! नुसता " जयजय रघुवीर समर्थ " म्हणून दारोदार भीक मागणारा फाटका इसम समर्थ नव्हे. त्याला फार तर लौकिकी भाषेंत रामदासी म्हणतां येईल. पण समर्थ ही पदवी वर सांगितलेल्या भाग्यवंतांच्यासाठींच आहे! समर्थही आपणांस हेंच सांगतात. ते म्हणतातः—

" जो बहुत जनांस चालवी । नानामंडळें हालवीं ॥
ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ! ॥ " १८–१०–४६.

अर्थात् हें काम वर सांगितल्याप्रमाणें सामर्थ्यसंपन्न पुरुषाचेंच आहे, आणि शारीरिक सामर्थ्यापेक्षांहि त्यास बौद्धिक आणि आत्मिक सामर्थ्यंच अधिक हवें, हें उघड आहे-पण तिहींच्याहि त्रिवेणी संगमांत अवगाहन करणारा पुण्यपावन महात्मा असेल, तर फारच उत्तम ! आमचे समर्थ अशा तोडीचे महंत होते, ते महंतांचे अग्रणी व मेरुमणि होते! महंतांच्या माळेंतल्या ह्या मेरुमण्यापाशीं आल्याबरोबर, सामान्य माळेच्या जपविधिप्रमाणेंच, येथेंही क्षणभर थांबून आणि थबकून, त्या मेरुमण्याला मस्तकीं लावून त्याला अनन्य नमस्कार करावा, असेंच कोणाही भोळ्या भाविकालाच नव्हे, तर चिकित्सक विद्वानालाही वाटावें, अशा तोडीचे समर्थ " समर्थ " होते ! समर्थांनीं सांगितलेल्या महाराष्ट्रधर्माचे गुण म्हणजे त्या धर्मचंद्राची एक एक कला असून, अशा सर्व कलांच्या संपूर्ण वैभवानें आकाशप्रांगणांत पौर्णिमेच्या दिवशीं झळकणाऱ्या सुधांशुबालकाला पाहून ज्याप्रमाणें त्याच्या समुद्रजनकाला अपरंपार प्रेमाचें भरतें येतें, व त्या प्रेमाच्या भरतीनें भरून येणारें त्याचें हृदय ज्याप्रमाणें कित्येक तास सारखें हेलावत असतें, तीच स्थिति येथेंहि होते ! महाराष्ट्रीय व भागवतधर्मी संत व त्यांचे स्वधर्मी व परधर्मी छलक ह्या देवदानवांनीं भारतवर्षाचा जनतासागर आपल्या निश्चयाच्या मेरुमांदाराला चिकाटीची रज्जु बांधून घुसळला असतां, त्यांतून अकबरासारखा कौस्तुभमणि निघाला, समर्थांसारखे चंद्रमे बाहेर पडले, व अवरंगजेबासारखे स्वधर्माभिनिवेशाच्या पायीं दुसऱ्याला हालहाल करून ठार मारणारे हलाहल विषही उत्पन्न झालें ! अर्थात् जगाला जाळीत सुटलेल्या त्या हालाहल विषाचें पान जसें

शेवटीं शंकरास करावें लागलें,त्याचप्रमाणें ह्याही हलाहल विषाचें पान त्याच शंकराचा—शिवाचा—अवतार जो शिवबा, त्यास करावें लागलें आहे! पण ती गोष्ट अर्थात् पुढची आहे. तत्पूर्वी अर्थात् जनतेंतूनच उत्पन्न झालेल्या, महाराष्ट्रधर्मीय षोडशकलांनीं पूर्ण शोभणाऱ्या, समर्थासारख्या ‘अलांछन चंद्रम्या’ला पाहून, त्या जनतासागराला किती प्रेमाचें, आदराचें, व कौतुकाचें भरतें दाटत असेल याची वाचकांनींच कल्पना करावी! कारण खरोखरच महाराष्ट्रधर्माच्या चतुरंगानें नटलेल्या ह्या चतुर चंद्रम्याचे—महाराष्ट्रधर्मरूप ‘चातुर्यचंद्राचें’—समर्थांनीं सांगितलेलें एक एक गुण म्हणजे एक एक कला होती! अर्थात् पारतंत्र्याच्या अमावास्येच्या काळोख्या रात्रीं जनता सागरास लागलेली परदास्याच्या नादानपणाची ओहोटी किती विषाद उत्पन्न करणारी असते, त्याचें वर्णन मागें येऊन गेलेंच आहे; पण ती ओहोटी पुरी झाल्यावर, जनतासागराचा संकोच पुरा होऊन त्यावरची उल्लासवृत्ति नाहींशी झाल्यावर, किंबहुना, त्याच्या प्रसरणशील लाटा आंतल्याआंत खेंचल्या जाऊन त्यांचा दैवी स्वातंत्र्याचा आनंद मावळल्यावर, अधःपाताची शेवटची पायरी हेंच उन्नतीचें पहिलें पाऊल असतें, रहाटगाड्यांतील तळाशीं पोहोंचलेला पोहोराच लवकर पाण्यानें प्रथम भरूं लागतो, अथवा “The darkest hour is nearest the dawn” ह्या आंग्लवचनाप्रमाणें, जनतासागराच्या त्या संकुचित लाटांला पुन्हां थोडथोडी भरती आणून हंसवायला सुरवात होते! आणि हें हंसवण्याचें कार्य, निसर्गांतल्या हंसऱ्या चंद्राप्रमाणेंच, हा महाराष्ट्रधर्माचा सुधांशु कलेकलेनें करीत असतो; अर्थात् प्रतिपदेची चंद्ररेखा घेतली तरी, तिच्या एका कलेच्या प्रकाशाचें कौतुक करण्यास जसा तिचा समुद्रजनक थोडासा तरी हेलावतोच, त्याप्रमाणेंच महाराष्ट्रधर्मचंद्राच्या विविध गुणांच्या कलांपैकीं कोणचीही एक कला—कोणचाही गुण दृश्यमान होऊन आपल्या प्रकाशानें झळकूं लागला कीं, त्या कलेच्या मगदुराप्रमाणें जनतासागर कांहीं काळ निस्संशय हेलावत राहिलाच पाहिजे, आणि त्याप्रमाणें तो राहतोही! कारण चंद्रास असलेल्या निसर्गाच्या ईश्वरी आशीर्वादाप्रमाणेंच महाराष्ट्रधर्माचे द्रष्टे, प्रणेते, व उपदेष्टे जे समर्थ रामदासस्वामी, त्यांचाही त्या

महाराष्ट्रधर्माच्या गुणापैकीं कोणच्याही उत्कटत्वानें नाचणाऱ्या, झळकणाऱ्या, व प्रकाशणाऱ्या गुणाला हा आशीर्वादच आहे कीं, त्या गुणाच्या कलेच्या प्रकाशाचा नाच महंताचे ठायीं दिसल्याबरोबर, त्या नाचाचे तालावर जनतासागराचें हृदयही कांहीं काळ नाचलेंच पाहिजे! कारण, निसर्गातल्या चंद्रकलेप्रमाणेंच, ह्याही गुणकलेच्या ठायीं तशीच अद्भुत शक्ति आहे असें समर्थांचें सांगणेंच आहे! म्हणूनच त्यांनीं "कांहीं एक उत्कटेंविण । कीर्ति कदापि नव्हे जाण । उगाच वणवण हिंडोन । काय होतें ? ॥ "—अशा तऱ्हेचा सोज्ज्वळ उपदेश आपल्या शिष्यांना केला आहे! आणि यासाठींच "उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट चातुर्य उत्कट भजन । उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ! ॥ " इत्यादि प्रकारें कोणच्या तरी उत्कट गुणाचा आश्रय करा, सर्व गुण अंगीं बाणवत नसतील, तर एका गुणाच्या प्रकाशाचा तरी कडेलोट करा, असें त्यांनीं पुढें सांगितलें आहे, तें किती सहृदय आणि प्रेमळ आहे बरें ! अहाहा ! समर्थ माऊलीच्या ह्या कनवाळूपणाला सीमाच नाहीं, हेंच खरें ! असो. पण प्रतिपदेच्या चंद्राची कोर दिसादिसांनीं जों जों वाढत जाते, तों तों आपल्या वाढत्या वयाच्या कलेबरोबर आपल्या अधिकाधिक सुरम्यतेनीं व वाढत्या वयाच्या बाललीलांनीं ती समुद्रजनकाच्या अंकावर लोळून, त्याला अधिकाधिकच प्रेमाचें भरतें व प्रेमाचा गहिंवर आणते, व त्या गहिंवरानें दाटलेले त्या पित्याचे निःश्वास त्याच्या हृदयाच्या पृष्ठभागांवर कितीतरी वेळ हेलावत रहातात, हें आपणांस ठाऊकच आहे! तीच स्थिति येथेंही होते. 'प्रतिपच्चंद्ररेखेव' ह्या महाराष्ट्र धर्मचंद्राच्या गुणांची कला जों जों अधिकाधिक वाढत जाते व तिच्यांत एकेका गुणाची अधिकाधिक भर पडत जाते, तों तों जनतासागरास अधिकच भरतें सुटून तो अधिकाधिकच हेलावत राहतो! त्याच्या हर्षोर्मींच्या, कौतुकाच्या व आदराच्या, लाटा किती काळ तरी साहजीकच उठत असतात ! आणि संपूर्ण षोडशकलांनीं युक्त असा तो कलानाथ, तारकापति, सुधांशु शुद्ध पौर्णिमेच्या रात्रीं निरभ्र नीलाकाशांत आपल्या संपूर्ण तेजानें उगवून झळकूं लागल्यावर, मग तर काय ! मग त्या प्रेमाच्या भरतीला काय विचारता ! त्या भरतीच्या

भरांत बेभान होऊन, आपल्या सहस्र लाटांच्या बाहूंनीं आपल्या लाडक्या सुधांशु–बालकाला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरण्यासाठीं यत्न करणाऱ्या रत्नाकराचे हातून वेलातिक्रम होतो कीं काय, असाहि प्रसंग येऊन ठेपतो, तीच गोष्ट ह्या जनता–सागराची होते! महाराष्ट्रधर्माच्या सर्व गुणकलांच्या संपूर्ण ऐश्वर्यानें झळकणारा समर्थासारखा चालताबोलता चंद्र पाहून, आकाशप्रांगणांतून चाललेल्या ' अमृताच्या चालत्या सरोवरा ' प्रमाणें आपल्या उपदेशामृताची वृष्टी करीत जगदाकाशाच्या प्रांगणांतून चाललेले समर्थासारखे ' अमृताचें चालतें सरोवर ' देखून, जनता–सागराच्या प्रचंड समुदायाच्या लाटारूप अनंत हस्तांनीं, त्या आपल्याच पोटच्या पोराला कवटाळण्यास धावणाऱ्या व त्या उत्सुकतेच्या व प्रेमाच्या भरांत बेभान झालेल्या जनता–सागराचे वेलातिक्रम व्हावें, त्यास वेळेचेंहि भान राहूं नये, हें किती साहजीक आहे बरें? अर्थात् नैसर्गिक चंद्राच्या दर्शनाकर्षणानें समुद्र–जनकाचें हृदय जसें पुरेपुर भरून येतें, व त्या भरतीच्या लाटा तासन् तास सारख्या हेलावत राहतात, तीच गोष्ट इथेंहि होते! पण अशा तऱ्हेनें खऱ्या चंद्रम्यास त्याच्या अनुचर तारागणांसह आपल्या भरतीच्या पोटाशीं कवटाळून धरणाऱ्या वारिधीला तो खरा चंद्रमा सांपडतो काय? मुळींच नाहीं! तो चंद्रमा–तो खरा रजनीनाथ, तारकापति, सुधांशु तर उच्च अशा आकाशोद्यानांत स्वैरविहाराची मजा मारीत असून; केवळ आपल्या शीतल व सुखकर अशा किरणांनीं व प्रतिबिंबांनीं ठायींठायीं असणाऱ्या मनुष्यमात्रांना व सप्तसागरांला भरती आणण्याचें दिव्य कार्य करीत असतो! साहजीकच " जळींचे जळीं न शिविजे पद्मपत्र " ह्या प्रसिद्ध पारमार्थिक दृष्टान्ताप्रमाणेंच इथेंहि स्थिति असून, महाराष्ट्रधर्मचंद्राचे मूर्त अवतार व चालत्याबोलत्या सगुण भाग्यश्रीचे भगवान् जे समर्थासारखे राष्ट्रीय संत सत्पुरुष, त्यांचीही स्थिति जनता-सागराच्या, हेलावणाऱ्या लोकसमुदायाच्या, बाबतींत-"आहे तरी सर्वांठायीं। पाहों जातां कोठेंचि नाहीं। जैसा अंतरात्मा ठायींच्या ठायीं। गुप्त जहाला! ॥ "–अशी कशी होते, व त्यामुळें चटक लागलेल्या लोकांची आणि आवड उत्पन्न झालेल्या जनसमुदायाची स्थिति–" लवलवा लवती

लोचन । लकलका लकलें मन । लपलपों लपती जन । आवडीनें ! ॥ ”—
अशी कशी होते, आणि “परतपरतों परी अंतरीं । चटक लागे ! ॥ ”
ह्याप्रमाणें जनतारूप राधेच्या चित्ताला चटकेचा चटका ह्या भगवान् कृष्णस्वरूपी महाराष्ट्रधर्माकडे, त्याच्या समर्थादिक चालत्याबोलत्या अवताराकडे, पाहून कसा लागून राहतो, त्याचें वर्णन आम्ही मागें केलेंच आहे !

आणि खरोखरीच हा महाराष्ट्रधर्म म्हणजे मंगलमय अशा श्रीविष्णूची, श्रीकृष्णाची, भगवान् शेषशायीची, मूर्ति आहे, ह्यांत तिळमात्र शंका नाहीं ! त्या भगवंताचा अवतार जसा—

“ यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥
परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ! ॥ ”—

ह्या त्यांनींच सांगितलेल्या वचनाप्रमाणें, ज्यावेळीं धर्माची ग्लानि होते, अधर्माचें पीक पिकतें, साधूंचा आणि साधुवृत्तिजनतेचा अमानुष छळ सुरू होतो, आणि दुष्टांचा नंगा नाच सर्वत्र दृष्टीस पडतो, त्यावेळीं होत असतो, त्याचप्रमाणें ह्या महाराष्ट्रधर्मरूप मंगलमय प्रभूचा अवतारहि अशाच प्रसंगीं होत असतो ! समर्थ रामदासस्वामींच्या महाराष्ट्रधर्मोदयाचे कालीं अशाप्रकारची स्थिति कशी झाली होती, “ब्राह्मण बुद्धिपासूनि चेवले । आचारापासूनि भ्रष्टले । द्विजत्व सांडोनि झाले । दास दासांचे ! ॥ ” ह्याप्रमाणें धर्माला ग्लानि कशी आली होती, परधर्मासहिष्णु अशा परधर्मी पिशाचांचा आणि दुष्कृती दुष्मानांचा नंगा नाच आणि ‘ हैदोस हुल्ला ’ सर्व आर्यावर्तभर कसा सुरू होता, व त्या पशूंच्या तरवारीला आणि विषयवासनांला पटापट बळी पडणाऱ्या दीनजनतेचा टाहो दशदिशा भेदून कसा जात होता, इत्यादिकांचें वर्णन आम्ही मागें केलेंच आहे ! साहजीकच, त्या ‘ अज्ञानाचे आंधारे गिळून घालायला,’ ‘ पुण्याची पहांट फुटायला, ’ आणि ‘ भक्तांला सात्विकाच्या दोंदे निघायला ’ महाराष्ट्रधर्मरूप मंगलमय भगवंताची ‘ मूर्ति ’ जगदाकाशाच्या क्षितिजावर ‘ प्रगटावी ’ हें किती साहजीक आहे बरें ! युगायुगांचे

ठायीं, धर्माला आलेली ग्लानि घालविण्याकरितां, स्वधर्माचें अभ्युत्थान साधण्याकरितां, आणि दुष्टांचे रान सफा जाळून काढून भूमातेला सुखविण्याकरितां, ज्याप्रमाणें मंगलमय भगवान् विष्णुचा अवतार शंखचक्रगदापद्मादि आयुधांनी शोभिवंतपणें संभवतो, तसाच महाराष्ट्रधर्मरूप श्रीविष्णूचा अवतारहि त्याच कार्यासाठीं आणि त्याचवेळेला होत असतो ! किंबहुना, ते दोन्हीं अवतार एकच होत; तीं एकाच चित्कलेची दोन रूपें असून आवळ्याजावळ्या मुलांप्रमाणें ते दोन्हीं अवतार एकमेकांचे परस्परपूरक प्राण आहेत असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं ! म्हणूनच—" गलिमांच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुरफुरती भुजा । ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ! ॥ "—असें समर्थ म्हणत आहेत, तर संपूर्ण दख्खनचें मिळालेलें राज्य चक्रवर्तीपदासह समर्थांच्या झोळींत टाकण्यास शिवबासारखी चिन्मयस्वातंत्र्याची मूर्ति तयार होत आहे, असा जो देखावा दृष्टीस पडतो त्याचें तरी कारण हेंच ! कारण, वाचक, लक्षांत ठेवा कीं, दुष्टांचें निर्दलन करून जगाचें सदा कल्याण चिंतणाऱ्या मंगलमय शिवाचा अवतार म्हणजेच आमचे शिवबा असून, महाराष्ट्रधर्माची, श्रीविष्णुची, भगवान् श्रीकृष्णाची, शेषशायी भगवंताची, चालती बोलती मूर्ति म्हणजे आमचे समर्थ रामदास स्वामी होते ! मग त्या शिवबाला आणि त्यांच्या मार्गदर्शक गुरुला स्वतःच 'देशभक्तीची वाट चुकून ' आंधळे झालेले ' महात्मे ' कांहींहीं म्हणोत अथवा कसलींही नांवें ठेवोत ! " आंधळ्यासी जग सारेंचि आंधळे " हेंच खरें ! असो. तर सांगण्याचा भाग इतकाच, कीं अशा मंगलमय विष्णूचा अवतार म्हणजेच आमचा महाराष्ट्रधर्म होय ! अर्थात् त्यामुळें खरोखरच " शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः " अशी स्थिति होऊन जाऊन शिवबा व रामदास यांची गुरुशिष्यांची जोडी नरनारायाप्रमाणें महाराष्ट्राच्या इतिहासांत आपल्या अद्वितीय तेजानें झळकत आणि चमकत राहावी, हें किती साहजीक आहे बरें ! असो. त्या महाराष्ट्रधर्मरूप श्री विष्णुच्या रम्य रूपाकडे, त्या तेजस्वी पण गोड आणि हंसऱ्या मूर्तिकडे पाहून कोणाचेंहि चित्त वेधून आणि वेडावून जावें, असेंच तें गोड ध्यान आहे ! त्या मूर्तिच्या चार हातांत

शंख, चक्र, गदा, पद्माचे ठायीं अनुक्रमें हरिभजन, सावधपण; राजकारण, आणि साक्षेपपूर्वक आक्षेपानिरसन, हीं चार आयुधें तितक्याच तेजानें आणि सोज्ज्वलतेनें चमकत आहेत! हरिभजनाच्या दिव्य शंखांतून रामनामाचा दिव्य ध्वनि ' भुं भुं ' करून घुमून घुमून निघत आहे, आणि परमेश्वरी प्रसादाचें शुद्ध गंगोदक त्याचवेळीं त्यांतून सर्व भक्तजनांच्या मस्तकावर पडून, त्या कृपाजलाच्या अभिषेकानें सर्वजण सुस्नात होत आहेत; त्या दिव्य ध्वनींच्या श्रवणानें व त्या कृपामृतजलानें पावन आणि निर्धूतकल्मष झालेल्या व दिव्यदृष्टि प्राप्त झालेल्या भक्तमंडळींच्या अंतर्भेदी दृष्टीच्या सुदर्शनचक्राची सावधपणाची चौफेर फेक सुरू आहे, व त्या सावधपणाच्या, चतुरस्रतेच्या, आणि चातुर्याच्या सुदर्शनचक्राच्या बळावर त्या चक्राप्रमाणेंच सर्व जनता महाराष्ट्रधर्मीय महंतमंडळी आपणांभोंवतीं भिंगरीसारखी फिरवीत आहे; नंतर राजकारणाच्या गदाघातानें, 'शठं प्रति शाठ्यं'च नव्हे, तर प्रसंगीं लाठ्यं सुद्धां करून, दुष्टनिर्दलनाचे, पण त्याचबरोबर– " आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि–" ह्या वचनाप्रमाणें आर्तांचें, अनागसांचें, व साधूंचें परित्राणाचें, कार्य सुरू आहे; व शेवटच्या अत्यंत कोमल, पण पाणी फोडून वर येण्यास कमी न करण्याइतकें कठोर, अशा कमलाप्रमाणें जें चौथें पद्माचे ठायीं असणारें साक्षेपपूर्वक आक्षेपनिरसनाचें आयुध, तेंहि आपलें कार्य शंकितांच्या आक्षेपांचें निरसन पद्माइतक्याच कोमल–कठोर शब्दांनीं करून गोड रीतीनें करीत आहे; असा हा दिव्य देखावा, हें दिव्य दर्शन, पाहून कोणाचें बरें मस्तक भक्तिभावानें विनम्र होणार नाहीं? ज्याचें होणार नाहीं तो ' देशभक्तीची व रामभक्तीची वाट चुकलेला वेडा महात्मा ' च असला पाहिजे; त्यावांचून इतर प्रत्येक मस्तक येथें नम्र झालेंच पाहिजे, अशा तोडीची ही महाराष्ट्रधर्मरूप परमात्म्याची लोभनीय मूर्ति आणि लोभनीय ध्यान आहे, यांत शंका नाहीं!

ह्या ठिकाणीं, " चौथा अत्यंत साक्षेप० । फेडावे. नाना आक्षेप । " ह्या समर्थांच्या चौथ्या शिकवणीबद्दल चार शब्द अधिक लिहावेसे वाटतात, आणि ते हेच कीं, त्यांच्याशीं तुलनेला घेतलेल्या

पद्माची उपमा त्याला अत्यंत साजत आहे,व इतर उपमाप्रमाणेंच हीही उपमा आपल्या साजिऱ्या गोजिऱ्या गोंडसपणानें शोभत आहे! कारण, या कामीं ज्ञानोबांचाही पाठिंबा समर्थवचनाला मिळून त्याची बहार आणि गोडी अधिकच खुलून दिसत आहे!कारण, असत्याचा व्यामोह दूर करण्यासाठीं सत्य प्रतिपादन करण्याच्या हातोटीची प्रशंसा दोघेही सारखेच करीत आहेत. साक्षेपपूर्वक आक्षेपनिरसन करतांना ह्या सत्याचाच अवंलब करा, असें समर्थांचें सांगणें आहे. सत्याची महती समर्थ पूर्ण जाणून होते. किंबहुना, " सत्यापरता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म । सत्यापाशीं पुरुषोत्तम । सर्वकाळ तिष्ठत !॥ " अशी मुक्तेश्वराची सांगी त्यांना माहीत होती. पण त्या परब्रह्माप्रमाणेंच ' डोळ्यांच्या बुबुळांना कमलदलांचा मंदमंद वारा ' जितका सुखद होतो तितकेंच सुखद पण प्रसंगीं कठिणतम दगडांना भेदून राहाणाऱ्या आकाशाप्रमाणेंच कठोर, असें हें सत्याचें एकाच वेळीं दुहेरी स्वरूप कसें आहे, ही कोमलकठोरता ह्या सत्याच्या ठायीं कशी विसलत आहे, त्याचें विवेचन ज्ञानोबांनीं, कमलाचा व इतर दृष्टांत घेऊन मोठे गोड रीतीनें केलें आहे, आणि समर्थांनाही तेंच म्हणावयाचें असल्यामुळें, आणि त्यांनाहि तेंच अभिप्रेत असल्यामुळें, ज्ञानोबांच्या या कामीं असणाऱ्या पांच सात ओंव्या आम्हीं आमच्या वाचकांस येथें सादर करतो, म्हणजे झालें. " अहिंसा सत्यमक्रोधः " ह्या श्लोकांतील ' सत्य ' ह्या पदावर व्याख्यान करतांना ' सत्य ' कोणचें, तें ज्ञानोबा सांगतातः—

" आतां तीख होऊनि मवाळ । जैसें जातीचें मुकुळ ।
कां तेज परी शीतळ । शशांकाचें ! ॥
तरी मऊपणें बुबुळें । झगडतांही परी नाडळे ।
येरवीं फोडी कोराळें । पाणी जैसें ! ॥
तैसे तोडावया संदेह । तीख जैसे कां लोह ।
श्राव्यत्वें तरी माधुर्य । पायीं घाली ! ॥
किंबहुना प्रियपणें । कोणातेंहि झकऊं नेणे ।
यथार्थ तरी खुपणें । नाहीं कवणा ! ॥

परि अहितीं कोपोनि सोप । लालनीं मऊ जैसें पुष्प ।
तिये मातेचें स्वरूप । जैसें का होय ! ॥
ऐको ठाता कौतुकें । कानातें निघती मुखें ।
जें साचारिवेचोनिं बिकें । ब्रह्महीं भेदी ! ॥
तैसें श्रवणसुखचतुर । परिणामोनि साचार ।
बोलणें जें आविकार । तें सत्य येथें ! ॥ "—

अर्थात् मातेच्या ममतेनीं, शशांकाच्या शीतलतेनीं, मुकुळाच्या मवाळीनें आणि मनाच्या मऊपणानें, तुम्ही लोकांचे आक्षेप अविकार चित्तानें, उत्क्षोभ न पावतां, न रागावतां, गोड शब्दानें दूर करा; पण त्याचबरोबर अज्ञानतमाचा नाश करण्यास शशांकाचे तेजही त्यांत असूं द्या, व्यामोहव्याधी निरसण्यास गोड औषधींचा रोगहारक गुणही त्यांत विलसूं द्या, हेंच ज्ञानोबाप्रमाणें समर्थांना येथें सांगावयाचें आहे! डोळ्यांतल्या बुबुळांनीं झगडूनही जें पाणी सांपडत नाहीं—त्यांच्या हातीं लागत नाहीं—तेंच मोठमोठे पर्वताचे कडे भेदून जसें पार होतें, आणि अशा पाण्याचें मार्दव अंगीं असून, त्या पर्वताला भेदणाऱ्या पाण्यालाही भेदून, कमल जसें त्या पाण्याच्या पृष्ठभागीं पुन्हा आपल्या मृदुत्वाच्या मनोहर पाकळ्या पसरून, हंसत आणि डुलत राहतें, त्याप्रमाणेंच तुमचें सत्यप्रतिपादन कोमल—कठोरतेच्या गोड मिश्रणानें रंगलेलें असूं द्या, हेंच ज्ञानोबाप्रमाणें समर्थांचेंहि येथें सांगणें आहे ! किंबहुना, लाकडाचा कोरून भुगा करणारा भुंगा, ज्याप्रमाणें कमलाच्या कोमलतेनें, त्याच्या प्रेमाखातर, त्याचा बंदिवान् होऊन प्रसंगीं प्राणांसही मुकतो, त्याप्रमाणें जनताकमलिनीच्या अथवा नलिनीच्या प्रेमाखातर, तिच्या हृदयाच्या अधिष्ठानावर विराजमान झालेल्या महाराष्ट्रधर्मीय महंतानें तिच्या कल्याणासाठीं प्रसंगीं प्राण देण्यासही मागें पुढें पाहूं नये, पण त्याचबरोबर त्या जनतेच्या शंकांचें पीठही आपल्या तीक्ष्ण दांतानें करण्यास कमी करूं नये, असा समर्थांचा आपल्या सर्व शिष्यांना दिव्य संदेश आहे! असो.

याप्रमाणें नानाविध संदेशांच्या दिव्य किरणांची प्रभा ज्या मनोहर मूर्तीच्या मुखांभोंवतीं फांकली आहे, अशी महाराष्ट्रधर्माची ही मधुर मोहनाची मोहक मूर्ति असून, तिच्या हातीं, " दोंवरी दो भुजा " घेऊन आलेल्या

त्या चौभुजांच्या मंगलमयमूर्तीच्या हातीं, शंखचक्रगदापद्माप्रमाणें हरिभजनादि चार आयुधें सतेजपणें तळपत आहेत ! ती 'मनहर' मूर्ती जनतारूप क्षीरसागरावर उभी आहे अथवा त्या जनतारूप क्षीरसागरावर, तिच्या विश्वासाच्या शेषावर, शेषशायी भगवंताप्रमाणें, शयन करून राहिली आहे; मनांत विश्वाच्या कल्याणाचें चिंतन सुरूं आहे, पायाशीं " हें शिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वोळंगती !। " अशी सकळ ऐश्वर्याची भाग्यश्री—लक्ष्मी असून, ती प्रभूचे पाय वक्षस्थळीं घेऊन आनंदानें चुरीत आहे, प्रभूच्या गळ्यांत समर्थांनीं सांगितलेल्या गुणांची वैजयंतीमाळ आपल्या संपूर्ण ऐश्वर्यानें आणि दिव्य लावण्यानें चमकत, रुळत आहे! अहाहा !—असें हें दिव्य ध्यान, किती गोड आणि ध्यानमधुर आहे, हें एखाद्या राष्ट्रभक्त साधूशिवाय इतरांस काय कळणार ? असो. अशाप्रकारची ही मंगलमय महाराष्ट्रधर्माची, शेषशायी भगवंताची, मूर्ति आहे ! अशा भुवनमोहन भगवंताची मूर्ति हृदयीं ठसावलेले समर्थांसारखे महंत, जनतेच्या हृदयाच्या खंबीर अधिष्ठानाच्या बैठकीवर बसून, त्या शिलाखंडावर विराजमान होऊन, ज्यावेळीं भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें, महाराष्ट्रधर्माची आपली भुवनमोहिनी मुरली वाजवीत असतील, त्यावेळीं त्या मधुर मुरलीच्या रवानें गुंगून जाऊन थरकलेली व वेडावलेली महाराष्ट्रजनता, गोकुळींच्या गोपींप्रमाणें, त्याच्या भोवतीं साहजीकच कशी बेभानपणें नाचत असेल, त्यांचीं मनें तल्लीन होऊन—" बळेंबळेंचि बळकाविती । कथेलागीं !॥ "—असें ते कसें करीत असतील, व त्यामुळें " दुमदुम दुमदुम दुमों लागलें । जगदंतर ! ॥ " असा थाट कसा उडत असेल, याची कल्पना अनुभविकांवांचून इतरांस कशी येणार ?

असो; अशा प्रकारचा हा दिव्य महाराष्ट्रधर्म असून, त्याच्या मंत्राची फुंकर समर्थांनीं महाराष्ट्रजनतेच्या हृदयांत मारल्याबरोबर, महाराष्ट्रजनता कशी खडबडून जागी झाली, व तिनें शिवबाच्या कार्यांत त्यास किती अलोट साह्य केलें, त्याची साक्ष इतिहास आज देतच आहे ! इतकेंच नव्हे, तर त्या बिनमोल महाराष्ट्रधर्माचें आजही महाराष्ट्रास थोडेंबहुत स्मरण आहे—किंबहुना, तो दिव्य उपदेश तो संपूर्णपणें विसरणें केव्हांच शक्य नाहीं—राजकारणांत महाराष्ट्राचें तेज कोणच्याही कालीं थोडें-

बहुत पडल्याशिवाय राहणारच नाहीं, ही किती आनंदाची गोष्ट आहे बरें !

पण समर्थांनीं ह्या महाराष्ट्रधर्माच्या दिव्य दर्शनानें महाराष्ट्रांत केवढी खळबळीची मौज करून सोडली होती, व सर्व महाराष्ट्र त्यांनीं कसा हालता चालता केला होता, तें धुळ्याच्या रा. देवांच्या शब्दांत आपण आधीं थोडक्यांत पाहूं, व पुढच्या इतिहासावरून मग धार्मिक दृष्ट्या थोडीशी विहंगम नजर फिरवून, मग आपण हें प्रकरण—हा भाग—पुरा करूं !

रा. देव आपल्या "दासबोधाच्या प्रस्तावनें"त म्हणतातः—"समर्थांनीं एकंदर हजार दीडहजार मठ स्थापन केले होते, पण त्यांत ७२ मठ मुख्य होते. ह्या ७२ पैकीं बहुतेक मठपति ब्रह्मचारी होते. सर्व मठपति समर्थांनीं शहाणपण शिकवून तयार केले होते. समर्थांची त्यांना जी शिकवण असे, तिचा विचार केला म्हणजे महाराष्ट्राच्या अभ्युदयाचे कामीं या सर्व महंतांचा किती तरी उपयोग झाला असला पाहिजे; याचें अनुमान प्रत्येक वाचकाला करतां येण्यासारखें आहे. ( पृ. ६ ) 'महंते महंत करावे । युक्ति बुद्धीनें भरावे । जाणते करून विखरावे । नानादेशीं ॥ '—ह्याप्रमाणें अशाप्रकारें समर्थांच्या देखरेखीखालीं तयार झालेले त्यांचे हजारों शिष्य सर्व महाराष्ट्रभर, किंबहुना, सर्व देशभर जेव्हां संचार करीत होते, तेव्हां त्यांनीं राष्ट्राची केवढी कामगिरी बजावली असली पाहिजे ! इतिहासांत, बखरींत, किंवा चरित्रांत ह्या गोष्टी दिलेल्या नाहींत (!). परंतु श्रीसमर्थांचें चरित्र आणि त्यांची शिकवण इत्यादिकांचा विचार केला असतां समर्थांचे सारे शिष्य म्हणजे स्वदेश—स्वधर्म—स्वबांधव यांच्या कल्याणासाठीं, जगाच्या उद्धारासाठीं, सर्वत्र संचार करणारे श्रीसमर्थांचे दूत होत, असें अनुमान काढण्यास वाचकांस कठिण जाऊं नये असें वाटतें. " जेथें अखंड नाना चाळणा । जेथें अखंड नाना धारणा । जेथें अखंड राजकारणा । मनासी आणिती ॥ ' अशा सद्गुरूंच्या सानिध्यांत राहून राष्ट्रसेवा करणारे किती भाग्यवान होत ! काय मौज असेल ती ! मध्यें सद्गुरू आणि शेंकडों शिष्य भोंवतालीं असून जेव्हां स्वारी संचार करण्यास, गांवांतून काय आणि अरण्यांतून काय, निघत असेल तेव्हां त्या सर्व शिष्यांचीं अंतःकरणें स्वदेश—स्वधर्म यांच्या प्रेमानें

किती उचंबळून जात असतील ! स्वतःच्या प्रापंचिक सुखदुःखाची कोणालाच काळजी नव्हती ( पृ. १७–१८ ). श्रीरामदासस्वामी शके १५३० त जांबगावीं जन्मास आले; १५४२ त लग्नसमारंभांतून ते पळाले; तेथून टाकळीस बारा वर्षें त्यांनीं पुरश्चरण केलें; पुढें बारा वर्षें तीर्थयात्रेसाठी सर्व आर्यावर्तभर त्यांनीं पर्यटन केलें; १५६६ त ते कृष्णाकाठीं चाफळ खोऱ्यांत आले; आपल्या वर्तनानें लोकांचीं मनें त्यांनीं आपल्याकडे वेधून घेतलीं; ठिकठिकाणीं मारुतींची स्थापना केली, मठ स्थापन केलें, शिष्य सांप्रदाय वाढविला, उत्साह सुरू केले; श्रीशिवाजी महाराजावर अनुग्रह केला; त्यांच्या आग्रहावरून सज्जनगडीं रहावयास गेलें; व तेथें शके १६०३ स अवतारसमाप्ति केली. असें हें समर्थांचें थोडक्यांत चरित्र आहे, पण त्यांतील प्रत्येक कृति विचार करण्यासारखी आहे. ( पृ. १ ) पहिली बारा वर्षें बाळपणांत गेलीं, पुढलीं बारा वर्षें पुरश्चरणांत व त्याच्या पुढचीं बारा वर्षें तीर्थाटनांत गेल्यावर श्रीसमर्थ आपल्या वयाच्या ३६ व्या वर्षीं कृष्णाकांठीं चाफळखोऱ्यांत आले. बारा आणि बारा चोवीस वर्षें भगवत्प्राप्तीसाठीं खर्चीं घातल्यानंतर श्रीसमर्थांनीं कृष्णाकांठीं येऊन जगदुद्धाराच्या कार्यास आरंभ केला. त्यावेळीं जेवढें लोक हयात होते तेवढें भाग्यवान् ! ज्यांना श्रीसमर्थचरणांचें पावन दर्शन घडलें त्यांच्या भाग्याला तुलणा नाहीं; ज्यादिवशीं समर्थांचे चरण कृष्णाकांठाला लागले तो महाराष्ट्राच्या भाग्योदयाच्या पहिला दिवस. येथून पुढें समर्थांनीं वैराग्यें-करून नानासामर्थ्यें वाढविलीं, तीं कशी याचें चिंतन करणें आल्हादकारक आहे...आरंभीं आरंभीं तर श्रीसमर्थांना लोक बावळट समजत असत. पण ह्या बावळ्यामूर्तीचें खरें स्वरूप लोकांना पटकन् कसें उमजावें ! "जनांस दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित्त । अखंड जयांचें चित्त । परमेश्वरीं ॥" १४–७–१५. त्यामुळें आरंभीं लोकांना श्रीसमर्थांची परीक्षा झाली नाहीं. "वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा। सगट लोकांचा जिव्हाळा। मोडूं नये ॥ १५–१–३१ अशाप्रकारचें त्यांचें वर्तन असे....आपला बहुतेक काळ ते अरण्यांत कंठीत; कामापुरतें गांवांत येत; परंतु तेवढ्या वेळांत लोकांना त्यांच्या प्रत्ययज्ञानाची चटक लागावी असें त्यांचें वर्तन असे...त्यामुळें कालांतरानें समर्थांच्या

यथार्थस्वरूपाचा बोध लोकांना होऊं लागला....चाफळखोऱ्यांत ठिकठिकाणीं मारुतीची स्थापना करून व रामजयंति, हनुमानजयंति, इत्यादि उत्सव सुरूं करून समर्थांनीं लोकांना भजनाला लावावें, पण आपण मात्र तेथें राहूं नये. अमुक अमुक उत्सव कोण करतो तर आपण करतों अशा लौकिकाची चाड त्यांना नव्हती, म्हणून लोकांना भजनीं लावून ते अन्यत्र चालते होत....खुद्द चाफळास उत्सव सुरूं असतांहि—"दास डोंगरीं राहतो । यात्रा देवाची पाहतो । देव भक्तासवें जातो । ध्यानरूपें ॥"—असें खुद्द त्यांनींच एके ठिकाणीं सांगितलें आहे. यावरून त्यांच्या वर्तनाची व त्यांच्या रामघळींतल्या चिंतनाची कांहींशी अटकळ बांधतां येते. सुमारें अडीचशेंवर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत असा एक सत्पुरुष होऊन गेला, कीं त्यानें आपल्या एकट्याच्या हिताचा सर्वस्वीं त्याग करून आपल्या आयुष्याचीं चोवीस वर्षें प्रथम भगवत्प्राप्ति करून घेण्यांत घालविलीं आणि मग कांहीं वर्षें केवळ स्वबांधवांच्या स्थितीचें चिंतन करण्यांत व त्यांच्या आत्मोन्नतिचे उपाय शोधून काढण्यांत दऱ्याखोऱ्यांत कंठिलीं! (पृ. ३, ४, ५, ) 'चाळणेविण एक क्षण । जाऊंच नेदी ॥' यावरून श्रीसमर्थांचा व्याप व्यक्त होत आहे. 'आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ' हा समर्थांचा स्वानुभव आहे. हताश होऊन स्वस्थ बसण्याचें ज्यांच्या मनांत येतें त्यांनीं ह्या दोन चरणांचें मनन करावें (पृ. ६). किंबहुना समग्र दासबोध हीच समर्थांची शिकवण असे. श्रीमत् दासबोधाची रचना शके १८५१ त झाली त्यावेळची महाराष्ट्राची स्थिति कशी होती ती काय सांगावयास पाहिजे ? श्रीशिवाजी महाराजांचा उदय झाला होता, उत्कर्ष व्हावयाचा होता. 'म्लेंछ दुर्जन उदंड । बहुता दिवसांचें माजलें बंड' तें अजून पुरें मोडलें नव्हतें. गोब्राह्मणांना आशा उत्पन्न झाली होती, परंतु त्यांचा प्रतिपाळ अजून व्हावयाचा होता. कांता धरून नेऊन भ्रष्टाविण्यासारखे असले अघोर प्रकार बंद होऊन पतिव्रता स्त्रियांचे आशिर्वाद श्रीशिवाजी महाराजांस अजून मिळावयाचे होते. 'येक देव दुराचारी । फोडिला बळें ॥' (६, ६, ३४) इ. असलीं बोलणीं अजून बंद पडलीं नव्हतीं... 'मतामतांचा गलबला । कोणी पुसेना कोणाला । जो जे मतीं सांपडला । तयासीं तेंचि

थोर ।। ११–२–२५ अशी बेबंदशाही समाजांत माजली होती. जो तो शहाणा व स्वमताभिमानी झाला होता. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नव्हता. ब्राम्हणांची जी हीन स्थिति झाली होती ती तर बोलावयासच नको. सर्वस्वाला मुकून भुकेकंगाल बनून सर्वांच्या तिरस्कारास ते पात्र झाले होते. साऱ्यांनींच त्यांच्यावर शस्त्र उचललें होतें. परधर्मी राज्यकर्त्यांनीं तर उचललेंच होतें परंतु स्वकीय देखील त्यांना पाण्यांत पाहूं लागले होते. ब्राह्मणांचा आचार बुडविण्यांत शूद्रांना अभिमान वाटूं लागला होता. राज्य तर म्लेंच्छांचें झालें होतेंच, परंतु आपला धर्म तरी ब्राह्मणांनीं राखावयाचा होता ! पण धर्माच्या बाबतींतही त्यांना दुसऱ्यांच्याच तोंडाकडे पहाण्याची पाळी आली होती. ‘ गुरुत्व आलें नीच यातीं.’ कारण स्वतः ब्राह्मण तरी कोठें ताळ्यावर राहिले होते ? तेहि बहकले होते. ‘ ब्राह्मण बुद्धिपासूनि चेवले ’ इ. अशी ब्राह्मणांची स्थिति झाली होती. ‘ करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण । तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ।। ’ असे ब्राह्मण कोठें उरले होते ? सारांश, ब्राह्मण सर्वस्वाला मुकले होते. राज्य तर म्लेंच्छाकडे गेलें होतेंच, परंतु गुरुत्वही तेच बळकावून बसून आपला धर्म त्यांच्या मुखांतून श्रवण करण्याची पाळी ब्राह्मणांवर आली होती...तरी पण शहाणे शहाणे त्यांतच प्रौढी मिरवीत. त्यांच्या कांहीं लक्षांत येईना कीं, राज्य तर परक्यांच्या हातीं गेलेंच होतें, पण धर्महि त्याबरोबर जात होता ! ‘ हे ब्राह्मणास कळेना । त्यांची वृत्तिच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ! ।। ’ तेवढा मूर्खपणाचा मिथ्या अभिमान कायतो ब्राह्मणांजवळ शिल्लक राहिला होता, बाकी त्यांची सर्व शेंडी परक्यांच्या हातीं गेली होती...‘ आतांचे ब्राह्मणीं काय केलें ? ’ पूर्वजांच्या कटुकर्माचीं हीं फळें होतीं. पण त्यामुळें ‘ अन्न मिळेना ऐसें झालें ’ हें तर खरेंना ? मग समर्थ म्हणतातः—‘ बरें ऐसा प्रसंग झाला । जाला तो होऊन गेला । आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शहाणे करावें ! ।। ’ १४।८।१ असा समर्थांनीं ब्राह्मणांना गोड उपदेश केला आहे. समाजाला अशी हीन स्थिति प्राप्त झाल्यावर तेथें मत्सर नांदावयाला येतोच. ‘ मज नाहीं तुज साजेना । हें तो ठाऊक आहे जना ! ।।’...हा तर अशावेळीं समा-

जाचा बाणा असतो !...तेव्हां समाजाला अशी हीन स्थिति प्राप्त झाली असतां श्रीमत्दासबोध ग्रंथाचें प्रयोजन काय होतें तें शब्दांनीं सांगितलेंच पाहिजे काय ? सर्वतोपरि निकृष्ट स्थितीला पोंचलेल्या समाजाला ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची दिशा स्पष्ट रीतीनें आंखून देऊन, शाश्वत सुखाची जोड करून देणें, हेंच या ग्रंथाचें प्रयोजन होय. ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची संगति या ग्रंथांत जशी घालून देण्यांत आली आहे तशी दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथांत क्वचित्च असेल...स्वतःचा प्रपंच प्राणिमात्र करीतच आहे. पण स्वबांधवांचा प्रपंच करण्यांतच मनुष्याची श्रेष्ठता आहे. हा बोध म्हणजेच महाराष्ट्रधर्माचें शिक्षण होय. अलिकडच्या भाषेंत यालाच स्वदेशाभिमान म्हणतात. असलें शिक्षण देणारा प्राकृतांत तरी एवढाच ग्रंथ आहे. हाच या ग्रंथाचा विशेष. इतर पारमार्थिक ग्रंथाप्रमाणें यांत अध्यात्मनिरूपण असून शिवाय इतर ग्रंथांतून जें नाहीं तें यांत आहे, हाच या ग्रंथांत आणि इतर ग्रंथांत फरक होय. ग्रंथ लिहिण्याचा श्रीसमर्थांचा हा जो विशिष्ट हेतु तो तत्कालापुरता कसा सिद्धीस गेला हें महाराष्ट्रवाचकांस तरी कोणी सांगावयास नको आहे. ( पृ. ४९;५० ). " असो.

याप्रमाणें दासबोध ग्रंथानेंच नव्हे, तर खुद्द आपल्या जिवंत आणि जातिवंत वाणीनें समर्थांनीं आपल्या हयातींत केवढें दिव्य कार्य केलें असेल याची वाचकांनींच कल्पना करावी ! ब्रह्मचर्याचें, रामभक्तीचें, आणि तारुण्याचें तेज ज्यांच्या नसानसांतून उसळत आहे, व स्वदेश—स्वधर्माच्या अभिमानानें ज्यांचें हृदय अहर्निश जळत आहे, असे तेजस्वी ब्रह्मचारी समर्थ कुठें कुठें हिंडले असतील, " उपासना करूनिया पुढें । पुरवलें पाहिजे चहूंकडे । भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ! ॥ " याप्रमाणें रामोपासनेच्या व हनुमदुपासनेच्या थरारून सोडणाऱ्या बोलांनीं त्यांनीं मेलेल्या हाडांतूनही कसें चैतन्य उत्पन्न केलें असेल, व याप्रमाणें विख्यात होऊनही गुप्त राहिलेल्या समर्थांनीं, आपल्या हजारों शिष्यांच्या सहाय्यानें, परकी आणि परधर्मी सत्तेविरुद्ध गुप्त कटांचें जाळें विणून, स्वातंत्र्याचें, स्वधर्माचें, व गोब्राह्मणप्रतिपालनाचें निशाण फडकावित चाललेल्या शिवबाला सहायक होईल,अशी भूमि कशी तयार करून ठेवली

असेल, याचा विचारही चित्त थरारून सोडणारा आहे! " उदंड करी गुप्तरूपें। भिकाऱ्यासारिखा स्वरूपें। तेथें यशकीर्तिप्रतापें। सीमा सांडिली!॥" व " लोकीं लोक वाढविले। तेणें अमर्याद झाले। भूमंडळीं सत्ता चाले। गुप्तरूपें!"॥ह्या दोन ओव्यांवरून समर्थांच्या सत्तेचें गुप्त निशाण कसें जागोजाग फडकत होतें, व " ठायीं ठायीं उदंड तावे" असून तें " कट घालून राजकारणा। लोका" कसें " लावी"त असत, तें चांगलेंच व्यक्त होतें. अर्थात्, राजकारणाच्या ह्या सोंगट्याच्या डावांतील सर्व कट आपल्या कटांनीं दाबून धरून, प्रतिपक्षाची पटावरील मोहरीं मारून काढून व त्यावर बिनतोड बाजूची मात करून, समर्थांनीं ही सर्व कटकट कशी बंद पाडली, त्याचा इतिहास कोणाही मृत माणसाला सुद्धां जिवंत करणारा असून, कबंधालाही नाचविणारा आहे, यांत शंका नाहीं! असो.

याप्रमाणें " मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा। येविषयीं न करितां तकवा। पूर्वज हांसती॥" याप्रमाणें समर्थांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें श्री शिवाजी महाराजांच्या हाताखालीं ब्राह्मणापासून महारापर्यंत अठरापगड जातीचे लोक महाराष्ट्रधर्माच्या आणि स्वदेशाभिमानाच्या विचारानें एकजीव आणि एकजूट होऊन स्वदेश—स्वधर्मासाठीं कसें झगडले, " धर्मासाठीं मरावें। मरोनि अवघ्यास मारावें। मारतां मारतां घ्यावें। राज्य आपुलें!॥" ह्या समर्थांच्या स्फूर्तिप्रद उपदेशाप्रमाणें त्यांनीं—त्या मराठे वीरांनीं—सतीचें वाण घेऊन स्वधर्मासाठीं, गोब्राह्मणप्रतिपालनासाठीं, आणि भूमातेला सुखी करण्याकरतां तळहातावर शीर घेऊन, विजापूरकर आणि औरंगजेब ह्यांच्या सैन्याशीं कसा जागोजाग झगडा केला, व सरतेशेवटीं शिवबानीं—ह्या 'डोंगरका चुव्या'नें महाराष्ट्राचा स्वातंत्र्यसिंह, परधर्मी आणि परक्या सत्तेच्या जाळ्यांत, परक्या पारध्यांनीं जखडून टाकला होता, त्या जाळ्याच्या दोऱ्या आपल्या तीक्ष्ण दंष्ट्रांनीं तोडून त्याला कसा मोकळा केला, ह्याचा इतिहास अत्यंत स्फूर्तिप्रद आहे! ह्या मोकळ्या झालेल्या महाराष्ट्रसिंहांनीं, अवरंगजेबाच्या सैन्याचे कसें जागोजाग लचके तोडले, व दक्षिणेंतील त्याची मोगलाई बुडवून समग्र महाराष्ट्राचें आनंदवनभुवन कसें करून

सोडलें, तें इतिहासज्ञांस सांगणें नकोच ! आपण जन्मभर केलेल्या श्रमांचें आणि खटपटीचें असें गोड फळ मिळालेलें पाहून, कोणांस बरें आनंद वाटणार नाहीं ? स्वतः हातानें बीजारोपण केलेला वृक्ष फलपुष्पभारांनीं डवरलेला पाहून कोणा बागवानास संतोष होणार नाहीं ? स्वत: जन्म देऊन आणि अनेक खस्ता खाऊन वाढविलेलें आपलें बालक त्रिभुन-विजयी होऊन, त्याच्या कीर्तीचा झेंडा त्रैलोक्यांत थैथै नाचतांना पाहून, कोणच्या मातेचें हृदय आनंदानें भरून येणार नाहीं ? समर्थांचे नेत्रही तसेंच आनंदाश्रूंनीं डबडबून आले, उदंड कष्ट करून, अनेक खस्ता खाऊन, व अहर्निश चिंता वाहून, ज्या महाराष्ट्र धर्मरूपी स्वदेश-स्वधर्माभिमानाचें चित्र ते जनसमुदायाच्या हृदयफलकावर इतके दिवस रेखाटीत होते, तें इतकें उठावदारपणें रेखाटलें गेलेलें पाहून, त्यास साहजीकच आनंद झाला, व त्या आनंदाच्या भरांतच—" बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला । मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें । आनंदवनभुवनीं ! ।। उदंड जाहलें पाणी। स्नानसंध्या करावया। "—इत्यादि तऱ्हेचे धन्योद्गार त्यांच्या मुखावाटें साहजीकच बाहेर पडले !

खरोखर " समर्थांच्या शिकवणीचा शिवाजीमहाराजांच्या मनावर केवढा परिणाम झाला असला पाहिजे, याची कल्पना आपल्यासारख्यांना कोठून होणार ? समर्थांचें चालण्यांत, समर्थांचे पहाण्यांत, समर्थांचे बोलण्यांत, कितीतरी सामर्थ्य असलें पाहिजे ? शिवाजीमहाराजांना, स्वीकारलेल्या कार्यांत, समर्थांच्या सल्लामसलतीचा कितीतरी उपयोग झाला असला पाहिजे ! " (" दा. प्र. " पृ. १९ ). या समर्थांच्या शिकवणीचा, सांगण्याचा, आणि उपदेशाचा परिणाम म्हणूनच मराठ्यांचें निशाण हरिभक्तीच्या पहिल्या पायाचा निदर्शक जो स्वार्थत्यागाचा भगवा रंग, कीं ज्या रंगाची छाटी खुद्द समर्थ सद्गुरूंच्या अंगावर विलसत होती, त्या भगव्या रंगानें रंगून गेले ! 'न्यायनीतिमर्यादा' राजकारणांतसुद्धां राखली गेली ! जोहार जाऊन त्या ठिकाणीं 'रामराम' आला ! असो.

" साताऱ्याहून चाफळ जरा लांब पडे, त्यामुळें मनांत येतांच श्रीसद्गुरुदर्शनाचा लाभ घेतां येत नव्हता, म्हणून शिवाजीमहाराजांनीं विनंति केल्यावरून श्रीसमर्थ परळीस येऊन राहिले. ते तेथें रहावयास आल्या-

नंतर त्यांच्या भेटीला व दर्शनाला हजारों साधुसंतांचे मेळे येत, आणि म्हणूनच तेव्हांपासून परळीस 'श्रीसज्जनगड' असें नांव मिळालें." ("दा. प्र." पृ. २०). असो.

याप्रमाणें समर्थसान्निध्यांत शिवबांचा कांहीं काळ गेल्यावर व त्यांनीं 'स्वराज्याचा कारभार' कांहीं वर्षे केल्यावर "श्री शिवाजीमहाराजांनीं आपलें चरित्र शके १६०२ चैत्र शुद्ध १५ स संपविलें व श्रीसद्गुरुसमर्थ रामदासस्वामी यांनीं सज्जनगडावर शके १६०३ च्या माघ वद्य नवमीस आपल्या अवताराची समाप्ति केली." ("दा. प्र." पृ. २०). पौर्णिमेच्या चंद्राची प्रभा ज्याच्या चरित्रचंद्रावर विलसत आहे व पौर्णिमेच्या शुद्ध व षोडशकलांनीं युक्त अशा चंद्रम्याप्रमाणें समर्थप्रतिपादित गुणांच्या षोडशकला ज्याच्या चरित्रचंद्राचे ठायीं पूर्णावस्थेंस पोंचल्या आहेत त्या शिवबांनीं आपलें सादृश्य त्या पूर्णकलानिधीशीं स्थापून त्याच्याचबरोबर त्याच तिथीस अस्त पावावें हें किती साहजिक आहे बरें! पण हाय!—तो सुधांशु दुसऱ्या दिवशीं एखाद्या कलेनीं कमती होऊन कां होईना पण दृष्टीस पडतो, आणि अगदीं संपूर्णत्वानें सुद्धां एक एक महिन्याच्या अंतरानें व फेऱ्यानें दृश्यमान होतो—पण—पण शिवबासारखा स्वातंत्र्यसूर्य, सकलगुणनिधि सुधांशु, एकदां मावळला, हा दिव्य हिरा एकदा हरपला, हा वैडूर्य मणि एकदां भंगून गेला, हा सौभाग्यतिलक एकदां पुसला गेला—कीं पुन्हां तो दृष्टीस पडणें कधीं तरी शक्य आहे काय? हाच भाव लक्षांत घेऊन एका संस्कृत कवीनें म्हटलें आहे कीं—"किं मधुना किं विधुना किं सुधया किंच वसुधयाऽखिलया। यदि हृदयहारिचरितः पुरुषः पुनरेति नयनयोरयनम्॥"—तें किती खरें आहे बरें! पण सर्व पृथ्वीचें राज्य दिलें तरी तो पुन्हा कोठून दृष्टीस पडणार? तो तर नाहींच, पण त्याच्यासारखा अलौकिक पुरुष व त्यासारखें नररत्नही पुन्हा दृग्गोचार होण्यास वर्षांचीं वर्षेंच नव्हेत, तर कधीं कधीं शतकेंचीं शतकेंसुद्धां जावीं लागतात, ही किती दुःखाची गोष्ट आहे बरें! म्हणूनच शिवबाच्या मृत्यूनें समर्थांनीं हाय खाल्ली, व तेही त्यांच्या पाठोपाठ लवकरच कालवश झाले! आपल्या बरोबरीचा कर्तासवरता मुलगा म्हातारपणीं एकाएकीं सोडून

गेला असतां त्या बापाला जितकें दुःख होईल, भावी राजकीय इतिहासातील उदाहरण हवें असल्यास, सवाई माधवरावांनीं कारंज्यावर उडी घेतली असतां नानांच्या हृदयाची जी घालमेल झाली व त्यांची 'खिरापत' कायमची हरवल्यामुळें त्यांच्या हृदयाचा ठावठिकाणा जसा नाहींसा झाला व ते लवकरच कालवश झाले, तीच कालवाकालव समर्थांची शिवबासंबंधीं होऊन ते लवकरच त्याच्या भेटीस निघून गेले! हाय! हाय! महाराष्ट्राची ही दुहेरी होणारी हानि कधीं तरी भरून निघणें शक्य आहे काय ?

पण मरतां मरतां सुद्धां समर्थांना संभाजीला—त्या सिंहाच्या छाव्याला-अत्यंत गोड आणि हृदय हलवून सोडणारा उपदेश केल्यावांचून राहवेना! संभाजीच्या एक एक दिव्य लीला दृष्टीस पडूं लागून, हें बाळ पुढें कसें निपजणार, त्याची समर्थांना साहजीकच कल्पना झाली होती; व आधींच शिवबाच्या मृत्यूनें हाय खाल्लेल्या त्यांच्या हृदयाला त्यामुळें अधिकच वाईट वाटणें साहजीक होतें! म्हणूनच त्यांनीं संभाजीराजे यांस उपदेश केला कीं:– "बहुत लोक मिळवावे । एकविचारें भरावें । कष्टें करोनि घसरावें । म्लेंच्छावरी !॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मिळवावें । महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे !॥" याप्रमाणें वागलांत तरच तुम्ही थोर व तरच तुम्ही शिवबाचे पोटीं आल्याचें सार्थक! फार काय सांगूं, पण राजे, माझें तुम्हाला शेवटचें हेंच सांगणें आहे कीं:—

"शिवराजास आठवावें । जीवित तृणवत् मानावें ।
इहपरलोकीं रहावें । कीर्तिरूपें !॥ १७ ॥
शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा प्रताप ।
शिवराजाचा आठवावा साक्षेप । भूमंडळीं !॥ १८ ॥
शिवराजाचें कैसें चालणें । शिवराजाचें कैसें बोलणें ।
शिवराजाची सलगी देणें । कैसें असे ?॥ १९ ॥
सकल सुखाचा त्याग । करूनि साधिजे तो योग ।
राज्यसाधनाची लगबग । कैसी असे ?॥ २० ॥
त्याहून करावें विशेष । तरीच म्हणावें पुरुष ।
याउपरीं आतां विशेष । काय लिहावें ?॥ २१ ॥

( संभाजीस पत्र—रामदास ).

याप्रमाणें ‘ शिवबा ’ ‘ शिवबा ’ करून, त्याच्या ध्यासानें ज्यांचे हृदय क्षणाक्षणाला उचंबळून येत होतें, व ज्यांचे नेत्र अश्रूंनीं सजल होत होते, ते समर्थ रामदास शेवटीं त्याच शिवबाच्या ध्यासांत त्यांशीं तद्रूप होण्यास निघून गेले!

पण समर्थांच्या पाषाणासही पाझरविणाऱ्या या दिव्य उपदेशानें शिवबाचा ‘ संभू ’ सुधारला काय? मुळींच नाहीं! कल्याणच्या सुभेदाराची सौंदर्यशालिनी सून पुढें आणून उभी केली असतांही तिच्याकडे मायबहिणीच्या दृष्टीनें पाहून तिला चुडेदान व साडीचोळी देणारे-देवानाही लाजिवणारे शिवबा कुठें, व तुळशीच्या नादानें स्वकर्तव्यावर तुळशीपत्र ठेवून, राज्यांतील सर्व सुंदर तरुणी म्हणजे स्वतःच्या उपभोगासाठीं निर्माण केलेल्या सौंदर्याच्या खजिन्यांतील चिजा, असें मानणारा अनीतिमान संभू कुठें? स्वराज्याच्या आणि स्वधर्माच्या रक्षणासाठीं उपयोगीं पडणाऱ्या नररत्नांना सायासानें गोळा करून, त्यांची माला गुंफणारे धोरणी व मुत्सद्दी शिवबा कुठें, व कलुषाच्या संगतीनें कलुषित बुद्धि होऊन, पिण्याच्या दारूचा प्याला ओठाशीं लावतां, लावतां शोभेच्या दारूच्या नळेचंद्रज्योतीप्रमाणें पूर्वीच्या स्वामिसेवारत मुत्सद्यांचे व सरदारांचे भुइनळे उडवून त्याची मजा पाहणारे, व कोणास तोफेच्या तोंडीं, तर कोणास हत्तीच्या पायीं, तर कोणास कडेलोट करून, तर कोणांस कारागृहांत डांबून दूर करणारे, महाराष्ट्रधर्मास जवळ जवळ पारखे झालेले संभाजीराजे कुठें? नसलेलें मिळवून, मिळवलेलें जतन करून, हिंदुपदपातशाहीची स्थापना समग्र हिंदुस्थानभर करण्याची हांव धरणारे शिवबा कुठे, व नाचरंग, दारूबाजी, व मृगया ह्यापायीं असलेलेंही घालवून बसण्याची पाळी आणण्यापर्यंत मजल गेलेले संभाजीराजे कुठें! ह्यावरून म्हणजे शौर्य, धैर्य, स्वदेशाभिमान, आणि स्वधर्माभिमान संभाजीचे ठायीं नव्हता, किंवा न्याय-अन्याय व नीति-अनीति हीं त्यास कळत नसत, असें मुळींच नाहीं! पण ही दारू आहे ना! ह्या सर्वनाशी दारूच्या एकच प्याल्यानें काय काय अनर्थ ओढवतात याचें वर्णन कै. गडकऱ्यांनीं थोडें कां केलें आहे? तें वाचकांनीं पुन्हां एकदां वाचावें म्हणजे झालें! पण एवढ्या दारूनेंच कोठें भागत होते!

मदिरेबरोबरच मदिराक्षी आणि मृगया यांचेंहि वेड संभाजीला अतिशय असे! अर्थात् मदिरा, मृगया, आणि मदिराक्षी अथवा मृगाक्षी या तीन 'म'कारांच्या मायेच्या लोंढ्यांत मोठमोठे 'मी मी' म्हणणारे सुद्धां वाहून गेले आहेत; तिथें आमच्या संभाजीचा काय पाड? तोही बापडा त्यांतच वाहुन गेला; त्याच जाळ्यांत गुरफटून जाऊन संगमेश्वरीं दारूच्या निशेंत बेहोषपणें पडला असतां गिरफदार होऊन त्यांत त्यास गुदमरून जाण्यापर्यंत पाळी येऊन ठेपली!

पण अशाहि 'बेबंदशाही' त एक बंद—संभाजीच्या हृदयाचा एक बंद-अद्याप शाबूत आणि बळकट होता! महाराष्ट्रधर्मचंद्राच्या इतर सर्व कला त्याचे ठायीं लोपल्या असल्या, तरी अंतकाळीं एकाच कलेच्या तेजानें तळपून आणि झगझगून, आणि त्यानें प्रत्यक्ष अवरंगजेबाचेहि डोळे दिपवून संभाजीचा आत्मचंद्र अस्त पावला आहे, हें महाराष्ट्रधर्माच्या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखें आहे! असा कोणचा तो बंद, कीं ज्याच्या आधारावर संभू स्वर्गांत चढला? अशी कोणची ती कला कीं, जिच्या तेजानें त्याच्या कट्टया दुष्मनाचे डोळे दिपले व महाराष्ट्रजनतेचे डोळे दुःखाबरोबरच आनंदानें भरून आले? तो बंद, संभाजीच्या हृदयांत खोल जाऊन बसलेला तो बंद, इतर गुणाभावाच्या काळोखांत आयुष्याच्या अंतकाळीं संभाजीला स्वर्गाची वाट दाखविणारी ती एकच एक दिव्य कला, म्हणजे महाराष्ट्रधर्माची 'धर्मासाठीं मरावें' ही शेवटची शिकवण होय! ही शेवटची शिकवण शिवाजीचा बच्चा आयुष्याच्या शेवटींसुद्धां विसरला नाहीं, आणि अवरंगजेबाच्या हुकमावरून अग्नींत तापवलेले लाल सांडस दुसऱ्याच क्षणाला आपल्या डोळ्यांच्या खाचा करण्यास तयार असता, मारेकऱ्यांच्या तरवारी आपल्या हातापायांचे तुकडे करण्यास सिद्ध असतां, आणि खुद्द अवरंगजेब बादशहा आपले हालहाल करून आपणांस ठार मारण्यास समोर उभा असतां, त्याच्यापुढें छातीठोक उभा राहून, ह्या महाराष्ट्राच्या सिंहानें शेवटच्या भीमगर्जनेनें त्याला हेंच सांगितलें कीं, "संभू कम-अस्सल बीजाचा नाहीं! शिवाजीमहाराजांचें रक्त ज्याच्या नसांनसांतून खेळत आहे, तो संभाजी त्रैलोक्याच्या राज्यावरसुद्धां लाथ मारून, नीच आणि कमअस्सल यावनी

धर्माचा स्वीकार करण्यापेक्षां, स्वधर्मासाठीं केव्हांही आनंदानें मृत्यूला कवटाळण्यास मागें हटणार नाहीं! कारण प्रसंग पडल्यास " मरेंगा पर हटेंगा नहीं " ह्या मराठाब्रीदांस जागणारा तो खरा खरा शूर 'मराठा' आहे!"

संभाजीराजांचें हें दिव्य निर्वाण ऐकून— 'आपला राजा धर्मासाठीं मेला' हें वृत्त ऐकून—महाराष्ट्रजनतेच्या नेत्रांतून दुःखाश्रूंबरोबरच प्रेमाचे आणि गहिवराचे अश्रू भूमातेच्या अंकावर कसे टप्टप् गळाले असतील, आणि त्या अश्रूंच्या पडणाऱ्या पावसानें आर्द्र झालेल्या भूमींतून धर्मवीरांचें पीक किती सपाट्यानें बाहेर पडलें असेल, संभाजीसारखा एक 'दाणा' गेला, भूमीच्या उदरांत गडप झाला, पण त्याच एका दाण्याच्या पेरणीनें शेकडों दाण्यांचीं कणसें महाराष्ट्रभूमींत कशीं लगडून गेलीं असतील, व त्या 'शापित महाराष्ट्रा'चे 'उश्शापित महाराष्ट्र' बनविण्यास राजारामाच्या—रामराजाच्या—हाताखालीं मराठ्यांनीं ' न भूतो न भविष्यति' अशा विलक्षण एकजूटीनें कसा प्रयत्न केला असेल, याचा वाचकांनींच विचार करावा! त्याची कल्पनासुद्धां अंगावर सात्विक रोमांच उठवून गात्रें पुलकित करणारी व चित्त थरारून सोडणारी आहे, एवढेंच आम्ही वाचकांस सांगतों!

संभाजीमहाराजांनीं स्वधर्मासाठीं केलेला आत्मत्याग किती असामान्य कोटीचा होता, याची सध्याच्या अधःपतित समाजाला कोठून कल्पना होणार? " देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी । सर्व अर्पावें शेवटीं । प्राण तोही वेंचावा! ।। " ह्या समर्थोक्तीप्रमाणेंच त्यांचें वर्तन झालें नाहीं काय? कारण, देव आणि धर्म यांत काय अंतर आहे? देवाची साकार मूर्ति म्हणजेच धर्म नव्हे काय? धर्मासाठीं केलेल्या दिव्य आत्मयज्ञानेंच मनुष्य देवाच्या मांडीवर जाऊन बसत नाहीं काय? संभाजीमहाराजांचें हें शेवटचें दिव्य निर्वाण पाहून खरोखर स्वर्गीच्या देवांनीं सुद्धां त्यांवर पुष्पें ढाळलीं असतील! त्या पुष्पांच्या इतकेंच पवित्र असे प्रेमाश्रू, समग्र महाराष्ट्र जनतेनीं ह्यावेळीं आपल्या नेत्रासमोर चमकणाऱ्या आपल्या राजाच्या प्रतिमेवर—धर्मासाठीं ' जीवित तृणवत् मानणाऱ्या ' आपल्या राजाच्या मूर्तीवर—ह्यावेळीं निः-

संशय ढाळले असतील, हें काय सांगायला पाहिजे ! यावनी छळाच्या स्थंडिलावर, स्वधर्मासाठीं महाराष्ट्राच्या प्रत्यक्ष राजानें आपल्या प्राणांची आहुति दिलेली, पाहून साक्षात् अग्निनारायण संतुष्ट झाले असतील, आणि " वन्हि तो चेतवावारे । चेतवीताचि चेततो ! ।। " ह्या समर्थांच्या उपदेशाप्रमाणें, महाराष्ट्राच्या हृदयांतील उरला सुरला नादानपणाचा पाचोळा जाळून टाकून, त्या अग्निनारायणांनीं संभाजीच्या आत्मयज्ञाच्या जळत्या ज्योतीची मशाल,प्रत्येक मराठा वीराच्या हातीं देऊन, त्याला ऐहिक आणि पारलौकिक मुक्तिचा मार्ग दाखविला असेल; इतकेंच नव्हे, तर याप्रमाणें दिव्य आत्मार्पणाच्या मशालीच्या उजेडांत ज्यावेळीं त्या धर्मवीरांच्या तरवारी निष्कोपित झाल्या असतील त्यावेळेस त्या तरवारींच्या तळपत्या धारेच्या तिखट तेजांत तोच अग्निस्फुलिंग जाऊन बसून, त्यानें सर्व यावनी सेना जाळून खाक केली असेल, हें काय सांगायला पाहिजे ! अशाप्रकारच्या अग्निनारायणाचा—म्हणजेच महाराष्ट्रधर्माचा—दिव्य आणि झगझगीत रथ—कीं, ज्याला हरिभजनादि चार अंगांचीं चार चाकें लावलीं आहेत, चार ' रथांगें ' शोभत आहेत, व ज्याला समर्थांनीं सांगितलेल्या गुणांचे वारु जुंपले असून, जनसमुदायाला खूप ठेवण्याच्या वृत्तिचा लगाम त्यांना खेंचीत आहे, व ज्यांत राजारामासारखे रामराजे सायुध सज्ज होऊन बसले आहेत, असा हा दिव्य रथ—ज्यावेळेस महाराष्ट्राच्या प्रांगणातून घडघडत धांवत असेल, त्यावेळीं त्याच्या धीरगंभीर नादानें दशदिशा दणाणून जाऊन, तो घनगंभीर ध्वनि ज्यांच्या ज्यांच्या कर्णसंपुटांत शिरला असेल, तो ज्यांनीं ज्यांनीं श्रवण केला असेल, तो प्रत्येक मराठा आपली तरवार उपसून बाहेर पडून ह्या मंगलमय प्रभूच्या दिव्य अवतारकार्यास हातभार लावण्यास निःसंशय धांवला असेल, यांत शंकाच नको !

यानंतर शाहूमहाराजांच्या पदरच्या बाळाजी विश्वनाथ पेशव्यापासून तो सवाईमाधवरावापर्यंत ह्याच महाराष्ट्रधर्माची महती गाजली, जाऊन त्यावेळच्या मराठमंडळांतील विलक्षण एकीची जूट आणि मराठ्यांच्या गादीविषयींचा—म्हणजेच मराठी साम्राज्याचा—त्यांचा दिव्य स्वाभिमान पाहून, अटकेपार घोडे नाचविणाऱ्या ह्या मराठेवीरांचें खरोखर कोणाही देशभक्तास कौतुकच वाटावें, अशाच तोडीचा तो स्फूर्तिप्रद इतिहास आहे !

पण त्या सर्वांत " आहे तितुकें जतन करावें । पुढें आणीक मिळवावें । महाराष्ट्रराज्य करावें । जिकडे तिकडे ! ॥ " हाच समर्थांचा स्फूर्तिप्रद संदेश, आणि " धर्मासाठीं मरावें । मरोनि अवघ्यांस मारावें । मारतां मारतां घ्यावें । राज्य आपुलें ॥" हीच रामदासांची खणखणीत वाणी ऐकूं येत नाहीं काय ? ह्याच दिव्य संदेशाच्या स्फूर्तिस्तव शिवबाच्या मराठ्यांनीं आपलें प्राण आपलें म्हटलें नाहींत; ह्याच दिव्य आदेशांत महाराष्ट्र मुरला होता, म्हणूनच स्वतःचा पिता नाहक हत्तीच्या पायीं तुडविला जाऊन, स्वतःच्या घरांदारांवर गाढवाचे नांगर फिरवले गेले होते तरी, खंडोबल्लाळासारखे संभाजींचे एकनिष्ठ स्वामिभक्त सेवक, "राजा, राजा, " करून हंबरडा फोडून, अगदीं त्याच्या अंतकाळींही त्याच्या रक्षणास धांवून जात, व त्यापायीं आपला जीव धोक्यांत घालीत; किंबहुना, शेवटच्या बाजीरावाच्या अधःपतितकाळींमुद्धां, गंगाधरशास्त्र्याचा खून खुद्द त्रिंबकजी डेंगळ्याकडून बाजीरावाच्या अनुमतीनें झाला असतां, त्याची लेक तें सर्व दुःख गिळून—" स्वराज्याची सौभाग्यलक्ष्मी परक्यांच्या घरांत घालूं नका; महाराज, एवढी भिक्षा ह्या लक्ष्मीला आपण घाला; ' म्हणून बाजीरावाच्या पायावर लोळण घेते, हा कशाचा बरें प्रताप ? हा प्रभाव ह्या महाराष्ट्रधर्माचा होता, ही शिकवण ह्या महाराष्ट्रधर्माची होती, हें कोणींहि विसरूं नये ! पण बाळाजीपंत नातूसारखे परक्यांचें ' युनियन जॅक ' शनवारवाड्यावर फडकावण्यास निघालेले कुलांगार जेथें स्वतःच्या समाजांत शेकड्यांनीं मोजतां येत होते, तेथें एकट्या लक्ष्मीचा काय पाड ? साहजिकच महाराष्ट्राची स्वराज्याची सौभाग्यलक्ष्मी घराबाहेर पडून, ती परक्यांच्या घरीं नांदण्यास गेली, यांत काय आश्चर्य ? तिचा हात धरून तिला घराबाहेर घालविल्यावर त्या बापडीनें जावें तरी कोठें आणि जगावें तरी कोणाच्या आधारावर ? असो. पण हा पुढचा किडका इतिहास आहे. इतिहासाच्या ह्या पानाला कीड प्रथम राघोबाच्या भाऊबंदकीनें लागली आणि ह्या ' अस्तनीतल्या निखाऱ्यानें'च बिचारा नारायणराव होरपळून आणि तडफडून तडफडून मेला ! हरहर ! कोण हें भीषण कृत्य ! आणि कोण हा घोर अधःपात ! रामशास्त्र्यासारख्या सडेतोड न्यायाधिशाचें माथें त्यानें फिरून जावें,

व “ ह्याला देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं ! ” असें त्यानें निर्भीड वाणीनें सांगावें, हें किती साहजीक आहे बरें ? अरेरे, “ प्रत्यक्ष बंधुसुत राज्यपदार्थ मारी । ऐसा न अन्य जगतीवरि देहधारी । कैसे तुम्ही विसरला जगदेकराया? । राज्यीं न वास तुमच्या मन घे कराया ।। ” शास्त्रीबुवा बोलत होते, व त्यांचें अंग सात्विक संतापानें थरथर कांपत होतें : “ अरेरे, खून,–आपल्या पुतण्याचा, आपल्या सख्या भावाच्या मुलाचा, त्या दीन अर्भकाचा, दीडदमडीच्या राज्यासाठीं तुम्ही खून केलात ना ? हाय हाय ! ह्याहून अधःपात तो कोणचा असणार ?” आम्हांस हा ऐतिहासिक कथाभाग अधिक रंगवायचा नाहीं; पण आम्हांस येथें हेंच दाखवायचें आहे कीं, हा अधःपात कशाचा होता ? हा अधःपात अर्थात् महाराष्ट्र धर्मापासून पदच्युत झालेल्या वृत्तीचा होता ! राघोबा, त्याला आपल्या सौंदर्याच्या जाळ्यांत पकडून भोळा सांब बनविणारी, आणि ‘ध’ चा ‘मा’ करून गारद्यांकडून त्या कोंवळ्या पोराचे तुकडे पाडणारी.क्रूर कृत्या आनंदीबाई, आणि विषयी, नादान, आणि भ्याड, असे त्यांचे दिवटे पोर–शेवटचा रावबाजी,–ह्या तीन व्यक्तिंनीं, ह्या त्रिकुटानेंच महाराष्ट्राचा स्वराज्याचा डोलारा जमीनदोस्त केला, असें म्हणण्यास हरकत नाहीं ! पण असें कां झालें, याचा विचार करतां “ महाराष्ट्रधर्मास ते पारखे झालें, ” हेंच याचें उत्तर नाहीं काय ? अर्थात् हेंच याचें उत्तर असून, परक्यांच्या घरांत घुसलेल्या, महाराष्ट्राच्याच काय, पण समग्र हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यलक्ष्मीला परत सन्मानानें आणून स्वस्थानापन्न करायची असेल, व तिच्या कपाळीं सौभाग्याचा कुंकुमतिलक लावावयाचा असेल, तर त्याकामीं एक महाराष्ट्रधर्म आणि महाराष्ट्रधर्मच तारणारा आहे असें शेवटीं सांगून, अशा तऱ्हेचा दिव्य आणि स्फूर्तिप्रद धर्म ज्या महात्म्यानें सांगितला त्या समर्थ माऊलीचें सदा स्मरण ठेऊन, त्यांच्या निवासानें पावन झालेल्या पवित्र जागेचें दर्शन घेऊन, आणि त्याहूनहि अधिक म्हणजे अशा तऱ्हेचे दिव्य बोल ते ज्या “ दासबोधां ”तून बोलले तो बोध सामान्य नसून–“भक्ताचिया साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेची वचनें । तो हा दासबोध ! ।।” अशाप्रकारचें समर्थ रामप्रभूचेच ते दिव्य बालबोध बोल आहेत हें ध्यानीं आणून, त्यांचें मनन, चिंतन,

आणि निदिध्यासन अहोरात्र ठेवावें, म्हणजे भारतवर्षाचा भाग्योदय होण्यास मुळींच वेळ लागणार नाहीं असें सांगून, शेवटीं हीच प्रार्थना धुळ्याच्या रा. देवांच्या शब्दांत महाराष्ट्र वाचकांस सादर करून, हें प्रकरण आम्हीं पुरें करतों ! धुळ्याचे समर्थभक्त रा. देव आपल्या "दासबोधाच्या प्रस्तावने"च्या अखेरीस म्हणतात:—

"ह्या (दासबोध) ग्रंथाचा उपयोग चिरंतन आहे. धर्माला ग्लानि आली म्हणजे परमेश्वर जसा अवतार घेतो, त्याप्रमाणें समाजाला केव्हांहि तत्कालीन स्थितिप्रमाणें निकृष्टावस्था प्राप्त झाली म्हणजे हा ग्रंथ मार्गदर्शक होणार आहे. जें कार्य एकवार या ग्रंथानें महाराष्ट्राच्या हातून घडविलें तेंच कार्य करण्याची पात्रता या ग्रंथाच्या आश्रयानें केव्हांही महाराष्ट्राला येणार आहे. म्हणून महाराष्ट्राला या ग्रंथाचा निदिध्यास लागावा अशी माझी इच्छा आहे. असा हा अपूर्व ग्रंथ आहे. असा दुसरा कोणता ग्रंथ आहे कीं जो लहानमोठे, संसारी, परमार्थी, राजकारणी, व्यावहारिक, अशा सर्वप्रकारच्या लोकांना सारखा उपयुक्त आहे ? सहावर्षांच्या मुलापासून तों ६० वर्षांच्या वृद्धापर्यंत सर्वांना याच्यांत बोध आहे. श्रीसमर्थांचा बोध, त्यांची कृति, व त्यांचें चरित्र, इत्यादिकांचें अध्ययन करणें, मनन करणें, व तदनुरूप अत्यल्पांशानें वर्तन ठेवण्याचा प्रयत्न करणें, यांतच महाराष्ट्राचा तरणोपाय आहे. सबंध प्रस्तावनेंत कोणतीच गोष्ट मला निक्षून सांगतां आली नाहीं किंवा मी कोणताच आग्रह धरला नाहीं; परंतु सरतेशेवटीं एक गोष्ट आग्रहानें पण प्रेमपूर्वक महाराष्ट्रवाचकांपासून मागून घ्यावयाची आहे. ती हीच कीं, महाराष्ट्राच्या पुनरुज्जीवनाची काळजी बाळगणाऱ्या प्रत्येक सद्गृहस्थानें श्रीसमर्थांच्या चरित्राचें अखंड श्रवणमनन करावें, त्यांच्या ग्रंथांचें परिशीलन करावें व त्यांच्या चरणधूळीनें पुनीत झालेल्या स्थलांचें दर्शन घ्यावें!" (पृ. ५०, ५१).

# भाग १७ वा.

महाराष्ट्रधर्माचें स्वरूप, त्याचें प्रचंड कार्य, व त्यास शेवटीं पारखे झालेले मराठे सरदार व रघुनाथराव व त्यांचा दिवटा मुलगा रावबाजी यांची हकीकत गेल्या दोन तीन भागांतून आपण पाहिली. पण खुद्द शिवाजी महाराजांचा भगवा झेंडा त्यांच्या हातीं नाचत होता तेव्हां, किंबहुना, त्याच्याहि अर्धी सुमारें शंभर वर्षांपूर्वीपासून, खुद्द यावनी सत्तेचा अंमल शिरजोरपणानें समग्र हिंदुस्थानभर गाजत असतांना सुमारें, सहा हजार मैलावरून आलेल्या दुसऱ्याच एका परद्वीपस्थ व परदेशस्थ धर्माच्या लोकांनीं एका हातीं तागडी व दुसऱ्या हातीं बायबल घेऊन, ह्या आर्यावर्तांत, ह्या भारतभूमींत, साळसूदपणें 'चंचुप्रवेश' करून घेतला होता! हॅमिल्टन डॉक्टरनें आपणांस रोगमुक्त करून मृत्यूच्या जबड्यांतून सोडविलें ह्या कृतज्ञतेनीं, त्याच्या विनंतिवरून त्यावेळच्या त्याच्या जातभाईंना व्यापाराच्या वखारी, परवाने, आाणि सवलती देणाऱ्या बिचाऱ्या दिल्लीपति यवनेश्वरास काय कल्पना कीं, यांचेच जातभाई वंशज पुढें आपल्या वंशजांसच नव्हे, तर त्यांनाही खाणाऱ्या मराठ्यांस गिळून, हिंदुमुसलमानांस सारखेच पारतंत्र्याच्या रौरवांत फेकून देऊन, मृत्यूच्या जबड्यांत लोटून देण्यास कारण होतील म्हणून? श्री-शिवाजी महाराजांनीं दोनदां सुरत लुटली; परंतु त्यांना तरी काय कल्पना कीं, ह्या सुरतेच्या वखारींतून साळसूदपणें व्यवहार करणारी ही परक्यांची खुपसुरत अवलाद, एकट्या महाराष्ट्राचीच नव्हे, पण समग्र हिंदुस्थानची सुरत बदलून टाकील,—हे टोपीवाले सर्वांनाच सारखी टोपी घालतील, हे फिरंगी आपल्या फिरंगीच्या बळावर समग्र हिंदुस्थानची भवितव्यता पुढें फिरवून टाकतील म्हणून? खुद्द समर्थांच्या तीक्ष्ण दृष्टींतूनही ते सुटले नव्हते; "कित्येक फिरंगणांत आटले" ही ओळ ह्याचीच दर्शक आहे. पण "दुर्जनः परिहर्तव्यो विद्ययालंकृतोपि सन्। मणिना भूषितः सर्पः किमसौ न भयंकरः?॥" हें वचन ह्या सर्वांच्याच ध्यानीं येऊन घरांत शिरलेल्या ह्या उटाऱ्या पिलांना, ह्या

सापाच्या गोजिरवाण्या जातीला, ह्या वाघाच्या बछड्यांना, त्यांनीं वेळींच दूर करावयास हवें होतें. पण होणाऱ्यासारखी बुद्धि होते म्हणतात, त्याला कोण काय करणार ? असो.

एका हातीं तागडी व दुसऱ्या हातीं बायबल घेऊन निघालेल्या ह्या परदेशस्थ बेपारीभाईनीं प्रथम बायबलाला पुढें न करतां तागडीच प्रथम पुढें केली, हें त्यांच्या राजनीतिकुशलतेला धरूनच झालें. किंबहुना, प्रथम केवळ व्यापार करावा एवढाच या सर्वांचा हेतू होता, असेंहि म्हणतात. तें कांहीं असलें तरी एवढी गोष्ट खरी कीं, प्रथम त्यांनीं तागडीच पुढें सारली व नंतर संधि पाहून ज्याप्रमाणें त्या तागडींतून तरवार बाहेर पडून तिनें तख्त काबीज करण्यासाठीं धडपड केली, त्याचप्रमाणें त्या तागडीच्या दुसऱ्या पारड्यांतून बायबल व ब्रँडी बाहेर पडून, ह्या दुकलीनें ह्या आर्यांच्या पवित्र देशांत खूपच धुमाकूळ मांडून दिला ! त्याचाच इतिहास आपणांस आतां पहावयाचा आहे.

तागडी, तरवार, आणि तख्त ह्या तिन 'त' कारांचा एक राजकीय संघ असून त्यापायीं डच, पोर्तुगीज, फ्रेंच, व इंग्रज, ह्या लोकांच्या हिंदुस्थानांत कसकशा झटापटी झाल्या व त्यांत शेवटीं इंग्रज यशस्वी होऊन त्यांनीं हिंदुस्थानची राजकीय सत्ता व गादी कशी बळकाविली व आजतागायत त्यांचाच अंमल ह्या देशावर कसा चालू आहे, इत्यादि हकीकत आमच्या पुढच्या खंडांत म्हणजे " भारववर्षांच्या राजकीय इतिहासांत " आम्ही देणार असल्यामुळें तो प्रश्न आपण येथें बाजूस ठेवून चालू धार्मिक इतिहासाच्या दृष्टीनें, ब्रिटिश, बायबल, व ब्रँडी या तिन 'ब' काराशींच आपणांस कर्तव्य असल्यामुळें आतां आपण तिकडेच वळूं.

आतां प्रथम हें सांगणें अवश्य आहे कीं, 'ब' कार-त्रयीच्या जुळण्यासाठीं जरी ब्रिटिश असा शब्दप्रयोग आम्ही घेतला आहे, तरी ब्रिटिश ह्या शब्दानें केवळ इंग्लंडांतले किंवा इंग्लंड—स्कॉटलंड—आयर्लंड या तीन देशांनीं मिळून झालेल्या राष्ट्रांतलेंच लोक तेवढे न धरतां त्यांत आम्ही समग्र ख्रिश्चन जगाची म्हणजे युरोप व अमेरिका खंडाचीही गणना करतो. कारण खुद्द ब्रिटिश लोकांच्या आधीं डॅनिश, पोर्तुगीज, ह्या लोकांनीं व चालू काळांत ब्रिटिश लोकांबरोबरच अमेरिकन मिशन्सनीं

ी हें त्याच्या धर्मप्रसाराचें कार्य केलें आहे व करीत आहेत. कारण इंग्लंडप्रमाणेंच युरोप आणि अमेरिका हे खंड ख्रिश्चनधर्माचे आगर आहेत. असो.

"इंग्लंडचा इतिहास कां शिकायचा ?" ह्या प्रश्नाची चर्चा आपल्या "इंग्लंडचा इतिहास" ह्या सुंदर पुस्तकाचे प्रारंभींच करतांना रा. गोविंदराव मोडक यांनीं त्याची जीं कारणें दिलीं आहेत, त्यांत आंग्लाई व मोंगलाई यांची तुलना करून, मोगलाईच्या सडेतोड जुलमानें शारीरिक विटंबना व हाल होऊन जो संताप येई त्यांनीं त्या मोंगलाईच्या पारतंत्र्याच्या देहाभोंवतालचा पाश तटातट तोडण्यास सामान्यतः विचारी मनुष्यास कठीण जात नसे; परंतु आंग्लाईच्या अंगाईगीतांनीं टाकलेला पारतंत्र्याचा पाश केवळ देहाभोंवतींच. नसून त्याचा वळसा आमच्या मनाच्या मानेभोंवतींसुद्धां कसा बसला आहे, म्हणजेच मोंगलाईंत आम्ही देहानें परतंत्र होतो, तर आंग्लाईंत आमचीं मनेंसुद्धां कशीं परतंत्र होऊन दुसऱ्यास विकलीं गेलीं आहेत, मोगलाईचा ताबा देहावर होता व मन स्वतंत्रविचारास मुक्त होते, पण आंग्लाईंत आमचीं मनेंसुद्धां कशी गुलाम बनून गेलीं आहेत, आणि म्हणूनच ह्या पाशाची पक्कड सोडविणें मोंगलाईपेक्षाही कसें कठिण झाले आहे, ह्याचें मोठें सुंदर चित्र रेखाटलें आहे ! अर्थात् अशाप्रकारची सुशीक्षित मनाची स्थिती व्हायला ज्याप्रमाणें राजकीय, औद्योगिक व सामाजिक वगैरे प्रकारचीं कारणें घडलीं आहेत, त्याचप्रमाणें निदान पहिल्या पहिल्या पिढ्यांना तरी धार्मिक बाबतींतही तेंच वाटलेलें आहे; आणि खरोखरच वरील सर्व बाबतींप्रमाणेंच धार्मिक बाबतींत सुद्धां केवळ मोंगलाई व आंग्लाईचीच नव्हे, तर आंग्लाई व हिंदुशाही यांचीही तुलना करण्यासारखीच आहे. पैकीं राजकीय व सामाजिकांचा विचार आमच्या पुढच्या खंडांत म्हणजे "भारतवर्षाच्या राजकीय व सामाजिक इतिहासांत" आम्ही करणार असलों तरी धार्मिकबाबींचा विचार आपणांस येथेंच कर्तव्य आहे, व त्याप्रमाणें ही तुलना ओघाओघानें पुढें येईलच. पण त्याच्या आधीं निदान धार्मिकबाबतींपुरती तरी ह्या आंग्लाईची पक्कड आमच्या आधुनिक सुशिक्षितांच्या मनावरची

ढिली व्हावी ह्यासाठीं विष्णुशास्त्री चिपळणूकर, विष्णुबोवा ब्रह्मचारी, न्या. रानडे इत्यादि दिवंगत विद्वान वक्त्यांनीं मागेंच आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा मिशनऱ्यांशीं वाद खेळून व लेखणीच्या तेजस्वितेनें प्रगट केलीच आहे; व स्वामी विवेकानंद, रामतीर्थांसारख्यांनीं हिंदुधर्माचे झेंडे साता-समुद्राच्या पलिकडे नेऊन अमेरिका, इंग्लंड, सारख्या देशांतून थुईथुई नाचवल्यापासून तर ह्या रोगाला पुष्कळच उतार पडत चाललेला आहे; तथापि अजूनही कांहीं त्याचा अंश शिल्लक असल्यास, भारतवासीयांच्या मनाच्या मानेभोंवतालचा हा पाश साफ ढिला होऊन जावा व त्याना आपली मान त्यांतून मोकळी करुन घेतां यावी यासाठीं, सामान्य तरळत्या बुद्धिला, वरवरच्या भपक्यानें भुलणाऱ्या जनतेला, तात्त्विकदृष्ट्या ख्रिश्चनधर्माचा कनिष्ठपणा व हिंदुधर्माचा श्रेष्ठपणा पुनश्च पटवून देणें भाग असल्यामुळें, खालीलप्रमाणें तत्संबंधीं अल्पसा प्रयत्न यथामति प्रथमतः करण्यांत येत आहे! कारण, वाचक, लक्षांत ठेवा कीं, हिंदुधर्मावर आजवर जे परधर्मीयांचे आघात झाले, त्यांत ख्रिश्चन धर्माचा टोला शेवटचा बसला आहे! अर्थात् आघातानें स्वतःची शक्ति वाढत व तिची प्रगति पण होते, हें तत्त्व आम्ही एकदां मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें इथेंहि कसें झालें, तें पुढें येईलच. पण त्या आधीं आपणांस ह्या परधर्मीय पाशाची उरलीसुरली पक्कड ढिली करण्याकडे वळलें पाहिजे. व त्यासाठीं आधीं तो धर्म व त्याचीं तत्त्वें आहेत तरी काय, हें आपण आधीं थोडक्यांत पाहूं.

वास्तविक पाहतां हा ख्रिश्चनधर्म पुष्कळसा हिंदुधर्माशीं व विशेषतः त्यांतून फुटून निघालेल्या पण त्यांनीं शेवटीं मान्य केलेल्या बुद्धधर्माशीं सदृश आहे. किंबहुना, लोकमान्यांनीं आपल्या "कर्मयोग-रहस्यां"त सांगितल्याप्रमाणें ख्रिस्ताची व बुद्धभिक्षूंची गांठ पडून त्यांच्या संन्यासपर विचारांचा व तत्त्वज्ञानाचा पगडा त्याजवर पडला असल्याचाही कसा संभव आहे. हें दोन्ही धर्मांचा इतिहास व त्यांतील आचारविचारांची तुलना पाहून कोणांसही करून येणार आहे. असो. "सर्व मनुष्यें जन्मतः पापी आहेत आणि त्यामुळें देवाचा आपल्यावर रोष झाला आहे अशी कल्पना ख्रिश्चन धर्मांत आहे. ह्या पापामुळें ईश्वरांत व आपल्यांत अंतर पडलें आहे आणि आपण अधिक

अपराध करून तें अंतर वाढवीत आहोंत. आपण ईश्वराच्या आज्ञा मानीत नाहीं व त्यामुळें आपलें नुकसान करून घेतों, अशी त्यांची विचारसरणी बनली आहे. ह्या पापक्षालनार्थ यहुदी लोक पशुयज्ञ करीत. ख्रिस्ती लोकांचें म्हणणें हें कीं, त्यासाठीं देवानें आपला पुत्र पाठविला, त्यानें आपल्या स्वतःचा यज्ञ करून आपल्या रक्ताच्या पाटानें मनुष्य जातीचीं पातकें धुवून टाकलीं. जो कोणी त्याच्यावर विश्वास ठेवील, त्याचा उद्धार होईल." ("वेदांतनिदर्शन" पा. ९३।९४). आमच्याकडेही वैदिककाळीं, पापक्षालनार्थ नव्हे, तर पुण्यसंपादनार्थ व स्वर्गाच्या इच्छेनें असाच पशुयज्ञ होत असे व त्यासाठीं महात्म्या ख्रिस्ताप्रमाणेंच महात्मा गौतमबुद्धानेंही एक प्रकारें आपल्या भयंकर निकराच्या चळवळीनें आत्मबलिदानच केलें, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. किंबहुना, त्याचा अवतारच त्यासाठीं व अहिंसामतप्रतिपादनार्थ होता, भ्रांतहिंसकांची हिंसाबुद्धि दूर करून अहिंसेची गुढी जगांत उभवण्यासाठीं होता, हें आपण मागें पाहिलेंच आहे! अर्थात् अशा स्वात्मार्पण करणाऱ्या ख्रिस्तावर किंवा बुद्धावर जो नितांतश्रद्धा ठेवील, तो निस्संशय तरेल यांत कांहीं शंका आहे काय? पण फरक इतकाच कीं, अशा अहिंसामतप्रतिपादक बुद्धदेवाच्या विचारांतली आणि वाणींतली कळकळ आणि तळमळ जाणून, सहृदय व उदारधी अशा आमच्या खऱ्या हिंदुधर्मानें त्यालाहि आपल्या पोटांत घेतलें इतकेंच नव्हे, तर अवतार म्हणून त्यास डोक्यावर घेऊन नाचविलें, तर पश्चिमेकडच्या बुद्धाला—महात्मा ख्राइस्टला—ह्याच कारणास्तव ज्यू लोकांनीं फासांवर लटकाविलें! पशुयज्ञाविरुद्ध मोहीम सुरू करणाऱ्या दोन महात्म्यांपैकीं एका महात्म्याला एका समाजानें देव म्हणून डोक्यावर घेतले, तर दुसऱ्या महात्म्याला दुसऱ्या समाजानें दगड म्हणून पायाखालीं तुडविलें—एखाद्या दरोडेखोराप्रमाणें फांसावर लटकावलें—ह्यांतच त्या दोन समाजांतील लोकांच्या हृदयाच्या, म्हणजेच त्यांच्या धर्माच्या, संस्कृतीतला फरक स्पष्ट होत आहे! पूर्व आणि पश्चिम ह्यांत फरक आहे तो हाच! आणि ह्याचें कारण, केवळ तत्वज्ञानांतच नव्हे, तर धार्मिक आचारविचारांतसुद्धां, एक सहिष्णु तर दुसरा असहिष्णु, हेंच होय! एकांत सहिष्णुतेचा

सद्गुण, तर दुसऱ्यात असहिष्णुतेचा अवगुण, पदोपदीं दृष्टीस पडतो ! अर्थात् असहिष्णुता म्हणजेच विचारांची, भावनांची, हृदयाची, व संस्कृतीची संकुचितता होय, हें काय वेगळें सांगायला पाहिजे ? हिंदुधर्म आणि ख्रिश्चनधर्म, किंबहुना, जगांतला इतर कोणचाही धर्म, ह्यांची तुलना करून पाहातां, आपणांस सहिष्णुता आणि असहिष्णुता ह्या सद्गुणदुर्गुणांतील फरकच उठावदारपणानें चितारलेला, व तोही तत्वज्ञान आणि धार्मिक आचार ह्या दोन्हीही बाबतींत चितारलेला, दिसून येणार आहे ! कसा तो पहा !

प्रथम ख्रिश्चन व हिंदुधर्मच घ्या ! तत्वज्ञान काय किंवा धार्मिक आचार काय, दोन्ही बाबतींत तुम्हाला हिंदुधर्म अत्यंत उदारहृदयी तर ख्रिश्चन धर्म अत्यंत संकुचित हृदयाचा आहे, असेंच आढळून येईल ! प्रथम तत्वज्ञानाचा विचार करूं. आणि केवळ तत्वज्ञानप्रतिपादनाच्या तात्विक दृष्टीनेच बोलायचें तर "हिंदुधर्म हा तत्वांचा आहे व तो सदा तत्वांचा—प्रामाणिकपणें प्रतिपादन केल्या जाणाऱ्या तत्वांचा—भुकेला आहे " असें जें रा. अ. ब. कोल्हटकर यांनीं आपल्या " सर्वधर्मपरिषद " नामक "श्रुतिबोधा"च्या अंकांत म्हटलें होतें, तेंच खरें आहे; याच गुणामुळें गौतमबुद्धासारखे महात्मे त्यांतील अवतार होऊन बसले; सांख्यासारखें नास्तिक मत सुद्धां षड्दर्शनांत कायमचें समाविष्ट झालें ! याचें कारण हेंच कीं, " हिंदुधर्मांत मानासिक विचाराला कोणतीच आठकांठी नाहीं. मतस्वातंत्र्याचा दुरुपयोग करणारांना हिंदुधर्म धर्मबाह्य मानीत नाहीं. कापिलाचें सांख्यमत, पतंजलीचा योगाभ्यास, गौतमाचें न्यायशास्त्र, कणादाचें अणुमहात्म्य, बुद्धाची अहिंसा, पंढरीची वारी, मुसलमानी रोजे, पिराची पूजा, इतकेंच नव्हे, तर बायबलांतील वचनेंसुद्धां आमच्या वेदांताला आड येत नाहींत. मागील असेल तें मोडण्याची चाल आमची नाहीं. देवघेवीचा व्यापार आम्हांला उत्तम साधला आहे. " ( वे. नि. पा. ८४ ) " वेदकालांतसुद्धां प्रचलित यज्ञयागादिकांच्या भर अमदानींत, ह्या सर्व देवता म्हणजे एका श्रेष्ठ शक्तीचीं पर्याय नांवें आहेत, असें म्हणण्याला तत्ववेत्ते भ्याले नाहींत. असल्या गोष्टी उघडपणें बोलून दाखविण्याला पुष्कळच धैर्य लागतें. " ( वे. नि.

पा. ९० ) पण ह्या गोष्टी बोलण्याला जर एकपट धैर्य लागत असलें, तर त्याच्या शतपट औदार्य व मनाचा विस्तृतपणा तें ऐकून ध्यायला लागत असतो, तो हिंदुधर्माच्या ठायीं पुरेपुर होता व आहे. पण तेंच ख्रिश्चॉनिटीकडे वळा, म्हणजे तुम्हाला काय देखावा दृष्टीस पडेल ? स्वामी विवेकानंद म्हणतात, "हिंदुस्थानाबाहेर धर्मबाबतींत सहनशीलतेचें नांव नाहीं....तिकडचा मोठा जाडा विद्वान प्रोफेसर घ्या, तो ह्या मतप्रतिपादन करण्याच्या कामांत अगदीं भागुबाईच ठरेल ! त्याच्या धर्माच्याबद्दल त्याच्या मनांत सत्यप्रदिपादनाचे विचार आले तर त्यांतला शंभरावासुद्धां हिस्सा बोलून दाखविण्याची त्याची छाती नाहीं !" ("कुंभकोणम् येथील व्याख्यान") वेदान्तमताची महती गातां गातां प्रोफेसर मॅक्समुल्लरसारख्या विचारी पंडिताच्या हृदयालासुद्धां जोचरका बसून त्यांनीं जे- Nor have I ever tried to make propaganda for Vedantism, least of all in England" असे जे काकुळतीचे उद्गार काढले त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते ! पण असें कां, याचा विचार करितां याकामीं ख्रिश्चनधर्माची विचाराची बेहद्द संकुचितताच कारण होय हें उघडदिसून येतें. फार काय, पण खुद्द जेसुस् ख्राइस्टला या स्वतंत्र मतप्रतिपादनाबद्दल या लोकांनीं धर्मलंड म्हणून फांसावर लटकाविण्यास कमी केलें नाहीं ! प्रो. मॅक्समुल्लर–वेदान्तविचारांनीं तळमळणारा हा उदारधी आंग्लऋषी–म्हणतो कीं " With us unfortunately such questions can hardly be discussed in a Calm philosophical Spirit, because Theology steps in and protests against them as irreligious and blasphemous, just as the Jews declared it blasphemy in Christ to teach that he was equal to God, nay that He and the Father were one " ( P. 162 Six Systems of Indian Philosophy by Prof. Max. mullar.)

अर्थात् या कामीं कोणचा धर्म श्रेष्ठ आणि कोणचा कनिष्ठ, हें आतां उघडच होत आहे ! बरें, खुद्द तत्वज्ञानाची—दोन्ही धर्मांतल्या विचारांच्या भरारींची तुलना केली, तरी आपणांस हाच चमत्कार दृष्टीस पडतो.

स्वामी रामतीर्थांनी आपल्या एका भाषणांत " तस्यैवाहं " " तवैवाहं " व " त्वमेवाहं " अशातऱ्हेच्या तीन निरनिराळ्या भूमिकेवर उभे राहून उद्धार काढणाऱ्या जगांतील धर्मांची तुलना करून त्यांत " त्वमेवाहं " ची छातीठोक भरारी मारणारा एक हिंदुधर्मच आहे, व म्हणूनच तो सर्वश्रेष्ठ आहे, हें फार उत्कृष्ट रीतीनें दाखवून दिलें आहे ! कै. न्या. रानडेही आपल्या " फिलॉसफी ऑफ् थीइझम " म्हणजे ईशतत्त्वनिर्णय नामक व्याख्यानांत म्हणतातः—"ही (जीवात्मैक्याची-वेदांताची) कल्पना फार उच्च आणि खरी आहे. जगांतील दुसऱ्या कोणच्याही धर्माची भरारी इतकी उंच गेलेली नाहीं. इतर धर्मांत सृष्टि आणि मनुष्य ह्यांचा संबंध देवापासून अगदीं तोडलेला असून तो देव आपल्या मनुष्यासारखाच एक जीव आहे, फक्त आमच्यापेक्षां त्याचें सामर्थ्य व ज्ञान अनंतपटीनें अधिक आहे, असें इतर धर्मांत मानतात. वेदांतधर्मांत फक्त ब्रह्मालाच काय तें अस्तित्व आहे, आणि जग आणि जीव दोन्ही त्याचीं प्रतिबिंबें असून, त्याच्या स्वरूपापासून ते कधींच निराळे होत नाहींत पण फक्त आमच्या अज्ञानामुळें त्यांचें स्वरूप व प्रकार निरनिराळे वाटतात. " असो.

जी गोष्ट खुद्द ख्रिस्ती तत्वज्ञानांत नाहीं ती मग त्याच तत्त्वज्ञानावर बसविलेल्या उपासनादिकांतून कोठून येणार ! येथेंही आपणांस हाच संकुचितपणा दिसावा, हिंदुतत्त्वज्ञानात्मक भक्तिच्या भरारीचा अभाव येथेंही दिसावा, हें किती साहजिक आहे बरें ! कारण, आडांतच नाहीं तें पोहऱ्यांत कोठून येणार ! राजकारणाच्या आखाड्यांत अटकेची अटक न मानतां अटकेपार जसा भरारीनेंच झेंडा नाचवावा, त्याचप्रमाणें तत्त्वज्ञानाच्या मैदानांत विचारवारूवर आरोहण करून आमच्या हिंदुऋषींच्या मनाच्या भरारीनेंच मायेची अटक ओलांडून तत्त्वनिर्णयाच्या उंचीवर जीवब्रह्मैक्याच्या भावनेचें आपलें दिव्य निशाण थुईथुई नाचवावें, हेंच योग्य नव्हे काय ! असो; वरील ख्रिस्ती उपासनेंतल्या संकुचितपणाचीं कित्येक उदाहरणें देतां येतील. " ईश्वरानें मनुष्य निर्माण केला तो अमुकच दर्जापर्यंत सुधारावा, त्याच्यापुढें त्यानें पाऊल टाकू नये, ईश्वराला सदोदित भिऊन त्याच्या पुढें नम्र असावें, हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाहीं; विद्यार्थी कितीही शहाणा झाला तरी त्याला गुरूची गादी कधींच मिळूं

नये असा बंदोबस्त करणारा गुरु दुराग्रही नव्हे काय? ( "वे. नि" पा. ११४ ) असें जे रा. फडके म्हणतात ते यासाठींच. अर्थात् हा दुराग्रह मनोवृत्तींच्या संकुचिततेशिवाय दुसरें काय बरें दाखवितो? ईश्वर हा भयंकर न्यायाधीश आहे यापेक्षां ह्या लोकांची दृष्टीच पलीकडे जाऊन पोंचत नाहीं. अगदीं फार फार उच्च भरारी म्हणजे त्याला—त्या प्रभूला—पिता मानून, "हे आकाशांतील बापा" म्हणून त्याला हांका मारण्याची होय! एवढा महात्मा ख्राइस्ट, पण त्याच्या कल्पनेची आणि भावनेची भरारीसुद्धां "पिता" ह्या शब्दापलीकडे गेली नाहीं! मातेची ममता-आईची वत्सलता ही ह्या लोकांना ठाऊकच नाहीं कीं काय, कोणास ठाऊक! "आई!"— अहाहा! "आई" ह्या शब्दांत—"आई" ह्या दोनच अक्षरांत जी जादू आहे, जी प्रेमाची पांखर आहे, जो दयेचा ओलावा आहे, जी अनन्यावस्था आहे, त्याचें कुठवर वर्णन करावें? त्या नात्यांत ईश्वराशीं सलगी करून एखाद्या महापाप्यानेंसुद्धां त्या माऊलीच्या मांडीवर लोळण घ्यावी, व पश्चात्तप्त हृदयानें "आई आई" म्हणून हुंबरून स्फुंदस्फुंदून रडावें, म्हणजे ती आई अवश्य अशा पाप्यालासुद्धां पटकन् उचलून घेऊन त्याचा प्रेमानें पापा घेईल, व त्यास पापापासून मुक्त करील असें सांगणारा, महापाप्यानाही उदार आश्वासन देणारा, उदार हृदयाचा व प्रेमळ भावनेचा हिंदुधर्म कुठें, व "पाप्यांना अक्षय नरकवास भोगावा लागेल" म्हणणारा, व ईश्वराला न्यायाधीश, व फार तर "पिता" मानणारा, संकुचित वृत्तीचा व कोमल भावनांशीं पारखा झालेला ख्रिश्चन धर्म कुठें? फार काय, पण बापडा ख्राइस्ट त्या पित्यांशीं तद्रूप होऊन "तदहमस्मि"च्या जेव्हां गोष्टी सांगूं लागला, तेव्हां ह्याच ख्रिश्चन लोकांनीं बिचाऱ्याला पाखंडी व धर्मविघातक म्हणून फांसावर लटकाविलें! आणि आतां त्याच्या पुढें मारे गुडघे टेकटेकून त्याची प्रार्थना करीत असतात! अशा तऱ्हेचा हा उलट्या काळजाचा, निर्दय वृत्तिचा, आधीं लाथ मारून मग पायां पडणारा, असा विचित्र धर्म आहे! खरोखर ख्रिस्ताच्या फांशीची गोष्ट आठवली, तें चित्र डोळ्यापुढें उभें राहिलें, म्हणजे खरोखर अंगावर शहारे येतात! क्रॉसावर चढवून, हस्तपादादिकांतून खिळे ठोकठोकून,

ह्या निर्दयांनीं त्याला ठार केलें, एकदां मरेना म्हणून तीनदां फांशी दिला, असे तर हे उलट्या काळजाचे मांग आहेत ! असो. याबद्दल लिहावें तितकें थोडेंच आहे ! अर्थात् हें सर्व आम्हीं महात्मा खिस्ताबद्दल आम्हांस जो नितांत आदर वाटत आहे त्यामुळेंच लिहिलें आहे, हें उघड आहे ! त्या बापड्याची झालेली नाहक छळणा आम्हांला पाहवेना, म्हणूनच हे सात्विक संतापाचे सहजोद्गार आमच्या मुखांतून बाहेर पडले आहेत ! असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा तऱ्हेनें तत्वज्ञानांत हलका ठरलेला खिश्चन धर्म, त्याच अधिष्ठानावर वसलेल्या भक्तींत व उपासनेंतही त्याहूनही हलका ठरावा, हें किती साहजीक आहे बरें ? असो.

याप्रमाणें तत्वज्ञानांत " सोहंहंसा "चें अद्वैती " उत्तर " सांगणाऱ्या खिस्तरूप परम'हंसा'चे पंख छेदन करून जे आग्रहानें द्वैतीच राहिले, व ज्यांनीं आपली अद्वैताची " किल्ली द्वैतभावानें हरविली आहे, " उपासनेमध्यें ज्यांच्या वत्सल भावनांची मजल 'पित्या'-च्या पलिकडे जाऊन पोंचत नाहीं, व तत्वज्ञान आणि उपासना ह्या दोहींतही ज्यांच्या विचारांचा आणि भावनांचा सारखाच संकुचितपणा दिसत आहे, त्या लोकांच्या आचारधर्मांत अथवा धर्माच्या आचारांत मग हाच दुराग्रह, हटवादीपणा, असहिष्णुता, अज्ञान, व कमालीची संकुचितता दिसावी, ह्यांत कांहीं मग आश्चर्य आहे काय ? किंबहुना हें ओघानेंच आलें. कसें तें पहा !:—

इंग्लंडच्या स्वीकृत धर्माचें सहावें कलम पहा, म्हणजे त्यांत किती आग्रह भरला आहे हें दिसेल " असें रा. फडके आपल्या " वेदांत निदर्शन " पान ८४ वर म्हणतात तें यासाठींच. ते साहजीकच पुढें म्हणतात, " मग खलीफ ओमारला कां हंसावें ? अलेक्झांड्रिया येथील पुस्तकसंग्रह जाळतेवेळीं तो म्हणाला कीं, या पुस्तकांत कुराणांतल्या गोष्टीच सांगितल्या असल्या तर ही पुनरुक्ति कशाला ? आणि त्याच्या बाहेरच्या गोष्टी असल्या तर त्या धर्मबाह्य होत, तेव्हां त्या नाहींशा केल्याच पाहिजेत. " (" वे. नि. " पा. ८५). पण पुस्तकेंच नुसतीं नव्हेंत, तर प्रत्यक्ष माणसें मारण्याचें, धर्माच्या पायीं—धर्मप्रसारार्थ-प्रत्यक्ष माणसांच्या आहुति

घेण्याचें कार्यसुद्धां करण्यास न कचरणारी अशी ही खिश्चन व मुसलमानी धर्माची अवलाद आहे ! विशेषतः मुसलमानी धर्माची या बाबतींतली असहिष्णुता अगदीं कळसास जाऊन पोहोंचलेली आपण मागें पाहिलीच आहे; व चालू—अगदी चालू काळांतसुद्धां हे लोक किती हट्टी, दुराग्रही, असहिष्णु, अनीतिमान, व परजीविताची पर्वा न ठेवणारे आहेत, याचा प्रत्यय जागोजाग येतच आहे! आणि असें असूनसुद्धां राष्ट्राचे पुढारी म्हणविणारे वेडे 'महात्मे' त्यांचीच तळी उचलून धरीत आहेत ! दुर्दैव देशाचें, दुसरें काय ? असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशातऱ्हेचे हे दोन धर्म—इस्लाम आणि खिस्ती—हे अत्यंत संकुचित वृत्तीचे, हट्टी व दुराग्रही आहेत ! 'दगडापेक्षां वीट मऊ' या न्यायानें, इस्लामपेक्षां खिस्तीधर्म जरा अधिक उजळ असल्यामुळें, तो हल्लीं उजळमाथ्यानें अगदीं जिवाशींच गांठ घालून काट छाट करीत नाहीं, इतकेंच ! पण त्या धर्माचा राजकीय इतिहास पाहिल्यास, तसलेंही अनन्वित कृत्य करण्यास त्या धर्मातील राजे कचरले नाहींत, हें खुद्द इंग्लंडचा इतिहासच आपणांस सांगत आहे ! उदाहरणार्थ कॅथॉलिक (?) मेरी राणीनें ' अग्नये स्वाहा ' केलेले सुमारें ३०० लोकांचे बळी पहा, म्हणजे हें कळून येईल ! म्हणून स्वामी विवेकानंद आपल्या कुंभकोणम् येथील व्याख्यानांत म्हणतात:—
" Aye, you little know how much of intolerance is yet abroad. Killing a man is nothing for religion's sake, and tomorrow they may do it in the very heart of the boasted Civilization if today they are not really doing so. Outcasting in the most horrible forms would often come down upon the head of a man in the West if he dared to say a word against his country's accepted religion. "

पण याप्रमाणें उघड काटछाट केली नाहीं, म्हणून अंतःकरणांतला संकुचितपणा त्यानें थोडाच नाहींसा होतो ?. ह्या नाहीं त्या रूपानें तो बाहेर पडणारच ! आणि लांचलुचपत, भुलभुलावणी, व खाजगी जुलूम उर्फ जबरदस्ती, आणि प्रसंगांत सांपडल्याची पराधीनता, ह्यांचा फायदा

घेऊन—ह्याच्या पायावरच ह्या "आकाशातील बापाच्या" लेकरांनीं आपली खिस्तीधर्मप्रसाराची टोलेजंग पण पापी इमारत हिंदुस्थानांत राजाश्रयाच्या जोरावर उभारली आहे; धनिक स्वधर्मीयांच्या लाखो रुपयांचा वार्षिक तनखा त्या इमारतीची चुनेगच्ची व साफसफेती करीत आहे! स्वखुषीनें त्यांच्या धर्मांत गेला, असा एखादाच सांपडायचा! असो. यावरून एकच गोष्ट पुनः पुन्हा दिसून येते व ती म्हणजे हीच कीं, ह्या धर्माचे लोक अत्यंत संकुचित वृत्तीचे व परधर्मासहिष्णु आहेत! आमच्या धर्माशीं ह्यांची तुलना केल्यास, खरोखर हिऱ्यापुढें गारगोटी किंवा अनर्घ्यरत्नापुढें किंवा दिव्य हीरककांतीपुढें क्षुद्र कांच तसाच ह्यांचा धर्म दिसणार आहे! म्हणूनच रा. फडके म्हणतात:—"येशू खिस्त हा देवाचा मुलगा होता, त्याच्यावर विश्वास ठेवा, आणि त्याच्या नांवाच्या मार्गानें गेला तरच तुमच्यावर ईशकृपा होईल," असला खिस्ती धर्मातल्यासारखा हट्ट वेदांचा नाहीं. ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं, मग तें मिळविण्याचें साधन तुमचें वाटेल तें असो. साधनाविषयीं, उपासनेविषयीं हिंदुलोकांचा तंटा नाहीं. वेदाला प्रामाण्य देण्यास सांगितलें पण इतर लोकांच्याप्रमाणें विशिष्ट धार्मिक पुस्तकांतच ज्ञान भरलें आहे, असल्याप्रकारचा वेदांचा दुराग्रह नाहीं. (तसेंच) धर्मपुस्तकांतील सिद्धान्ताला विचाराची कसोटी लावूं नका अशी कोती समजूत हिंदुधर्माची नाहीं. धर्मबाबतींत छळ करण्याचें इंग्रजांनीं सोडून दिलें, तें हिंदुच्या सहवासानें असें कोणी म्हणतात, पण यांत खरें राजकीय धोरण आहे. पोर्तुगीज लोकांची पाद्रीमंडळी प्रथम हिंदुस्थानांत आली, त्यांनीं बाटविण्याचा सपाटा चालविला, पण त्यामुळें त्यांना लागलेली ('वसईच्या रणसंग्रामाची') ठेंच पाहून इंग्रज सावध झाले आणि त्यांनीं आपलें धोरण बदललें" ("वे. नि." पा. ९१). असा हा इतिहास आहे. असो. ईश्वर तेथून एक असून त्याचींच पर्याय नांवें जगांत पसरलीं आहेत; ज्यानें त्यानें आपापल्या धर्मप्रमाणें वागून मोक्ष मिळवावा; इत्यादि प्रकारचीं शांतिमय व शांतिप्रद उदात्त तत्त्वें आणि ध्येयें सांगणारा उच्च हिंदुधर्म कुठें, व हट्टी, दुराग्रही, व संकुचित असा खिस्ती धर्म कुठें!

याप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहाराच्या आणि आचाराच्या धार्मिक जगांत उतरल्यानंतरही ह्या ख्रिस्ती लोकांची कशी संकुचितवृत्ति दृष्टीस पडते तें आपण त्यांच्या पाद्री भटांच्या उर्फ मिशनऱ्यांच्या उदाहरणावरून पाहिलें. आतां त्यांचीं त्याच अज्ञानाचीं दुसरीं अंगें पहा ! "Do not drink," "Don't kill" म्हणजे "हत्या करूं नको' 'मद्यपान करूं नको' अशा प्रकारचा उज्वल उपदेश, आज्ञा, व आदेश महात्मा-ख्रिस्तानें आपल्या सर्व अनुयायांला केला असतां, आज काय स्थिति दिसत आहे ! ते लोक याप्रमाणें मुळींच वागत नसून येशूची आज्ञा ते बेशक पायाखालीं तुडवीत आहेत, असेंच आपणांस दिसत नाहीं काय ! वांद्र्यासारख्या ठिकाणीं लक्षावधि गाईचा जो आजवर संहार झाला व अजूनही हें सत्र चालूंच आहे, तें काय दाखवितें ? आणि असें असून उलट, "A cow has no soul" अशाप्रकारचे निरर्गल प्रलाप काढून हे आपल्या कृतीचें वर समर्थन करूं पाहतात ! पण "गाईला आत्मा नाहीं" म्हणणाऱ्या ह्या लोकांना आम्ही असें विचारतों की, तुम्हाला तरी आत्मा आहे काय ! त्या गाई-प्रमाणेंच तुम्हालाही गोळी घालून कां ठार करूं नये ! आणि "A cow has no soul" हें तत्व तुम्हांला कोणीं सांगितलें ! तुमच्याच सुपीक डोक्यांतून तें निघालें ना ! जगदीशचंद्र बोसना तुम्ही जाऊन विचारा, म्हणजे ते तुम्हाला आमच्या पूर्वज ऋषींप्रमाणेंच सांगतील कीं, गाईलाच काय,पण जगांतील सर्व स्थिरचर वस्तूला आत्मा आहे-भावना आहे ! "आपणासि चिमोटा घेतला। तेणें कासावीस झाला। आपणावरूनि दुसऱ्याला। राखीत जावें ॥ " अशातऱ्हेच्या समर्थांच्या व हिंदुधर्माच्या उदात्त उपदेशाशीं सदृश वचनें तुमच्याही बायबलांत सांपडणार नाहींत असें नाहीं ! पण प्रत्यक्ष आपल्या धर्मसंस्थापकाचा बळी घेऊन त्याच्या रक्तानें ज्यांनीं आपलें "पवित्रशास्त्र" रंगविलें त्या निर्दयांना हें सांगून काय फायदा ! आमचें म्हणणें त्याकामीं इतकेंच आहे कीं, मग त्या येशूपुढें गुडघे टेकण्याचा फार्स तरी कशाला करता ? अशानें भ्तो फसेल असें तुम्हास वाटतें काय ? ईश्वरप्रार्थनेच्यावेळीं हॅम्लेटचा चुलता काय उद्वार काढीत आहे तें तुम्ही विसरलांत काय ! असो. तर आमचें तुम्हांस एवढेंच सांगणें

आहे कीं, तुम्हांस येशूच्या बलिदानाचा खराखुरा पश्चात्ताप झाला असेल तर गरीब जीवमात्राची हिंसा सोडून द्या; नाहींतर गुडघे टेकण्याचें ढोंग तरी टाकून देऊन बेशक मोंगलाई खाक्या सुरू करा! पण तुम्ही पडलांत धूर्त! उघड–भर रस्त्यावर–जर तसा प्रकार केला तर उद्यां गाईच्या ऐवजीं कदाचित् तुम्हीच येशूच्या भेटीला जाण्याची वेळ यायची! म्हणून ही आडपडद्याची वांद्याच्या यंत्राची योजना तुम्ही केली आहे! होयना? शाबास! तुम्ही धूर्त खरे! पण लक्षांत ठेवा कीं, अशानें तो येशू व आकाशांतला बाप तर कधींच फसणार नाहींच, पण तुम्हालाही अशा अनान्वित कृत्याची पुढेमागें कदाचित् सव्याज फेड करण्याची पाळी आल्यावांचून राहणार नाहीं! असो.

जी गोहत्येची गोष्ट तीच मदिरापानाची कथा! ह्या बाटलाबाईच्या नादीं लागून, दारूच्या पिपांत समग्र पाश्चात्य जग—अगदीं ख्रिस्ती म्हणविणारें पाश्चात्य जग–कसें बुडालें आहे हें वेगळें सांगणें नकोच! कुत्र्याच्या मुताची ज्या पेयाला सर, त्यालाच 'पृथ्वीवरील अमृत' म्हणून, तोंडें वेडीवांकडीं करीत, तें घशाखालीं ढकलणाऱ्या ह्या मद्यप्यांची आणि दारुड्यांची कींव करावी तितकी थोडीच! पण स्वतः दारूंत बुडूनच ह्या मद्यप्यांचें कोठें समाधान होत आहे? दारूच्या निशेनें भ्रमलेल्या बेताल-बुद्धीच्या ह्या दारुड्यांची पानस्वातंत्र्याची बडबड सुरू झाली व "हिंदूंच्या पानस्वातंत्र्याच्या आड आम्ही कसें यावें?" अशाप्रकारचा खुळचट कोटी-क्रम धनलोभी आणि स्वार्थांध असें हे दारुबाज सरकार–ख्रिस्तधर्मानुयायी म्हणविणारें सरकार–पुढें सारूं लागलें! जणूंकाय, हिंदुस्थानच्या सर्व प्रजेनीं एकादिलानें आणि अट्टाहासानें त्याची मागणीच केली होती! लोकांचें सात्विक असें राजकीय स्वातंत्र्य घशाखालीं घालून, त्यांच्या स्वातंत्र्य-लक्ष्मीचा अपहार करून, त्यांच्या घरांत दारूबाजीसारख्या पापी हडळी पानस्वातंत्र्याच्या नांवाखालीं कोंबणें, म्हणजे त्यांच्या घराला आग लावून देणें आहे, त्यांच्या दुःखावर मीठ चोळण्यासारखें आहे! हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, बौद्ध, इत्यादि जगांतला कोणचाही धर्म घ्या; तो तुम्हाला मदिरापान हें महत्पाप आहे, असेंच सांगेल, इतकेंच नव्हे, तर ह्या पापाचें प्रायश्चित्तही शास्त्रकारांनीं अत्यंत कडक सांगितलेलेंच ह्या

त्या धर्मांतून दिसून येईल ! मद्यपानाविरुद्ध सर्व धर्मांच्या सर्व वाङ्मयांतून हजारों वचनें काढून देतां येतील; पण दारू प्यावी, तें एक पुण्यकृत्य आहे, अशा अर्थाचें एकही वचन तुम्हांला कोणच्याही समंजस वाङ्मयांत सांपडणार नाहीं ! यासाठीं आमचें ह्या ख्रिस्ती सरकारास एवढेंच सांगणें आहे कीं "बस्, आम्ही तुम्हांला दारुबाज बनविणार !" असें म्हणून सत्राईखाक्या चालवाना ? त्याला एवढें सोंगढोंग कशास पाहिजे ? पण तुम्हीं पडलात धूर्त ! तुमचें, असा देखावा केल्यावांचून व हजारों खटपटी आणि लटपटी केल्यावांचून, कसें चालणार ? पण लक्षांत ठेवा कीं, "अत्युत्कटैः पापपुण्यैः इहैव फलमश्नुते" असा निसर्गाचा कायदा आहे, आणि तो तुमच्यावर केव्हांना केव्हांतरी उलटल्यावांचून कधींही राहाणार नाहीं ! असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, ब्रिटिशसत्तेपाठोपाठ येणाऱ्या बायबलांनीं व ब्रँडींनी ह्या आर्यांच्या पवित्र देशांत खूपच धुमाकूळ माजविला आहे ! अगदीं पेशवाई अखेरपासूनचे सरकारी रिपोर्ट घेतले तरी त्यांतसुद्धां १०।२० रु. पासून लक्षावधि रुपयांपर्यंत, गांवोंगांवचे दारूविक्रींचे आंकडे कसे चढत्या वाढत्या प्रमाणांत आहेत, तें दिसून येईल. अशातऱ्हेनें स्वधर्माज्ञेविरुद्ध ही ख्रिस्तीमंडळी पुण्यसंचय करीत आहेत !

यावर कदाचित् कोणी असा कोटीक्रम करतील कीं, "कायहो, तुमच्यांतही पूर्वी हिंसा आणि मद्यपान नव्हतें काय ?" तर त्यावर उत्तर इतकेंच कीं, तें असलें, तरी बौद्धजैनासारख्यांच्या उपदेशानें व शुक्राचार्यासारख्यांच्या अनुभवानें आम्ही हजारों वर्षांपूर्वीच सावध झालों असून उन्नतीची एक पायरी वर चढलों आहोंत—इतकेंच नव्हें, तर त्यांचीं मतें खुद्द आमच्या धर्मशास्त्रांत व धार्मिक वाङ्मयांत गोंवून हिंदुधर्मानें आपला उदारपणा, प्रगमनशीलता, व चुकीची सुधारणा करण्याचा बाणेदार मनमोकळेपणा जागोजाग दाखवून, तो आज जगांतला सर्वश्रेष्ठधर्म होऊन बसला आहे; तर, इतर धर्म संकुचित वृत्तीनें, हट्टी दुराग्रहानें, उंबरांतल्या किड्याप्रमाणें, अद्याप आपल्याच अज्ञांनी अभिमानांत—अर्थात् दुराभिमानांत—गर्क आहेत ! आणि त्यांतलाच ख्रिस्ती धर्म एक असल्यामुळें, तोही इतर धर्मांप्रमाणेंच खालच्या पायरीचा ठरतो ! असो.

याप्रमाणें तत्त्वज्ञान, उपासना, व धार्मिक आचार, ह्या तिन्हींही बाबतींत हिंदुधर्माशीं तुलना करतां खिस्तीधर्म कसा हिणकस ठरतो, तें आम्ही येथवर दाखविलें! याशिवाय पुनर्जन्म न मानणें, तत्वनिष्ठ न राहतां व्यक्तिनिष्ठ असणें, इत्यादि गोष्टीही त्यास खालच्या कोर्टांत ढकलण्यास कारणीभूत झाल्या आहेत. आणि जी खिस्ती धर्माची स्थिति, तीच थोड्याबहुत अंशानें इतर धर्मांचीही स्थिति असल्यानें तेहि हिंदुधर्माशीं होणाऱ्या तुलनेंत कमीच ठरतात ! किंबहुना, ही गोष्ट शिकागोला भरलेल्या सर्वधर्मपरिषदेमध्यें स्वामी विवेकानंदांनीं मागेंच सिद्ध करून दाखविलेली आहे. जिज्ञासूंनीं त्यांचें त्यावेळचें तें भाषण अवश्य वाचून पहावें, म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता त्यांस पटेल ! असो.

येणेंप्रमाणें हिंदुधर्माची श्रेष्ठता—सर्वतोपरी श्रेष्ठता—सिद्ध झाली, तरी आज तद्धर्मानुयायी म्हणविणारांची काय स्थिति आहे, धार्मिकदृष्ट्या चालू काळांत कोणचे प्रश्न विशेष विचारणीय झाले आहेत, व प्रचलित हिंदुधर्म सुधारणेचा कोणी कसा यत्न केला व तो कितपत यशस्वी झाला, इत्यादि गोष्टी आपणांस पाहिल्या पाहिजेत. कारण, ' पेशवाई अखेर ते चालू घटकेपर्यंत ' असेंच आपण ह्या प्रकरणांस नांव दिलेलें आहे ! असो.

तर याप्रमाणें विचार करून पाहतां, प्रथम आपल्या डोळ्यांपुढें हिंदुधर्मसुधारणेचे आधुनिक काळांत झालेले यत्न उभे राहतात ! ते यत्न म्हणजे राममोहनराय यांचा बंगाल्यांतला ब्राह्मोसमाज, पंडित दयानंदजींचा पंजाबांतला आर्यसमाज, महाराष्ट्रांतील कै. रानडे प्रभृतींचा प्रार्थनासमाज, इत्यादि होत. पण, हे सर्व प्रामाणिक बुद्धीचे प्रयत्न असले, तरी त्या त्या पंथाच्या चालकांची विचारसरणी ह्या हिंदुधर्माचे बाबतींत फारच कोती ठरते. हिंदुधर्मांतील जातिभेद, व मूर्तिपूजा ह्याच दोन गोष्टींवर मुख्यत्वेंकरून त्यांचा भर असल्यामुळें आपण तेवढ्या दोन गोष्टींचाच विचार करून, त्यांच्या चुकीच्या विचारसरणीचें आविष्करण करूं, म्हणजे झालें ! प्रथम मूर्तिपूजाच घ्या! दयानंदजींचें चरित्र रा. वसंतराव नाईकांनीं " मनोरंजनाच्या " जून १९२५ च्या अंकांत नुकतेच दिलेलें आहे. त्यांत सांबाच्या पिंडीवरून उंदराचें पिलूं

इकडून तिकडे उड्या मारतांना पाहून व तो महादेव त्याचा कांहींच प्रतिकार करीत नाहीं—करूं शकत नाहीं—असें पाहून त्या कोंवळ्या वयाच्या मुलाच्या मनांत—दयानंदजींच्या हृदयांत—मूर्तिपूजेविरुद्ध विचार थैमान घालूं लागले, असें रा. नाईक आपणांस सांगतात ! सोरटी सोमनाथाची मूर्ति गझनीच्या महंमुदानें—त्या मूर्तीभंजक अविंधानें—फोडली त्यावेळींही त्या मूर्तीनें—त्या देवाधिदेवानें—कोठें त्याचा प्रतिकार केला नाहीं तो ? अशातऱ्हेचा प्रश्नही ह्या मूर्तिपूजेविरुद्ध विचारतां येण्यासारखा आहे. मदांध अफझुलखानानेंही तुळजापूरची भवानी अशीच जात्यांत भरडून काढून तिचें पीठ केलें व तें नदीच्या पात्रांत फेकून दिलें; पंढरीचा विठोबा बडव्यांनीं पळवून लपवला म्हणूनच बचला, नाहींतर त्याची तीच गत व्हायची, किंबहुना, अगदीं आजच्या घटकेलासुद्धां मूर्तिभंजनाचे वेडानें भ्रमलेले कित्येक वेडेपीर काफर मुसलमान, हिंदूंच्या पवित्र देवालयांचा विध्वंस करून, त्यांतील मूर्ती फोडीत आहेत, मग कुठें तो तुमचा दगडी देव उर्फ दगडांतला देव त्यांचा प्रतिकार करीत आहे ? मग त्या मूर्ति-पूजेंत, त्या दगडाच्या देवाला भजण्यांत काय अर्थ राहिला ? त्यापेक्षां त्याचा त्यागच करणें उचित नव्हे काय ? अशातऱ्हेची विचारसरणीही जोरदार-पणें, पूर्वपक्ष म्हणून, पुढें मांडता येण्यासारखी आहे, किंबहुना, मांडली जातेही; तेव्हां तिचा विचार करणें अवश्य आहे !

यावर उत्तर देतांना प्रथम आपण मूर्तिपूजेची, म्हणजेच सगुणभक्तीची उर्फ सगुणभजनाची, आवश्यकता प्रथम पटवून देऊं, व मग त्याच्या दुसऱ्या भागाकडे वळूं. मूर्तिपूजेची आवश्यकता व महत्त्व आज म्हणजे नव्यानें सांगावयाचें आहे, असें नाहीं. विवेकानंद, रामतीर्थादि महात्मे आपल्या व्याख्यानांतून तें मागेंच बोलून गेलेले आहेत ! त्याचप्रमाणें नामदेवाच्या कथाधारें खरी दिव्य, उच्च भक्ति व संकुचित सगुणभक्ति ह्यांतील फरक आम्ही आमच्या "सायुज्यसोपानां"त सविस्तर विशद केला आहे, तोही जिज्ञासूंनीं या कामीं अवश्य पहावा, अशी विनंति आहे ! असो.

वास्तविक जगाचें आदितत्व हें निर्गुण, निराकार, अचिंत्य, इंद्रि-यातीत असून, "एकमेवाद्वितीय" आहे व "गुणतोऽपि विभागतां न

सहते " असें त्याचें स्वरूप आहे. याच्या उलट, त्याचे गुणच सांगायचे झाल्यास, ते सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व 'सच्चिदानंद' स्वरूप आहे; किंबहुना, ह्याच्याही पलिकडे जाऊन, त्या ब्रह्माचें निर्गुणत्व हाच त्याचा एक गुण नव्हे काय? अशातऱ्हेची रामानुजांची एक कोटी आहे! असो. पण ते कांहीं असलें तरी, अशाप्रकारचें उपरिनिर्दिष्ट ब्रह्म, हें वर सांगितलेल्या " सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोक्षिशिरोमुखं " इत्यादि विश्वरूपानें आकलन करणें सुद्धां किती कठिण व भयप्रद आहे व सामान्य भाविकाला " किरीटिनं गादिनं चक्रहस्तं " असेंच रूप पाहण्याची लालसा व " लागलीसे भूक डोळियासी " कशी असते, हें भगवद्गीतेचा ११ वा अध्याय आपणांस चक्क सांगत आहे! बरें, " आंग सांडोनि छाया आलिंगितोसि मा " असें म्हणून अर्जुनाला " गांवढळ " म्हणणाऱ्या प्रभूंनींच, त्याच्या पुढच्याच अध्यायांत, अगदीं प्रारंभासच, आपल्या लाडक्या अर्जुनाच्या सगुण भक्तीचेंच अधिक कोडकौतुक केलेलें, व असेंच भक्त "ते मे युक्ततमा मताः" असा निकाल दिलेला आपणांस माहीत आहे! अशी ही मौज असून, खऱ्या सगुण भक्तीचें माहात्म्य हें असें आहे! हिलाच ज्ञानीभक्ति, अथवा चौथी भक्ति, असेंच उच्चावस्थेंतलें एक नांव असून! " ठाकिलीयाही सागरू। जैसा मागील यावा अनिवारु " अशाप्रकारचा तो भक्तीचा पूर असतो व " सुवर्णमणी सोनया। ये कल्लोळ जैसा पाणिया। " तशाप्रकारची किंवा, " गगन गगनावरी लोळे। " अशी ही उच्च भक्ति असते! " अद्वैतींही भक्ति असे " असें ज्ञानोबा म्हणतात, किंवा " सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वं। सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः॥ " अशाप्रकारचे प्रेमळ उद्गार खुद्द आद्य श्रीशंकराचार्य काढतात, ते यासाठींच! अर्थात् अद्वैतप्रतिपादकही शेवटीं, ह्या उच्चावस्थेंतल्या कां होईना, पण भक्तींतच रंगलेले आपणांस दिसणार आहेत! आणि " जेथें जेथें आपले नेत्र जाऊन पोहोंचतील, तेथें तेथें त्या पूर्णाचें, त्या परब्रह्माचें दर्शन होणें " हीच उच्चभक्तीची कसोटी असून, " वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः " असें भगवान् म्हणतात तें यासाठींच! किंबहुना, " विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाकेच पंडिताः समदर्शिनः॥ "

हीच उच्चभक्ति बाणल्याची खूण आहे ! अगदीं ह्याच अर्थाचे व अधिक काव्यमय असें ' रामबादशहाचे ' उद्गार प्रसिद्धच आहेत, पण ह्या उच्च अवस्थेला–ह्यालाच निर्गुणभक्ति म्हटल्यास ह्या अवस्थेला–पोंचायचें साधन भक्तिच आहे, हें कोणीही विसरूं नये ! " सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाहिजे निर्धारें । " असें समर्थ म्हणतात तें यासाठींच ! " बोले सर्वज्ञाचा राजा । मूर्खस्य प्रतिमापूजा । " म्हणणारे समर्थच, अन्यत्र " सांडील सगुणभजनासी । तो ज्ञाता परी अपेशी । म्हणोनी सगुण भजनासी । सांडोचि नये ! ॥ " असें म्हणत आहेत. मग ह्याचा मेळ कसा घालायचा ? असें कोणी म्हणतील, तर त्याचें उत्तर इतकेंच आहे कीं, सगुणभक्तींतही दोन पायऱ्या आहेत. एक संकुचित व आंधळी, व दुसरी व्यापक व डोळस ! अर्थात् ' पहिली'तून ' दुसरीं'त नेणारे 'सद्गुरू'च असून त्यांच्या कृपेनेंच हें कार्य होत असतें ! पण पहिल्या प्रकारच्या भक्तींत मुरल्याशिवाय दुसरी एकाएकीं कधींच प्राप्त होत नाहीं ! एवढेंच कीं, त्या पहिलींतच कायमचें डुबून न राहतां, हळूहळू दुसरीची ओळख करून घेऊन, तिच्या मार्गास प्रत्येकानें लागलें पाहिजे; कारण, त्यावांचून सुटका म्हणजे मोक्ष नाहीं ! अर्थात् समर्थांचे—" बोले सर्वज्ञांचा राजा " इ. वरील उद्गार हे अशा आंधळ्या भक्तींतच रमणाऱ्या जीवाला उद्देशून आहेत, हें उघड आहे; आणि तें साहजिकच आहे. माझा बाब्या श्रीगणेशा शिकतो हें म्हणणें कांहीं दिवस शोभेल. पण त्याला एकदा दाढीमिशा येऊं लागल्यावरही तसेंच म्हटल्यास कसें चालेल ? तीच गोष्ट इथेंहि लागू आहे! पण ' श्रीगणेशा ' शिवाय पुढची कार्यसिद्धि होणेंहि तितकेंच कठीण उर्फ दुर्लभ होय, हेंहि तितकेंच खरें आहे ! असो.

तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा त्या ईश्वराची उपासना करायला कांहींतरी सगुणाचा आधार लागत असतो ! ज्ञानावांचून मोक्ष नाहीं हें तर खरेंच; पण तें ज्ञानही, निदान सामान्य माणसाला तरी, उपासनेच्या मार्गानेंच सांपडत असतें ! अर्थात् मूर्तिपूजा, सगुणभक्ति, व उपासना, ही अशा कोट्यावधि सामान्य जनांच्यासाठींच आहे, हें उघड आहे ! ज्याप्रमाणें वाङ्मयांत ललितवाङ्मयाचें अधिष्ठान अथवा व्यायामांत विविध खेळांचें

स्थान आहे तीच गोष्ट पारमार्थिक बाबतींत ह्या सगुणभक्तीची आहे. हंसत, खेळत, करमणूक होऊनच्या होऊन, जसा त्या दोन्ही गोष्टींत अनुक्रमें उत्तम उपदेश व सुदृढ व्यायाम घडतो वा मिळतो, तीच गोष्ट येथेंहि प्रत्ययास येते; आणि याबद्दल आपणांजवळ भगवद्गीतादि ग्रंथांतून लागतील तितके आधार आहेत. म्हणूनच " तूप विथुरलें गोड होय । थिजलें त्यापरीस गोड आहे । " असें नाथ म्हणतात ! असो.

याच ठिकाणीं, पुढें जाण्यापूर्वी, मूर्तिपूजेचा अथवा सगुणभक्तिचा उगम जेथून झाला अथवा त्यांस ज्या कारणीभूत झाल्या अशा ईश्वरावताराच्या गोष्टीसंबंधीं विचार केला पाहिजे. ती चिच्छक्ति, तें परब्रह्म ' साकार होऊन अवतरते ' किंवा नाहीं, याबद्दल कोरडे वावदूक वाटेल तितका वाद घालोत, पण अशा तऱ्हेनें प्रसंगवशात् ईश्वरावतार संभवतो, असेंच आमचें ठाम मत आहे व तेंहि साधार बनलें आहे! इतकेंच नव्हें, तर इतर धर्मांकडे, जगांतल्या कोणच्याहि धर्मकल्पनेकडे तुम्ही दृष्टि फेकल्यास तुम्हांस ' प्रेषित ' किंवा ' दूत ' म्हणून म्हणा, ' मुलगा ' म्हणून म्हणा, किंवा दुसरें काय वाटेल तें नांव द्या, पण हीच गोष्ट सांगितलेली अथवा हीच कल्पना मान्य झालेली, दिसून येणार आहे ! आणि सर्व धर्मांचा शिरोमणि असा जो हिंदुधर्म, त्यांतल्या प्रस्थानत्रयींत सामावलेल्या, व ज्या भगवद्गीतेची कीर्ति व महती आम्ही मागेंच गायिली आहे, त्या खुद्द भगवद्गीतेंतही ह्या प्रभूच्या अवतारधारणेचें वर्णन, " वेद जया निद्रिताचा घोरु " आहे अशा खुद्द " सर्वज्ञ " ( पण साकार ) "शार्ङ्गधरू"नें "यदा यदा हि धर्मस्य" व "परित्राणाय साधूनां " ह्या दोन श्लोकांत, उत्कट प्रकारें केलें आहे ! आतां अशा प्रकारें "दोंवरी दो भुजा" घेऊन जरी तो लक्ष्मीवल्लभ भक्तकाजार्थ साकार होऊन अवतरला, तरी त्याचें अजत्व, अनादित्वादिगुणांचें माहात्म्य त्यानें मुळींच कमी होत नसून "सगुणानिर्गुण एक गोविंदु रे"असाच हा थाट आहे! पण अज्ञानी जीवाला प्रथम प्रथम ही गोष्ट कळत नाहीं. म्हणूनच "अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितं" अशा तऱ्हेनें भगवंतांनीं त्याचा तीव्र निषेध केला आहे. हा निषेध अर्थात् नामरूपात्मक दिसणाऱ्या दृश्याच्या जादुगिरीनें फसल्या जाणाऱ्या जीवांचा आहे.

हें उघड आहे, आणि तें साहाजिकच आहे. कारण हळुहळू ह्या जीवाला उच्च अशी वरची पायरी चढायची आहे; मग त्यानें केवळ ह्या दृश्याच्या जाळ्यांत गुरफटून कसें चालेल ? म्हणूनच " बाह्य सौख्य सुखापुरतें " घे, पण शेवटीं ह्या निर्गुणावर लक्ष ठेव असें प्रभूंनीं अर्जुनाला सांगितलें आहे. पण ' वाटेनें चालणें हें जसें वाट संपण्यासाठींच असतें ' त्याच-प्रमाणें सगुणोपासनेच्या चढत्या वाढत्या पायऱ्या चढून मगच त्या निर्गुणपदाला जाऊन पोंचण्याचें कार्य, निदान सामान्य जीवांला तरी, करायचें असतें! पक्षी एका झेपेंत फळाला झोंबेल, पण पिपीलिकेचा मार्ग " हळुहळू ढाळे ढाळे "च असणार, हें उघड आहे. बहुजनसमाज ह्याच वृत्तीचा आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अर्थात् त्यांच्यासाठीं कांहीं तरी सोपा आणि सुगम मार्ग दाखवून देणें हें प्रभूचें कार्यच होतें, व विशेषतः कृष्णावतारीं त्यांनीं तें किती उत्कृष्टपणें बजावलें हें आपण मागें पाहिलेंच आहे ! शिवाय, "विश्व नाहीं, मीचि आहे, सखया तुझी आण रे" ह्यांतली गोडी कळून त्या भूमिकेवर आरोहण केलें असतां प्राप्त होणारे गुण, निर्गुणपदप्राप्तिपूर्वीं, अंगीं बाणावे लागतात, तेहि ह्या भक्तिमार्गांतल्या उच्च भक्तींत बाणत असतात ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे, ज्याप्रमाणें योगशास्त्र हें एक शास्त्र आहे, त्याचप्रमाणें भक्तियोगाचेंहि एक शास्त्र आहे ! व मूर्तिपूजा अथवा प्रतिमापूजन हा त्यांतलाच एक भाग अस-ल्यामुळें, शब्दांच्या फुंकरीनें उडून जायला तो कांहीं पत्त्यांचा बंगला नव्हे, हें कोणीही विसरूं नये !

आमची तर अशी ठाम समजूत आहे कीं, हृदयांत सर्व सात्विक वृत्तींचा उदय व्हायला जीं साधनें आहेत, त्यांतच सगुणभक्ति हें एक—आणि अचूक असें कदाचित् हेंच एक—साधन असून, त्या सगुणभक्तीच्या साधनाच्या शिडीची मूर्तिपूजा ही पहिली पायरी आहे ! जगांतल्या कोण-च्याही धर्मांतल्या लोकांपेक्षां हिंदुलोक अधिक सात्विक वृत्तीचें असण्याचें मुख्य कारण, आमच्या मतें त्यांच्या धर्माचीं उच्च व उदात्त तत्त्वें, व त्यांच्यांत प्रामुख्यानें झळकणारी सगुणपूजा, हींच होत ! " अहिंसा सत्यमक्रोधः " इत्यादि दैवी संपत्तीचा इतर धर्मीयांतून पुष्कळसा अभावच असून, पृथ्वीच्या पाठीवरचे ते लोक आसुरी संपत्तिनें कसे झपाटलेले आहेत, हें

हिंदुमात्राच्या हरघडी प्रत्ययाला येतच असल्यामुळें त्याचें वेगळें वर्णन करण्याचें कारण नाहीं ! पण सात्विकवृत्तीनें विनटलेला आचांडाळ असा हिंदूच्या एवढा प्रचंड जनसमुदाय पृथ्वीच्या पाठीवर तुम्हांस अन्यत्र क्वचितच दृष्टीस पडेल ! म्हणूनच भगवद्गीतेच्या आपल्या प्रस्तावनेंत थॉमसन् साहेबही पृष्ठ ११२ वर म्हणतात कीं, " ह्या पृथ्वीच्या पाठी-वरील कोणच्याही हवेंतील कोणचाही देश घेतला तरी हिंदुस्थानांतल्या लोकांना, सर्व जातींना जितकी धर्माची चाड आहे, तितकी दुसऱ्या कोणच्याही लोकांना नाहीं. दुसऱ्या कोणच्याही राष्ट्राच्या किंवा समाजाच्या मनांत ऐहिक यात्रा संपल्यानंतर पुढें काय होईल याविषयींचा विचार हिंदु लोकांच्या इतका येत नाहीं. हिंदूंची आसक्ति ह्या जन्माकडे, देहाकडे फारशी नसते. ह्या दुःखदायक जन्मपरंपरेतून केव्हां सुटेन इकडे त्यांचें लक्ष असतें. " ( वे. नि. पा. १११ ). कै. न्या. रानडेहि आपल्या " ईशतत्वनिर्णया''वरील व्याख्यानांत म्हणतातः—" आमच्या राष्ट्रीय इतिहासांत अभिमान बाळगण्याजोगी आणि आमच्यावर आलेल्या दुःखपरंपरेंतही सुखाचें बक्षीस वाटण्याजोगी कांहीं गोष्ट असेल तर ती ही कीं, मनुष्याची संपत्ति ही त्याची खरी योग्यता ओळखण्याचें साधन नाहीं; त्याच्याजवळ काय आहे, त्याची बाजारांत काय किंमत होईल ह्याचें महत्त्व नाहीं. त्याचें वर्तन कसें आहे, तो किती साधुत्वाला पोहोंचेल, ह्याच्यावर त्याची थोरवी आहे अशी आमची दृढ समजूत झालेली आहे ! " ( वे. नि. १०३ ) ह्या दोन्ही. उताऱ्यावरून हिंदु-लोक सर्वांत अधिक सात्विकवृत्तीचे आहेत हीच गोष्ट सिद्ध होते !

ह्याच्याच उलट जगांतल्या इतर धर्मीयांकडे दृष्टि फेका, म्हणजे तुम्हांस काय दिसतें ? आसुरी संपत्तीनें ते लोक झपाटलेले आहेत हीच गोष्ट तुम्हांस दिसून येईल ! कार्लाईल नांवाचा प्रख्यात तत्त्ववेत्ता म्हणतोः—
" Your average Englishman does not greatly care whether there be a god or not provided the price of stock does not fall. If you want to awaken his real beliefs, you must descend into his stomach, purse, and the adjacent regions. " ह्याच संपत्तीच्या लोभाचे पार्यी,

आसुरी संपत्तीच्या लोभाच्या भुतानें झपाटलेलें सरकार, तोंडानें मात्र न्यायाच्या, समतेच्या, आणि स्वातंत्र्याच्या गप्पा मारीत असतां, महात्मा गांधीसारख्या खिस्ततुल्य साधूला सहा वर्षे तुरुंगांत डांबून ठेवण्यास कसें तयार झालें, तें आपणांस ठाऊकच आहे! पण ज्यांनीं खुद्द खिस्ताला फांसावर लटकावले, ते कोणचें अनन्वित कृत्य करणार नाहींत? किंबहुना, " इदमद्य मया लब्धं " व "असौ मया हतः शत्रुः" ह्या श्लोकांतून वर्णिल्याप्रमाणेंच ह्या " असुरां"ची स्थिति असते! हिंदुस्थानच्या चालू काळांत विशेषतः आंग्ल व मुसलमान " असुरांनीं " किती " कहर मांडिला " आहे त्याचें चित्र मनश्चक्षूपुढें उभें राहिलें म्हणजे कोणाचेंहि हृदय थरारल्यावांचून व त्यास शिवकालीन महाराष्ट्राची आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं! असो.

पण असें कां झालें? हिंदुलोक अधिक सात्विकवृत्तीचे कां निपजले, व इतर धर्मानुयायांत ह्या दैवीसंपत्तीचा पुष्कळसा खडखडाटच कां दिसतो, याचा विचार केल्यास त्याला जीं भौगोलिक, सामाजिक, इ. कारणें झालीं, त्यांतच दोन्ही धर्मांतील भयंकर फरकच या कामीं मुख्य कारणीभूत झाला आहे असें आमचें ठाम मत झालें आहे! अर्थात् त्यांतच मूर्तिपूजा व सगुणभक्ति अंतर्भूत झाली असल्यामुळें, तिचा वेगळा उल्लेख करण्याचें कारण नाहीं. तत्त्वज्ञान, उपासना, व आचार, ह्या तीन गोष्टींवरच कोणच्याही धर्माची उच्चनीचावस्था अजमावावयाची असते हें आम्ही मागें दाखवून दिलेंच असून, अगदीं हां हां म्हणतां इतर धर्मीयांना जर हिंदूंच्या सात्विक अधिष्ठानाबरोबर येऊन बसायचें असेल तर आमूलाग्र अशी त्यांच्यांत वरील तिन्ही गोष्टींत त्या दृष्टीनें सुधारणा झाली पाहिजे, तरच हें होणार आहे हें उघड आहे! किंबहुना, आम्ही असें छातीला हात लावून सांगतों कीं, हिंदूंच्या उपासनाशास्त्राची खरीखरी किंमत कळून, त्यांच्या भक्तियोगाच्या पायऱ्या चढून जाण्याचें जरी नुसतें ह्या इतर धर्मीयांनीं मनांत आणलें, तरी त्यांच्या एकंदर आचरणांत कितीतरी तफावत दृष्टीस पडेल!

बरें, 'आम्ही मूर्तिभंजक किंवा मूर्तिपूजेविरुद्ध आहोंत' म्हणून शेखी मिरविणाऱ्या इतर धर्मानुयायांतही मूर्तिपूजा नाहीं कोठें? ह्या नाहीं त्या रूपानें

ती अस्तित्वांत असलेलीच आपणांस दिसून येणार आहे! कारण मूर्तिपूजे-विरुद्ध गवगवा करणाऱ्या ह्या बालिश भ्रमिष्टांना आम्ही असें विचारतों कीं, मग तुम्हालाही ती चर्चेस्, त्या मशिदी, ती अग्निमंदिरें, तो क्रूस, तो चांद, तें हिरवें निशाण, ते पंजे, ते डोले, इ. कशास पाहिजेत? अमुकच दिशेला तोंड करायचें, अमुकच शब्द पुटपुटायचें किंवा मोठ्यानें म्हणा-यचें, मक्कामदीनेलाच जायचें, हें ढोंग तुम्हांला कशाला पाहिजे? हिंदूंचीं देवालयें उध्वस्त करून त्यांतील मूर्ति फोडणाऱ्या मूर्खांना आम्ही असें विचारतो कीं, तुमच्या मशिदी अशाच पाडल्या, तुमचे ताबूत, पंजे, स्वाऱ्या, पीर, इत्यादि जागच्याजागीं असेंच थंड केले, तर तुम्हांस बरें वाटेल काय? मग आपणावरून दुसऱ्याचें चित्त राखावें, हें साधें तत्त्व सुद्धां तुम्हांला तुमच्या महंमदानें शिकविलें नाहीं काय? मग अत्यंत रानटी अशा ह्या परधर्मासहिष्णुतेंतून तुम्ही केव्हां बाहेर पडणार? निरा-कार, निर्गुण, परमेश्वराची आम्ही उपासना करतों म्हणून शेखी मिरव-णाऱ्या व ढोंग माजविणाऱ्या लोकांना वरील सर्व प्रकारच्या खाणाखुणा कशाला लागतात तें सांगतां येईल काय? ते लोक तें सांगू शकतील काय? बुद्ध, ख्रिस्त, झोरास्टर, महावीरादि तीर्थंकर, व रामकृष्णादि अव-तार, यांचीं चित्रें व मूर्ति यांची उपासना व तत्संबंधींच्या व त्यांची आठ-वण देऊन प्रेमानें व आदरानें गहिंवर आणणाऱ्या अशा त्यांच्या शेकडों गोष्टींचा प्रतिपाल मोठ्या आदरानें त्या त्या धर्माचा मनुष्य करतो, तें एव-ढ्याचसाठीं, कीं त्या त्या रूपानें त्यांची आठवण व्हावी! आणि हें किती साहाजिक आहे बरें? जगांतल्या मानवी मनाचा—सामान्य मानवी हृदयाचा-हा धर्मच आहे कीं, मृत्यूच्या निर्दय हातानें आपल्या अत्यंत जिव्हाळ्याचें माणूस आपणांस हरपलें असतां, त्याचीं पत्रें, त्याचा फोटो, त्याचे कपडे-लत्ते, त्याची बसायउठायची जागा, इत्यादि किती तरी गोष्टींकडे पाहिलें असतां आपला ऊर भरून येतो, व त्याची पवित्र आठवण म्हणून आपण त्यांतल्या किती तरी गोष्टी मोठ्या प्रेमानें जवळ बाळगीत असतो! यांतला उद्देश काय बरें? त्या पवित्र वस्तूंना आपण इतकें कां बरें जपतो? कारण हेंच कीं, त्याकडे पाहिलें असतां, डोळे भरून पाहिलें असतां, आपणांस त्या आपल्या लाडक्या जीवाची आठवण होतें, त्याची

मूर्ति आपल्या डोळ्यांपुढें नाचूं लागते, व जणों प्रत्यक्ष तोच आपणांस भेटतो आहे, अशी दुःखात्मक सुखाची संवेदना आपल्या हृदयांत दुःखी आनंदाचा अनुभव आणून देत असते, व त्यांतच आपणांस परमानंद वाटत असतो! ही जर सामान्य जीवासंबंधीं गोष्ट, तर त्या जगदाधार प्रभूविषयीं, कीं जो भक्तीच्या उत्कटत्वानें केव्हांही दृश्यमान होणें शक्य आहे, त्याविषयीं किती प्रेम आणि उमाळा वाटेल बरें!

शेवटीं आम्हांस या बाबतींत इतकेंच सांगावयाचें आहे कीं, ह्या भक्तिमार्गानें सुद्धां "वासुदेवः सर्वम्" असें मानणारा 'महात्मा' जर 'सुदुर्लभ' आहे, तर केवळ डोळे मिटून निराकाराचें ध्यान करण्याचा आव घालणारांत असा महात्मा त्याहूनही दुर्लभतरच असणार, हें उघड आहे! शिवाय, कोट्यावधि सामान्यजनांच्या दृष्टीनें तो मार्ग अत्यंत खडतर आहे. तेव्हां, सर्व माणसें समानभूमिकेचीं व मनोवृत्तींचीं समजण्यांत जी बुद्धाची चूक झाली, तीच चूक मूर्तिपूजेविरुद्ध पंथ स्थापन करण्यांत दयानंदादिकांची झाली आहे! पण मागील अनुभवावरून शहाणे व्हायचें हें ह्या नवीन पंथस्थापकांच्या लक्षांत येईल तेव्हांना या साऱ्या गोष्टी? नवीन पंथच स्थापायचा, तर त्यानें पूर्वीच्यापेक्षां अधिक सुलभतर मार्ग बहुजनसमाजाला मिळेल हें पाहायचें कीं ज्याला 'घोडा' म्हणजे काय तेंहि कळत नाहीं त्याला 'अरे, घोडा म्हणजे अश्व!' असें सांगत सुटायचें याचा, ज्याचा त्यानेंच विचार करावा! म्हणूनच रा. फडके म्हणतात:—"हिंदुधर्मातील मूर्तिपूजेचा खरा अर्थ समजून न घेतां, दुसऱ्याच्या हिनवणीनें लाजून तिला कंटाळल्यानें, राममोहनराय यांचा ब्राह्मोसमाज, पंडित दयानंदजींचा आर्यसमाज, महाराष्ट्रांतील प्रार्थनासमाज, वगैरे हिंदुधर्म सुधारण्याचे निरनिराळे पंथ झाले. पण त्यांचा परिणाम एकंदर जनसमाजावर विशेष न होतां हिंदुधर्मातील पंथसंख्येंत एवढी भर झाली. कोणी वेदांचा आधार धरून पुराणें तुच्छ केलीं; कोणी रामकृष्णाचीं देवळें सोडून सुट्टीच्या दिवशीं एका घरांत प्रार्थना करावयाची तऱ्हा काढली, कोणी जातिभेद मोडण्यासाठीं एकेश्वरी मताची थाळी भरली, तथापि त्या त्या पंथाला जोम न येतां त्या सर्व पंथतरूंना माळीदादांचीच जरूर लागत आहे. रानांत पर्जन्य, कालवा वगैरेंच्या पोषणाशिवाय रहाणाऱ्या हिंदु-

धर्मासारख्या वृक्षाची सर त्यांना येत नाहीं." (वे. नि. पा. १०२).

आतां शेवटीं ह्या मूर्तिभंजनाविरुद्ध त्या मूर्ति कांहीं प्रतिकार करतात कीं नाहीं, करीत नसल्यास त्याचा उलगडा काय ? हें सांगून आपण ह्या मूर्तिपूजेची रजा घेऊं ! या बाबतींत आम्हास इतकेंच सांगायाचें आहे कीं, "दगडाची मूर्ति मानिला ईश्वर" ह्या नामदेवाच्या प्रसिद्ध अभंगाविरुद्ध असें, "अशक्य तो तुम्हा नाहीं नारायणा । निर्जिवा चेतना आणावया ॥" असें तुकोबांचें वचन आहे. त्यांचा मेळ असा आहे कीं, दगडाच्या मूर्तीचा दगड–दगड ह्या नात्यानें जरी कांहीं हालचाल करूं शकत नसला, तरी प्रत्येक अणूरेणूंत भरून राहिलेल्या त्या चिच्छक्तीच्या मनांत आल्यास अशा दगडांनाहीं हलवण्याचें सामर्थ्य तिच्या ठायीं आहे. कारण ती प्राणशक्ति, चिच्छक्ति, सर्वत्र भरून राहिलेली असून, तिनेंच पंचमहाभूतांला त्यांचे त्यांचें नियम लावून दिले आहेत, असें भगवंतमुखानें तीच शक्ति आपणांस सांगत आहे, धरणीकंपाच्या धक्यानें पृथ्वीचीं कपाटें खालीं वर सारणाऱ्या, किंबहुना, प्रचंड वादळें, भयंकर पूर, इत्यादि शेकडों चमत्कार ज्या शक्तीला आपल्या पंचमहाभूतरूप सेवकांकडून वाटेल तेव्हां अगदीं सहज लीलेनें करवता येतात, तिला साध्या दगडाच्या मूर्तींत चेतना उत्पन्न करणें कठिण आहे काय ? भक्त प्रल्हादासाठीं कडकडणाऱ्या खांबांतून गुरगुरत बाहेर पडणाऱ्या नृसिंहदेवानें हीच गोष्ट सर्व जगाला जाहीर केली नाहीं काय ? पण प्रत्यक्ष भगवंत जातीनें पाठिराखे असतां पांडवांना बारा वर्षांचा वनवास भोगावा लागलाच कीं नाहीं ! अर्थात् "न्याय्यं वा विपरीतं वा" जें जें कर्म केलें जातें अथवा होतें, त्याला जी कारणांची पंचकडी प्रभूंनीं सांगितली आहे, त्यांतच "दैवं चैवात्र पंचमं"चा समावेश आहे, हेंहि येथें विसरून चालणार नाहीं. पण त्याजबरोबर भगवंतांनीं भक्तकाजार्थ धारण केलेलीं विविध रूपें, व साधुसंतांनीं व योग्यांनीं केलेले विविध चमत्कार हेंच दाखवतात कीं, मनांत आणल्यास त्या चिच्छक्तीला कांहींच अशक्य नाहीं, आणि क्वचित् दैवाला त्याचा वांटा जरी प्रभूंनीं उचलूं दिला, तरी तो सहेतुक असतो. दुष्टांच्या पापांचें घडे त्याला भरून ठेवायचे असतात–व शेवटीं अशा दुष्टांना त्यांच्या पापांचें प्रायश्चित्त

तों प्रभू अगदीं पुरेपुर दिल्यावांचून कधींच राहत नाहीं, हें कोणीहि विसरूं नये ! आणि असें असतां, कुठें म्हणे उंदराच्या पिलाचा प्रतिकार महादेवाच्या पिंडीनें—म्हणजेच महादेवानें—केला नाहीं, म्हणून आमच्या दयानंदजींच्या मनांत कसेसेंच झालें ! मग कोऱ्या करकरीत वहाणांचे पाय पिंडीवर ठेवून निजणाऱ्या 'खेचर विसा'ला आमचे दयानंदजी नामदेवापेक्षांही अधिक हंसले असते, ह्यांत शंकाच नको ! पण ह्या ठिकाणीं तात्त्विक दृष्टयाच बोलायचें तर, नामदेवापेक्षां—निदान त्यांच्या इतकीच-दयानंदजींची सगुणभक्तींत चूक झाली, हें कोणाच्याही तेव्हांच लक्षांत येणार आहे ! ' स्थिरचर व्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला ' अथवा ' विष्टभ्याहमिदंकृत्स्नं एकांशेन स्थितो जगत् ' ह्या वचनाचा दोघांनाही सारखाच विसर पडला होता म्हणायचा ! फरक इतकाच कीं, नामदेवाच्या भाग्यानें त्याला त्याचक्षणीं खऱ्या गुरूची प्राप्ति होऊन त्याचे डोळे उघडले, व दयानंदजींच्या दुर्भाग्यानें त्यांना कोणीच गुरु न भेटतां, अभिमानाची—स्वतःच्या अकलेच्या घमेंडीची-मनावर असलेली पक्कड अधिकच बळकट होऊन, त्याची झांपड त्यांच्या ज्ञानचक्षूंवरही आली व बिचाऱ्यांचे डोळे याकामीं अगदीं अजिबात कामांतून गेले ! दुर्दैव त्यांचें ! दुसरें काय ? जी गोष्ट त्यांची तीच ब्राह्मो, प्रार्थना, इ. पंथवाल्यांची उर्फ पंथस्थापकाची होय, हें काय आतां वेगळें सांगायला पाहिजे ? असो.

यानंतरचा या धर्मसुधारणेच्छूंना जाचणारा प्रश्न, म्हणजे जातिभेदाचा होय ! पण ह्या प्रकरणाची मर्यादा येथेंच खलास होत असल्यामुळें, त्याचा विचार आपण पुढील प्रकरणाच्या प्रारंभासच करूं, म्हणजे झालें !

# भाग १८ वा.



आधुनिक धर्मसुधारकांना जाचणाऱ्या जातिभेदाच्या दुसऱ्या प्रश्नाकडे वाचकांचे डोळे अगदीं साहजीकच लागून राहिले असतील, तर मागील भागाच्या शेवटीं आश्वासन दिल्याप्रमाणें आपण प्रथम आतां तिकडेच वळूं !

प्रस्तुत पुस्तकाची मर्यादा "भारतवर्षाचा धार्मिक इतिहास" देण्याची असल्यामुळें, यद्यपि, जातिभेदाच्या प्रश्नाचा विचार राजकीय, सामाजिक, धार्मिक, ऐतिहासिक, इत्यादि विविध अंगांनीं व बाजूंनीं करतां येण्यासारखा आहे, तथापि प्रस्तुत प्रकरणीं तो वरील मर्यादेमुळें आपण फक्त धार्मिकदृष्टयाच विचारांत घेऊन सोडवण्याचा यत्न करूं !

आणि याप्रमाणें विचार करून पाहतां, आपणांस ह्या जातिभेदाशीं अत्यंत निकटत्वानें संबद्ध असा अस्पृश्योद्धाराचा उर्फ अस्पृश्यांचा प्रश्नही विचारांत घेतला पाहिजे !

या दोन्हीही प्रश्नांचा विचार आजवरच्या आपल्या धार्मिक इतिहासांत आपण एकंदर तीनदां केलेला आहे, हें लक्षपूर्वक वाचणाऱ्या वाचकांना क्षणैक सिंहावलोकनानें तेव्हांच लक्षांत येणार आहे. त्या तीन वेळा म्हणजे, भगवान् श्रीकृष्णाचा काळ, गौतमबुद्धाचा व सौतीचा काळ, आणि भागवतधर्मीय साधुसंतांचा काळ होय ! इतिहासावरून जर मानवाला शहाणपणा शिकायचा असेल, तर त्यानें ह्या तिन्हीकाळीं घडलेल्या हकीकतींचा सूक्ष्म व शांतपणें विचार करून आपल्या मनाशीं तत्त्वनिर्णयात्मक बोध ठसवून घेतला पाहिजे ! कारण—याचें विशेष कारण असें आहे कीं, हल्लीं, अगदीं चालू घटकेला, तशीच परिस्थिति पुन्हां उत्पन्न झाली आहे ! पण ही तरी उत्पन्न होण्याचें कारण हेंच कीं, इतिहासावरून वेडा मानव अद्याप व्हावा तसा शहाणा झाला नाहीं; म्हणूनच "history repeats itself" म्हणजे "इतिहासाची पुनरावृत्ति होत असते" अशातऱ्हेचा चमत्कारिक नियम आपणांस ह्या जगाच्या व्यापारांत हरघडी दृष्टीस पडतो ! मग इतिहासावरून मानवानें शहाणपण शिकूं नये, असाही एक

नियम आहे कीं काय कोणास ठाऊक—असल्यास नकळे! असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, "पुढच्यास ठेंच मागचा शहाणा" ह्या इतिहासाच्या नियमास हरताळ न फांसतां, या कामीं प्रत्येकानें अवश्य तो बोध घेतला पाहिजे!

वरील तिन्हीही काळांचा सूक्ष्म विचार करतां आपणांस असें दिसून येतें कीं, तिन्हीही वेळीं परधर्मीय हल्ल्याची भीति, या प्रश्नाच्या सोडवणुकीच्या वेळेला कारणीभूत होती. कोठें त्या वावटळीची धूळ उडालेली दुरूनच पाहून आगाऊ तरतुदीसाठीं खटपट झाली, तर कोठें ती वावटळ प्रत्यक्ष अंगावर येऊन आदळल्यावर तींत सर्वच वाहून जाऊं नये म्हणून वांचतील तितके जीव त्यांतून वांचविण्यासाठीं शिकस्तीची धडपड झाली. यावरून श्रीकृष्ण, सौति, व भागवतधर्मीय संत हे तिघेहि परिस्थितीच्या पेचांत सांपडल्यामुळेंच या कामीं अवश्य ती सुधारणा करण्यास प्रवृत्त झाले, असें मात्र कोणी समजूं नये. हें विधान फक्त सौतिला मात्र बरोबर लागूं पडेल. परंतु बाकीच्या दोघांनींही आपल्या स्वतंत्र बुद्धीच्या तडफीनें व अंतःकरणाच्या नितांत कळवळ्यानेंच ह्या अस्पृश्योद्धाराचे कामीं खटपट केलेली आहे! एवढेंच कीं, परधर्मीय हल्ल्याच्या वावटळींची वावधूळ भगवंतांना आधींच दुरून या कामीं दिसली होती, व भागवतधर्मीय साधुसंतांच्या वेळीं तर ती लाट प्रत्यक्ष अंगावरच येऊन आदळली होती, त्यामुळें दोघांच्याही प्रयत्नास व छातीठोक प्रतिपादनास त्यामुळें असल्यास अधिकच जोर मिळाला असला पाहिजे, हें उघड आहे. असो. श्रीकृष्णांनीं अस्पृश्योद्धाराची खटपट केली पण जातिभेदाची छान कायमच ठेवली असल्यामुळें गौतमबुद्धासारख्याला साहजिकच हिंदुधर्मांतून फुटायला फावलें! पण आरंभीं आरंभीं जरी त्याचीं तत्त्वें गोड लागलीं, तरी शेवटीं जातिभेदाचा सबगोलंकार करून संततिणींनीं भरलेले बौद्धविहार अनीतीचें माहेरघर कसें बनलें, व अखेर हा बुद्धधर्माचा डोलारा कसा गडगडून पडला, व त्याला हिंदुस्थानांतून कसें हद्दपार व्हावें लागलें, याचा इतिहास मोठा बोधप्रद असून तो आपण मागें पाहिलाच आहे! असो. हा अनुभव एकदां आल्यामुळें एकेश्वरीमताच्या व जातिभेद न मानणाऱ्या मुसलमानी धर्माची जरी प्रचंड लाट

ह्या आर्यावर्तात पुढें उसळली, तरी मागील अनुभवावरून व प्रयोगावरून शहाणी झालेली जनता त्याला आपण होऊन फारशी बळी पडली नाहीं, राहिलेल्या अस्पृश्यांच्या अक्षम्य अनास्थेच्या प्रश्नाविषयीं महाराष्ट्रीय संतांनीं पुष्कळच उचल केली, व याप्रमाणें तो समाज त्यांनीं आपल्या सक्रिय उपदेशानें मागें खेंचून धरला! अशा तऱ्हेचा हा इतिहास आहे; व तो आपण सविस्तरपणें मागें पाहिलाच आहे. त्यावरून अस्पृश्योद्धाराचा प्रश्न, ज्यावेळीं त्यांच्याविषयीं—खालच्या जातीविषयीं—अक्षम्य अनास्था समाजांत माजते, त्यावेळींच तीव्रतेनें उत्पन्न होतो, असें आपणांस दिसून येणार आहे! श्रीकृष्णाच्या व महाराष्ट्रीय संतांच्या वेळीं ह्या वर्गाविषयीं अशीच अक्षम्य अनास्था माजली होती; ती साहाजिकच त्या उदारहृदयी महात्म्यांना पाहवेना, म्हणूनच त्यांनीं आपल्या छातीठोक प्रतिपादनाचें तीव्र शस्त्र या कामीं पाजळलें, हें उघड आहे! मग यापासून आपण कांहींच बोध घ्यावयास नको काय? या कामीं स्वामी विवेकानंदाच्या "खाजगी पत्रांतील" सविस्तर व भरपूर उतारे, महात्मा गौतमबुद्धाचे तडफडीचे विचार, व स्वामी रामतीर्थांचें समारोपादाखल उद्बोधक वचन हीं आम्ही मागें दिलेलींच आहेत. त्यावरून वाचकांनीं पुन्हा एकदां शेवटची नजर टाकावी, म्हणजे " साम्य शेजें डोळा । लागला तया !॥" अशी त्यांची निस्संशय स्थिति होइल, एवढेंच आम्ही या कामीं सांगतों! कारण " अस्पृश्यता हा हिंदुधर्मावर खरोखर कलंक आहे! "—आपल्या सारख्याच ईश्वराच्या चालत्या बोलत्या लेकराच्या नुसत्या स्पर्शाचाच नव्हे, तर सावलीचा सुद्धां विटाळ मानण्यापर्यंत मजल जाऊन पोहोंचणें हा खरोखर मानव्याचा उपमर्द आहे! " पद्भ्याम् शूद्रो अजायत " म्हणणाऱ्या वैदिकांना त्या विराट पुरुषाच्या देहाच्या ऐक्याची कल्पनाच झाली नाहीं असें म्हटल्यावांचून या कामीं आमच्यानें राहवत नाहीं! देहाचे जसे हस्तपादादि चार मुख्य अवयय, त्याचप्रमाणें समाजांतील चतुर्वर्णांचें स्थान होय ही गोष्ट खरी; पण त्याच उपमेंतील कल्पनेंत जें ऐक्य, व जो परस्पर सहायाचा प्रेमाचा उमाळा आहे, त्याचा एक शतांश तरी आपणांत सध्यां दिसतो आहे काय, याचा, " वर्णानां ब्राह्मणो गुरुः " म्हणून कोरडा अभिमान वाहणाऱ्या

व "ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्" म्हणून रोज पुरुषसुक्ताचा पाठ म्हणणाऱ्या अंधळ्या वैदिकांनीं क्षणभर तरी विचार केला आहे काय ? सर्व शरीराची सुस्थिति राखण्यासाठीं, ज्याप्रमाणें डोकें अगदीं स्वतःला न कळत अशा सहजगत्या ( Instinctively ) गुंतलेलें असतें, त्याप्रमाणें समाजपुरुषाचें मुख उर्फ शीर्ष म्हणविणाऱ्या ब्राह्मण समाजाचें हातून त्या राष्ट्रपुरुषाचा देह सुदृढ आहे किंवा नाहीं, नसल्यास त्यांतील कोणचे अवयव दुबळे झाले आहेत, त्यांना कांहीं आधिव्याधी झाली आहे किंवा काय, असल्यास त्यावर काय उपाय योजावा, व अहर्निश त्यासाठीं त्या सर्व अवयवांना मायेच्या ममतेनें कुरवाळून त्यांची योग्य ती जोपासना व निगा कशी राखिली जाईल, याचा सहज प्रेमाच्या भावनेनें (Instinctively) विचार होत आहे काय ? दुःखिताला औषध, अज्ञान्याला ज्ञान, निरुद्योग्याला उद्योग, अनाथ-अपंगांचें रक्षण, व मायेच्या ममतेची स्नेहाळू पाखरण, ह्या गोष्टी बुद्धभिक्षूंच्या मठांत आणि ख्रिश्चन मिशन्समधून मिळाव्यात, आणि आम्ही " सर्वं खल्विदं ब्रह्म " म्हणून वेदांताच्या कोरड्या गप्पा तोंडानें मारून कृतीनें खालच्या वर्गाची निगरगट्ट उपेक्षा तशीच चालू ठेवावी, हें हिंदुधर्माभिमानी म्हणविणाऱ्या ब्राह्मणांना शोभतें काय ? कारण लक्षांत ठेवा कीं, आज जे लक्षावधि लोक परधर्मांत जात आहेत, ते ह्या खालच्या वर्गांतूनच होत ! मग ह्या ख्रिश्चन मिशन्सला मिशन्स व मुसलमानी " तबलख"ला " तबलग्व " तुम्ही कधीं भिडवणार? याचा अर्थ, पायांना तुम्ही डोक्यावर घ्या, असा नव्हे; किंवा, त्यांच्या घाणींत लोळून दोघेही घाण होऊन अधःपाताला लागा, असाही याचा अर्थ नव्हे ! एवढेंच कीं, आपल्या आईबहिणींच्या अस्पृश्यावस्थेंत जी तुम्ही त्यांची काळजी घेतां, व प्रसंग पडल्यास त्याना शिवूनही जें आपलें उदात्त प्रेम तुम्ही व्यक्त करतां, तंचि कळकळ आणि तीच तळमळ तुमची येथेंही दिसूं द्या; तुम्ही स्वतः सुधारून त्यांनाही सुधारा व लवकरच त्यांची अस्पृश्यता कशी नाहींशी होईल याच्या विचारास लागा, एवढेंच आमचें तुम्हास शेवटीं सांगणें आहे ! वास्तविक, श्रीकृष्ण व महाराष्ट्रीय संतांच्या दिव्य कामगिरीनंतर हा प्रश्न पुन्हां उद्भवूं नये !

पण आमची अक्कल देवापेक्षांही जास्त ना ! त्याला कोण काय करणार ! असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, त्या महात्म्यांनीं घालून दिलेल्या मार्गानें जाऊन, आपण हा कलंक धुवून काढला पाहिजे ! " त्यांच्यासारखी योग्यता मिळवावी व मग तसें वागावें " ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, " मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः " असें भगवंतच आपणांस चक्क सांगत असून, " कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः (जनकादिभिः) पूर्वतरं कृतं " असें तेच अर्जुनाला निक्षून सांगत आहेत ! अर्थात् अर्जुन ह्या ठिकाणीं कांहीं जनकादिकांच्या तोडीचा नव्हता; तरीहि पण त्याला त्यांचाच मार्ग अनुसरण्यास सांगितलें आहे, त्यांतलें इंगित हेंच आहे ! अर्जुन जर जनकादिकांसारखा म्हणजे त्यांच्या तोडीचा असता, तर त्याला वरील उपदेश करण्याचें कारण नव्हतें ! पण त्याला उपदेशाची गरज लागली, हीच गोष्ट त्याची खालची पायरी अथवा दर्जा सांगत आहे. पण त्या जनकादिकांप्रमाणें कर्म करतांकरतांच त्याला ती उच्च अवस्था प्राप्त होणार होती, हें उघड आहे ! तीच गोष्ट येथेंहि लागू आहे. " एकनाथासारखे साधू व्हा, आणि मग महाराच्या पोरांना कवटाळायला धांवा, " हें म्हणणें म्हणूनच ' वदतो व्याघाता ' सारखें हास्यास्पद आहे ! एकनाथासारखे साधु झाल्यावर महारांची अनुकंपा करा हें सांगायला तुम्ही कशाला पाहिजेत ! ती अवस्था प्राप्त झाल्यावर कोणीही तें करीलच. पण ही अशी अनुकंपा करतांकरतांच—किंबहुना, ह्याच मार्गानें—तें पद गांठायचें असतें; व त्याप्रमाणें तुम्ही तें गांठा, हाच इथें महत्त्वाचा मुद्दा आहे! असो. याशिवाय श्रीकृष्णाच्या, गौतमाच्या व महाराष्ट्रीय संतांच्या काळाचा विचार करतांना आम्ही या अस्पृश्यत्वा-संबंधीं बराच विचार केलेला आहे; तोही वाचकांनीं पुन्हां एकदां पहावा, अशी आमची या कामीं सर्वांना शेवटची विनंति आहे ! असो.

पण हा झाला अस्पृश्यत्वाचा विचार. पण जातिभेदाचें काय ? कारण आमच्या आधुनिक धर्मसुधारकांना जाचणारा दुसरा प्रश्न म्हणजे जाति-भेदाचा होय ! तेव्हां त्यावर तुमचें काय म्हणणें आहे ? असें आमचे वाचक आम्हांस साहजिकच विचारतील ! तर आतां तिकडेच वळूं !

प्रथम आम्हांस हें सांगितलें पाहिजे कीं, जाति आणि वर्ण हे दोन्हीं शब्द आम्ही समानार्थकच समजत असून, जन्मावरून नसले तरी गुण-कर्मावरून कोणच्याही देशांत व कोणच्याही सुशिक्षित काळांत हे चार वर्ण, श्रमविभागाच्या तत्त्वावर, समाजाच्या धारणपोषणार्थ, ह्या नाहीं त्या रूपानें, अस्तित्वांत असतातच! ह्यावरून ह्या चातुर्वर्ण्याची परंपरा फार जुनी आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. म्हणूनच "चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः" असें भगवंतांनीं भगवद्गीतेच्या ४ थ्या अध्यायांत म्हटलें आहे. त्याचप्रमाणें ते १८ व्या अध्यायांत म्हणतात—"ब्राह्मण-क्षत्रियविशां शूद्रांणां च परंतप। कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः॥" या दोन्ही श्लोकांतल्या "गुणकर्मविभागशः" व "स्वभावप्रभवैर्गुणैः" ह्या शब्दांच्याकडे वाचकांनीं विशेष लक्ष द्यावें, अशी आमची विनंति आहे. भगवद्गीतेच्या प्रतिपादनांत ज्या गोष्टी विशेष प्रामुख्यानें झळक-तात त्यांतच सत्व—रज-तम-ह्या त्रिगुणांनीं सर्व जग कसें व्यापलें आहे; किंब-हुना, "यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे। मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृति-स्त्वां नियोक्षति॥" ह्यांत म्हटल्याप्रमाणें, ह्या त्रिगुणात्मक मायेचा स्वभाव प्रत्येक मानवाला कसा कळसूत्री बाहूल्याप्रमाणें नाचवित आहे व "स्वभावप्रभ-वैर्गुणैः" तो कसा नाचत आहे, किंबहुना, ही ईश्वरी मायारूप कुंभारीण त्रिगुणांच्या चक्रावर मानवदेहाचीं मडकीं घालून त्यांना कशी गरगर फिरवीत आहे, याचें वर्णन विशेष प्रामुख्यानें प्रत्ययास येत आहे! किंब-हुना, "न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः। सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिःस्यात् त्रिभिर्गुणैः॥" ह्या श्लोकांत तर याचा कळसच झाला असून, आपले आहारविहार, आपले आचारविचार, आपली धृति, मति व कृति आणि भक्ति, इत्यादि सर्व गोष्टी ह्या त्रिगुणांनीं कशा बांधून टाकल्या आहेत, हें पाहणें मोठें कौतुकास्पद आहे! अर्थात् "प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति" किंवा "स्वभावो दुरतिक्रमः" अथवा "अतीत्य हि गुणान् सर्वान् स्वभावो मूर्ध्नि तिष्ठति" ह्या वचनांतील स्वाभाविक प्रकृतीचा अथवा प्राकृतिक स्वभावाचा झपाटा लक्षांत घ्यावयास नको काय? "बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपिकर्षति।" ही जैमिनीच्या उक्तीची घमेंड फुकट असून "विद्वांसमपि कर्षति" हें व्यासांचें पहिलेंच वचन

कसें खरें आहे, हें त्यांनीं त्यालाच पटवून दिलेलें आहे. कितीही शिक्षणाचे संस्कार झालें तरी ', मूळ स्वभाव जाईना ''–अर्थात् स्वभाव बदलणें महा कठीण आहे, असें 'जेन ऑस्टीन' नामक प्रसिद्ध आंग्ल कादंबरीकर्त्रीही म्हणत आहे. हें सगळें सांगण्याचा हेतु इतकाच कीं, अशा-तऱ्हेच्या " स्वभावप्रभवगुणा '' वर व " गुणकर्मविभागा''वर बसविलेली चातुर्वर्ण्याची उर्फ जातिभेदाची संस्था, नाहींशी करूं म्हटलें तरी होणें शक्य आहे काय? आणि अशा तऱ्हेचा प्रयत्न करणें शहाणपणाचें होईल काय? तसें करूं पाहणें म्हणजे सर्वांना एकाच मापाचे कपडे बेतणाऱ्या शिंप्याइतकें किंवा " सरासरी आणि गुडघाभर पाणी '' म्हणणाऱ्या वेडप्याइतकेंच हास्यास्पद आहे! सृष्टींतील प्राकृतिक विविधता लक्षांत न घेतां सर्वांना एकाच सांच्यांत बसवण्याचा यत्न केल्यानें ती विविधता तर नाहींशी होत नाहींच, पण त्या प्रयत्नानें मात्र एकंदर समाजपुरुषाचा देह वर्णसंकरापासून उद्भवणाऱ्या अनीतिकर्दमांत गुदमरून जाण्याची वेळ लवकरच आल्याशिवाय राहत नाहीं! "आम्ही झालों ऐसे जो म्हणे। तो कांहींच नोहे!॥'' ही जेथें खुद्द परमार्थांत स्थिति आहे, तेथें केवळ वरवर चौकशी करून,पाणी शिंपडून,किंवा असेंच दुसरें फार्स करून, सर्वांना एकाच मालिकेंत गोवूं पाहणें, हें किती हास्यास्पद आहे बरें? या कामीं " आधीं होता वाघ्या। दैवयोगें झाला पाग्या। त्याचा येळकोट राहीना। मूळस्वभाव जाईना॥ आधीं होता ग्रामजोशी। राज्यपद आलें त्यासी। त्याचें पंचांग राहीना। मूळस्वभाव जाईना॥ आधीं होती दासी। पट्टराणी केले तिसीं। तिचें हिंडणें राहिना। मूळ स्वभाव जाईना॥ '' इत्यादि व्यावहारिक उदाहरणें देऊन तुकोबांनीं जो बोध केला आहे, त्याचा वाचकांनीं खरोखर आपल्या मनाशीं शांतपणें विचार करावा; म्हणजे वरवरच्या उपचारानें मूळ स्वभाव कसा बदलत नाहीं, व जातिभेद नाहीं म्हणून सबगोलंकार करण्याचा यत्न केला असतां, शेवटीं समाजाचा गाडा प्रगति न पावतां, उलट अनीतिकर्दमांतच कसा रुतून बसतो, हें त्यांच्या ध्यानांत येईल! विनोदानेंच सांगायचें तर, तुकोबांनीं खुद्द आपलें उदाहरण देऊन, " आधीं होता संतसंग। तुका झाला पांडुरंग। त्याचें भजन राहीना। मूळ स्वभाव जाईना!॥ '' ह्याप्रमाणें ह्या मूळ

स्वभावाचा झपाटा परमार्थांत सुद्धां कसा दिसतो, तें त्यांनीं विनोदानें सांगितलें आहे! असो.

तर याप्रमाणें असलेलें प्रकृतीचें वैविध्य जाऊन ऐक्य होण्यास त्या प्रकृतीच्या पलिकडेच गेलें पाहिजे, हें उघड आहे! आणि म्हणूनच आमच्या धर्मानें अथवा वेदांतानें अशाच विभूतींचें खरें ऐक्य प्रतिपादिलें असून, प्रकृतिच्या झपाट्यांत येणाऱ्या इतर सर्व जगाला त्यांनीं साहजिकच त्यांच्या त्यांच्या स्वभावप्रभवगुणकर्मांप्रमाणें कार्यें वांटून दिलीं आहेत, यांत वावगें तें काय झालें हेंच आम्हांस समजत नाहीं! कित्येकजण या त्याच्या करणीबद्दल त्याला दूषण देण्यास पाहतात; पण त्यांनीं या गोष्टींचा सूक्ष्म विचारच केला नाहीं, असें म्हणणें भाग पडतें! वेदांतानें वेदांताप्रमाणेंच जर व्यवहारांत ह्या ऐक्याची मुभा दिली, अर्थात् खोट्या ऐक्याची कल्पना जर प्रसृत झाली, तर त्यानें फायदा न होतां उलट कसा अनर्थ ओढवतो, हें आम्ही वर सांगितलेंच आहे! गौतमबुद्धानें असाच यत्न करून, हेंच सत्य सर्व जगाच्या निदर्शनास आणिलें आहे, हें आपण मागें पाहिलेंच आहे! गौतमाला हिंदूंनीं अवतार मानूनही त्याच्या धर्माची हकालपट्टी हिंदुस्थानांतून कशी झाली, याचें पुष्कळांना मोठें कोडें वाटतें! पण त्याचें उत्तर हेंच कीं, त्याच्या अहिंसामताची ध्वजा मात्र उज्वल होती आणि खालच्या जातींविषयींची त्याची विश्वप्रेमी कल्पना आणि कळकळ ही वाखाणणीय होती, आणि म्हणूनच सहृदय अशा उदारहृदयी हिंदुधर्मानें त्याच्या त्या दिव्य उपदेशाबद्दल त्याला— "तरी तयातें मी माथां। मुकुट करीं॥" या प्रभूंच्या उपदेशाप्रमाणें आपल्या माथ्यावरील मुकुटांत स्थान दिलें. पण हिंदुधर्म हा व्यक्तींचा नसून तत्वांचा आहे; अर्थात् दिव्य उपदेशकाच्या दिव्य तत्त्वांना तो आपल्या मस्तकींच्या मुगुटांत अनर्घ्य रत्नाप्रमाणें धारण करतो! पण त्याच्याबरोबर समग्र समाजाविरुद्ध बंड करून त्याची जिव्हा जर भलभलतें बडबडूं आणि प्रलपूं लागली, तर अशा दिव्य उपदेशकाचींही तो पर्वा ठेवीत नाहीं! कारण तो तत्त्वांचा भुकेला आहे; व्यक्तींचा मिंधा नाहीं! गौतमाला जें नामोहरम व्हावें लागलें, त्याच्या धर्माची जी हिंदुस्थानांतून हकालपट्टी झाली, ती त्याच्या अहिंसामतासाठीं

नसून, समग्र समाजाला उलथापालथा करूं पाहणाऱ्या त्याच्या जातिभेदावरील बंडानें व त्याच्या नास्तिकमतानें होय ! हें आतां वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. मग ह्यापासून आपण कांहींच बोध घ्यावयास नको काय ?

जगल्लीलेच्या नाटककार प्रभूनें जगाच्या रंगभूमीवर आरंभिलेल्या जगद्व्यवहाराच्या नाटकांत ज्याच्या त्याच्या गुणानुरूप ज्याची त्याची भूमिका ठरवून दिली असतां, त्याविरुद्ध बंड करून, त्या सबंध नाटकाचा चुथडा करूं पाहणें हें किती वेडगळपणाचें आहे बरें ? आणि कोण खरा सहृदय रसिक हें चालूं देईल ? प्रत्येकानेंच राजाची भूमिका करूं म्हटल्यास, सेवकाची भूमिका कुणी करायची ? अर्थात् तीहि कुणीतरी करायला पाहिजे हें जर उघड आहे, तर त्यातल्या त्यांत पात्रापात्र व युक्तायुक्त पाहून एकदां सर्व पात्रांना आपापल्या भूमिका त्या सर्वज्ञ व सर्वश्रेष्ठ नटानें ठरवून दिल्या असतां, त्याविरुद्ध जाण्याचा यत्न करणें हें शहाणपणाचें होईल काय ? बरें, राजाची भूमिका करायला हवी; पण त्याप्रमाणें आवाज, रूप, शरीराचा रुबाब, इत्यादि गोष्टी नकोत कां अंगीं असायला ? एखाद्या लुकड्या काडी पेहेलवानानें, मला भीमाची भूमिका दिली नाहीं, म्हणून रुसण्याइतकेंच हें हास्यास्पद नव्हे काय ? बरें, कोणचीही भूमिका असली तरी तिनें त्या नटाला कमीपणा न येतां त्या नटाची वाहवा ती वठविण्यावर होत असते, हेंहि आपण प्रत्यहीं पाहतोंच; कोणच्याही जातीचा मनुष्य झाला, म्हणून तो हलका नव्हे—पाय झाले तरी त्यांच्यावरच सर्व शरीराचा डोलारा उभा असून, शरीराच्या इतर अवयवाइतकीच शरीरव्यवस्थेंत त्यांची किंमत व योग्यता आहे. तीच गोष्ट समाजपुरुषाचे बाबतींतही लागू असून, खुद्द भगवंतांनीं 'विठु-महारा'चें रूप घेऊन अगदीं महाराची भूमिकासुद्धां कशी उत्तम वठवून दाखवावी, तें सिद्ध करून दिलेलें आहे! अर्थात् आपापली भूमिका उत्तम प्रकारें वठवून दाखवा, म्हणजे जरूर तर पुढच्याच खेळांत (जन्मांत) तुम्हाला त्याहून उच्चप्रकारची भूमिका तो प्रभू देण्यास चुकणार नाहीं ! पण भगवंताचा दयाळूपणा त्याच्याहीपेक्षां पलिकडे जाऊन, केवळ आपापली भूमिका उत्तम प्रकारें करणाऱ्या नटाला पुन्हा कोणच्याच भूमिकेचा त्रास न देतां,

त्याला कायमचें विश्रांतिसौख्य देण्याचीही त्याची तयारी असून, त्याप्रमाणें प्रभूंनीं भगवद्गीतेंत जाहीर आश्वासनही दिलेलें आहे! अर्थात् सर्व समाजाचा गाडा सुरळीत चालावा, हाच ह्यांत प्रभूंचा उद्देश असून, आपल्या पुत्राच्या घष्टपुष्ट व बुद्धिमान देहाकडे पाहून ज्याप्रमाणें त्याच्या पित्याला आनंद वाटतो, त्याचप्रमाणें समाजपुरुषही धडधाकटपणें व बुद्धीच्या चमकीनें आपला कारभार करतांना पाहून, त्या जगत्पित्याला खरोखर प्रेमाचें भरतें येत असतें, हें कोणीही विसरूं नये! पण तेंच "पोट आणि अवयव" यांच्या भांडणांत ज्याप्रमाणें त्या शरीराला जीवन्मृतावस्था प्राप्त होण्याची वेळ आली, तीच गोष्ट समाजपुरुषाची असून, त्याचीं कडू फळें सध्यां आपण प्रत्यक्षच चाखीत असल्यामुळें त्याचें वेगळें वर्णन कशास पाहिजे? अर्थात् यावरून एकच गोष्ट उघड होते कीं, ह्या समाजपुरुषाच्या देहांतील सर्व अवयव आपापलीं कामें यथायोग्य रीतीनें करीत नाहींत! कारण, राष्ट्रपुरुषाचा देह सुरळीत चालावयाचा असल्यास, त्यांतील अवयव तेवढे वेगळे असूनच चालणार नाहीं; तर त्यांनीं आपापलीं कामेंही यथायोग्य रीतीनें बजावलीं पाहिजेत, हें उघड आहे! पण हिंदुस्थानच्या रंगभूमीवर सध्यां काय देखावा दृष्टीस पडत आहे? ज्याप्रमाणें खरोखरीच्या बहुतेक नाटककंपन्यांची वाताहात होऊन, त्यांतील बहुतेक नटांची फुटाफुटी झाल्यामुळें कोणचाच खेळ सहसा रंगावा तसा रंगलेला दिसत नाहीं, व त्यामुळें खऱ्या रसिकाचा हिरमोड होऊन त्याचें चित्त उद्विग्न होतें, तीच गोष्ट खुद्द आपणांस हिंदुस्थानच्या रंगभूमीवर दृष्टीस पडत असून, त्यांतील चतुर्वर्णांचीं पात्रें फुटलीं असल्यामुळें व त्यांना आपल्या खऱ्या भूमिकांचा विसर पडून तीं भलभलत्याच भूमिकांनीं व रंगांनीं रंगू लागल्यामुळें बहारीचें व हृदयंगम असें एखादें दृश्यकाव्य दृष्टीस पडण्याऐवजीं, "नाटक झालें जन्माचें तें!" असेंच म्हणण्याची आज पाळी आली असून खऱ्या रसिकाला ह्याहून अधिक दुःखप्रद अशी कोणची गोष्ट असणार आहे?

भगवंतांनीं हा भावी अनर्थ केव्हांच आपल्या दिव्य अशा प्रज्ञाचक्षूंनीं ओळखून असें न व्हावें व हिंदुस्थानच्या रंगभूमीवर बहारीचें असें आनंदपर्यवसायी कथानक सदैव

नवनव्या सजावटीनें खुलत राहावें, म्हणून वर सांगितलेल्या मार्गानें त्याची व्यवस्था करून दिली! पण सुदैवानें लाभलेल्या ह्या चिंतामणीला पायानें डावलून आम्ही आपल्या पदरांत गारगोटी बांधून घेतली व कॉमेडी-ऐवजीं जगातल्या इतर रंगभूमीवर दिसणारी ट्रॅजेडीच आम्ही येथेंहि आरंभिली आहे! यांतून निभावयाचें असेल, तर फाजलि उशीर झाला नाहीं तोंच आपण जितकें लवकर शुद्धीवर येऊं तितकें पाहिजेच आहे, हें उघड आहे! पण हें आमच्या लक्षांत येईल तेव्हां ना! श्रीयुत फडकेहि आपणांस हेंच सांगत आहेत. ते म्हणतात:—" सर्वांचा आत्मा एकच आहे, आणि परमात्म्याच्या स्वरूपाचा आहे, तथापि प्रत्येक जीव निरनिराळें कर्म घेऊन जन्मास आलेला आहे, जन्मपरंपरेनें आपापली शुद्धि करून घेण्याचा मार्ग सर्वांना आहे वगैरे खंबीर पायावर वेदांतधर्म रचला असल्यामुळें त्याची छाप सर्व विचारी पुरुषांवर पडल्याशिवाय रहात नाहीं. पण...विचाराचा मक्ता ब्राह्मणांनीं आपल्याकडे घेतला तो तसाच चालविल्यामुळें ब्राह्मण इतर लोकांच्या डोळ्यावर येतात यांत आश्चर्य नाहीं. झाडावरचें फळ हाताला येत नाहीं असें पाहून मुळासकट झाड उपटावें असें वाटणें स्वाभाविक आहे. हिंदुधर्म बुडविण्याकरितां आजपर्यंत झालेल्या प्रयत्नांत ब्राह्मणांचा मत्सर हा मुख्य कावा होता. तो आमच्या लोकांना न समजल्यामुळें उताराला लागलेल्या गाड्याला वरून ढकलण्याची मदत कांहींलोक करीत आहेत व ह्या मार्गानें आपलें कल्याण होईल असें मानीत आहेत. परंतु फांदीवर बसलेल्या मनुष्यानें ती फांदी तोडण्याला मदत केल्यासारखें हें अज्ञानाचें कार्य आहे." (" वे. नि." पृ. ८९।९०). पण " विचारांचा मक्ता ब्राह्मणांनीं आपल्याकडेच ठेवला" हें म्हणणेंहि कसें चूक आहे, हें स्वामी विवेकानंदांनीं दाखवून दिलेलें आपण मागें पाहिलेंच आहे! व जनक, श्रीकृष्ण, राम, भीष्म, गौतम, इत्यादिकांच्या चरित्रांवरून हीच गोष्ट सिद्ध होते! अर्थात् असें असतांही जी जातिभेदाविरुद्ध चळवळ आजवर केली गेली, ती केवळ हुल्लडीच्या म्हणजे अविचाराच्या स्वरूपाची होती हें उघड आहे! अर्थात् तिचा व्हायचा तोच शेवट झाला, व तो योग्यच झाला!

अर्थात् जगांत आर्यसंस्कृति आणि हिंदुधर्म जर टिकायचा

असेल, तर जातिभेदाची ही त्यांतील संस्था अखंड अशी चिरकाल टिकली पाहिजे, तरच ही गोष्ट होणार आहे,–किंबहुना, तिच्यावरच त्याचें जगणें मरणें अवलंबून आहे, हें कोणीही न विसरतां तिच्या नाशाचा आत्मघातकी उपाय कोणीही यापुढें करूं नये—आचरूं नये हेंच उचित नव्हे काय ? कारण रथाची जशी चार चाकें, इमारतीचे जसे चार खांब, किंवा देहाचे जसे हस्तपादादि चार अवयव, त्याचप्रमाणें हिंदुधर्मांतील ह्या चार जाती होत ! तो सुंदर रथ, ती भव्य इमारत, आणि तो दिव्य देह ज्यांना पाहवत नसेल, त्यांनीं खुशाल त्याला भग्न करण्याचा प्रयत्न करावा. हिंदुस्थानच्या अध्यात्मिक पूण्याईनें, भारताच्या भाग्यानें, व खुद्द ईश्वरी आशीर्वादानें पावन झालेली जातिभेदाची संस्था मोडणें शक्य नाहींच; पण मोडलीच तर काय अनर्थ होईल, याचें चित्र अर्जुनानें भगवद्गीतेच्या प्रथमाध्यायांतच परिणामकारक वार्णीत रेखाटलें आहे तें वाचकांनीं अवश्य पहावें, अशी आमची विनंति आहे ! एकदां जातिभेदाचा हा बंद तुटला कीं, दोरा काढून घेतलेल्या हारांतील मणी अथवा पुष्पें जशीं खळकन् गळून भूमीवर पडतात, त्याप्रमाणें स्थिति होऊन जाईल ! कोणचें पुष्प कुठेंही घातलें तरी समग्र हार त्याच विश्वप्रभूच्या गळ्यांत लटकणार आहे, ह्या दिव्य कल्पनेला पारखे होऊन जर त्या पुष्पांनीं गुंफून घेण्याचेंच नाकारलें, तर त्या हाराची बहार दृष्टीस पडेल काय ? जातिभेदाच्या वर्णव्यवस्थेला कृत्रिम व ऐहिक स्वरूपाची न मानतां, नैसर्गिक व ईश्वरी स्वरूपाची ओळखून, त्या अध्यात्मिक भावनेच्या बळावर–त्या रज्जूनें, चातुर्वर्ण्य जर एकत्रित संबद्ध असा राहील–तर जगांतली कोणचीही शक्ती या संस्थेचा नायनाट करूं शकणार नाहीं ! पण तेंच परक्यांच्या खोट्या बुद्धिवादानें भुलून जाऊन अथवा लज्जित होऊन, जर आम्ही वेगवेगळे होऊन आपापसांत झगडूं लागलों, तर काटक्यांच्या जुडींतल्या सुट्या काटक्यांतून जशी एक एक काटकी घेऊन कुटकन् मोडून टाकतां येतें त्याचप्रमाणें "Divide and rule" म्हणजे 'फोडा व झोडा' ह्या कुटिल राजनीतीच्या अवलंबनानें व त्याच्याच जोरावर राज्य करणारे परकीय लोक, अशींच कोंबडी झुंजविण्याचा खेळ अखंड खेळत राहतील, हें उघड आहे ! मग आम्ही हें केव्हां ओळखणार ?

श्रीयुत फडकेही आपणांस हाच इशारा देत आहेत. ते म्हणतात.:—"व्यवहारामध्यें वरच्या मनुष्याला खालीं ओढणारा कोणी असला तर वरचा तेवढा खालीं जाईल व दोघांनाही एका बाजूस सारून वरच्याला खालीं ओढण्यासाठीं खालच्यास उत्तेजन देणारा तिसराच कोणी आपलें काम साधून घेईल, इकडे लक्ष दिलें पाहिजे!" ("वे. नि."पा. ८६). असो.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार जाती अथवा वर्ण म्हणजे हिंदुधर्मरूप किल्याच्या चार प्रचंड भिंती अथवा तट असून त्या भक्कम तटांच्या आंत, त्यांनीं सुरक्षित असा हिंदुधर्म, आज हजारों वर्षें काळाशीं टक्कर देऊन उभा आहे! हिंदुधर्मातील खरी मूर्तिपूजा व त्यांतील उच्च तत्त्वज्ञान हे त्यांतील बालेकिल्ले असून औपनिषदिक ऋषींपासून आजतागायत झालेल्या सर्व ईश्वरावतारांच्या, साधुसंतांच्या व विचारप्रवर्तकांच्या प्रतिमा अथवा मूर्ति त्या बालेकिल्ल्यांत बसून ह्या हिंदुधर्माला त्या मंगलाशीर्वाद देत आहेत! ह्या 'अजिंक्यताऱ्या'च्या बाहेरील भक्कम भिंतींना भगदाडें पाडण्याचा प्रयत्न, किंबहुना, आंतील बालेकिल्ल्यावरही हल्ला चढविण्याचा यत्न, आजवर बौद्ध, मुसलमान, व ख्रिश्चन ह्या धर्मांनीं व आधुनिक काळांतल्या ब्राह्मो, आर्य, प्रार्थनादि समाजांनीं व पंथांनीं केला; पणं त्याला कितपत यश आलें बरें? मुळींच आलें नाहीं म्हटलें तरी चालेल. म्हणूनच रा. गोळे म्हणतातः—"जातिभेद मोडण्याच्या प्रयत्नांत बौद्धधर्मानें हिंदुस्थानांतून पळ काढला;...त्या मुसलमानी धर्मानेंहि कालगतीनें माघार घेतली व तटस्थवृत्ति अंगिकारिली, ...त्या (ख्रिस्तीधर्मा)कडून हिंदुधर्माचा पाडाव झाला नाहीं, जातिभेद मोडला नाहीं...सुधारकांच्या प्रयासांनीं तशाच दोनचार (ब्राम्हो-वगैरे) नव्या जाति उत्पन्न झाल्या व एकंदरीनें जातिभेद मोडण्याच्या प्रयत्नांत जातींची संख्या मात्र वाढविली. (पान २०९ हिंदुधर्म आणि सुधारणा). आमचा धर्म व जातिभेद असाच कायम राहिल्यास पूर्वीप्रमाणें आणखी कितीही राजक्रान्त्या पुढें झाल्या तरी त्यांतून सुरक्षितपणें आम्ही पार पडूं. (सदर-पान ९३)" असो. श्रीयुत फडकेही म्हणतातः—"एका सांच्यांत सर्व माणसांना बसविण्याची महंमदाची

पद्धति, समजूत घालून किंवा आमिष दाखवून येशू ख्रिस्त काय तो एक तारणारा म्हणविणाऱ्या ख्रिस्ती पंथाची तऱ्हा, किंवा इराणांतील बाब-पंथाची रीति, ह्या सर्वच निरुपयोगी ठरल्या. लोकांना स्वतंत्रता, चित्रविचित्रपणा पाहिजे असतो, आणि तसली मोकळीक हिंदुधर्मानें, वेदांतानें, ब्राह्मणधर्मानें ठेविली असल्यामुळें तोच सर्व लोकांना मान्य झाला व होणार आहे." ("वे. नि." पा. ७७.) कलकत्त्याच्या फार्कहर साहेबांनींही अशाच अर्थाचे उद्गार काढिले आहेत. ते म्हणतात, "हिंदुधर्मात इतके पुष्कळ पंथ, जाति, पोटभेद आहेत कीं, त्यांची गणती होत नाहीं, तरी त्याच्यांत अंतस्थ तेज आहे हें कबूल करावें लागतें" इ. ह्या तेजाच्या ठिणगीवर साचलेली राख आपल्या सक्रिय उपदेशाच्या फुंकरीनें उडवून टाकल्याबरोबर आंतील अग्नि कसा धगधगून बाहेर पडतो व पाखंडमतविध्वंसन करून, अज्ञान, आलस्य, मोह, इत्यादिकांचा पाचोळा जाळून टाकून, हिंदुधर्माचे उज्ज्वल स्वरूप तो कसा प्रगट करून दाखवितो याचा प्रत्यय भगवान् श्रीकृष्ण, आद्य श्रीशंकराचार्य, भागवतधर्मीय साधुसंत, व महाराष्ट्रीय 'समर्थशिष्य' ह्यांनीं आणून दिलेला आपण मागें पाहिलाच आहे! ह्या अंतस्थ तेजाच्या प्रज्वलित झालेल्या ठिणगीनेंच बुद्धधर्माची हिंदुस्थानांतून हकालपट्टी केली, मशिदींच्या जागीं मंदिरें उभारलीं, व अस्पृश्यांचें अस्पृश्यत्व घालवून हिंदुधर्मावरील कलंक धुवून काढला! असो. हल्लींच्या परिस्थितीकडे पाहतां त्या हिंदुधर्मरूप अग्नीच्या अंतस्थ तेजाच्या ठिणगीवर पुष्कळच रक्षा सांचली आहे, व ती अवश्य दूर करून तो अग्नि पुन्हा प्रज्वलित करायला हवा आहे, ह्यांत शंका नाहीं! पण तसें करण्याच्या प्रयत्नांत खुद्द त्या धर्माच्या नरडीला नख देण्याची चूकच "गौतमबुद्धापासून राममोहनरायापर्यंत" सर्वजण करीत आले आहेत, असें स्वामी विवेकानंदांनीं म्हटलेलें आम्ही बुद्धधर्माचा इतिहास देतांना मागेंच सांगितलें आहे. असो. तर याप्रमाणें मूर्तिपूजा व जातिभेद हे जे आधुनिक हिंदुधर्मसुधारणेच्छूंना जाचक प्रश्न वाटतात त्यांत त्यांची चूक कशी आहे, व त्यांचा उलगडा काय, हें आम्ही येथवर सांगितलें.

सरतेशेवटीं सनातन हिंदुधर्मानुयायी व हिंदुधर्माभिमानी म्हणवि-

णाऱ्या समाजाला आम्हांला ह्या दोन प्रश्नांचें बाबतींत इतकेंच सांगावयाचें आहे कीं, मूर्तिपूजा व जातिभेद पाहिजेत म्हणून त्यांच्या यथायोग्य अस्तित्वाचें जरी आम्ही वर प्रतिपादन केले आहे, तरी त्याच भूमिकेवर सर्वांनीं सदा राहावें असा त्या म्हणण्याचा केव्हांही अर्थ नाहीं. त्या मूर्तिपूजेंतूनच उच्च भक्ति व शेवटीं अव्यक्तधामपदप्राप्तिसाठीं सर्वांनीं सदैव यत्न चालू ठेविला पाहिजे; व जातिभेद हवा असला, तरी जातिमत्सर नको असून, अध्यात्मिकच काय पण उच्च अशा राजकीय व सामाजिक कर्तव्यासाठीं व ध्येयासाठीं, प्रसंगीं त्यांचा क्षणैक त्याग झाला, तरी त्यानें डरता किंवा कचरतां कामा नये! दिल्लीहून शिवाजीची सुटका झाली तेव्हां संभाजीला आपल्या ताटांत घेऊन जेवणाऱ्या व राष्ट्रावरची आपत्ति टाळण्याऱ्या ब्राह्मणाची कोणीही खरा राष्ट्रप्रेमीच नव्हे, तर धर्मप्रेमी माणूसही, प्रशंसाच करील! असो. एरवींच्या व्यवहारांतही चातुर्वर्ण्य व जातिभेद असला, तरी जातिमत्सर मुळींच नको असून एकाच देहाचे जसे हस्तपादादि चार अवयव तीच कल्पना ह्या राष्ट्रपुरुषाच्या व समाजपुरुषाच्या देहाचे बाबतींत सदैव डोळ्यापुढें वागवून, पायाला कांटा बोचला कीं जसें टचकन् डोळ्यांला पाणी येतें, तसेंच सर्व समाजव्यवहारांत झालें पाहिजे! अद्वैत ओळखून मगच द्वैतांत खेळण्याची जशी पारमार्थिक भक्तिची मौज, तीच गोष्ट ऐहिक लोकयात्रेसही तितकीच लागू असून, तसें जो वागेल तोच खरा भक्त असें दोन्हींकडेही सारखेंच समजलें जाईल, हें कोणीहि विसरूं नये! अहाहा! अशा तऱ्हेचें ऐक्य व द्वैतांत अद्वैताची मौज जर पाहाण्यास सांपडली तर अस्पृश्यता, ब्राह्मणब्राह्मणेतर वाद, इत्यादि कितीतरी धुकीं त्या ऐक्याच्या आणि अद्वैताच्या सूर्यकिरणानें वितळून जातील, व आपला मार्ग आपणांस स्पष्ट दृग्गोचर होऊन आपलें ध्येय आपणांस हांहां ह्मणतां गांठतां येईल! पण हें व्हायचें कसें? हा प्रश्न आहे. ‘ मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्या ’ इतकेंच हें सध्यां तरी कठिण वाटत आहे! कारण, अप्रबुद्ध व असमंजस अशा लोकांनीं परिस्थितीचा तसाच चुथडा करून ठेवला आहे! बर्कनें म्हटल्याप्रमाणें, “भूतें उठवणें सोपें असतें, पण त्यांचा एकदां नंगा नाच सुरूं झाला म्हणजे त्यांना आवरणें व परत

थडग्यांत गाडणें मोठें कठिण असतें !" हिंदुस्थानला अशा दिव्य मांत्रिकाची अत्यंत जरूर असून तो आशावादी दृष्टीनें त्या भावी मूर्तिकडे सारखा टक लावून पाहत आहे ! तो दिव्यदृष्टीचा द्रष्टा केव्हां ईशकृपेनें अवतरेल तेव्हां अवतरो, पण तोंपर्यंत आपणही आपणांकडून होईल तितकी खटपट करून त्याचा मार्ग सुकर करण्याचा यत्न केला पाहिजे ! वर वर्णिलेला बुद्धिभेदाच्या भुतांच्या उठावणीनें माजलेला चुथडा, हा कशाचा परिणाम आहे ? याचा सूक्ष्मपणें विचार करतां आपणांस हेंच दिसून येतें कीं, ब्रिटिश, बायबल, आणि ब्रँडी ह्या तीन 'ब'कारांच्या बलवत्तर भुलावणीची अक्काबाईच ह्या सर्व अनर्थाला कारण असून, एकंदर समाजाचें व राष्ट्राचें सूक्ष्म निरीक्षण केल्यास वरील त्रयीनें केवळ मागें सांगितला तेवढाच अनर्थ केला नसून, वामनानें त्रिपादभूमींनें ज्याप्रमाणें ब्रम्हांड व्यापिलें त्याचप्रमाणें ह्या सैतानी अवलादीच्या तीन पावलांनीं हिंदुस्थानच्या अधः-पाताचा सर्व ब्रह्मांडगोल व्यापला असून, मौज ही कीं त्या भुलभुलावणीच्या गोड गुंगींत ही अमृतवल्ली नसून विषवल्लीची जुडी आहे, ह्याचीही जाणीव आम्हांस नाहींशी झाली आहे ! ह्या सैतानी वामनाच्या तीन पायांच्या सर्वतोगामी पराक्रमाचें अधिक वर्णन ओघाओघानें पुढें येईलच ! असो.

ब्राम्हण ब्राम्हणेतर वादासंबंधीं वेगळें तें काय लिहायचें ? जातिभेदाच्या वादाचा गोड निकाल लागला, कीं त्याच्या पोटींच उत्पन्न झालेलें हें विषारी सापाचें पिलूं त्याच्या नुसत्या धगीनेंच मरून जाईल, हें आम्ही प्रतिज्ञेवर सांगतों ! यापेक्षां अधिक काय लिहावें ?

यानंतरचा प्रश्न म्हणजे शुद्धि आणि संघटन ह्यांचा होय ! अर्थात् या प्रश्नांत दोन गोष्टींचा समावेश झाला असून त्याचा आपण पृथक्पणेंच विचार करूं. पहिली गोष्ट शुद्धिची घ्या ! शुद्धि याचा अर्थ हिंदुधर्मांतून परधर्मांत गेलेल्या म्हणजेच लौकिकी भाषेंत ज्याला, बाटलेला म्हणतात, अशा मनुष्याला परत पावन करून घेऊन, म्हणजेच त्या अशुद्धाला शुद्ध करून घेऊन, स्वधर्मांत घेणें असा आहे. खरोखर स्वधर्मावर आणि विशेषतः हिंदुधर्मासारख्या उच्च तत्वज्ञानाच्या, दिव्य भक्तिच्या, आणि

उदात्त आचरणाच्या स्वधर्मावर—मनुष्याचें इतकें नितांत प्रेम आणि अढळ श्रद्धा हवी कीं; त्यासाठीं प्रसंगीं प्रत्यक्ष प्राणावर बेतली तरी त्यानें न कचरतां ' जीवित तृणवत् मानून ' 'स्वधर्मे निधनं श्रेयः' ह्याच भगवदुक्तीचा अवलंब त्यानें केला पाहिजे, आणि संभाजीप्रमाणें स्वधर्माच्या स्थंडिलावर स्वप्राणांची आहुति दिली पाहिजे. पण अशातऱ्हेनें स्वधर्मावर नितांत श्रद्धा व त्याविषयीं प्राणापलिकडे प्रेम वाटण्यास, त्या धर्मांतील तत्वेंच नुसतीं उच्च असून चालणारा नाहींत; तर ज्याला व्यावहारिक वेदांत म्हणतात, तो प्रत्यक्ष कृतींत उतरून, तीं तत्वेंच जणों साकार झालीं आहेत कीं काय, असें त्या धर्मांतील विशेषतः अज्ञानी जीवमात्रांला व " स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः " ह्यांना वाटेल, अशातऱ्हेचें आचरण उच्चवर्णीयांचें असायला पाहिजे! " स्त्रिया, मुलें, आणि शूद्र ही राष्ट्रीयवृक्षाची मुळें आहेत " अशा अर्थाचें स्वामी रामतीर्थांचें वचन आम्ही मागें दिलेलें वाचकांच्या लक्षांत असेलच. तसेंच दयेचा परिघ अत्यंत विस्तृत केला असतां केवढें प्रचंड कार्य होतें, याचा प्रत्यक्ष दाखला गौतमबुद्धानें आपल्या चारित्र्यानें पटवून दिलेला आम्ही मागेंच सांगितलेला असून, आज हिंदुस्यानाला ह्याच सक्रिय वेदांताची जरूरी आहे, असें आम्हीं तेथेंच म्हटलेलें वाचकांना स्मरत असेलच, किंबहुना, गौतमाच्या चरित्रकार्याचा, श्रीकृष्णाच्या दिव्य कामगिरीचा, व महाराष्ट्रीय साधुसंतांच्या अलौकिक आचरणाचा विचार करतांना या मुद्याचा आपण भरपूर विचार केलाच आहे! पण आज प्रश्न इतकाच आहे कीं, अशा तऱ्हेच्या उज्ज्वल परंपरेचा इतिहास व त्यावर दिव्यप्रकाश पाडणारीं—अगदीं आधुनिक सुशिक्षितांनाही मान्य होणारीं—अशीं विवेकानंद, रामतीर्थादि स्वामींचीं वचनें पाठीशीं उभी असतां, तो भगवान् कृष्णसारथी सायुध असा पाठीशीं याप्रमाणें उभा असतां, निर्भयपणें व अंतःकरणाच्या कळकळीनें आमच्यांतील कितीजण हें कार्य करीत आहेत ? विशेषतः मद्रास इलाख्याकडे दृष्टि फेकल्यास आपणांस तेथें काय दिसतें, हें नव्यानें सांगायला पाहिजे काय? वायकोमसारखें सत्याग्रह, याचीच साक्ष देत नाहींत काय? असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, याप्रमाणें आपण ह्या दिव्य उपदेशाला

पारखें झालों असून, शाब्दिक बडबडीचें पांडित्य मात्र क्वचित् क्वचित् दृग्गोचर होते. पण छातीठोक पुढें होऊन, ह्या अनर्थाच्या मुळाशीं हात घालणारा महात्मा एखादाच, ह्यांत शंका नाहीं. काय खालच्या वर्गाला भावना नाहींत, कां कल्पना नाहींत कां काय नाहीं? शीतोष्णादि बाह्य द्वंद्वांचें त्याचप्रमाणें रागलोभादि आंतरद्वंद्वांचें सुखदुःख तुमच्याप्रमाणेंच त्यानाही होते–तुमच्यासारखींच तींही ईश्वराचीं लेकरें आहेत–नव्हे, "चालते बोलते देव" आहेत–,हें लक्षांत ठेवून, त्यांना आधीं संतुष्ट करा म्हणजे तो परमात्मा तुम्हाला भेटेल, अशा त-हेच्या विवेकानंद स्वामीजींच्या वचनाचा तुम्हांला इतक्यांतच विसर पडला काय? मग ही खालच्या जातिविषयींची एवढी निर्घृण अनास्था कां? त्यांच्याशीं मायेच्या ममतेनें बोला, आणि त्यांच्यावर प्रेमाची पांखर घाला–त्यांना तुमचें सहभोजन नको, रोटीबेटीव्यवहार नको, दुसरें कांहींही नको–एक प्रेमाचा, स्नेहाचा, जिव्हाळ्याचा, आत्मीयभावनेचा शब्द! बस! ह्या प्रेमाच्या शब्दांत किती दिव्य जादू भरली आहे, ह्यास्नेहाच्या नजरेत किती अमृत साठविलें आहे, आणि ह्या जिव्हाळ्याच्या करकमलांत पतितपावनत्वाची किती अलोट शक्ति आहे, ह्याची सध्याच्या निर्घृण समाजाला कोठून कल्पना येणार? ह्याच, ह्याच प्रेमाच्या पारखेपणाच्या पायीं, आज लक्षावधि लोक परधर्मांत जात आहेत, याचा विचार आम्ही करावयास नको काय? असो.

त्याचप्रमाणें भुलभुलावणी, जुलूम–जबरदस्ती, व दुष्काळादि आपत्तींत प्राणांवर प्रसंग येऊन पडल्याची पराधीनता, ह्यांच्या कैचींत सांपडूनही आज लक्षावधि लोक परधर्मांत जात आहेत. त्याच्याहि प्रतिकारासाठीं म्हणजेच अशा प्रसंगीं लोकांना स्वधर्मांत राखण्यासाठीं, आम्ही काय प्रयत्न करीत आहोंत? ख्रिश्चन मिशन्सशीं मिशन्स आम्ही भिडवायला नकोत काय? मुसलमानी तबलघशीं हिंदु तबलघ आपण चालवायला नको काय? रोग झाल्यानंतर त्यावर उपचार करीत सुटण्यापेक्षां, तो आधीं होऊंच न देण्याची खटपट करणें, वाजवी आणि उचित नव्हे काय? अर्थात् परधर्मांत लोक कां जातांत, याचा विचार करतां त्या लोकांच्या पेक्षां याकामीं आपल्याकडेच–आपल्या ह्या हयगयीकडेच–दोष जास्त

येतो, हें कोणीही कबूल करील. यासाठीं ज्याप्रमाणें गाईला कसायाच्या-हातून सोडविण्याआधीं, ती आधीं बाजारांतच कशी विक्रीला येणार नाहीं यासाठीं ज्याप्रमाणें प्रत्येक गोभक्तानें खटपट केली पाहिजे, त्याचप्रमाणें ह्या ठिकाणींही प्रयत्न व्हायला हवा असून, प्राणांवर बेतली तरी परधर्मस्वीकार करणार नाहीं अशातऱ्हेची छातीठोक आचांडाल जनता कशी निर्माण होईल, इकडे आपण लक्ष दिलें पाहिजे; आणि या सर्वांच्या मुळाशीं जाऊन ज्या प्रेमाच्या पाण्यावर समग्र जनता जगायची, त्या जलाचें वैपुल्य सर्वत्र कसें होईल, त्या जलाचे जलद, जलद्गतीनें सर्वत्र फिरत राहून आपल्या शीतल जलाचा वर्षाव संतप्त व तृषित अशा भूमीवर सर्वत्र सदा सारखा कसा करीत राहतील, याच्या योजनेला आपण लागलें पाहिजे! कारण " Wise men will always apply their remedies to the causes of evils which are permanent & not to the transitory modes through which they act" अशा तऱ्हेची महात्मा बर्कची उक्ति असून, त्याप्रमाणें आपण वागावयास नको काय ? ,, Other-wise you will be wise historically, but a fool in practice" अशा तऱ्हेचा त्यांनीं मारलेला शेराही या कामीं अवश्य लक्षांत घ्यावयास पाहिजे!

पण याप्रमाणें शक्य तितकी खबरदारी घेतली तरी, परान्नावर पुष्ट होणाऱ्या पोळाप्रमाणें, अथवा सांपडेल त्या व्रणावर चोंच मारण्यास सदैव तत्पर असणाऱ्या कावळ्याप्रमाणें, मुसलमान व ख्रिश्चन ह्या परधर्मीयांची गिधाडें ह्या हिंदुधर्माच्या मृतप्राय समाजाभोंवतीं सारखी वावरत असून त्याचे लचके तोडण्यास तीं अगदीं टपून बसलेलीं आहेत, हें आपण केव्हांही विसरतां कामा नये. आणि यासाठींच, जरी त्या जीवन्मृतावस्थेप्रत पोंचलेल्या समाजाच्या शरीरांत आंतून ऐक्याच्या अमृताचा झोत सोडून देण्यास, व त्यास विजेच्या झटक्यानें जागृत करून परिस्थितीकडे पाहायला शिकविण्यास आपण आटोकाट यत्न केला, तरी त्याहूनही आधीं परधर्मीय मिशनऱ्यांच्या व मौलवींच्या तडाख्यांत सांपडलेल्या, किंवा ह्या चळवळीच्या जागृतीच्या आधींच आज शेकडोंशे वर्षे परधर्मांत गेलेल्या—पण मनानें परत स्वधर्मांत येण्यासाठीं मूक आक्रोश कर-

णाऱ्या, किंबहुना—अगदीं परधर्मीय असूनही हिंदुधर्मांत येण्यासाठीं ज्यांची विचारपूर्वक तळमळ चालू आहे, अशा सर्व जीवांना आपण स्वधर्मांत घेतलें पाहिजे. स्वधर्मांतून परधर्मांत जाण्यास जर बंदी नाहीं, तर परधर्मांतून स्वधर्मांत येण्यास तरी कां बंदी असावी ? हिंदूला मुसलमान किंवा ख्रिश्चन होतां येते, तर अगदीं अस्सल परधर्मीयालासुद्धां हिंदु कां बनतां येऊं नये हें समजणें कठिण आहे ! हौदाला एकच पाणी बाहेर वाहून नेणारी तोटी असली व त्यांच्यात पाण्याचा पुरवठा कायम राखण्यासाठीं जर तशीच दुसरी आंत येणारी नळी नसली, तर लवकरच त्या हौदांत पाण्याचा खडखडाट होण्याची वेळ येईल हें एखादें पांच वर्षांचें पोरसुद्धां सांगू शकेल ! मग, एकेकाळीं जरी स्वधर्मशुद्धतेच्या कल्पनेवर आपल्या पूर्वींच्या स्मृतिकारांनीं निराळे नियम केलेले असले, तरी काळवेळ प्रसंग पाहून आपणांस त्यांत बदल करावयास नको काय ? बरे, याला देवलस्मृतीसारख्या स्मृतींचाही आधार असून बजाजी निंबाळकरासारखीं ऐतिहासिक उदाहरणेंही कित्येक आहेत. कोणच्याही निमित्तानें एकदां मनुष्य बाटला, कीं त्याला परत स्वधर्मांत जातां येत नाहीं, ह्या आपल्या आजवरच्या सामान्य खुळ्या समजुतीचा फायदा घेऊनच उपरिनिर्दिष्ट दोन धर्मांच्या—ख्रिश्चन व मुसलमानीधर्मांच्या——लोकांनीं आपल्या लोकांना नानातऱ्हेनें बाटविण्याचा सपाटा चालविला आहे ! अर्थात् कोणच्याही धर्मांत गेला तरी हिंदु हा शेवटीं हिंदूच राहतो हें सक्रिय पटवून देणारी शुद्धीची तोडीस तोड चळवळ चालविली तरच या परधर्मीयांच्या अत्याचाराला कांहीं आळा पडल्यास पडेल हें उघड आहे ! किंबहुना, ह्या पालींचें दर्शन झाल्यावरोबर त्यांच्या विंचवानें नांगी टाकलीच पाहिजे, याचा प्रत्यय स्वामी श्रद्धानंदजींच्या शुद्धिचळवळीनें आजही थोडाबहुत येत असून त्या दृष्टीनें त्यांचेच नव्हे, तर वैद्यांच्या हिंदु मिशनरी सोसायटीसारखे प्रयत्नही अभिनंदनीय आहेत, यांत शंका नाहीं ! असो.

यानंतरची दुसरी गोष्ट म्हणजे संघटनेची होय ! संघटन म्हणजे एकत्रित असा जोरदार समुदाय ! अर्थात् हें हिंदूंच्याच बाबतींत लागू करावयाचें आहे, हें उघड आहे; पण अशातऱ्हेच्या संघटनाची आवश्यकता वाटत आहे, यावरूनच त्याचा अभाव——अत्यंताभाव—आपणांत असून,

सर्व समाज कसा विस्कळित बनून गेला आहे, याचेंच तें दर्शक आहे! जातिभेदाच्या प्रश्नावर लिहितांना याचा आपण वर विचार केलाच आहे. येथें आम्हांस इतकेंच सांगायचें कीं, विस्कळित झालेला समाज हा नादान असतो, किंबहुना, नादानपणा हा विस्कळितपणाच्या पाठोपाठ तयारच असतो! म्हणूनच " United we stand, divided we fall " अशा तऱ्हेचें जें आंग्लवचन आहे तें याचेंच दर्शक आहे. " Unity is strength " म्हणजे एकी हेंच बळ आहे, हें वचन हेंच दाखवितें. " संहतिः कार्यसाधिका " हें संस्कृतवचनहि ह्याच ऐक्याची आठवण देत आहे. " बेकीनें बुडतीं राज्यें । एकीनें कार्य साधतें । " हा समर्थांचा सिद्धान्त त्रिकालाबाधित असून, राज्याप्रमाणेंच बेकीच्या पायीं समाजही डबघाईला येतो ह्याचें प्रत्यंतर समर्थकालीन महाराष्ट्रांत शिवबाच्या उदयाचें आधीं जसें आलें, तसेंच आजही पुरेपुर येत आहे! किंबहुना, अज्ञान, आलस्य, मोह, नादानपणा, भ्याडपणा, पंगुपणा, आणि क्लैब्य, ह्या सर्वबाबतींत दोन्हीही समाजांची सारखीच तुलना करतां येण्यासारखी असून तत्कालीन—शिवकालीन—समाजाचें चित्र समर्थांच्या देशपरिभ्रमणांत त्यांना जें दिसलें म्हणून आम्ही मागें सांगितलें आहे व सविस्तर वर्णिलें आहे, तोंच देखावा आजही समग्रहिंदुस्थानची तीर्थयात्रा करणाऱ्या कोणाही सूक्ष्म दृष्टीच्या द्रष्टयाला दिसणार आहे! नानातऱ्हेच्या व्यसनांत बुडून, स्वार्थानें अंध होऊन, परक्यांच्या हांजीहांजीखोरपणाचे पायीं, आम्ही स्वत्वाला मुकून कसें नादान बनलों आहों, आणि आमचा स्वाभिमान कसा ठार झाला आहे, ह्याचें प्रत्यंतर प्रत्येकास पावलोपावलीं येत असतां त्याचें वेगळें वर्णन करून सांगण्याची जरूर आहे काय? अर्थात् जातिभेदाची—म्हणजेच खऱ्या समाजैक्याची—गोड कल्पना जर आमच्या रोमरोमांत भिनेल, तर त्या प्रत्येक रोमागणिक चेतना उत्पन्न होऊन त्या चेतनेवर चालणाऱ्या चातुर्वर्ण्याच्या चार पात्यांच्या चक्राची गति आणि शक्ति इतकी प्रचंड बनेल अथवा होईल, कीं त्या विद्युद्वेगानें फिरणाऱ्या तीक्ष्णदंष्ट्रायुक्त अशा जिवंत आणि जातिवंत यंत्रावर कोणच्याही बाह्य आपत्तीचा आघात आधीं व्हायचा नाहीं; आणि झालाच, तर तो एखाद्या कागदाप्रमाणें

तावडतोब टरकावला जाऊन त्याचा क्षणार्धात् मागमूसही राहणार नाहीं ! अशा तऱ्हेचें दिव्य सामर्थ्य ह्या दिव्य अशा खऱ्या समाजसंघटनेंत आहे ! आणि शुद्धिच्या बाबतींत ज्याप्रमाणें आम्ही मुळाशीं हात घालून ' काय पाहिजे ' तें सांगितलें, त्याचप्रमाणें येथेंहि असें चक्क सांगत आहोंत कीं, या संघटनेच्या प्रसंगावर खरा, कायमचा, व नित्य परिणाम-कारक असा तोडगा म्हणजे आम्हीं मागें सांगितलेली खऱ्या चातुर्वर्ण्याची उर्फ जातिभेदाची म्हणजेच–खऱ्या समाजैक्याची व्यवस्था होय ! कारण ही व्यवस्था म्हणजे क्षुद्र बुद्धीचे आणि कोत्या विचाराचे लोक समजतात त्याप्रमाणें सामान्य नसून, प्रत्यक्ष विश्वरूप दर्शनाची व्यवस्था असून—" कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः । ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ तस्मात्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धं ।"—अशा तऱ्हेचा मंगल आशीर्वाद, भगवंताच्या त्या विश्वरूपानें ऐहिक बाबतींत ज्या प्रमाणें अर्जुनाला दिला, त्याचप्रमाणें त्याच प्रभूच्या पुरुषसूक्तोद्गत अशा हिंदु-धर्माच्या ह्या विराटस्वरूपी पुरुषाचा–त्या पुराणपुरुषोत्तमाचा–अध्यात्मिक बाबतींत तोच आशिर्वाद, भारतवासीय हिंदुजनतारूप अर्जुनाला मिळाला आहे, हें दिव्यदृष्टीच्या द्रष्टयांवांचून इतरांस काय कळणार ? पण अशा तऱ्हेचें दिव्य दर्शन झालेले विवेकानंदासारखे महात्मे, खुद्द सिंहाच्या गुहेंत शिरून, त्याच्या छातीवर नाचून, हिंदुधर्माचें भगवें निशाण फडकावीत हेंच सर्व जगाला सांगत आहेत कीं, वेदांतधर्म हाच सर्वश्रेष्ठ धर्म असून सर्व जगाचा तोच एक धर्म पुढें होणार आहे ! असो. त्याच हिंदुधर्मरूप विराटस्वरूपाचे " किरीटिनं गदिनं चक्रहस्तं " असें सौम्य-स्वरूप, म्हणजे चातुर्वर्ण्याची नेहमींची शांतिप्रद व आनंददायी व्यवस्था होय ! अर्थात् अशा तऱ्हेच्या सौम्यस्वरूपी परमात्म्याचें सामर्थ्यही अगाध असून, शंखचक्रगदापद्मादि त्याचीं आयुधें दुष्टनिर्दलनार्थ व साधुपरित्राणार्थ सदैव सज्जच असून आपल्या तळपत्या तेजानें गरगरा फिरत असतात, व त्यांच्या त्या खड्या पहाऱ्याच्या जागरूकतेनें हिंदुधर्म व तदनुयायी जनता खुशाल आंतील बालेकिल्ल्यांत आनंदानें आपापले व्यवहार करीत असते ! पण आज काय स्थिति आहे ? तें विराटस्वरूप तर

राहोंच, पण त्या सगुणरूपालाही पारखा होऊन, हिंदुधर्माचा डोलारा आज विस्कळित झाला आहे! अर्थात् त्याची पुनश्च स्थापना होईल तेव्हांच खरें कार्य होणार आहे. तथापि ती व्यवस्था कधीं व्हायची असेल ती होवो; पण तोंपर्यंत, अगदीं त्या रूपानें नाहीं, तरी, विस्कळित समाजांतला कां होईना, पण प्रत्येक इसम अद्याप आपणांस अस्सल बीजाचा हिंदूच म्हणवतो आहेना ? मग दिवसाढवळ्या चाललेले हे अत्याचार त्यास कसे पाहवतात ? आपलीं बायकामुलें, आपलीं पवित्र देवालयें, आपले गाईबैल, किंबहुना, खुद्द आपले स्वताचे जीविताची तरी शाश्वती त्यास राहिली आहे काय ? समग्र हिंदुस्थानांत मुसलमान अवघे ७ कोटी असून ते हिंदमातेच्या २२ कोट हिंदूसंतानाला भारी होऊन रहावेत, ही किती शरमेची गोष्ट आहे बरें ? आजकाल हिंदुस्थानांत, ह्या आर्यांच्या पवित्र देशांत, कोणची गोष्ट प्रामुख्यानें ऐकूं येत असेल, तर ते मुसलमानाचें दंगे होत! वाद्यें वाजविण्यास मनाई करणें, देवालयें उध्वस्त करणें, मूर्ति फोडणें, गोवध करणें, बायका पळविणें, ह्याप्रमाणें एकच हलकल्लोळ माजून राहिला आहे! हरहर! आर्यपुत्रा! कोण हा तुझा अधःपात! नुसत्या दृष्टीच्या पातानें किंवा शापवाणीच्या उच्चारानें शत्रूला भस्मसात् करणारें तुझें तें उग्र तपश्चर्येचें दिव्य तेज कुठें गेलें ? किंबहुना "अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः। इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि॥" असें तुझें एकेकाळीं असलेलें सामर्थ्य, इतकेंच नव्हे, तर "धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजो बलं बलं" असे उद्गार काढायला लावणारी तुझी ती अमर्याद शक्ति, आज कुठें आहे ? पण त्या लांबच्या गोष्टी म्हणून सोडून दिल्या, तरी परवा परवापर्यंत समर्थांच्या दिव्य उपदेशानें व शिवाजीमहाराजांच्या स्फूर्तिप्रद आदेशानें तूं "स्वधर्मासाठीं घेतलेली फकिरी" आज कुठें गेली ? 'ठोशास ठोसा, हुंब्यास हुंबा, उद्धटास उद्धट' हें समर्थांचें वचन, आणि "धर्मासाठीं मरावें। मरोनी अवघ्यांसि मारावें" हा उपदेश तूं विसरलास काय ? "मरेंगा पर हटेंगा नहीं" ही मराठ्यांची मराठा-ब्रीदाची बाणेदार उक्ति, आज तुझ्या स्मरणांतून लुप्तप्राय झाली काय ? तसें झालें नसेल, आणि ह्या सर्व पूर्वीच्या वैभवाच्या थरारीचा तुला अजूनही योग्य अभिमान वाटत असेल, तर पुनश्च निदान समर्थांच्या-

प्रमाणें तरी जागोजाग तालमीचे आखाडे काढून, व बजरंगबलीच्या मूर्तीची तेथें स्थापना करून, तुला पुन्हां तेजस्वी बनावयास नको काय ? कारण लक्षांत ठेव कीं, " व्रजंति ते मूढधिय: पराभवं भवंति मायाविषु ये न मायिनः । " ही भारवींची उक्तिच त्रिकालाबाधित खरी आहे ! अर्थात् मानानें जिवंत राहायचें असेल, तर त्याप्रमाणेंच वागून, ठोशास ठोसा ठेवून देण्यासाठीं तुला सर्व हिंदुमात्राच्या संघटनाकडेच वळलें पाहिजे; पण तें नुसतें नांवाचें बाजारबुणग्यांचे संघटण न होतां, खरें तेजस्वी कसें होईल, इकडेही तुला लक्ष दिलें पाहिजे ! हें केव्हांही विसरूं नकोस !

या संघटणानें करावयाच्या मुसलमानी अत्याचारांच्या प्रतिकाराविरुद्ध अहिंसा, शांति, आणि ऐक्य इत्यादि खुळचट मतें, मोठ्या गंभीर पणानें, व जणूंकाय आपणाला एकट्यालाच 'एकमेवाद्वितीय' अशी हिंदुस्थानच्या कल्याणाची काळजी आहे असा आव आणून, प्रतिपादण्यांत येतात ! तेव्हां त्यांचाहि समाचार घेतला पाहिजे ! प्रथम अहिंसा घेऊं; या अहिंसेच्या बाबतींत आम्हांस येथें इतकेंच सांगायचें कीं, अहिंसा म्हणजे जर क्लैब्य नसेल, तर ह्या ठिकाणीं अहिंसेचा भंग मुळींच होत नसून उलट " आततायिनमायांतं हन्यादेवाऽविचारयन् " अशा तऱ्हेची खुद्द मनुसारख्या शास्त्राकाराची आम्हांस येथें आज्ञा आहे ! ह्या अहिंसेच्या खोटया कल्पनेच्या भुतांनीं अर्जुन असाच झपाटला जाऊन, " मी माझ्या बांधवाना कसा मारूं ? " अशा तऱ्हेचा शेळपट बुद्धिवाद त्यानें भारतीय युद्धप्रसंगीं आरंभिला होता. अर्थात् त्याप्रसंगीं, "क्लैब्यं मा स्मगमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते । क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ " अशाच तऱ्हेचा बाणेदार उपदेश भगवंतांनीं त्याला—अर्जुनाला—केलेला आहे तो काय दाखवितो बरें ? हेंच दाखवितो कीं, सत्य न्याय, आणि धर्म यांच्या संरक्षणासाठीं छातीठोक उभें राहिलें असतां, त्या सत्याला, न्यायाला, आणि माणुसकीच्या धर्माला पायाखालीं तुडविणारे नरपशू प्रत्यक्ष आपल्या भाईबंदांच्या स्वरूपांत जरी शत्रुत्वाच्या नात्यानें समोर उभे ठाकले, तरी त्यांचीसुद्धां गय करूं नये, स्वकर्तव्याच्या निष्ठुरपालनासाठीं अशा भाईबंदाचा सुद्धां बळी घेण्यास कचरूं नये, हाच उदात्त उपदेश ह्या

भगवंतांच्या उपदेशामृतांत साठविला नाहीं काय ? आणि स्वताचें घरदार, बायकापोरें, गायीसारखें पवित्र दैवत, परमेश्वराचीं पवित्र मंदिरें, आणि खुद्द आपलें जीवित यांचे आततायी आणि अत्याचारी अशा नरपशूंपासून रक्षण करणें, हें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्य नाहीं काय ? आणि ह्या पवित्र कर्तव्याच्या कठोर परिपालनांत जर खुद्द आपले भाईबंदही मोजायचें नाहींत, तर मुसलमानासारखे कोण परक्या देशाचे, परक्या धर्माचे, आणि परक्या संस्कृतीचे लोक, त्यांचा कोण मुलाजा धरणार ? अर्थात् ह्या पवित्र कर्तव्याचे पायीं, प्रसंगीं कितीही दुष्टांची हत्या घडली, तरी त्यांत यत्किंचित्ही पाप नसून, उलट "दया तिचें नांव भूतांचें पाळण । आणिक निर्दळण कंटकांचे ।। धर्मनीतिचा हा ऐक व्यवहार । सांगतसे सार निवडोनी ।।" अशाच तऱ्हेचा निकाल धर्मनीतीच्या सूक्ष्म धाग्यांची गुंतागुंत आपल्या ओजस्वी वाणीनें सोडविणाऱ्या तुकोबासारख्या शांतिसागर महात्म्यानेंहि दिला आहे, तो आमच्याच म्हणण्यास बळकटी आणीत असून, त्याचाही विचार करावयास नको काय ? किंबहुना, खुद्द मंगलमय प्रभूचा अवतार ह्याच कार्यासाठीं युगायुगाचे ठायीं होत असून त्याच्या पावलावर पाऊल टाकूनच आम्ही चालावें, अशीच त्याची इच्छा व आज्ञा आहे! अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारांतही ह्या प्रभूच्या कार्याचा असाच उलगडा करायचा हेंच. तुकोबांना वरील अभंगांत सांगायचें आहे! आतां याचा अर्थ असा नव्हे कीं, दिसला मुसलमान कीं कर त्याला ठार, असें करीत सुटावें. पण त्याचे अत्याचारी रगेल मनगट पकडून, त्याला जागच्या जागीं दाबून धरून, आपल्याहि मनगटांचा जोर त्याला दाखवून—"हें प्रकरण कांहीं न्यारेंच आहे, हें पाणी और आहे, येथें आपली डाळ शिजणार नाहीं, आणि अतिप्रसंग केल्यास आपणांस प्राणांसच मुकावें लागेल!"— अशातऱ्हेची सणसणीत जाणीव त्याला पुरेपुर पटवून द्यायला नको काय ? कारण शक्तींशीं शक्ति आणि युक्तीशीं युक्ति भिडवली तरच आपला तरणोपाय आहे, हें विसरून कसें चालेल ? जिवंत मढ्याप्रमाणें राहणें, कोणीही येऊन आपल्या कमरेंत लाथा घातल्या तरी त्याचेच पाय धरण्यास धावणें, आणि एका गालांत भडकावली गेली असतां दुसरा गाल

पुढें करणें, आपल्या आईबहिणींची, आपल्या पवित्र मंदिरांची अब्रू दिवसाढवळ्या घेतली जात असतां आणि गोब्राह्मणासारख्या गरीब जीवांची नागवणूक आणि संहार आपल्या डोळ्यादेखत चालला असतां तो उघड्या डोळ्यांनीं पाहणें, यालाच अहिंसा म्हणायची असेल, तर ती ज्याची त्यालाच लखलाभ होवो! श्रीकृष्ण, समर्थ, इत्यादिकांच्या आमच्या खऱ्या धर्माला हें मुळींच संमत नाहीं, एवढेंच आम्ही येथें सांगतों!

जी अहिंसेची गोष्ट तीच शांतीची कथा! वरच्यासारख्या प्रकारालाच जर शांति म्हणायचें असेल, तर त्यावर आमचें उत्तर असें आहे कीं, स्मशानांतहि मग शांतीचा वास काय कमी असतो? स्मशानांत जशी शातता असते, तशीच भगवंताच्या पवित्र देवालयांतहि शांतताच असते! पण ह्या दोन शांततेंत केवढा बरें फरक आहे? एका शांततेकडे पाहिल्यास चित्त उद्विग्न होऊन ऊर भरून येतो, तर दुसऱ्या शांतिमय वातावरणांत शिरल्याबरोबर प्रसन्नतेच्या लाटा हृदयावर खेळूं लागतात! दोन्ही प्रसंगीं मनुष्य शांतच राहिला, तरी त्याच्या हृदयींच्या भावनांत हा केवढा फरक आहे बरें? जगांत एकाच बाह्य आकाराच्या अशा किती तरी दुकली आहेत! उदाहरणार्थ, साव आणि चोर, दुःखाश्रु आणि आनंदाश्रु, घार आणि गरुड, सज्जन आणि दुर्जन! पण ह्या दुकलींतले दोन्ही पदार्थ सारखेच, असें कोणी तरी म्हणेल काय? अर्थात् तोच फरक मंदिरांतल्या मंगल शांततेंत आणि स्मशानांतल्या दुःखदशांततेंत असून, ह्या स्मशानवत् बनलेल्या भारताच्या भूमींत, परधर्मी पिशाचांचा नंगा नाच, शिवकालांतल्याप्रमाणें कसा सुरू आहे, याचें वेगळें वर्णन करून सांगावयाची जरूर आहे काय? अर्थात अशा तऱ्हेची स्मशानशांतता म्हणजे "विषकुंभ पयोमुख" अशा तऱ्हेची पूतनेसारखी पापी हडळ असून, भारताच्या भाग्याला—त्या भगवान् श्रीकृष्णाला मारण्यास मोठ्या दिमाखानें आणि साळसूदपणानें आली असून तिनें आपले विषपूर्ण असे स्तनही त्या बालकाच्या तोंडांत दिले आहेत. पण फार उशीर झाला नाहीं तोंच ह्या पापी हडळीला ठार करणें हें आपलें कर्तव्य आहे; हें आतां एखाद्या शांतिब्रह्मासही कबूल करणें भाग आहे! म्हणूनच "एकचि आकार आकार। आंत भिन्न आचार ॥ धृ० ॥" ह्याप्रमाणें सुरवात करून वरीलसारखी

उदाहरणें देऊन, एक आधुनिक कवि शेवटीं हाच उपदेश करीत आहे कीं बाबारे, " अंतरंग जाणें । प्राण्या, मायेचा बाजार ! ॥ " पण ह्या ' मायेच्या बाजारा'ला—ह्या बाजारबसवीच्या भुलभुलावणीला आमच्यातले कित्येक शहाणे म्हणविणारे पंडितही फसून भुलून जातात, त्याला कोण काय करणार ?

दुसरें असें कीं, वरीलसारख्या अहिंसेच्या आणि शांततेच्या गप्पा कोणी मारायच्या आणि कोणी सांगायच्या ? आम्हीं ? शेंदाडशिपाई, भागुबाई, आणि पळपुटे बनलेल्या आम्ही त्या गोष्टी करायच्या ? मग रस्त्यावरच्या भणंग भिकाऱ्यानें भगवंताच्या भाग्यलक्ष्मीचा त्याग केल्याचा कां तोरा मिरवूं नये ? एखाद्या तृतीयप्रकृतीच्या पुरुषानें काम जिंकल्याच्या कां बढाया सांगूं नयेत ? अन्नाचे फाके पडणाऱ्या भिकारी गरीबानें उपोषणाचा डौल कां मिरवूं नये ? हें जितकें हास्यास्पद, तितकेंच आमच्यासारख्या नामर्दांच्या तोंडी अहिंसेच्या आणि शांतीच्या गोष्टी हास्यास्पद ठरतात ! अर्थात् " आधीं संपत्ति मिळवा आणि मग खुशाल पाहिजे तर लक्ष्मी चंचल म्हणून तिचा त्याग करा, म्हणजे त्या तुमच्या त्यागाला कांहीं किंमत तरी येईल ! " अशा अर्थाचे विवेकानंद स्वामीजींचे उद्गार आम्ही मागें दिलेले वाचकांच्या स्मरणांत असतीलच. त्यांचा तरी अर्थ हाच आहे ! प्रथम बलसंपन्न व्हा; आणि मग त्या बलसंपन्नतेच्या ऐश्वर्यांत " हत्ती चलत है आपने गतमो " अशा बलवंत गजाच्या शांतगतीनें खुशाल चालून, " कुतर भुकतवाकु भुकवा दे । " अशी मौज जगाला दाखवा ! त्या कुतऱ्यांनीं जशीं दुरूनच मग कोल्हेकुई करावी, त्या हत्तीच्या जवळ जाऊन त्याच्या देहाला स्पर्श करण्याची जशी त्यांची प्राज्ञा नाहीं,—कारण जवळ गेल्यास तो गजराज आपल्या प्रचंड शुंडादंडानें आपणांस तेव्हांच मातीशीं मिळवील ही त्यांची खात्रीच असते,—तीच गत ह्या नोडग्यांची होणार आहे ! किंबहुना, त्या कुत्र्यांची कटकट कायमची बंद पाडायची असल्यास, त्या कटकटीला कंटाळलेला करि, जसा त्यांपैकीं कित्येकांना यमसदनीं पाठवून त्यांचा कांटा काढून टाकतो, तसेंहि आपणांस प्रसंगवशात् करावें लागणार आहे ! पण त्यांत मुळींच पाप नसून, उलट ही त्या दुष्टांवर दयाच आहे असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं !

शिवाय, दुसरीही एक गोष्ट ध्यानांत धरायची ती ही कीं, जगांत असे कांहीं दुष्टप्रकृतीचे प्राणी असतात कीं, दुसऱ्याच्या उपदेशानें, उदाहरणानें, किंबहुना, दुसऱ्याच्या आत्मबलिदानानें सुद्धां ज्यांचा स्वभाव यत्किंचितही सुधारण्याची किंवा त्यांत पालट पडण्याची अथवा बदल होण्याची आशा नाहीं! उदाहरणार्थ, सर्प, विंचु, इ. प्राणी पहा! पण अप्रबुद्ध अशा खालच्या वर्गांतच असे प्राणी असतात, असें नसून मनुष्यवर्गाच्या कोटींत जन्म पावूनही अद्याप आपण त्याच पशु अवस्थेंत आहोंत, आणि आपणांस चुकून हा मनुष्य देह मिळाला आहे, असें आपल्या आचरणानें सर्व जगाला दाखवून देणाऱ्याही कांहीं मानवी अवलादी ह्या पृथ्वीच्या पाठीवर—ह्या भूतलावर—वास करीत असून, अशा तऱ्हेच्या दोन अवलादींशीं आपली प्रस्तुत गांठ पडली असून, ह्या दोन एडक्यांच्या दोन बाजूंच्या धडकीत आज आपली अगदीं दामटी वळायची वेळ आली आहे, हें आम्ही वर सांगितलेंच आहे! अर्थात् अशा स्थितींत कसें वागावें या संबंधींच्या व्यावहारिक धर्माच्या उपदेशांत तुकोबा हेंच सांगतात कीं,— " विंचू देव्हाऱ्यासी आला। देवपुजा नावडे त्याला ॥ एथ पैंजाराचें काम। अधमाशीं तो अधम!॥" अर्थात् हें वर्णन ह्या मूर्तिभंजक आणि मंदिरविध्वंसक अविंधाना किती तंतोतंत लागू पडतें आहे बरें? अर्थात् हाच व्यवहारिक धर्म असून, भीष्माचार्यही युधिष्ठिराला उपदेश करतांना हेंच सांगतात कीं, " बाबारे,— "यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्यः तस्मिन् तथा वर्तितव्यं स धर्मः। मायाचारो मायया बाधितव्यः साध्वाचारो साधुना प्रत्युपेयः॥ "—( शांतिपर्व—महाभारत ). अर्थात् लोकमान्यांची 'प्रतियोगी सहकारिता' ही फक्त राजकारणांतच नसून, धर्मकारणांतही ती तितकीच लागू पडते, हेंच आम्हांस येथें सांगावयाचें आहे! पण त्याचबरोबर, आतांच वर सांगितल्याप्रमाणें, जगांत नितांत दुष्टप्रवृत्तींच्या मानवी पशूंचाही वास आहे, हें विसरून चालणार नाहीं! ता. ४।८।२५ च्या 'केसरींत' रा. ओडलमने हेच सांगतात. ते म्हणतात —" अहिंसा, सत्य, साधुत्व, इत्यादि सद्गुण उदात्त आहेत यांत संशय नाहीं. पण लोकमान्यांनीं म्हटल्याप्रमाणें " जग जर दुष्ट लोकांनीं भरलेलें आहे, 'लुच्चे' लोकांनीं व्याप्त झालेलें आहे....तर हें उदात्त तत्त्व घेऊन काय करणार?" त्याच

'केसरी'त आलेल्या लोकमान्यांच्या ओजस्वी वचनांपैकीं एकांत लोकमान्य म्हणतातः—" हल्लीं आपले दिवस फिरलेले आहेत. आपण साधु जर बनूं तर साधूस योग्य असें जें ठिकाण तेथें म्हणजे स्वर्गास आपणास लवकरच जावें लागेल!" असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशातऱ्हेनें 'साधु' होऊन आपला ह्या जगांत निभाव लागायचा नाहीं. तर ज्याप्रमाणें विंचवाला पायांतला पैंजर काढूनच मारावा लागतो, किंवा 'चांभाराच्या देवाला जशी खेटरांचीच पूजा' बांधावी लागते, त्याचप्रमाणें ह्या अधमांशीं अधमच झालें पाहिजे! त्यांना उपदेश करायला पाहणें किंवा आपल्या आत्मबलिदानानें त्यांना शुद्धीवर आणण्याचा यत्न करणें; हा अशा ठिकाणीं शुद्ध वेडेपणा आहे! कारण, गाढवाला कितीहि अगदीं गंगेत धुतला, तरी तो घोडा होणार नाहीं—त्याचा पुन्हा उकिरडा कायम आहेच! म्हणूनच, हाच दाखला देऊन, तुकोबा पुढें म्हणतात—" तेवि खळां काय केला उपदेश?। नव्होचि मानस शुद्ध त्याचें!॥" सर्पाला किती जरी दूध पाजलें, तरी त्याचें शेवटीं गरळच होणार ना?—आणि तें तुम्हालाच मारक होणार ना? मग त्याचा काय उपयोग? अर्थात् अशाप्रसंगीं त्यांना देहांतप्रायश्चित्ताचीच शिक्षा योग्य होणार आहे, हें उघड आहे! जी गोष्ट विंचुसर्पाची, तीच गोष्ट जवळ जवळ मुसलमानांची आहे, असें म्हणण्यास आम्हांस मुळींच हरकत वाटत नाहीं! हिंदूंनीं कोठवर सहन करायचें? ह्या मुसलमानांच्या दंग्याची कथा प्लेग इतकीच जुनी असून, अलिकडे प्लेग बराच कमी झाला आहे, पण ह्यांचा 'प्लेग' मात्र वाढत्या प्रमाणावर सुरू आहे! अर्थात् मूषकसंहारावांचून प्लेग कमी होत नाहीं, हेंच खरें नव्हे काय? असो. तथापि माणुसकीला जागून, आजवर जरी अक्षम्य अन्यायांचे पापांचे घडे उपरिनिर्दिष्ट दोन अवलादींनीं भरून ठेवले आहेत व त्यासाठीं त्याना जरी जिवंत प्रायश्चित्ताचा पुरेपूर दंड केव्हाही मिळाला तरी योग्यच आहे, तथापि, उदारमनानें आम्ही ह्या दोन्हीही नीच संस्कृतीच्या लोकांना कायमचें आणि बजावून सांगतों कीं, यापुढें जर तुम्ही चांगुलपणानें वागाल तर तुमचे मागील अपराध क्षमून तुमच्याशीं आम्हीही चांगले वागूं. कारण, लक्षांत ठेवा कीं, जगांत हिंदूंच्या इतकी क्षमाशील दुसरी जात नाहीं; तथापि, कोणाच्याही सहनशीलतेला मर्यादा

असते, आणि विशेषत: तेजस्वी वृत्तीचे किंवा परंपरेचे लोक केव्हांना केव्हां तरी, त्या मर्यादेचा पारा पूर्णांशावर चढल्यावर, हातीं तेजस्वी तरवार धारण करून, अशा दुष्टांना देहदंड देऊन, त्यांची रग जिरविल्या-वांचून राहत नाहींत, हा बोध शीखांच्या आणि मराठ्यांच्या, आम्ही मागें दिलेल्या इतिहासावरून लक्षांत घेऊन शहाणपण शिका, मूर्ख-धुंदीनें भ्रमून जाऊं नका,—नाहीं तर त्याचें पुरेपुर प्रायश्चित्त तुम्हांला लवकरच अगदीं इथल्याइथें भोगावयास लागल्यावांचून राहणार नाहीं! कारण "अत्युत्कटै: पापपुण्यैरिहैव फलमश्नुते" असा निसर्गाचा रोकडा सिद्धान्त असून, तो आम्हीं मागें एकदां सांगितलाच आहे! असो.

आमच्या हिंदु लोकांनाही आम्हांला हेंच सांगायचें आहे कीं, लो. टिळ-कांनीं म्हटल्याप्रमाणें व 'चित्रमयजगत्'कार सांगतात त्याप्रमाणें आमच्यां-तून 'चीड' आणि 'वेड' हे शब्दच नाहींसे झाले आहेत, इतकें आम्ही मेषपात्र आणि स्वार्थलोलुप बनलों आहोंत! अन्यायाबद्दल खरी खरी 'चीड' ज्याला येते, आणि कोणच्याही कार्याबद्दल ज्याला रात्रंदिवस 'वेड' लागलें आहे, अशा व्यक्ति आपल्या समाजांत किती बरें साप-डतील? 'शरीरानें तुकतुकीत पण मनानें षढ बनलेल्या' आपल्या भ्रतारांचा भारतीय सती द्रौपदी अधिक्षेप करीत आहे त्याचें कारण हेंच आहे! स्त्रीजातीची अब्रू स्त्रीजातच जाणे! त्या अब्रूवर अंगार ठेवला जात असतां त्यांच्या हृदयाचा कसा संताप होत असेल तें काय सांगावयास पाहिजे? आजही आपल्या भारतीय महिलांचीच नव्हे, तर खुद्द भारतमातेची अब्रू वर सांगितलेल्या दोन अवलादी नानातऱ्हेनें घेत आहेत, हें पाहून आपणांस चीड यावयास नको काय? पण आम्ही वर म्हटल्याप्रमाणें चीड आणि वेड हे शब्दच आमच्या कोशांतून हद्द-पार झाले आहेत! पण कोणचेंहि कार्य ह्या दोन शब्दांच्या जोरावरच होत असतें,—किंबहुना, मानाचें जगणें मरणें त्यावरच अवलंबून आहे! डुकरासारखें जगायचें आणि कुत्र्याच्या मोतीनें मरायचें, ह्यांतच आज आम्हांला धन्यता वाटत आहे! अरेरे, ह्याहून आमचा अध:पात तो कोणचा असणार? भारता, "मुहूर्तं ज्वलितं श्रेयो न च धूमायितं चिरं" ह्या विदुलेच्या, कुंतीच्या,

आणि बायजाबाईच्या उपदेशाच्या आठवणीचा तुला विसर पडला काय ? तुझी धैर्य, शौर्य, तेजस्विता यांची उज्ज्वलपरंपरा विसरून तूं असा नादान कशानें बरें बनलास ? हें तुला मुळींच शोभत नाहीं—" नैतत्त्वय्युपपद्यते " यासाठीं " क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप "—ह्यापेक्षा आम्हीं तरी तुला जास्त काय सांगणार ? ' शठं प्रति शाठ्यं ' च नव्हे तर प्रसंगीं ' लाठ्यं सुद्धां करण्यास चुकूं नकोस, आणि तरवारीशीं तरवार भिडवून, " धर्मासाठीं मरावें " ह्या समर्थांच्या उपदेशाप्रमाणें स्वधर्मासाठीं जिवाची कुर्बान करण्यासही मागेंपुढें पाहूं नकोस ! कारण, पाशवी जगांत पाशवी शक्तिचा उपयोग केला तरच ते पशू आपणांस दबकून वागतात, एवढेंच नव्हे, तर ' लायक ' समजतात, हें विसरून कसें चालेल ? म्हणूनच ' जगत् 'कार ह्या प्रश्नाची छान करतांना जून १९२५ च्या अंकांत म्हणतातः— " स्वराज्याकरतां राजकारणांत पडणाऱ्या देशभक्ताच्या अंतःकरणांत जशी तळमळ लागावी लागते, तशी तळमळ संघटणाच्या आणि शुद्धीच्या बाबतींत उत्पन्न झाली पाहिजे. मुसलमानांना आपण धर्मवेडे म्हणतों; परंतु कोणत्याही गोष्टीचें वेड लागल्याशिवाय हातून कार्य होत नाहीं. मुसलमान धर्मवेडे आहेत म्हणूनच त्यांनीं आपला धर्म जिवंत राखला आहे एवढेंच नव्हें तर आपले धर्मानुयायी वाढविले आहेत. धर्माची आस्था नसण्यापेक्षां धर्मवेडे असलेलें पुरवले. आज आमच्या हिंदुसमाजांत धर्माविषयीं किती आस्था आहे व कितीजणांचीं अंतःकरणें धार्मिक भावनेनें पिळवटून निघत आहेत हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. हिंदुसमाजांतील सुशिक्षित वर्ग धर्माविषयीं पूर्ण उदासीन आहे...आमच्या खालच्या समाजांत धार्मिक भावना आहे; परंतु ती भावना संग्रहात्मक नसून वैयक्तिक आहे. त्यामुळें धर्मरक्षण केलें पाहिजे वगैरे गोष्टी त्यांना समजत नाहींत. याच्या उलट स्थिति मुसलमानांची आहे. त्यांचा धर्म तरवारीच्या जोरावरच वाढला असल्यामुळें खालच्या वर्गापासून वरच्या वर्गापर्यंत धर्मप्रसाराची व धर्मरक्षणाची जाणीव त्यांच्यांत दिसते. त्यांच्यांतील सुशिक्षित वर्ग आपल्याप्रमाणें उदासीन असला तरी धार्मिक विचार मनांत आला कीं, तो खडबडून जागा होतो व राष्ट्रापेक्षां धर्माला अधिक मान देतो. या

कारणामुळें मुसलमानांच्या चळवळी यशस्वी होतात व आमच्या चळवळी फसतात. ( यावरून ) आमच्या चळवळींत धर्माविषयीं श्रद्धा व कळकळ असणारा वर्ग पडल्याखेरीज संघटण किंवा शुद्धि यांना यश प्राप्त होणार नाहीं हें उघड दिसतें." ( स्फुट विचार. ) असो.

पण त्याचबरोबर आम्हांस हेंहि येथें सांगितलें पाहिजे कीं, मुसलमानांच्याप्रमाणें तरवारीच्या जोरावरच काय, पण खिश्चन मिशनऱ्यांप्रमाणें लांचलुचपत, भुलभुलावणी, किंवा प्रसंगांत सांपडल्याचा पराधीनपणा, यांच्या जोरावरही आम्हांस आमचा धर्म मुळींच वाढवायचा किंवा जगवायचा नाहीं. कारण, तसें करणें महत्पाप आहे. शिवाय तत्वज्ञान, भक्ति, आणि आचार ह्या तिहींतही आमचा धर्म अत्यंत उच्च असून, जगांतील सर्व धर्मांचा तो मुकुटमणि होऊन राहिला असल्यामुळें, व म्हणूनच त्याची संस्कृति अत्यंत उच्च असल्यामुळें, त्याला वरीलसारखे प्रकार करण्याची जरूर तर नाहींच; पण कधीं करावेंसेहि वाटणार नाहींत ! ज्यांची संस्कृति हीन असेल, ज्यांचें तत्त्वज्ञान हिणकस असेल, ज्यांची भक्ति थोतांड असेल, व ज्यांचा आचार दांभिक असेल, जे परधर्मासहिष्णु असतील, जे उंबरातले कीटक असतील, व जे जीवैक्यभावनेला आणि हृदयाच्या कोमलवृत्तीला पारखे झाले असतील—त्यांनींच त्या गोष्टी कराव्या आणि तेच त्या गोष्टी करतातही ! पण ह्या गोष्टी आम्ही न केल्या, आघात आणि चढाईचें ( offensive ) कार्य आम्ही केलें नाहीं, तरी प्रत्याघात आणि आत्मरक्षणाचें (defensive) कार्य आम्हांस केलेंच पाहिजे; कारण आम्हांस इतराप्रमाणेंच जगायचें आहे, नव्हे,—तो आमचा जन्मसिद्ध हक्क आहे आणि त्यासाठीं झगडणें आमचें काम आहे ! पण आम्हांस नुसतें जगायचें आहे, एवढेंच नव्हे, तर जगून शक्यतर आमच्या उच्च संस्कृतीचा आदर्श उघड उपदेशानें-( जुलूमजबरदस्तीनें नव्हे )—व आमच्या सक्रिय आचरणानें जगापुढें ठेवून, जमल्यास हें जग सुधारावयाचें आहे ! अशा तऱ्हेचें ईश्वरप्रेरित उच्च कार्य आमच्या वेदांतधर्माच्या भविष्यकालीन भाग्यांत असून आमचा भविष्यत्काल आशेच्या आणि ईश्वरी आदेशाच्या उज्ज्वल मेघखंडांनीं सुरंजित झाला आहे ! स्वामी विवेकानंदांचे ह्या अर्थाचे उद्गार आम्ही मागें दिलेले वाचकांना स्मरत असतीलच;

आणि त्यांचे शब्द केव्हांही खोटे होणार नाहींत! पण आज आमची काय स्थिति आहे? तें भविष्यत्कालीन उज्ज्वलकार्य तर राहोंच, पण खुद्द आत्मरक्षण करून जगावें कसें, ह्याचासुद्धां आज आम्हांस विसर पडला आहे! आणि त्याचीच जाणीव देण्याकरितां आम्ही वरील सर्व उपदेश लिहिला आहे! असो.

अहिंसेवर आणि शांतिच्या मुद्यावर इतकें विवेचन झाल्यावर, त्यांच्याप्रमाणेंच संघटनेविरुद्ध पुढें सारला जाणारा तिसरा प्रश्न जो ऐक्याचा—म्हणजेच हिंदुमुसलमानी ऐक्याचा—तो त्या दोन मुद्याइतकांच चुकीचा आहे हें वेगळें सांगवयास पाहिजे काय? तथापि सामान्य बुद्धीच्या माणसाची समजत पडायला चार शब्द लिहूं या! 'हिंदुमुसलमानांच्या ऐक्याला हें तुमचें हिंदूचें आपापसांतलें संघटण विरुद्ध आहे, तेव्हां तें तुम्ही करूं नका" असें मोठें गंभीरपणानें प्रतिपादन करण्यांत येतें! पण या खुळचट शंकाबाजांना आम्ही असें विचारतों कीं ऐक्य, म्हणजे दुसऱ्याच्या पोटांत आणि गोटांत जाऊन होणारें तर ऐक्य नव्हे ना? तसें जर ऐक्य असेल, तर मग उद्यां तुम्हीं आपलें घरदार त्या अविंधांच्या हवालीं करा, तुमच्या बायकामुली त्यांच्या गोटांत नेऊन घाला, तुमचे गायी बैल त्यांच्या जिव्हालौल्यशमनार्थ त्यांना अर्पण करा, आणि स्वताच्या धर्मावर तिलांजलि देऊन, इस्लामीधर्माचा स्वीकार करून मंदिरांचा विध्वंस आणि मूर्तिभंजन करून त्या जागीं एकजात मशिदी उभारण्यास त्यांस मदत करा. आणि ह्या राष्ट्राचेंहि नांव बदलून उद्यां जाहीर कॉंग्रेसमध्यें 'हिंदुस्थान'च्या ऐवजीं ह्यास आजपासून 'यवनस्थान' असें नांव ठेवलें आहे, असें मोठ्या गंभीरपणें जाहीर करून, त्याप्रमाणें इतर सर्व राष्ट्रांना तारा ठोका! आजपासून तीन हजार वर्षेंच नव्हे तर त्याहूनही अधिक काल चालत आलेल्या आमच्या आर्यधर्माचा, आर्यसंस्कृतीचा त्याग करून, आम्हीं सर्वप्रकारें मुसलमान झालों आहोंत, असें बेशक सर्व जगाला सांगत सुटा! असा प्रकार करण्याची तुमची तयारी आहे काय? असेल तर तुम्ही अस्सल बीजाचे हिंदूच नव्हेत! एवढेंच आम्ही म्हणूं. कारण कोणीही अस्सल बीजाचा हिंदु असें म्हणण्यास तयार होणार नाहीं—म्हणणार नाहीं! आणि तुम्हीही जर तसें म्हणत नसाल—"अहो,

आम्ही कधीं असें करा म्हणून म्हटलें?'' असें जर तुमचें कचरलेलें आणि चरकलेलें मन बोलत असेल तर—'' मग चालू आहे हा प्रकार कशाचा द्योतक आहे ? मांजर जसें उंदराला गट्ट करून दोघांचें 'ऐक्य' करूं पाहते, तशांतलाच हा प्रकार मुसलमानांनीं आरंभला नाहीं काय ? आम्ही कधीं आपण होऊन यांच्या पवित्र मशिदींचा विध्वंस, ह्यांच्या मिरवणुकींवर हल्ले, यांचीं बायकापोरें पळविणें, किंवा जुलमजबरदस्तीनें यांना स्वधर्मात घेण्याचा प्रयत्न, यांपैकीं कांहीं प्रकार, आणि तेहि यांच्या तिप्पट आमची संख्या असूनही, कधीं केलें आहेत काय ? मग ह्यांनीं हें प्रकार कां करावेत ? '' असा आमचा उलट रोकडा सवाल आहे ! भिन्नशील, भिन्नसंस्कृति, भिन्नव्यसन, किंबहुना, भिन्न शक्तिच्या माणसांचे कधी जगांत ऐक्य उर्फ सख्य झालेले कोणी कधीं पाहिलें आहे काय ? अर्थात् एक त्यांनीं तरी आमच्या उच्च संस्कृतीचा अंगीकार करून, किंवा निदान दोघांवरहि आलेल्या व दोघावरूनही सारख्याच फिरणाऱ्या परकीय दास्याच्या वरवंट्याला ओळखून, शांत सहिष्णुतेचा व खऱ्या सहकार्याचा हात पुढें केला पाहिजे, म्हणजे उदारहृदयी व परधर्मसहिष्णु अशा हिंदूंचा हात सदैव तो स्नेहानें आपल्या हातांत घेण्यास तयारच आहे; किंवा, आम्ही तरी आत्मसंघटण करून त्यांच्या पाशवी शक्तीच्या हातांत आमचाही पाशवी शक्तीचाच हात दिला पाहिजे एक, तरच हें ऐक्य होणें शक्य आहे; दुसरी ह्याला तोडच नाहीं, हें आतां उघड होत नाहीं काय ? असो.

याप्रमाणें संघटनेविरुद्ध येणाऱ्या आक्षेपांचा समाचार घेतल्यावर आम्हांस शेवटीं हिंदुमात्रांना हेंच सांगायचें आहे कीं, तुम्ही अवश्य ह्या संकटकाळीं संघटण करा, व इतके बलवान् बना कीं,— ''हुंकारेणैव धनुषः स हि विघ्नानपोहति '' ह्या दुष्यंतास लावलेल्या वचनाप्रमाणें तुम्हांसहि प्रत्यक्ष बाण कधीच टाकण्याचा प्रसंग न येता नुसत्या आपल्या धनुष्याच्या प्रत्यंचेच्या टणत्कारानें विघ्नें 'दुरीच्या दुरी' पळालीं पाहिजेत ! पण त्याचबरोबर हिंदुमात्राचें खरें, कायमचें, व सदैव परिणामकारक असें ऐक्य उर्फ संघटण कशानें होईल तेंहि आम्ही मागें सांगितलें आहे, त्याचाहि विसर पडूं देऊं नका, एवढीच

आमची तुम्हांस विनंति आहे ! कारण, तात्कालिक संघटण म्हणजे वर्षभर खेळून परीक्षा जवळ आली म्हणजे चहाच्या डोसावर रात्रींची जाग्रणें करून अभ्यासाचा ढीग पाडायचा, व परीक्षा झाली कीं त्या चहाच्या डोसांच्या व जाग्रणाच्या ताणानें निस्सत्व झालेल्या शरीरानें आजारी पडायचें, अशांतला प्रकार आहे ! दारूचे ग्लास झोकून जिवापाड काम केल्यावरही मागून मेंदूला व शरीराला असाच थकवा येत असतो ! चहाबाजीचा अनुभवही असाच आहे ! पण ह्या दोन्हीही क्रिया जशा निसर्गास धरून नाहींत, तसेंच वरील संघटण हें तात्कालिक असल्यामुळें चिरस्थायी स्वरूपाचें नव्हे ! पण तेंच दमदारपणें वर्षभर व्यवस्थित अभ्यास करणाराला, किंवा नैसर्गिक खाद्यपेयव्यायामानें आपली काया गुटगुटीत ठेवणाराला, ज्याप्रमाणें ऐन प्रसंगीं वेगळ्या कृत्रिम साहाय्याची जरूर न लागतां, अगदीं सहज लीलेनें तो पुढें आलेलें कार्य उडवून देतो, त्याचप्रमाणें अध्यात्मिक भावनेच्या खऱ्या भरभक्कम पायावर उभी राहिलेली चातुर्वर्ण्याची संघटित संस्था, हीच कोणच्याही संकटांना सहज लीलेनें उडवून देत असते—तिला वेगळें श्रमच करावें लागत नाहींत—हें न विसरतां, ती आपली पहिली स्थिति कशी प्राप्त होईल—त्या नैसर्गिक क्रमांस आपण कधीं आचरूं—इकडेहि ध्यान ठेवा म्हणजे झालें ! असो.

यानंतर राहिलेल्या चालू काळांतील प्रश्नांचा विचार आतां आपण पुढील भागांत करूं या.

# भाग १९ वा.



गेल्या भागांत शेवटचा प्रश्न संघटणाचा घेतला असून तो आम्ही यथास्थित प्रतिपादिला आहे. तथापि त्यांत शेवटीं एक गोष्ट सांगायची राहिलीच; ती फार उद्बोधक असल्यामुळें येथें आधीं सांगून मग आपण दुसऱ्या प्रश्नाकडे वळूं. ती गोष्ट म्हणजे आत्मरक्षणासाठीं ह्या 'टवाळ' जगांत साधूनेंसुद्धां जगायचें असेल, व उगाच हाल करून घ्यायचे नसतील, तर कसें वागावें याबद्दलची आहे. 'रामकृष्णवाक्सुधेंत' ही आलेली आहे. रामकृष्ण परमहंसांनीं एकदां अशाच तऱ्हेचा प्रश्न निघाला असतां त्यावर खालील उद्बोधक गोष्ट सांगितली. ते म्हणाले:—" एका सापाला एका साधूनें गरीब होण्याचा उपदेश केला. सापाच्या मनावर तो ठसून त्याप्रमाणें वागण्याचें त्यानें कबूल केलें. पुढें तो साधु निघून गेल्यावर तो साप त्या साधूच्या उपदेशाप्रमाणें अगदीं गरीबासारखा एका पाराखालीं स्वस्थ पडून राहिला ! कोणी जवळ आल्यास तो नुसता फुस्ही करीना ! त्याचा हा स्वभाव लवकरच ओळखून दुष्ट लोकांनीं आणि टवाळ मुलांनीं त्याला त्रास देण्यास सुरवात करून, त्याला अगदीं जीव नकोनकोसा करून सोडलें ! कोणी त्याची शेपटीच ओढी, तर कोणी दगडच मारी, तर कोणी त्याला काट्याकुट्यांतून फरफटत ओढी! याप्रमाणें बिचाऱ्याची अगदीं दैना होऊन त्याचें अंग जागोजाग रक्तबंबाळ झालें व त्याच्या हालाला सीमा उरली नाहीं—' त्याचे हाल कुत्राही खाईना ! '—तथापि त्या गरीब बिचाऱ्या सापानें त्या साधूच्या उपदेशाकडे लक्ष देऊन तितकेहि सर्व हाल सहन केलें व तो तसाच जीव धरून राहिला. ( त्याचें भाग्यच म्हणायचें कीं, कुणी त्याला त्या अवधींत ठार केला नाहीं ! )—पुढें कांहीं दिवसांनीं तो साधु परत त्याच मार्गानें जात असतां, आपल्या सापाची हालहवाल आतां कशी काय आहे ती पहावी, म्हणून त्या पाराखालीं आला. पण पाहतो तों काय ! त्या सापाची 'हवाल' कांहीं नसून 'हाल' मात्र अत्यंत झालेले त्याच्या शरीरावरूनच दिसत होते ! साधूनें विचारलें, " हें रे काय वेड्या ! असें रे कशानें झालें ! " त्यावर साप त्या साधूला वंदन करून म्हणाला—

" महाराज, हा सर्व आपल्याच उपदेशाचा प्रताप! आपण मला गरीब ' साधु ' व्हायला सांगितलें, तेव्हांपासून मी आपल्या उपदेशाप्रमाणें अगदीं हूं का चूं न करतां पडून आहे, आणि त्याचें फळ म्हणून मी सध्यां ' स्वर्ग ' लोकाची वाट धरण्याच्या तयारींत आहे हें तुम्ही प्रत्यक्ष पाहतांच आहां, यापेक्षां अधिक काय सांगूं ? " सापाचें तें उत्तर ऐकून साधूला त्याच्या भोळ्या खुळेपणाचें हसूं आलें, व त्याच्या दैन्यावस्थेची कींवही आली; म्हणून आधीं आपल्या अमृतकरानें त्या सर्पाची सर्व दुःखें हरून, ते त्याला पुढें हंसून म्हणाले—"अरे वेड्या, मी तुला साधु व्हायला सांगितलें, मनांतल्या सर्व दुष्ट वासना काढून टाकायला सांगितलें, ज्याला त्याला दंश करण्याची प्रवृत्ति टाकून द्यायला सांगितली, म्हणजे कोणी तुला त्रास द्यायला आला तर नुसतें 'फुस्' सुद्धां करूं नकोस, असा कां त्याचा अर्थ झाला ? या टवाळ जगांत अशा भलत्याच गरीबीनें कसा निर्वाह लागेल ? बरें, झालें तें झालें! आतांतरी पुढें लक्षांत ठेव कीं, आपण जरी कोणाला दंश केला नाहीं तरी आपणांला उगाच कोणी त्रास द्यायला जवळ आल्यास 'फुस्' केल्यावांचून राहावयाचें नाहीं. अरे, तुझें सामर्थ्य इतकें अलोट आहे कीं, तुझ्या नुसत्या ह्या 'फुस्' कुलीनें-सुद्धां मोठमोठ्या मर्दांनींही मागें सरावें—त्या तूं आपले असें हाल उगाच करून घेतलेस! असो. यापुढें तरी तूं मी, वर सांगितल्याप्रमाणें साधुत्व न सोडतां सावधपणानें वाग, म्हणजे कोणीही तुझ्या वाटेस जाणार नाहीं!" असें सांगून तो साधु निघून गेला; आणि झालेंहि तसेंच! तेव्हांपासून त्या सापानें एकदोनदां 'फुस्' केल्यापासून कोणीहि त्यास त्रास देईना व त्याचा काळ आनंदांत जाऊं लागला!" ही समग्र गोष्टच्यागोष्ट हिंदूंच्या प्रस्तुत परिस्थितीला कितीं तंतोतंत लागूं पडते आहे तें वेगळें सांगावयास पाहिजे काय ? यासाठीं आमचे हिंदूंना हेंच सांगणें आहे कीं, त्या सापाप्रमाणेंच तुमचाहि यापुढचा काळ आनंदांत जावो म्हणजे झाले! तसा तो जाण्याची तुम्ही खबरदारी घेतलीत तरच ही गोष्ट ऐकल्याचें तुम्ही सार्थक केलें असें होणार आहे, हें उघड आहे! असो. आतां आपण दुसऱ्या प्रश्नांकडे वळूं.

यापुढें विचार करावयाचे प्रश्न आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीचे आहेत.

आतांपर्यंत विचार केलेल्या प्रश्नांतही कित्येक प्रश्नांत ही आत्मदृष्टि होतीच. उदाहरणार्थ अस्पृश्यता, जातिभेद, शुद्धिसंघटण हे मुद्दे पहा. तथापि ते केवळ आत्मनिरीक्षणाच्याच दृष्टीनें लिहिले नसून त्यांपैकीं कांहींत परक्यांचाहि संबंध येत होता, म्हणून त्या दृष्टीनेंहि त्यांचा विचार करणें भाग होतें. आणि अगदीं निव्वळ आत्मनिरीक्षणाचीच दृष्टी लागेल असे प्रश्न या द्वैती जगांत थोडेच आहेत! या जगांत पाऊल टाकल्यापासून द्वैतालाच सुरवात होते—आपण व आपल्या भोंवतालची परिस्थिति हेंच तें द्वैत होय! अर्थात् " सर्वं खल्विदं ब्रह्म " अशी भावना होऊन आपण परत त्या ऐक्यांत मुरेपर्यंत " द्वैत दृष्टीचे उमाळे " हे सारखे सुरूं राहायचेच! अर्थात् साधारणपणें कोणच्याही प्रश्नाचा विचार एकदां परिस्थितीच्या दृष्टीनें तर एकदां आत्मदृष्टीनें करावा लागतो, हें उघड आहे. पैकीं, मद्यपान व गोहत्या यांचा विचार आपण, आपला ख्रिश्चन धर्माशीं अथवा तद्धर्मीयाशीं जो प्रस्तुत संबंध जडला आहे, त्या दृष्टीनें मागें केलाच आहे. आतां आपण हे दोन्हीच नव्हेत, तर इतरही कित्येक प्रश्न आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीनेंच विचारास घेऊं! कारण, हिंदुधर्म एकेकाळीं कसाहि असला, त्यानें कितीहि दिग्विजय गाजविले असले, तरी त्या पूर्वजांच्या पुण्याईच्या यशस्तोत्रावर आणि गुणगानावर आपले भागणार नसून, आपली व आपल्या धर्माची हल्लीं स्थिति काय आहे हें अवश्य पाहिलें पाहिजे! कारण स्वतः अधःपाताच्या पंकांत रुतत असतां, तोंडानें केवळ पूर्वजांच्या पुण्याईच्या आणि पराक्रमाच्या गप्पा सांगणारा मूर्ख होय, ह्यांत शंका नाहीं! " सांगे वडिलांची कीर्ति । तो एक मूर्ख ॥ " हें समर्थवचन ह्याच अर्थाचें आहे! " किं जन्मना च महता पितृपौरुषेण । शक्त्या हि याति निजया पुरुषः प्रतिष्ठाम् ॥ " ह्या संस्कृत ओळीही हेंच सांगतात. असो. तर ह्या दृष्टीनें आत्मनिरीक्षण करणें अत्यंत जरूरच नव्हे, तर अपरिहार्य आहे पण तें निरीक्षण केवळ दुःखानें, खेदानें, निराशेनें, आणि विषण्ण चित्तानें हात पाय गाळून बसण्यासाठीं नसून, आपटलेला चेंडू जसा उशी घेऊन पुन्हा वर येतो, किंवा ' तोडलेला तरु ' जसा पुन्हा अधिक जोरानें आणि जोमानें वाढतो, अर्थात् त्या चेंडूमध्यें जी उसळीची शक्ति ( Elasticity ) आहे, व त्या

वृक्षांस आंतून जो जीवंत चिवटपणा आहे, तीच शक्ति आणि तोच अंतर्यंत जिवंतपणा ह्या हिंदुधर्मांतही असून, मातीच्या गोळ्याप्रमाणें कायमचें पडून न राहतां त्या चेंडूप्रमाणें पुनः उसळी मारून वर येण्याचें, किंवा त्या वृक्षाप्रमाणेंच पुन्हा नव्या नवाळीनें भरारून वाढण्याचें, किंवा फीनिक्सपक्षाप्रमाणें स्वताच्या राखेंतून बाहेर पडण्याचे सामर्थ्य ह्या हिंदुधर्माचे ठायी असून, त्याप्रमाणें तो पुन्हां आपल्या उज्ज्वल स्वरूपानें प्रगट झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं—ह्या आशामय भावनेसाठीं व अर्थात् त्याप्रमाणें आचरण करण्यासाठींच हें पुढचें निराशामय आत्मनिरीक्षण आहे हें सर्वांनीं लक्षांत ठेवावें! कारण, 'निराशेच्या पोटींच देवी आशेचा जन्म' असून, स्वतःच्या परिस्थितीची तीव्र आणि जळजळीत जाणीव झाल्याशिवाय आणि विजेच्या झटक्यासारखें विचाराचें झटकेच नव्हेत, तर चटकेहि बसल्याशिवाय, कोणचाहि अधःपतित समाज शुद्धीवर येऊन सुधारत नसतो! अर्थात् अशा तऱ्हेचे प्रयत्न चालू काळांत आजवर कित्येक झाले आहेत; पण अजूनही कित्येक व त्याहून जोरदारपणें व्हावयास हवे आहेत—किंबहुना, त्या विचारांच्या अखंड परंपरेची ज्योत कायम ठेवण्यास जागोंजागीं ठाणवया मांडिल्या पाहिजेत! त्या विचारांची मशाल अगदीं खेड्यापाड्यांतूनसुद्धां सारखी पोंचत आणि फिरत राहील असे प्रयत्न व्हायला हवे आहेत! लोकजागृतिच्या गंगेचा प्रवाह देशाच्या शेंवटच्या टोकापर्यंत जाऊन पोंचून त्यात सर्वांनीं सुस्नात झालें पाहिजे, नव्हे, त्यांना आपण केलें पाहिजे! त्या विचारगंगेच्या प्रवाहांत आमच्याकडून यथामति आणि यथाशक्ति प्रस्तुतग्रंथरूपानें कांहीं अंजली आम्ही वहात आहोंत; त्यांतल्याच पुढील ओंजळी आहेत! अस्तु.

वर सांगितलेंच आहे कीं, आपला समाज आणि त्यांतील धर्मानुयायी म्हणविणारे लोक यांची स्थिति इतर बाबतींप्रमाणेंच धार्मिक बाबतींतही सध्यां अत्यंत खालावलेली आहे; मुळाला पाणी घातलें नाहीं म्हणजे तो वृक्ष वठत जातो. धार्मिक बाबत ही समाज वृक्षाचें व राष्ट्रवृक्षाचें मूळ आहे. कोणच्याहि काळीं काय, किंवा कोणच्याहि देशांत काय, हा धर्मच समाजवृक्षाचें आणि राष्ट्रवृक्षाचें मूळ असतो!

म्हणूनच— "धारणाद्धर्ममित्याहुः" अशा तऱ्हेची त्याची व्याख्या भीष्माचार्यांनीं महाभारतांत सांगितली आहे, ती किती साहजीक आहे बरें ? पण त्या मुळालाच पाण्याचा पुरवठा जर व्हावा तसा झाला नाहीं, किंवा, जो थोडाबहुत होतो तोहि जर सामान्यतः खराब. पाण्याचाच झाला, तर तें झाड जगणार तरी कसें ? दिवसेंदिवस खंगून वठण्याच्या पंथास तें लागावें हेंच साहाजिक नव्हे काय ? त्या झाडाच्या फांद्यांवर व पानांवर वरवर पाणी शिंपडून तो वृक्ष पुन्हा जोरानें फोफावेल, अशी कांहीं सुधारकांची खुळी समजूत आहे ! पण ती अर्थात्च चुकीची असून, "स्त्रिया, मुलें व शूद्र ही राष्ट्रीयवृक्षाचीं मुळें होत!" हें रामतीर्थ स्वामीजींचें वचन या कामीं कोणासही मार्गदर्शक व्हावें अशाच तोडीचें आहे ! पण तिकडे पाहतों कोण ?

धर्म म्हणजे बंध किंवा मर्यादा असेंहि म्हणतां येईल ! आपल्या खाण्यापिण्यांत, आपल्या वागण्यासवरण्यांत, आणि आपल्या आचारविचारांत, एकप्रकारचा बंध, मर्यादा, किंवा नियम असायला पाहिजे, आणि यालाच धर्म असें म्हणतां येईल. समुद्र आपली मर्यादा कधींही उल्लंघित नाहीं; चंद्र, सूर्य, तारे, ठराविक गतीनें आणि ठराविक मार्गानेंच उदयास्त पावतात; वृक्ष सुफलित होतात, जल वाहतें, तेहि एका ठराविक नियमानें, किंबहुना, पंचमहाभूतें हीं साधारणतः ठरलेल्या नियमानेंच वागत असतात. त्यांपैकीं कोणीहि मर्यादेचें उल्लंघन केल्यास आपण 'प्रलयकाळ' म्हणजेच सृष्टीचा नाशकाळ जवळ आला असें म्हणतों ! पण त्याच पंचमहाभूतांच्या एकत्रितकरणानें बनलेला मानवाचा देह मात्र त्या बंधनाप्रमाणें क्वचितच राहतो. त्याला ती नैसर्गिक व ईश्वरदत्त बंधनें—म्हणजेच धर्म—झुगारून देऊन "मनः-पूतं समाचरेत्" असें वागावेंसें वाटतें ! पण हें उचित आहे काय ? ईश्वरानें दिलेल्या बुद्धीचा हाच कां उपयोग ? आहार, निद्रा, भय, आणि मैथुन ह्या बाबतींत पशुप्रमाणेंच आपण वागणूक ठेवली तर आपणही शिंगें व शेपूट नसलेलें पशूच होणार नाहीं काय ? पण 'पशू' म्हटलें असतां कोणासही राग येतो, याचें कारण काय बरें ? हेंच कीं, त्याच्या हृदयाच्या हृदयांत "मानवी जात ही पशूंच्या वरची पायरी आहे, पशूंना जो वरील चारी गोष्टींत

विचार व धर्म नाहीं, म्हणजेच बंध नाहीं, तो मनुष्याला आहे " ह्या विचाराची जाणीव असते ! पण ह्या नुसत्या जाणीवेचा काय उपयोग ? प्रत्यक्ष व्यवहारांत म्हणजेच, जगांतल्या वागण्यांत, तो जर त्या जाणीवेला विसरून अथवा दाबून, हृदयाच्या सातव्या पडद्यांतून सदसद्विवेकाचा सूक्ष्म ध्वनि आपल्या कानावर येऊन आदळूं नये म्हणून त्या हृदयकपाटाचीं सर्व द्वारें बंद करून, आणि चंचल आणि मर्कटसदृश मनाच्या आधीन होऊन, वाटेल तसा वागूं लागला, आपले आहारविहार आणि आपले आचारविचार यांत जर त्यानें कांहींच ताळतंत्र ठेविला नाहीं, तर तो पशूच नव्हे काय ? हीच गोष्ट " आहारनिद्राभयमैथुनं च सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् । धर्मोहि तेषामधिको विशेषो धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ।। " ह्या अत्यंत महत्त्वाच्या संस्कृत वचनांत आलेली असून कै. न्या. रानडे यांनींहि आपल्या ईशतत्वनिर्णयावरील व्याख्यानांत त्याचें फार सुंदर उद्‌घाटन केलें आहे. ते म्हणतात–" आहार, निद्रा, भय, आणि विषयोपभोग किंवा स्त्रीसंग ह्या गोष्टींमध्यें मनुष्य आणि पशू ह्यांच्यांत कांहींच भेद नाहीं. भोग्यवस्तुप्रकार मात्र निराळा. विचार करण्याची शक्ति मनुष्याला असून तिचा उपयोग केला नाहीं तर पशूंमध्येंच त्याची गणना होईल. ही विचारशक्ति वरच्या चार गोष्टीच जास्त वाढवील असल्या मार्गाकडे वळली तर तो पशूंत उत्तम पशू होईल इतकेंच ! " ( वे. नि. पा. १०४ ) असो. पण याप्रमाणें ' पशु ' म्हणून म्हणवून घ्यावयास नको, पण आचरण मात्र वरील चारीही गोष्टींत पशुंवत् करायला पाहिजे, असाच याचा अर्थ होत नाहीं काय ? आज समग्र हिंदुस्थानभर दृष्टी फेका, म्हणजे, वाचक ! तुम्हांला काय दिसतें ? दारूबाजी, रंडीबाजी, जुव्वेबाजी उर्फ रेसेस, कज्जेदलाली अथवा सत्यामलाप किंवा असत्यार्थ कज्जेबाजी, आणि हिंसात्मक मांसाहार, ह्यांतील एक दोन, तीन, किंवा चारीहि व्यसनांनीं आणि अनीतीच्या पापकर्दमानें वरपासून खालपर्यंत समग्र समाज—त्या समाजांतील प्रत्येक थर—लँडबडलेला तुम्हांला दिसत नाहीं काय ? मनूनें मनुस्मृतींत सांगितलेलीं पंचमहापातकें हींच नव्हेत काय ? आणि त्या पापकर्दमांत आमचा समाज रुतून—खचून—आणि बुडून बसला असतां

त्याबद्दल कोणाच्याहि मनाला तिळमात्र शरम न वाटतां, उलट मिटक्या मारीत आम्ही बेडकाप्रमाणें तो चिखलच खात आहोंत, आणि कमलांतील मकरंदाचा आस्वाद मिळाल्याचा आनंद मानीत आहोंत ! हर ! हर ! कोण हा आमचा अधःपात ! वाचक ! आमच्या ह्या म्हणण्याची सत्यता तुम्हाला घरच्या घरीं गाद्यागिरद्यांवर लोळून कदाचित् होणार नाहीं; पण जरा आपल्या घराबाहेर पडा व आपल्याभोंवतीं वरील व्यसनांच्या हडळींचा कसा नंगा नाच सुरू आहे तो पहा, म्हणजे तुमची तुम्हालाच शरमेनें मान खालीं घालावी लागेल ! दारूच्या गुत्त्याजवळ उभे राहून त्या दारुबाज हिंदूंची कर्कश दंगल ऐका व त्यांचें तें धुंद मस्तक पहा; कोर्टांत जाऊन गळ्यामध्यें रुद्राक्षमाळा किंवा तुळशीची माळ घालून शपथेवर खोटें सांगणारे वारकरी, पुजारी, पुराणिक व इतर लोक पहा, आणि स्वतःचे दीडदमडीचें पोट जाळण्यासाठीं त्या पक्षकारांच्या चार दिडक्यांवर त्यांच्या असत्पक्षाचें भांडण भांडणारा उच्चवर्गीय वकीलसमाज पहा; रेसकोर्सच्या भव्य मैदानावर जाऊन उभे राहा आणि आधुनिक ‘ युधिष्ठिरां’चे जुव्वेबाजीचे खेळ पहा; मुंबईच्या डंकन रोडनिवासी अखंड सौभाग्यवतींच्या किंवा ‘ सफेत गल्लीं’तल्या सफेत देहाच्या वारांगनांच्या किंवा पुण्याच्या बावनखाणींतल्या बाजारबसव्यांच्या महालांतून रात्रौ लोळणारे तरुण व मध्यम वयस्क शेटसावकार पहा;— हा समग्र देखावा डोळ्यापुढें आणा, आणि त्यांतच कोंबडी किंवा कोंबडीचीं अंडीं खाणारे, मासे खाणारे, इतकेंच नव्हे, तर त्या माशांना ‘ पाणशेंगा ’ म्हणून यथेच्छ मत्स्याहार करणारे, लोकांचें चित्र रेखाटा, म्हणजे हा समाज हिंदूंचाच आहे काय ? अशी तुम्हांला शंका आल्यावांचून खास राहणार नाहीं ! असो.

आमच्या पूज्यपाद ऋषींनीं आम्हांस लावून दिलेल्या चतुराश्रमांचा विचार केला तरी त्यांचीही अशीच वाताहात झालेली तुम्हांला दिसून येईल ! ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, व संन्यास हेच ते चतुराश्रम होत ! मानवी आयुष्याचे कलियुगींचें परिणाम शंभर वर्षांचें धरूनच ह्या आश्रमाच्या चार पायऱ्या उत्तरोत्तर चढत्या वाढत्या प्रमाणांत आपल्या पुण्यपाद ऋषींनीं व मनुसारख्या शास्त्रकारांनीं लावून दिलेल्या आहेत, आणि यद्यपि अलिकडे हें आयुष्यमान कमी झालेलें आहे तथापि पन्नास

मासून शंभर वर्षेपर्यंत जगणारीं वृद्ध खोडेंहि कांहीं आपल्या समाजांत थोडीं थोडकीं नाहींत. पण त्यांच्याकडे दृष्टिक्षेप केल्यास आपणांस काय दृष्टीस पडतें ? पहिली भार्या मृत झाली असल्यास कोणी वृद्ध जांबुवान 'शारदें' तले श्रीमंत बनून कोंवळ्या १०–१२ वर्षें वयाच्या पोरींच्या गळ्यांत अगदीं साखसुरत लग्नविधीनें मिठ्या मारूं पाहतात, तर कोणी रंगेल गुलहौशी ही लग्नाची पिरपिर पुन्हां नको आणि वरील 'श्रीमंतां' चें होणारें हंसूही नको, म्हणून बेशक वारांगनेच्या महालाचा—वानप्रस्थाश्रमाचा नव्हे—आश्रय करतात, किंवा घरींच एखादें 'उपवस्त्र' ठेवून देतात ! काय करतील बिचारे ! पहिली बायको मृत झाल्यामुळें उघड्या पडलेल्या अंगाला कामज्वराची हुडहुडी भरल्यावर एखाद्या उपवस्त्राच्या गुडगुडीवांचून ती थंडी कशी नाहींशी होणार ? बरें; हे दोन्हीही प्रकार न करता जे वृद्ध राहतात त्यांची तरी काय स्थिति असते ? ह्या संसारापासून निवृत्त होऊन, अर्थ आणि काम ह्या पुरुषार्थ प्राप्तीची आपली मर्यादा संपली म्हणून ती गोष्ट सर्वस्वीं आपल्या कर्त्या संतानावर सोंपवून, चारी आश्रमांत आचरावयाच्या व आतां मुख्यत्वें व सर्वस्वेंकरून आचरावयाच्या धर्म आणि मोक्ष ह्या पुरुषार्थाचा ते अवलंब करतात काय ? व त्यासाठीं जरूर त्या वानप्रस्थ व संन्यास ह्या आश्रमांचा ते स्वीकार करतात काय ? वाचकांनीं आपल्या आवतींभोंवतीं दृष्टी फेकावी, म्हणजे त्यांच्या दृष्टीच्या टप्यांत येणाऱ्या हजारोंच नव्हे, तर लाखों लोकांतून, किंबहुना, कोट्यावधि जनतेंतून ह्या दिव्य आश्रमांचा अवलंब करून स्वताचा, स्वतःच्या समाजाचा, आणि स्वतःच्या राष्ट्राचा उद्धार करणारी—किंवा त्या कामीं हातभार लावून आपलें सर्वस्व कायावाचामनानें त्याला वाहणारीं अशीं नररत्नें जी पूर्वींच्या काळीं शेकड्यानें मोजतां येत होतीं, तींच आतां हातापायांच्या बोटांवर मोजतां येण्याइतकीं तरी दृष्टीस पडतील कीं नाहीं, याची वानवाच आहे असेंच त्यांना दिसून येईल ! कोणी कामिनीच्या नाहीं तर कांचनाच्या मागें लागलेले असून—"जीर्यंति जीर्यतः केशा दंता जीर्यंति जीर्यतः" असें झालें तरी "जीवनाशा धनाशा च जीर्यतोऽपि न जीर्यति ॥" ह्या वचनाचा प्रत्यय जगाला आणून देत असतात; तर कोणी पोराबाळांच्या घटल्यांत पडून, मुलें कर्तींसवरतीं झालीं असलीं तरी, "प्राप्ते तु षोडशे

वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्" ह्या वचनाला विसरून, विनाकारण नव्या-जुन्यांचा झगडा माजवून स्वतःला व दुसऱ्याला ताप करून देत असतात; तर कोणी मरेपर्यंत या मायामोहांतच गुरफटून माझें घर, माझें दार, माझें शेत, माझी वाडी, माझा बंगला, माझीं बायकामुलें, माझें नातूपणतु, अशा ह्या "माझें माझें" मध्येंच गुंगून पडतात व त्यांतच मरत असतात! पण वरीलपैकीं एकाच्याहि मनांत असें चुकूनसुद्धां कधीं येत नाहीं कीं मी कोण, माझा जन्म कशाशाठीं, माझा धर्म काय, मी कोणच्या आश्रमांत आहे, व मी काय करावयास पाहिजे? वास्तविक, राजकीय, सामाजिक, धार्मिक, कोणच्याहि बाबतींत आणि कोणच्याहि काळीं काय, कै. गोखले यांनीं म्हटल्याप्रमाणें, "कामाचे डोंगर पडले आहेत, कार्यकर्त्यांचीच वाण आहे!" पण ही वाण आपण भरून काढावी—निदान त्याकामीं आपणांकडून व्यक्तिदृष्ट्या जलबिंदुवत् साहाय्य करावें, असें वरीलपैकीं एकाच्या तरी मनांत कधीं येतें काय?—अलीकडच्या काळांत आजवर कधीं आलें आहे काय? यावरून वानप्रस्थ आणि संन्यास ह्या दोन आश्रमांस आपण कसे कायमचे पारखे झालों आहोंत, हेंच दिसून येत नाहीं काय? आणि ही गोष्ट काय दाखविते? आपली उन्नति कीं अवनति? याचा ज्याचा त्यानेंच विचार करावा! प्रो. भाटे यांनीं "प्रेम कीं लौकिक?" ह्या आपल्या आत्मचरित्रांत हीच गोष्ट सांगितली आहे—अशाच-तऱ्हेचे उद्गार काढले आहेत. ते अत्यंत वाचनीय असल्यामुळें वाचकांनीं ते अवश्य वाचावेत, अशी आमची त्यांना विनंति आहे! असो.

जी गोष्ट शेवटच्या दोन आश्रमांची तीच कथा जवळ जवळ पहिल्या दोन आश्रमांची आहे, असेंच आपणांस विचारांतीं दिसून येईल! किंबहुना, पहिले दोन आश्रम हे पुढील आश्रमांचे एका दृष्टीनें पायाभूत आहेत; तर एका दृष्टीनें ते उत्तम होण्यास पुढच्या दोन आश्रमीयांच्या सहायाची अत्यंत जरूर असल्यामुळें त्यावर ते अवलंबून आहेत. पण ह्यांचा त्यांना आधार नाहीं, व त्यांचा ह्यांना नाहीं,- ह्याप्रमाणें दोन मरतुकडे बैल जोडलेली गाडी जशी मध्येंच चिखलांत रुतून बसते, तशी आजकाल आमच्या समाजाची स्थिति झाली आहे! वास्तविक, धर्म-अर्थ-काम-मोक्ष या चार पुरुषार्थांपैकीं पहिला पुरुषार्थ हा प्रथमाश्रमांत

म्हणजे ब्रह्मचर्याश्रमांत मिळवून नंतर कोणाहि युवकानें पुढच्या, म्हणजे गृहस्थाश्रमांत पाऊल टाकावयास हवें, कारण त्या आश्रमांत— त्या गृहस्थाश्रमांत—मुख्यत: मिळवावयाचे अर्थ आणि काम हे जे दोन पुरुषार्थ आहेत, ते ह्या धार्मिक पुरुषार्थावरच अवलंबून आहेत, किंबहुना, चारी आश्रमांतील चारी पुरुषार्थ ह्या धर्मज्ञानावरच अवलंबून आहेत ! पण आज आपणांस काय स्थिति दृष्टीस पडते ? ब्रह्मचर्याश्रमांतील कर्तव्यें यथास्थित रीतीनें बजावून व भावी आयुष्याला परिपोषक अशा उत्तम धर्मज्ञानाचा सांठा संग्रहीं बांधून, मुसमुसणाऱ्या देहानें आणि चमकणाऱ्या बुद्धिनें गुरूंच्या आश्रमांतून गुरूंची आज्ञा घेऊन गृहस्थाश्रमाचा स्वीकार करण्यासाठीं उज्ज्वल तेजानें बाहेर पडणारे खरेखुरे ब्रह्मचारी युवक आज आपणांस किती सांपडतील बरें ! वाचक ! शाळांतून आणि कॉलेजांतून प्रतिवर्षी बाहेर पडणाऱ्या हजारो तरुणांच्या तांड्यांकडे तुम्ही कधीं पाहिलें आहे काय ? नसल्यास एकदां अवश्य पहा, म्हणजे "हेच का आमच्या भावी पिढीचे आधारस्तंभ ?" असा विचार तुमच्या मनांत येऊन लज्जेनें तुमची मान खालीं झाल्यावांचून राहणार नाहीं ! पहा, पहा, एकदां त्या तरुणांच्या तांड्यांवरून आपादमस्तक दृष्टि फिरवा, म्हणजे तुम्हांला काय दिसतें ? शारीरशास्त्र, मानसशास्त्र, आणि धर्मशास्त्र, ह्या तिन्हीही दृष्टींनीं तुम्ही त्यांच्याकडे पाहिलें असतां तुम्हाला काय देखावा दृष्टीस पडतो ? शरीराची भरदार आणि गुटगुटीत गोटी—पिळदार दंड, बळकट बाहू, कणखर हात, विशाळ व भरदार छाती, तेजस्वी डोळे, भरीव मांड्या, आणि सशक्त पण चपल अशी तनू तुम्हांस तेथें दिसते काय ? ब्रह्मचर्याचे तेज अंगीं प्रत्यंगीं वोसंडत असलेलें व शुद्ध तांबड्या रक्तसंचयानें लालबुंद पण सतेज अशा देहयष्टीनें शोभणारे युवक तुमच्या दृष्टीस पडतात काय ? का त्याचेऐवजीं खप्पड गाल झालेले, डोळे खोल गेलेले, रोगट प्रकृतीचे, आणि पिकुटलेल्या शरीराचे काडीजवानच तुमच्या दृष्टीस पडतात बरें ? अत्यंत खेदानें आणि कष्टानें तुम्हाला ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे कीं, या दुसऱ्या प्रतीचेच बहुतेक तरुण युवक असून, पहिल्या प्रकारच्या दिव्य सौंदर्यानें शोभणारे खरे

ब्रह्मचारी युवक हाताच्या बोटावर मोजण्याइतके तरी सांपडतील कां नाहीं याची वानवाच आहे! पण ही गोष्ट काय दाखवतें बरें? शारीरिक ब्रह्मचर्याचा अभाव, म्हणजेच खऱ्या ब्रह्मचर्याचा चुथडा! अर्थात् अशा-तऱ्हेच्या शोभेनीं विनटलेल्या देहाचा आश्रय करून राहाणाऱ्या मनांत कसल्याप्रकारचे विचार वावरत असतील हें काय वेगळें सांगायला पाहिजे? किंबहुना, अशातऱ्हेचे विचार त्याच्या मनांत न येते, तर त्याच्या शरीर-यष्टीची अशी माती कशानें झाली असती? ते विचार प्रत्यक्ष ऐकावयाचे आणि पहावयाचे असल्यास, वाचक! एकच दिवस तुम्ही त्याच्या वस-तिगृहांत जाऊन त्याच्या गाण्याच्या गुणगुणण्यावर, त्याच्या हालचालीवर, व त्याच्या हावभावावर बारीक दृष्टी ठेवा, म्हणजे बस् आहे! ती पहा त्याची खोली! आणि तो पाहिलात कां आपला युवक? आरशासमोर उभा राहून, अत्यंत सौगंधिक अशा कामिनीयाच्या तेलानें तुकतुकीत व तुळ-तुळीत केलेल्या आपल्या केसांवरून फणी फिरवीत, "मला मदन भासे हा मोही मना!" हें पद स्वारी गुणगुणत आहे ती ऐकलीत ना? बस्, झाली खात्री? पण थांबा, कपडे करून स्वारी बाहेर पडण्याच्या विचा-रांत आहे वाटतें! पण असें तुम्ही कुठवर पहात बसणार? थोड-क्यांत सांगायचें तर शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध ह्या पंचवि-षयांस पारखे व्हावयाचे ऐवजीं ते त्याचे पंचप्राण झालेले असतात! शृंगारिक विचार, शृंगारिक उच्चार, शृंगारिक आचार, शृंगारिक बोलणें, शृंगारिक चालणें, शृंगारिक गाणें, शृंगारिक वाचणें, शृंगारिक पाहणें—बस् शृंगार! शृंगार! शृंगार! यावांचून आमच्या युवकाला दुसरी बात ठाऊक नाहीं!—किंबहुना, त्यास स्वप्नेंसुद्धां शृंगारिकच पडत असतात! कधीं स्वप्नांत त्याला देवाचें दर्शन झालें आहे? कधीं साधुसंतांची गांठ पडली आहे? होईल कोठून? "मनीं वसे तें स्वप्नीं दिसे" हा तर निसर्गाचा रोकडा सिद्धान्तच आहे! असो. तर याप्रमाणें सर्व शृंगारमय बनलेला, पण ब्रह्मचर्याश्रमाची घमेंड मारणारा, असा हा आमचा सध्यांचा तरुण अविवाहित विद्यार्थीयुवकांचा तांडा आहे! जणूंकाय, भावी गृह-स्थाश्रमांतले घडे तो आतांच गिरवीत आहे! खरोखरीं खऱ्या ब्रह्म-चाऱ्याचे बाबतींत त्यांनीं कसें वागावें, कसें राहावें, काय खावें,

काय प्यावें, काय वाचावें, इत्यादिसंबंधीं आमच्या शास्त्रकारांनीं नियम घालून दिले आहेत; पण प्रेमरसाचें पान करून शृंगाररंगानें रंगलेला आमचा 'शृंगारराजा' तिकडे कशाला लक्ष देतो आहे? त्याच्या नाटकसिनेमांत, त्याच्या हॉटेलसलूनांत, त्याच्या नेकटायकॉलरींत, त्याच्या रेनॉल्ड्सच्या कादंबऱ्यांत, आणि त्याच्या टॉयलेटच्या थाटांत, त्याला इकडे लक्ष द्यायला फुरसत आहे कुठें? बरें; प्रातःकाळीं उठावें, श्रीहरीचें नांव घ्यावें, शौचमुखमार्जन करून व्यायाम करावा; दुग्धप्राशन करावें; मग आपला स्वाध्याय म्हणजे अभ्यास करावा; भोजन करतांना स्वच्छता आणि प्रसन्नता राखून ईशस्मरणपूर्वक भोजन करावें; वर्तणूक विनयशील आणि सभ्य ठेवावी; देवादिकांचे आणि साधुसंतांचे फोटो लावावेत, त्यांचीं चरित्रें वाचून त्यांवर मनन करावें; कीर्तनपुराणश्रवणाची आवड धरावी; रात्रौ निजतांना श्रीहरीचें स्मरण करून त्याचें चिंतन करीत झोपीं जावें; सद्ग्रंथवाचनाची व सद्वचनें पाठ करण्याची आवड ठेवावी; संध्या, नमस्कार, पुरुषसूक्त, रामरक्षा, भगवद्गीता, हरिपाठ, देवपूजा, भक्तिमार्गप्रदीप, इत्यादि होईल तितकें करीत असावें:—थोडक्यांत म्हणजे, "Simple living and high thinking" म्हणजे 'साधी राहणी आणि उच्च विचारसरणी' बनवून, पूर्वीच्या ऋषिपुत्रांसारखे आणि ऋषिकुमारांसारखे आपण सत्वगुणी कसे बनूं इकडे लक्ष द्यावें—अशाप्रकारचा उपदेश जर आम्ही आधुनिक सूर्यवंशी, चहाबाज, आणि वर सांगितलेल्या पद्धतीच्या रंगेल तरुणांना करूं लागलों, तर ते आम्हांला वेड्यांतच काढतील! बाकी, पानपट्ट्या खाऊन सदा थोबाड रंगलेलें, चिरूट किंवा सिगार ओढणारे, किंबहुना, पण्यांगनेपर्यंत सुद्धां कांहींकांची मजल पोंचलेल्या विद्वान् विद्यार्थीवर्गाला आम्ही झालों तरी अधिक काय सांगणार? पण असें कां होतें? याचा विचार करतां स्वामी श्रद्धानंदजींच्या गुरुकुलासारखीं गुरुकुलें जागोजाग निघेपर्यंत हा प्रकार बहुतेक असाच चालायचा, असें म्हटल्यावांचून मात्र आमच्यानें रहावत नाहीं! कारण, त्या गुरुकुलांच्या ऐवजीं साध्यासुध्या शाळाकॉलेजांच्या 'घरकुलांनीं' समाजाचा खरा संसार थाटत नसतो, हें विसरून चालणार नाहीं! आवर्तींभोंवतीं नानातऱ्हेच्या व्यसनांचें व्यामोह आणि

चटकचांदण्या नाचत असतांना, 'बहकलेले ब्रह्मचारी' आणि 'बहकलेल्या तरुणीं'च्याच गोष्टी कर्णपथावर याव्यात, हेंच साहजीक नव्हे काय ? त्याच पंथाला समग्र विद्यार्थी समाज कसा लागला आहे, आणि म्हणूनच खऱ्या ब्रह्मचर्याश्रमाचा कसा चुथडा उडाला आहे याचें वर्णन आम्हीं वर केलेंच आहे ! असो.

अशाप्रकारच्या 'दिव्य' ब्रह्मचर्याश्रमाचा टेंभा हातांत घेऊन आपल्या शारीरिक, नैतिक, मानासिक, व अध्यात्मिक जीविताला आग लावणाऱ्या ह्या आधुनिक ब्रह्मचाऱ्याचें धर्मज्ञान व वेदांतज्ञान आणि पुराणज्ञान किती आहे हें पाहूं गेल्यास—बहुतेक "रामाची सीता कोण ?" असल्या प्रश्नांचाच प्रकाश पडलेला आपणांस दिसून येईल ! असो. अशा तऱ्हेच्या दिव्यदेहानें स्वर्गसुखाचें आयुष्य नेणाऱ्या आमच्या ब्रह्मचाऱ्यानें एकदां गृहस्थाश्रमांत पाऊल टाकल्यावर त्या आश्रमाचाहि त्यानें मग असाच चुथडा उडवावा, हेंच साहजीक नव्हे काय ? ह्या आश्रमांत मुख्यतः साधावयाचे असे पुरुषार्थ दोन—अर्थ आणि काम; हे दोन्हीही पुरुषार्थ पहिल्या धार्मिक ज्ञानावर, धार्मिक पुरुषार्थावर, आणि ब्रह्मचर्याच्या अस्सल तेजस्वितेवर साधायचे असतात ! पण विद्यार्थीदशेंतच शृंगाराचा पाठ घेणारे, व शरीराचे खोकें बनलेले खोकड विद्यार्थी, धर्मज्ञान आणि ब्रह्मचर्याचा धार्मिक पुरुषार्थ ह्या बाबतींत किती नादान आणि मेषपात्र बनलेले असतात तें नुकतेंच वर सांगितलें आहे ! मग ह्यांच्या हातून "धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ" आणि "जोडोनियां धन उत्तम व्यवहारे" याप्रमाणें खऱ्या अर्थकामाच्या पुरुषार्थाची प्राप्ती कशी होणार ? धर्मविचार आणि मोक्षाचा आचार, ह्यांचें तर नांवच नको ! ब्रह्मचर्याश्रमापासून ज्याचें चिंतन आणि मनन सुरुं झालें, त्या कनककामिनींत आणि कामिनी—कांचनांतच आयुष्याच्या अंतापर्यंत अज्ञानानें झपाटलेल्या ह्या जीवानें भुलून पडावें, हेंच मग साहजीक नव्हे काय ? "इदमद्य मयालब्धं इमं प्राप्स्ये मनोरथम् । इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥" इत्यादिप्रकारची त्यांची बडबड पाहिली, आणि "हातीं द्रव्याची जपमाळ । कांता—ध्यान सर्वकाळ ।" किंवा "द्रव्यदारा तेंचि तीर्थ । द्रव्यदारा तोचि परमार्थ ।" अशा प्रकारचा

त्यांचा थाट अवलोकन केला, म्हणजे ह्या बद्धजीवांच्या कधींही न संपणाऱ्या दिव्य गृहस्थाश्रमाची कींव आल्यावांचून राहत नाहीं! याचें अधिक सविस्तर वर्णन आमच्या "सायुज्यसोपानां"त आलेलेच आहे; तें वाचकांनीं पहावें म्हणजे झालें. असो. तर याप्रमाणें कायिक, वाचिक, आणि मानासिक तपाला मुकलेल्या ह्या जीवांनीं खऱ्या गृहस्थाश्रमाचा कसा चुथडा करून टाकला आहे हें आतां वेगळें सांगावयास पाहिजे काय?

ह्याप्रमाणें चारी आश्रमांची वाताहात झालेला, व त्या सर्व आश्रमांना सांवरून धरणाऱ्याच नव्हे, तर खुद्द मानवीजातीला पशूंच्या पायरीपासून अलिप्त व दूर राखणाऱ्या अशा धर्मांचा बंद तुटलेला, आमचा सध्यांचा समाज कसा घसरगुंडीला लागला आहे, कसा अधःपतित झाला आहे, आणि कसा पशुतुल्य आचरणांत निमग्न झाला आहे, ह्याचा विचार मनांत आला कीं आंग थरारून जातें! व छाटलेल्या दमाचा एक दीर्घ सुस्कारा सोडावासा वाटतो! खरोखरच, आहार, निद्रा, भय, आणि मैथुन ह्या बाबतींत मानवी आयुष्य मिळूनही आमचा समाज कसा झपाट्यानें पशूंच्या पायरीवर घसरत आहे—हिंदुस्थानच्या चारी दिशांना दृष्टी फेंकली असतां, समग्र हिंदू म्हणविणारा समाज कसा पशुतुल्य आचरणांत निमग्न झाला आहे, ह्याचें चित्र डोळ्यापुढें उभे राहिलें म्हणजे चित्त कावरेबावरें होतें, मनाला दरदरून घाम सुटतो; आणि ह्या गुदमरलेल्या वातावरणांतून कधीं बाहेर पडूं, अशी तळमळ चित्ताला लागून राहते! अशातऱ्हेनें बाहेर पडून समग्र देशाला चमकविणारा, व ऐहिकच काय पण पारलौकिक मुक्तीचा मार्ग दाखविणारा 'महात्मा' हि परमेश्वरकृपेनें आम्हांस लाभला, व एके काळीं त्या तपोनिधीच्या विलक्षण विचारांची छाप बसून, त्याच्या पुंगीच्या नादावर समग्र समाज भारून गेला होता! पण त्या 'गोविंदाचा गारुडी' ठरण्यास त्याच्या कार्यक्रमांत जी तेजास्विता आणि जो विवेक पाहिजे तो नव्हता, हें जसें एक कारण, तसेंच त्या आत्मशुद्धीच्या मार्गांची अयशस्विता होण्यास आमचा आत्मिक अधःपातही तितकाच बलवत्तर होता—त्या अधःपाताची पक्कड आमच्या मनावर बळकट बसलेली होती व आहे, हेंहि एक त्याचें कारण नव्हे काय? कोणाही निःपक्षपाती आणि विचारी मनुष्याला ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे! दारूच्या बरोबरीनें चहासारख्या परकीय पेयाची

पकड ज्यांच्या जिभेच्या मानेभोंवतीं बसली, आणि तिच्याच तोंडीची विदेशी मालाची आवड व गोडी ज्यांना जडली त्या समाजानें आणि त्या राष्ट्रानें स्वदेशोद्धाराच्या आणि राष्ट्रप्रेमाच्या गप्पा कशाला माराव्यात ? त्यानें क्षणैक हुल्लडींत स्मशानवैराग्य धारण केलें, तरी त्याची किंमत तितकीच ! असो.

आतां " आहारनिद्राभयमैथुनं च । सामान्यमेतत्पशुभिर्नराणाम् ॥ " हें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं पाशवी, मानवी, आणि दैवी अशा तीन शक्तींचे म्हणजेच तामस, राजस, व सात्विक अशा त्रिगुणांचे विलक्षण मिश्रणानें हा मानवी देहाचा पुतळा परमेश्वरानें बनविला असून, धर्मज्ञान व सदसद्विवेकबुद्धि ही पशूंच्या ठायीं नव्हती, ती त्याचे ठायीं त्या विधात्यानें अधिक ठेवून दिली व " ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसा: । जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसा: ॥ " असा नियम लावून देऊन, या संसारांतून मोक्षपदवी प्राप्त करून घ्यायची असेल, तर त्या संसारचक्राला फिरविणाऱ्या त्रिगुणाच्या दांड्यावरूनही तुमचा हात सुटला पाहिजे, तुम्ही निस्त्रैगुण्य उर्फ गुणातीत झालें पाहिजे, असें त्या प्रभूचें अगदीं योग्य आणि सरळ सांगणें आहे ! असो. वर सांगितल्याप्रमाणें Beastly, Manly, and Godly, म्हणजे पाशवी, मानवी, आणि दैवी अशा तीन शक्ती व तीन गुणांच्या मिश्रणानें हा मानवी देह बनलेला आहे. अर्थात् पाशवी अंश त्याचे ठायीं, एक तृतीयांश कां होईना, पण असल्यामुळें पाशवी अवस्थेंत आहारनिद्रादि ज्या चार गोष्टी त्याला सहजात होत्या, त्याच येथेंहि थोड्या प्रमाणांत तरी लागणारच; आणि म्हणूनच त्या चारी बाबतींत मनुष्य आणि पशू सारखाच, असें म्हटलें आहे ! पण, जर सारखाच, तर त्यानें त्या बाबतींत पशूसारखेंच हुबेहूब आचरण करायचें कीं काय ? तर नाहीं—" धर्मो हि तेषां अधिको विशेष: । धर्मेण हीनाः पशुभिः समानाः ॥ " ह्या पुढच्या दोन ओळी पहा, म्हणजे आम्ही कां नाहीं म्हटलें तें तुमच्या लक्षांत येईल ! अर्थात् धर्म म्हणजे आचारविचार व आहारविहार ह्यांत जो नियम, मर्यादा, किंवा बंधन तो धर्म होय, हें आम्हीं मागें सांगितलेंच आहे. अर्थात् आहारनिद्रादि चार गोष्टींचें सेवन धर्म—म्हणजे—बंधनरहित केलें तर ती

पशूची अवस्था होय; (–कारण धर्मावांचून, बंधनावांचून दोहोंत फरकच नाहीं, " धर्मेण हीनाः पशुभिः समानाः " असें चक्क म्हटलेंच आहे ! ); धर्म-सहित त्या चार गोष्टी केल्या, तर ती मनुष्याची अवस्था होय; पण आम्हीं वर सांगितलेंच कीं, Beastly and Manly बरोबरच Godly म्हणजे पाशवी आणि मानवी बरोबरच दैवी अंशही त्या दयाळू देवानें आपणांस दिला आहे—आपणांत ठेवला आहे म्हणून. आणि मानवी जन्माचें खरें सार्थक आणि थोरवी तेंव्हांच कीं ज्यावेळीं त्याच्या ठिका-णचा ईश्वरांश पूर्णत्वानें जागा होऊन तो वरील चारी गोष्टींला म्हणजे आहारनिद्रादि विषयांना धार्मिक बंधांत राखतो, एवढेंच नव्हें, तर संपूर्ण-त्वानें जिंकतो–म्हणजेच शुद्ध सात्विक गुणांचा तो पुतळा बनून, " निरा-हारत्व " " विनिद्रत्व, " " अकुतोभयत्व, " ( म्हणजेच " अभ-यत्व " ) आणि " जितेंद्रियत्व, " प्राप्त करून घेतो ! कारण ह्या चार गोष्टी करायच्या म्हणजे काय ? आजारांत अगदीं दह्यावांचून राहवत नाहीं म्हणून आठवड्यांतून एकदां व तेंहि थोडेसें अदमोरे दहीं खाण्यास डॉक्टरकडून कशीबशी घेतलेली परवानगी होय ! ह्याचा अर्थ दही खावें असा नसून, तें अजिबात सोडलें तरच चांगलें असा जसा त्या डॉक्टरच्या म्हणण्याचा अर्थ, त्याचप्रमाणें वरील चार गोष्टी अजी जिंकतां आल्या तर उत्तमच; * पण नाहींच आल्या, तर अमुक अमुक नियमानें त्या चालवा म्हणजे त्या तुम्हांस उपकारक झाल्या नाहींत तरी फारशा बाधक होणार नाहींत असें आमच्या शास्त्रकारांचें सांगणें आहे ! × आम्हीं काय खावें, किती निद्रा घ्यावी, किती आणि कोणाचें भय धरावें, आणि विषय किती सेवावा, यासंबंधीं नियम आणि उपदेश शास्त्र-कारांनीं आणि साधुसंतांनीं जागोजाग घालून दिलेले आहेत. पण आम्ही कशाला तिकडे लक्ष देतों आहोंत ? आमचा आपला वरील सर्व बाबतींत अनिर्बंध असा–म्हणजेच पशुवत् आणि पशुतुल्य नंगा नाच सुरूंच आहे ! त्यांतच आलस्य, मोह, लोभ, मत्सर, द्वेष, आणि भांडणें या पशूंच्याच गुणांचा भर पडून, त्या पायीं अध्यात्मिक

---

* सर्वथा न करावा स्त्रीसंग । हेंचि वेदाचें अंतरंग ॥—तुकाराम.

× विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ —तुकाराम.

स्वातंत्र्य तर राहोंच, पण ऐहिक स्वातंत्र्यालाहि आम्ही मुकलों असून, आज शंभरावर वर्षें झालीं तरी त्याची आम्हांस तिळभरहि चीड किंवा शरम न वाटतां, आमच्या दौर्बल्यानें आणि चैनबाजीनें आम्ही आपलें जगांत हंसू करून घेत आहोंत! —"काय ? तुम्ही तीस कोट लोक असून अद्याप परतंत्रच आहां ?" असें आम्हांस लोकांनीं विचारून आमची कींव केली, तरी आम्हांस त्याची लाज कुठें आहे ? परदास्याच्या पंकांत पिचत पडलेल्या, म्हणजेच निरयनिर्विशेषावस्थेप्रत पोंचलेल्या आम्हांला अद्याप आमच्या चैनबाजींतच सुख वाटत आहे, त्याला कोण काय करणार ? याचा अर्थ असा नव्हे कीं, आम्ही आजवर कांहींच हालचाल केली नाहीं. पण ती हालचाल अंतर्गत उष्णतेच्या उकळीची नसून जलताडनवत् होती, असेंच आपणांस आजवरच्या सर्व चळवळींच्या इतिहासावरून दिसून येत नाहीं काय ? पारलौकिक मोक्षासच नव्हे, तर ऐहिक स्वातंत्र्यप्राप्तीसाठींसुद्धां हृदय अहर्निश जळावें लागतें, तीव्र तपश्चर्या आचरावी लागते, आणि स्वसुखनिरभिलाषित्व स्वीकारावें लागतें! पण ह्या तिन्हींही बाबतींत लोकमान्य टिळकांच्यासारखी अलौकिक विभूति आजवरच्या आंग्लाईत एकच झाली असें म्हणण्यास आम्हांस मुळींच हरकत वाटत नाहीं! बाकीचे सर्व पुढारी त्यांच्याशीं तुलनेंत फिकेच पडतात! असो. पण अशा तऱ्हेच्या लोकमान्यासारख्या जळत्या हृदयाच्या, तीव्र तपश्चर्येच्या, आणि स्वसुखावर तिलांजलि देणाऱ्या, व्यक्ती शिवशाहीच्या कालापर्यंत व सवाई माधवराव पेशव्यापर्यंत जिथें शेकड्यांनीं निर्माण होत होत्या, तेथेंच आज शंभर सवाशें वर्षांत आमच्यांत एकच 'लोकमान्य' निर्माण व्हावेत, ह्यावरून आमचा किती अधःपात झाला आहे, ह्याचा ज्याचा त्यानेंच विचार करावा! कोणी म्हणेल कीं, हा परदास्याचा परिणाम आहे आणि ह्या म्हणण्यांत अगदींच अर्थ नाहीं असें नाहीं. परिस्थितीचा परिणाम मनुष्याच्या मनावर निःसंशय होत असतो, ह्यांत शंका नाहीं. पण त्या परिस्थितीच्या पाशांत सांपडून आणि स्वत्वाला विसरून आपण जर सर्कशींतल्या पशूप्रमाणें ते सर्कसवाले नाचवतील तसें नाचूं लागलों, तर मग त्या पशूंत आणि आपणांत भेद काय ? असा आमचा पुन्हा सवाल आहे! अर्थात् मनुष्याची खरी थोरवी परिस्थितीच्या आहारीं न जातां

तिच्यावर आरोहण करण्यांतच आहे, हें काय आतां वेगळें सांगायला हवें ? आणि याप्रमाणें पाहतां, आम्ही त्याप्रमाणें वागतों काय, याचा नको का ज्यानें त्यानें आपणाशीं विचार करायला ? पण विचाराची आणि आमची मुळीं आधीं फारकतच झाली आहे त्याला काय करता ? पण ह्याचाहि अर्थ आम्ही अप्रबुद्ध पशूप्रमाणें वागत आहोंत, असाच नव्हे काय ?–अशाच अर्थाची ही अप्रत्यक्ष कबुली नव्हे काय ? वाटेल त्यानें वाटेल तें खावें, वाटेल तें प्यावें, वाटेल तें ल्यावें, आणि वाटेल तसें वागावें, ही अवस्था निर्नायक पशूंची नव्हे काय ? आणि इतकें असून—इतका आमचा अधःपात झाला असूनहि–" आचारस्वातंत्र्य " " विचारस्वातंत्र्य " इत्यादि बेवकूब नांवांच्या गोड भुलीखालीं मन मानेल तसा वागण्याचा सदर परवाना आम्ही मिळविला आहे ! व दिवसेंदिवस दैवी संपत्तीला पारखे होऊन अधःपाताच्या खोलच खोल गर्तेत अधिकाधिकच खचत चाललों आहोंत ! पण ' मटीरिॲलिझम् 'ची म्हणजेच ऐहिक चैनबाजाची भूलच इतकी दांडगी आहे कीं, त्या अधःपाताची खरीखरी जाणीव आमच्यांतलि फारच थोड्या लोकांना होत आहे ! आंग्लाईची—परकी शिक्षणाची–आमच्या मनाच्या मानेभोंवतीं बसलेल्या पाशाची–हीच ती पक्कड, आणि तीन पायांनीं ब्रह्मांड व्यापणाऱ्या त्या सैतानी अवलादीच्या वामनाचा हाच तो दुसरा पाय ! हा पाय इतका सुखद रीतीनें आणि आमच्या न कळत आम्हाला खालीं दाबीत आहे कीं, त्याची आम्हास जाणीवच नाहीं ! यांत त्या पायाचा—त्या पांढऱ्या पायाचा–दोष नसून, तो डोक्यावर घेणाऱ्या आणि मस्तकावर वाहणाऱ्या आमचा दोष आहे ! " सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता । परो ददातीति कुबुद्धिरेषा । " हें वचन काय सांगतें ? " आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः " ही भगवदुक्ति तरी कशाची द्योतक आहे ? " गळ गिळितां गोड वाटे । ओढोनि घेतां घसा फाटे । " ही गोष्ट जर त्या माशांना कळली नाहीं तर त्याला त्या कोळ्यांनीं काय करावें ? मासे धरणें हा तर त्यांचा धंदाच आहे ! अर्थात् त्याचप्रमाणें आत्मिक, नैतिक, शारीरिक, सामाजिक, व राष्ट्रीय अधःपाताचा गळ न पहातां जर " आचारस्वातंत्र्या"ची आणि " विचारस्वातंत्र्या"ची

‘ उंडी ’ म्हणजे आमिष आम्हीं गिळलें, तर तो आमचा दोष नव्हे काय ? आम्हाला देवानें विचार करण्याची बुद्धि दिली असूनहि आम्हीं त्या जलचर प्राण्यांप्रमाणें वागावें काय ? ही गोष्ट आमचा अधःपात दाखवितें कीं उन्नति ? सरकारनें काय आमच्या घरांत आणून रांडा कोंबल्या, कां आमच्या घशांत दारूच्या बाटल्या, चहाचे कप व मांसाचे तुकडे आणून ओतले, कां गोरक्षण करूं नका म्हणून आम्हाला त्यांनीं सांगितलें, कां स्वदेशी माल घेतांना त्यांनीं आमचा हात धरला, कां धर्माचरण व परमार्थ साधन करूं नका म्हणून आम्हास कधीं हरकत केली, कां केलें तरी काय ? आम्ही होऊन जर आपखुशीनें ह्या सर्व गोष्टी करीत आहोंत, तर उगाच सरकारच्या नांवानें खडे फोडण्यांत काय अर्थ आहे ? तुम्ही सामाजिक, धार्मिक, आणि नैतिक सुधारणा करूं नका असें सरकारनें कधीं आम्हांस सांगितलें आहे काय ? उलट त्या कामीं कदाचित् थोडीबहुत त्यांनीं आम्हास मदतच केली आहे. पण ती केली नाहीं म्हटलें, तरी हरकत तर केली नाहींना ? मग उगाच ‘परकी सरकार’ म्हणून उठल्यासुटल्या हाकाटी पिटण्यांत काय अर्थ आहे ? ती, स्वतःला कांहीं करायला नको—हातपाय हलवायला नको—ह्या निष्क्रियतेचीच द्योतक नव्हे काय ? जणूं काय, स्वराज्य एकाएकीं आकाशांतून जांभळासारखें आमच्या तोंडांत येऊन पडणार आहे ! पण असल्या शेळपट बुद्धिवादानें, बायकासारखीं बोटें मोडून, आणि गाद्यागिरद्यावर लोळून, ‘सुखंचमे शयनंचमे’ करीत, झालीं हीं शंभर वर्षें तर काय पण अशीं शेंकडों वर्षें गेलीं तरी स्वतःचें स्वराज्य तुमच्या दृष्टीससुद्धां नुसतें पडणार नाहीं—हें सर्वांनींच खूप लक्षांत ठेवावें ! त्याला अंतर्गतच उष्णता लागते—जलताडनानें असलीं कार्यें होत नसतात—व्हायला ते कांहीं पोरखेळ नव्हेत ! तेव्हां हा जलताडनाचा उद्योग सोडून देऊन सर्व समाजरूप भांड्यांतील पाण्याचे अणूपरमाणू तापून निघायला त्या भांड्याखालीं जागोजाग विचाराचा अग्नि पेटवून त्याचे स्टोव्ह उत्साहाच्या वाऱ्यानें व निश्चयाच्या हातानें पंप करून सारखे जळत राहतील अशी व्यवस्था केली पाहिजे; आणि असें झालें तरच त्यांतील पाण्याची वाफ होऊन त्या वाफेच्या जोरानें परकी सत्तेचें वरील झांकण ताडकन् उडून जाईल !

ता. ११।८।२५ च्या केसरींतील रा. वासुदेव कृष्ण भावे यांचा लोकमान्यासंबंधीं तीन कॉलमी लेख, ही गोष्ट लोकमान्यांनीं आपल्या दिव्य प्रज्ञाचक्षूंनीं ओळखून त्याप्रमाणें त्यांनीं जन्मभर आपल्या जिवाचें रान त्यासाठीं कसें केलें, हीच गोष्ट सांगत आहे. पण आम्ही वर म्हटल्याप्रमाणें असे लोकमान्यासारखे जळत्या हृदयाचे, तीव्र तपश्चर्येचे, आणि स्वार्थनिरपेक्ष लोक शेकड्यांनीं निघाल्याशिवाय भारतभूमीचा तरणोपाय नाहीं, हेंच खरें! असो.

सरतेशेवटीं सांगायचें इतकेंच कीं, मनुष्य हा सर्व सृष्टीचा मुकुटमणि व आपली अपरमूर्ति म्हणून परमेश्वरानें निर्माण केला ही जर गोष्ट खरी आहे, तर तो सर्वसत्ताधीश आहे, त्याला वाटेल तें करण्याची अमर्याद शक्ति त्याचे ठायीं आहे, हेंहि तितकेंच खरें आहे! पशूंत शिरून तो "उत्तम पशू होईल," किंवा देवांत उत्तम देवही पण त्याला बनतां येईल, अशी त्याची ताकद आहे. पण " The highest proof of virtue is to possess boundless power without abusing it ( Essay on Addison P. 40 ). ह्या मेकॉलेच्या अत्यंत बिनमोल वचनाप्रमाणें मनुष्य वागला, तरच त्याची माणुसकी, नव्हे काय? अमर्याद शक्तीचे धनी असून तिचा दुरुपयोग न करणें यांतच सर्व सद्गुणाचें सार आहे, हें मेकॉलेचें वरील वचन खोटें आहे काय? मग त्याप्रमाणें आम्ही केव्हां वागणार?

दुसरें असें कीं, जुन्या लोकांची गोष्ट तर राहूं द्याच! ते तर Old orthodox म्हणजे जुन्यासच चिकटून बसणारे आहेत!-पण अगदीं स्वताला शहाणे आणि सुशिक्षित म्हणविणारे लोक जेव्हां ह्या आचार विचारांत, आणि आहारविहारांत, एखाद्या मद्द मेंदूच्या माणसाप्रमाणें, म्हणजेच शेळ्यामेंढ्यांच्या कळपाप्रमाणें गतानुगतिकत्वाच्या अंधपरंपरेनीं जातात—एखाद्या अंधळ्यांच्या माळेंतल्या अंध माणसाप्रमाणें एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून अंधळ्यासारखे चालतात—वागतात—आणि बोलतात—तेव्हां मात्र त्यांची कींव आल्यावांचून राहत नाहीं! यावरून "गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः।" असें जे हितोपदेशकारानीं म्हटलें आहे, तेंच खरें असून, तें नव्याजुन्यास सारखेंच लागू पडत आहे, असें म्हटल्यावांचून

मात्र आमच्यानें राहवत नाहीं ! पण या बाबतींत नव्याजुन्या दोघांसहि आमचें कालिदासाच्या शब्दांत हेंच सांगणें आहे कीं,—" पुराणमित्येव न साधु सर्वे । न चापि काव्यं नवमित्यवद्यम् । संतः परीक्ष्यान्यतरद्भजन्ते । मूढ :परप्रत्ययनेयबुद्धिः ॥" अर्थात् यावरून धर्माचे बाबतींत जरी आम्ही नियम, बंधन, यांची तरफदारी मागें केलेली आहे, तरी त्याचा अर्थ ते नियम अगदीं अनाद्यनंत व यावच्चंद्रदिवाकरौ सारखेच टिकणारे आहेत असा नव्हे; आणि म्हणूनच अंधळ्यासारखें तुम्ही कोणच्याच गोष्टीचा स्वीकार करूं नका; पण जो कराल—मग तो जुन्याचा असो वा नव्याचा असो—तो विचार पूर्वक करा व कोणचीही वागणूक जी ठेवाल—मग ती सामाजिक, धार्मिक, नैतिक, राजकीय, कोणच्याहि स्वरूपाची असो व कितीहि क्षुल्लक बाबींत असो, ती विचारपूर्वक, विशिष्ट तत्त्वान्वेष्टित, व म्हणूनच नव्या जुन्या कोणच्या तरी नियमानें होऊं द्या, हेंच आमचें सर्वांना सांगणें आहे ! आम्हाला जी चीड आहे, ती ह्या गतानुगतिकत्वाची व मद्द-मेंदूच्या म्हशीप्रमाणें वागण्याची होय ! तसेंच, जुन्या तत्त्वांना झुगारून देण्यापूर्वी, त्यावर पूर्ण विचार करून, व तितकाच नव्याचाहि साधक-बाधक विचार करून, मगच कोणचा मार्ग अनुसरावयाचा तें तुम्ही ठरवा, म्हणजे जुन्या खंबीर शास्त्रवचनापासून व सदुपदेशापासून तुम्ही फारसें बहकणार नाहीं, असेंहि आम्हांस सांगावेंसें वाटतें ! पाश्चात्त्यांच्या भुलभुलावणीनें व त्यांतून ते जेते म्हणून सर्व सद्गुणांचें आगर ह्या भलत्याच भावनेनें भुलून व भ्रमून जाऊं नका; त्यांच्या सुखाची मिरास जरी तुम्हाला दिसली, व तिला मोहून आमच्यांतले कांहीं शहाणेहि जरी कांहीं बडबडूं लागले, तरी ही सर्व शेवटीं मायावी सृष्टि आणि 'जादूचा झगा' आहे, व म्हणूनच त्या झग्याचा फुगा केव्हां फट् म्हणून फुटेल याचा नेम नाहीं, हें न विसरता व त्या आसुरी संपत्तीच्या मायावी भुलभुलावणीला न भुलतां, आपलें डोकें थंड ठेवा; व आज हजारो वर्षे चालत आलेल्या आपल्या आर्यसंस्कृतीचा व आर्यधर्माचा सूक्ष्म व शांतपणें विचार करून, ज्यावेळीं पाश्चात्य लोक अंगाला रंग फासून व कातडीं पांघरून रानावनांतून हिंडत होते, त्यावेळीं आर्यांच्या उच्च संस्कृतीचें वैभव कळसाला पोहोंचलें होतें—इतकी ही संस्कृति उच्च व जुनी आहे हें न विसरतां

तिच्यांत कालांतरानें शिरलेले दोष टाकून, केवल सद्गुणत्वानें ती आपणांस परत कशी प्राप्त होईल याचा विचार व अहर्निश चिंतन चालू ठेवा, हेंच आमचें या बाबतींत सर्वांना अखेरचें सांगणें आहे !

पण याप्रमाणें विचार करून पाहतां, आम्ही आमच्या नित्य व्यवसायांत आणि रोजच्या व्यवहारांत विचारपूर्वक वागतो काय ? असा प्रश्न केल्यास त्याचें 'नाहीं' असेंच मोठ्या खेदानें आम्हांस उत्तर द्यावें लागणार आहे! मनुष्यत्वाची व्याख्या "ज्ञानं हि तेषां अधिको विशेषः" अशी आमच्या संस्कृत कवीनें केली आहे, तर "Man is a reasonable being" म्हणजे "मनुष्य हा विचारशील प्राणी आहे" अशीच इंग्रजी वचनांतही त्याची व्याख्या आहे. पण हेंच आमचें विचारशीलत्व गेलें, म्हणजे मग आमचें मनुष्यत्व कोठें राहिलें बरें ? येथें विचार ह्या शब्दाचा अर्थ ज्ञान किंवा सदसद्विचार–म्हणजेच सदसद्विवेकबुद्धि–असा आहे, हें उघड आहे! नाहींतर, दिलेल्या बुद्धीचा, मनुष्य आपल्या स्वार्थसाधनार्थ उपयोग करीत असतोच–नाहीं असें थोडेंच आहे ? पग शास्त्रीय भाषेनें बोलायचें तर, शास्त्रीय विषयांत ज्याप्रमाणें आपण पुष्कळ गोष्टी पाहूनही पाहत नाहीं–म्हणजेच ज्याला observation म्हणजे सूक्ष्म निरीक्षण म्हणतात, तें आमचें तेथें नसतें व म्हणूनच आमचें चुकतें; तीच गत धार्मिक, नैतिक, सामाजिक, राजकीय इत्यादि बाबतींत आपली होते ! कारण ह्या सर्व बाबी म्हणजे साध्यासिध्या नसून शास्त्रीय आहेत—त्या प्रत्येकाचें एक एक स्वतंत्र शास्त्र आहे. धर्मशास्त्र, नीतिशास्त्र, समाजशास्त्र, अशीं त्यांचीं विविध नांवें आहेत ! पण रसायनशास्त्राच्या दृष्टीनें जसें आपण डोळें असून अंधळे असतो, व त्या शास्त्राची दृष्टि मिळाल्यावरच आपण खरे डोळस बनतो, व यासाठीं तें शास्त्र आपणांस शिकावें लागतें,—तीच गोष्ट धर्मनित्यादि उपरिनिर्दिष्ट शास्त्रांची असून, तेथेंहि आपण डोळे असून अंधळे, अथवा विचार असून अविचारी ठरतो; व यासाठींच खरे विचारी म्हणून घ्यावयाचें असेल, तर अगदीं बारक्यासारक्या गोष्टींत, सुद्धां रसायनशास्त्राप्रमाणेंच त्या शास्त्रांचाहि आपणाला अभ्यास केला पाहिजे एक; किंवा तसा अभ्यास करून चालणाराच्या पाठोपाठ—अथवा तोहि न

आढळल्यास,खुद्द त्या शास्त्रांच्या पाठोपाठ गेलें पाहिजे एक;त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. म्हणूनच—"तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ । ज्ञात्वा शास्त्रविधानोऽक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ "—असें भगवंतांनीं भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायाच्या शेवटीं अर्जुनाला सांगितलें आहे. पण कसेंहि केलें, यांपैकीं कोणचाहि मार्ग स्वीकारला,तरी वर्तणूक नियमबद्धच होणार,हें उघड आहे! आणि तशीच ती होऊं द्या, हेंच तर आमचें सर्वांना पुनः पुन्हा आग्रहानें सांगणें आहे! कारण, ह्या नियमित स्वातंत्र्यांतच खरें सुख आहे. स्वातंत्र्य आणि स्वेच्छाचार ह्यांत महदंतर असून स्वातंत्र्य—म्हणजे नियमबद्ध स्वातंत्र्य—हें प्रथम कडु वाटलें, तरी अंतीं सुखाला कारण होतें, व स्वेच्छाचार अथवा मन मानेल तसें वागणें, हें प्रथम गोड वाटलें, तरी अंतीं अंताला—म्हणजे नाशाला आणि दुःखालाच कारण होणार आहे; किंबहुना, अशा तऱ्हेची अविचारी वागणूक ही रानटी अवस्थेचीच द्योतक आहे, असेंहि म्हणण्यास आम्हांस मुळींच हरकत वाटत नाहीं!

रानटी अवस्था आणि पशूची अवस्था ह्यांत मुळींच भेद नाहीं. अर्थात्, धर्माची अवस्था खऱ्या माणुसकीनें राहावयाला सुरवात होते तेव्हांच उत्पन्न होते, हें उघड आहे; आणि या धर्मापासून—म्हणजेच बंधनापासून मनुष्यजातीला सुख झालें आहे, व कोणच्याहि बाबतींत ही नियमबद्ध वागणूक असावी,असा तिचा जो अट्टाहास आहे तो यासाठींच! उद्यां जर कोणी, समाजांत कोणच्याहि प्रकारची शासनसंस्था नसावी व पहिल्यासारखे रानटी अवस्थेंत आपण जाऊन राहूंया, असें म्हणूं लागला तर त्याचें किती हसूं होईल बरें! सत्ता राजाची असो वा प्रजेची असो, धर्मगुरूची असो वा लोकसत्तेची असो, किंबहुना,स्वतःच स्वतःवर लादलेली असो; पण सत्ता, शासन, नियम, बंधन, मर्यादा, ही कुणीनाकुणीतरी घालून दिली पाहिजे, व त्याप्रमाणें आपण वागलें पाहिजे, तरच आपणांस व समाजास खरें सुख लागणार आहे,हें उघड आहे! संसाराचा प्रवास सुखाचा व्हायचा असेल, तर आयुष्याची आगगाडी धर्माच्या रुळावरून (नियमावरून)च नेली पाहिजे, हें उघड आहे !आणि जी गोष्ट राजकीय बाबतींत लागूं तीच सामाजिक आणि धार्मिक बाबतींत खरी आहे! किंबहुना, आम्ही मागें म्हटल्याप्रमाणें, धर्म हाच सर्व समाजवृक्षाचें

आणि राष्ट्रीयवृक्षाचे मूळ कोणच्याहि काळीं आणि कोणच्याहि देशांत असतो. त्या मुळाला जर कीड लागली, किंवा तें मूळच जर उपटलें गेलें, तर तो समाजवृक्ष व राष्ट्रवृक्ष केव्हांनाकेव्हां तरी उलथून पडल्यावांचून राहणार नाहीं आणि राहत नाहीं! आजवर जगांत अनेक राष्ट्रें उदयास आलीं आणि लयास जाऊन नामशेष झालीं; पण हिंदुस्थान हें राष्ट्र अद्याप जीव धरून आहे, याचें कारण काय बरें? याचें कारण परिस्थितीप्रमाणें फेरफार करून, पण धर्माचे बळकट मूळ न सोडतां, तें आजवर काळाशीं झुंजत राहिलें आहे हेंच होय, असेंच सर्वांना दिसून येईल! "महापुरें झाडें जाती। तेथें लव्हाळे वांचती॥ येती सिंधूच्या लहरी। नम्र होता जाती दुरी॥" याप्रमाणें वारा वाहील तशी पाठ फिरवून, पण स्वताचे धर्माचें बळकट बैठकीचें अधिष्ठान न सोडतां, तो हिंदुधर्म काळाशीं झुंजत राहिला म्हणूनच आजवर जिवंत राहिला, व ह्याच धोरणानें पुढें वागल्यास त्यास जगाच्या अंतापर्यंत मुळींच भय नाहीं! आजवर अनेक राज्यक्रांत्या; व धर्मक्रांत्या झाल्या व त्यांच्या लाटा हिंदुस्थानावरहि येऊन आदळल्या पण वरील लव्हाळ्याचे नम्र पण बळकट व्रत आमच्या हिंदुधर्मानें स्वीकारल्यामुळेंच तो आजवर जगला आहे! लव्हाळ्याचें मूळ अत्यंत बळकट असतें, तसेंच धर्माचेंहि मूळ अत्यंत बळकट असतें! मोठमोठ्या महापुरांच्या संकटांतून वांचविण्याचें सामर्थ्य दोहोंतही सारखेंच आहे, आणि म्हणूनच त्या मुळाला आपण बळकट धरून ठेविलें पाहिजे!

पण आज स्थिति काय आहे? तें बळकट मूळ—धर्माचें तें दृढ अधिष्ठान सोडून देऊन, या आंग्लाईच्या महापुरांत आम्ही वाहवतच चाललों आहोंत! या आंग्लाईच्या वावटळींत आमचे पायच धर्माच्या बळकट भूमीवरून उचलले गेल्यामुळें आम्ही गिरक्या खात आहोंत—आणि विशेष मौज ही की, इतकें झालें तरी आम्हाला त्याची शुद्ध नाहीं—इतकें आम्ही भ्रमलों आहोंत! यावनी धर्मसत्तेच्या महापुरांत—"कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पीरासीच भजती। कित्येक तुरुक होती। आपुले इच्छेनें॥" आणि "कित्येक फिरंगणांत आटले" असा जसा समर्थांना अनुभव आला, तसाच आजकाल आम्हाला अनु-

भव येत नाहीं काय ? किंबहुना, आम्ही मागें सांगितल्याप्रमाणें मोगलाईपेक्षाहि या आंग्लाईची पकड अधिक बळकट आहे—कारण पहिली देहाला आणि मनाला भुलविणारी असली तर दुसरी खुद्द आमच्या बुद्धीला भ्रमविणारी आहे! आणि—"शस्त्रैर्हतास्तु रिपवो न हता भवंति । प्रज्ञाहताश्च नितरां सुहता भवंति ॥ शस्त्रं निहंति पुरुषस्य शरीरमेकं । प्रज्ञा कुलंच विभवंच यशश्च हंति ॥" ह्या बिनमोल सुभाषितांत म्हटल्याप्रमाणें आम्ही मोंगलांचे दास होतो, तर आंग्लांचे दासानुदास झालों असून, आमच्या पूर्वीच्या उच्च कुलाची, श्रेष्ठ वैभवाची, आणि दिव्य यशाची आम्हांस मुळींच खंत न वाटतां, त्यांना आम्ही मुकलों याबद्दल आम्हांस मुळींच लाज किंवा दुःख न वाटतां, आम्ही उलट आमच्या बेचैन आनंदात हर्षानें नाचत, उडत आणि बागडत आहोंत ! हरहर ! काय ही स्थिति ! आम्ही मुसलमानांचे देहानें व मनानें गुलाम असलों तर सध्यांच्या आंग्लाईसत्तेचे आम्ही बुद्धीनें गुलाम झालों आहोंत—आम्ही आपली सर्व बुद्धि त्यांना विकली आहे–असेंच आमच्या अगदीं बारक्या सारक्या हालचालींतून सुद्धां सूक्ष्मपणें पहाणारास दिसून येईल ! अर्थात् इंग्रजसरकारनें आमची बुद्धीच काबीज केल्यामुळें आम्हांस त्यांनीं पुरेपुर जिंकलें आहे, असें म्हणण्यावांचून गत्यंतर नाहीं ! नाहींतर, तीस कोटी लोकांचें बळवान् राष्ट्र आज शंभर वर्षें पारतंत्र्याच्या पंकांत असें पिचत कां पडलें असतें ? किंबहुना, चालू हिंदुधर्माच्या प्रश्नाप्रमाणें पाहतां, त्यांतील वीस बावीस कोट हिंदुस्तान जरी ऐक्याच्या दृढ व बळकट भावनेनें भरारलेलें असतें, तरीसुद्धां इंग्रजांना आपण चुटकीसरसे केव्हांच उडवून दिले असते! पण–अरेरे–ह्या पणमध्येंच सारें दुःख सांठविलें आहे ! अमुक असतें तर अमुक झालें असतें, असें म्हणून शेवटीं 'पण' म्हटलें कीं दुःखाचा तीव्र सुस्कारा सोडावासा वाटतो ! एक धनगर ज्याप्रमाणें शेंकडों शेळ्यामेंढ्यांना वळवितो, किंवा एक गुराखी जसा शेंकडो गाईबैलांचे कळप राखतो, तशीच आमची स्थिति झाली नाहीं काय ? म्हणजेच आमची वागणूक बुद्धिहीन पशूसारखी नाहीं काय ? असें आम्ही पुनः विचारतों ! आम्ही आपापसांत भांडत आहोंत, आपल्याच चैनींत गुंग आहोंत, आणि मन मानेल तसें वागत आहोंत; कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, एकाचें तोंड पूर्वेस तर दुसऱ्याचे पश्चिमेस;

"मतस्वातंत्र्य," "आचारस्वातंत्र्य" "विचारस्वातंत्र्य" या बेवकूब सैतानी अवलादींचा धुडगूस माजून समाजाला कोणी शास्ता राहिला नाहीं; आम्ही दारू प्यावी, मांस खावें, रंडीबाजी करावी, जुव्वेबाजींत लोळावें, काय वाटेल तें करावें—सरकारचें यांत काय जातें ? उलट या गोष्टी जोंजों तुम्ही अधिक कराल, जोंजों तुम्ही अधिकाधिक विषयी आणि स्वधर्मपराङ्मुख बनाल, तोंतों त्यांना तें पाहिजेच आहे. कारण, बोलूनचालून तें परकी सरकार! तें येथें तुमच्या कल्याणासाठीं आलें नसून, आपणाला अधिक सुखानें व सुलभतेनें राज्य कसें करतां येईल, हेंच तें पाहणार ! किंबहुना, जगांतील राजकारणाच्या लाजेकाजेस्तव तें जें काहीं आम्हांस थोड्याबहुत चांगल्या गोष्टी देत आहे व चांगल्या गोष्टी करूं व शिकवूं पहात आहे, त्यांचा तरी आम्ही कुठें उपयोग करून घेत आहोंत ? त्यांचा उपयोग—त्या सद्गुणांचा व सद्वस्तूंचा उपयोग तर लांबच राहिला, पण उलट,'इदं च नास्ति परंच न लभ्यते ' या न्यायानें आमचे स्वतःचे सद्गुण आणि सदाचार सुटले, आणि त्यांचे सद्गुण व सदाचार अंगीं यायचेऐवजीं त्यांच्या बाह्यगोष्टीचें व त्यांच्यांतील व्यसनांचें मात्र—व तेंहि बेछूटपणें—अगदीं कळसास नेऊन भिडविणारें आचरण अंधळ्यासारखें व सारासार विचार न करतां आमचें सुरू होऊन—"इरहर न हिंदुर्न यवनः"—अशी एखाद्या वटवाघुळासारखी स्थिति आमची आमच्या हातानें आम्हीं करून घेतली आहे! आणि सर्वांत मौज ही कीं, अशा ह्या दुःखद व हास्यास्पद स्थितीची आम्हांस क्षणभरसुद्धां लाज, शरम, किंवा खेद न वाटतां, उलट स्वतःच्या 'डँडी-' पणांतच आम्हांस मोठें भूषण, कौतुक, आणि आनंद वाटत आहे! ह्याहून आत्मिक अधःपाताची परमसीमा ती कोणती ? पण आपल्याच समाजांतले विचारी लोकच नव्हे, तर खुद्द ज्यांचें आपण हें 'मर्कटानुकरण '—मर्कटसदृशानुकरण—(Aping at a distance) —करीत आहोंत, ते खुद्द इंग्रज—विचारी इंग्रजही—आपणांस हंसून आपली कींव करीत आहेत—ह्याची बिचाऱ्या आमच्या 'भोळ्या ' (Simpleton) डँडीला कल्पनाही नाहीं ! अरेरे ! केवढा आमचा हा अधःपात ! ह्या अधःपाताला जगाच्या इतिहासांत तोड सांपडेल काय ? असो. येथें ह्या भागाची मर्यादा संपल्यामुळें यापुढील विचार आपण पुढील प्रकरणीं करूं या.

# भाग २० वा.



इंद्रियांच्या पलीकडे मन, व त्या मनाच्या पलीकडे बुद्धि आहे; पण ह्या बुद्धिबळाच्या डावांत, आमची बुद्धि जिंकून आणि मारून, आमच्यावर बिनतोड बाजूची मात करणाऱ्या इंग्रजांची शहामत खरी, यांत शंका नाहीं! पण याप्रमाणें बुद्धीनें आम्ही इंग्रजांच्या ' सत्तेचे गुलाम ' झाल्यावर, इंग्रजांनीं आमच्यावर यावच्चंद्रदिवाकरौ कां राज्य करूं नये ? रजपूत लोक मुसलमानांच्या साठीं लढले, यावनी वैभव कायम ठेवण्यासाठींच झगडले, म्हणून आपण त्यांना हंसतों; पण खुद्द आपण आज काय करीत आहोंत, आपल्या बुद्धिसर्वस्वानें ह्या आंग्लसत्तेचा डोलारा कायम ठेवण्यासाठींच कायावाचामनानें खपत आहोंत ना, याचा कुणी विचार करतो आहे काय ? खुद्द आपल्या महाराष्ट्रांतही शिवशाहीपूर्वी काय स्थिति होती ? उत्तरेस रजपूत जें करीत होतें, तेंच दक्षिणेंत मराठे करीत नव्हतें काय? असो. आजही तेंच आपण करींत असून, रजपूतांपेक्षां मराठे ज्या धर्मदृष्ट्या उच्च होते त्या धर्माचा बंदहि सध्यां आपला तुटला आहे—ढिला झाला आहे! पण हा बंद ज्या बुद्धीवर असायचा, त्या बुद्धीच्या शिखरावरच पाणी गढूळ झाल्यावर, त्या बुद्धीच्या ढिलाईनें आपण बुद्धिभ्रष्ट झाल्यावर, मग, " विवेकभ्रष्टानां भवति विनिपात: शतमुख: ॥" ह्या भर्तृहरीच्या वचनाप्रमाणें, आमच्या कुलाची, कीर्तीची, आणि यशाची कलुषित झालेली गंगा, बुद्धीपासून मनांत आणि मनांतून इंद्रियांत, याप्रमाणें अधिकाधिक अध:पात पावत जावी—अध:पतित व्हावी, हेंच साहजिक नव्हे काय ? एकदां ज्यांनीं आपला विवेक दुसऱ्याला विकला, आपली सारासार बुद्धि दुसऱ्याला अर्पण केली त्याची, शकुनीनें युधिष्ठिराची केली तशी, अशीच स्थिति व्हायची ! मनोरूपी शकुनिच्या सांगण्यावरून पंचेंद्रियांचे फासे हातांत घेऊन बुद्धी (बळा)च्या पटावर विषयसुखाचे दान देण्यास एकदां ह्या आत्मराज–युधिष्ठिरानें सुरुवात केली, कीं त्याच्या खजिन्यांतील शारीरिक संपत्तीची, त्याच्या शीलाची कुलाची, मानाची, आणि यशाची धुळधाण करून, आणि त्याची अब्रू मातींस मिळवून, हे पंचविषय त्याला कसा नागवितात, आणि खरोखरच

अशा मनुष्याला, तो लवकरच शुद्धीवर न आल्यास, प्रत्यक्ष पांडवाप्रमाणेंच, सर्व वैभवाला मुकून कायमच्या किंवा कित्येक वर्षांच्या अज्ञातवासास सुद्धां कसें जावें लागतें, ह्याचें चित्र आज तुम्हांआम्हांला हिंदुस्थानच्या चालू अधःपतित समाजांत हरघडीला दृष्टीस पडत नाहीं काय ? पण पंचेंद्रियांच्या फाशानें खेळल्या जाणाऱ्या पंचविषयांच्या ह्या द्यूताची मोहनीच इतकी दांडगी आहे कीं, त्या फाशांच्या फासांत सांपडून आज लक्षावधींच नव्हे, तर कोट्यावधि जनता गुदमरून जायची वेळ आली आहे, तरी अद्यापसुद्धां त्यांतून आपली मान मोकळी करून घ्यावी असें क्वचित्च कोणाच्या मनांत येऊन, उलट कालच्यापेक्षां आज आमचें पाऊल त्यांत पुढेंच आहे ! इतकेंच नव्हे, तर आमच्यांतील कित्येक सुशिक्षित पंडितहि, अगदीं बारक्या सारख्या गोष्टींपासून तो खुद्द मद्यमांसादि ( आम्ही मागें सांगितलेलीं पंचमहापातकें ) करण्यास सुद्धां काय हरकत आहे ? असें विचारतांना पाहून, त्यांच्या मौर्ख्याला हंसावें कीं त्यांच्या अज्ञानाची कींव करावी, कां हिंदुस्थानच्या ह्या दुर्भाग्याबद्दल ढळढळां अश्रू ढाळून ह्या अप्रबुद्ध पंडितांना सुबुद्धि देण्याविषयी प्रभूची प्रार्थना करावी, हेंच आम्हांस समजत नाहीं ! परमेश्वराची तर आम्ही तशी प्रार्थना करतोंच; पण प्रत्यक्ष परमेश्वराचें अस्तित्व तरी ह्यांच्या खिजगणतींत असेल म्हणून कुणी सांगावें? ह्यासाठीं, त्यांना बुद्धीवादानें व थोरांच्या वचनांनीं त्यांची फजिती पटवून देण्याचा आम्हीं आमच्या अल्पमतिप्रमाणें प्रयत्न करतों ! कारण, आज हिंदुस्थानच्या चालू प्रश्नांत, आमच्या मतें, सर्व अनर्थांचें मूळ असा हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे; कारण येथें धर्माचा बंद तुटलेला आहे आणि, उच्च अवस्थेंत जाण्यासाठीं तो तुटला नसून पशूंच्या पायरीवर घसरण्याजाठीं ही सोय झाली आहे, असें आम्हांस स्पष्ट दिसत आहे व त्याचें वर्णनही आम्ही मागें केलेंच आहे. असो. ऐका तर पंडितानो, अर्ध्या हळकुंडानें पिवळ्या झालेल्या व स्वताच्या भ्रमानें भ्रमलेल्या मूढ जीवांनो, या इंद्रियांच्या फाशांत अडकलें असतां कशी फटफजीति होते, तें ऐका !:—

भगवान् श्रीकृष्ण, जगांत आजवर झालेल्या तत्ववेत्त्यांचे मुकुटमणि, आपल्या दिव्य उपदेशांत—भगवद्गीतेंत—सर्व जगाला जाहीर करून सांगतात कीं—

" यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ २-६०
इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ २-६७
त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ १६-२१ "

याशिवाय, " ध्यायतो विषयान् पुंसः " ह्यांत त्यांनीं सांगितलेली अधःपाताच्या घसरगुंडीची उतरंड, व " अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः " ह्या तिसऱ्या अध्यायांतील अर्जुनाच्या प्रश्नावर उत्तर देतांना कामक्रोधांचे अथवा मुख्य म्हणजे कामाचें प्रभूंनीं केलेलें वर्णन व "हे ज्ञाननिधीचे भुजंग। विषयदरीचे वाघ।भजनमार्गींचे मांग।मारक जे ॥" इत्यादि हृदयभेद करून जाणाऱ्या वाणींत ज्ञानोबांनीं त्याचें काढलेलें चित्र वाचकांनीं पहावें,म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता त्यांना पटेल ! किंबहुना, ज्ञानाचा 'गर्वतुष्टिगंडु' घेऊन चालणाऱ्या 'ज्ञानियासि तरी वधिती पैज घेऊनि ॥ " असा यांचा पराक्रम आहे ! ज्यांच्या ज्ञानगर्वगंडस्थलांतून अहंकाराचा मद वाहत आहे, असे हे धुंद मतंगज—ज्ञानीपंडित—ज्यावेळीं विषयदरींतून जाऊं लागतात, त्यावेळीं त्रैलोक्यविजयी असे कामक्रोधादि व्याघ्र निस्संशय त्यांचें गंडस्थळ फोडल्यावांचून राहत नाहींत ! असो.

महर्षि व्यासांचा अनुभव हाच असून, त्यांनींही ह्या इंद्रियांच्या क्रीडेपासून अगदीं विद्वानांनीं सुद्धां सावध रहावें, असाच इशारा दिलेला आहे ! ते म्हणतातः—" मात्रा स्वस्रा दुहित्रा वा न विविक्तासनो भवेत्। बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ॥ "—हें वचन आमच्यांतील इंद्रियाला स्वेच्छाचारी बनवून " वरिवरि दिसे वैभवाचें । अंतरीं पोतडें नरकाचें । जैसें झांकणें चर्मकुंडाचें । उघडितांचि नये! ॥ " ह्या अवस्थेप्रत गेलेल्या विद्वानांनीं लक्षांत घ्यावयास नको काय ? वरील व्यासांच्या वचनांत कोणाला कदाचित् अतिशयोक्ति वाटेल. पण समग्र समाजाचें खालपासून वरपर्यंत सूक्ष्म अवलोकन करणाराला, तें म्हणणें मुळींच अतिशयोक्तीचें नाहीं, असेंच दिसून येईल ! फार काय सांगावें ? पण गुरुपत्नीशीं व्यभिचार करणारा चंद्र, स्वताच्या स्नुषेवर पापी नजर ठेवणारा वसिष्ठ,

स्वतःच्या मुलीशीं व्यभिचार करणारा ब्रह्मा, माद्रीच्या पोटऱ्या पाहून चंचलचित्त झालेले धर्मराज, आणि " स्वसाया जार उच्यते " असा रवि, ही जेथें मोठमोठ्या धेंडांची गत, तेथें सध्यांच्या अधःपतित समाजांत ' एकच स्पर्श ' यानें चंचलचित्त होणारे हर्रांचे ' रामलाल ' किती असतील बरें ? आणि खुद्द निर्मल प्रेमाच्या नात्यांत जर हा गोता तर मग परस्त्रीच्या बाबतींत तर काय विचारायलाच नको ! यवनस्नुषेला, स्वतःची नाटकशाळा बनविण्याचें पूर्ण सामर्थ्य असतां तिच्याकडे मायबहिणीच्या दृष्टीनें पहाणारे शिवबा एकच झाले! त्या शिवबासारखे समाजाचे सदा शिव करणारे—चिंतणारे, व त्या दृष्टीनें त्याकडे पहाणारे महात्मे किती बरें सांपडतील ? तसे शिवदेव सांपडण्याऐवजी, " शिवाशिव शिवानां कलकलः ! " असेंच म्हणण्याची आज आपल्यावर पाळी आली नाहीं काय ? असो. तर सांगण्याचा भाग इतकाच कीं, महर्षि व्यासांचा सिद्धान्तच खरा असून आपण त्या बाबतींत किती जागरूक राहिलें पाहिजे, हेंच कोळ्याच्या पोरीवर भाळलेले पराशर महाराज, मेनकेला भुललेले विश्वामित्रऋषि, पार्वती परिणयप्रसंगीं गलितवीर्य झालेले ब्रह्मदेव, अहिल्येच्या मागें कुत्रा होऊन लागलेले इंद्र, इत्यादि मोठमोठीं धेंडें सांगत आहेत; पण इतकें लांब कशाला ? ह्या व्यासांच्या वचनाचा प्रत्यय खुद्द त्यांनींही एकदां जैमिनीला आणून दिलेला आहे ! ती गोष्ट मोठी उद्बोधक असल्यामुळें आम्ही जेथून वाचली तेथूनच खालीं उतरून घेतों, म्हणजे झालें! रा. रा. पां. गो. बाळ, महाजन म्हणतातः—"व्यास भगवानांनीं भागवत लिहिलें; नंतर ते तपासण्यासाठीं जैमिनी जो त्यांचा शिष्य त्यास त्यांनीं सांगितलें व म्हणाले, ' ह्यांत कांहीं चूक असल्यास तपास. ' ' जैमिनीनें तें पसंत केलें, परंतु एकच चूक दुरुस्ती करितां काढली. कोणती ? तर " बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति. " जैमिनीचें म्हणणें " बलवानिंद्रियग्रामो विद्वांसं नापकर्षति " असें योग्य होईल असें होतें. व्यासांनीं तें लक्षांत घेऊन जैमिनीला सांगितलें, " याचा विचार करूं. "

कांहीं काळानंतर व्यासांनीं मोहिनीरूप धारण केलें, मोहक स्त्रीरूप धारण केलें; व ज्या ठिकाणीं जैमिनीचा आश्रम होता, तेथें, पाऊस पडत आहे

अशावेळीं ही सुस्वरूप स्त्री त्याच्या आश्रमाजवळ गेली. त्या जैमिनीनें तें मनोहर रूप पाहून, पावसानें भिजत आहे त्यामुळें आश्रमांत त्या स्त्रीला बोलाविलें. त्या स्त्रीला पाहून जैमिनीचें मनाची चलबिचल स्पष्टपणें दिसूं लागली. त्या स्त्रीला आश्रमांत राहण्याचा आग्रह करूं लागले. मोहित झाल्यानें त्या स्त्रीला आलिंगन देण्याच्या बेतांत जैमिनी येत आहेत इतक्यांत व्यासांनीं आपलें दाढीवाल्याचें रूप प्रगट केलें व विचारलें कीं, बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति वा नापकर्षति ? जैमिनीला व्यासांचें म्हणणें कबूल करावें लागलें ! " ( " सचित्र व्यावहारिक योग "—पृष्ठ ५१२. ) असो. ह्या गोष्टीपासून चालू समाजाला कितीतरी बोध घेतां येण्यासारखा आहे. पण तो घेईल तेव्हां ना ? अशा तऱ्हेच्या शेंकडो गोष्टी पुराणांतूनच नव्हेत, तर इतिहासांतून व चरित्रांतूनही काढून देतां येतील ! मग त्यावरून आमच्या घमेंडखोर विद्वानांनीं कांहींच शिकावयास नको काय ? संभाजी, अकबर, बाजीराव, ह्यांच्या गोष्टी प्रसिद्धच आहेत. मग दुर्योधन, रावणासारख्या दुष्टांच्या गोष्टी दूरच राहिल्या. पण स्वतःला शाहाणे आणि विद्वान् म्हणवणारांची जेथें ही स्थिति, तेथें सिद्धान्त हाच कीं, " बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति । " दशरथ–कैकेयी, शंतनु–मत्स्यगंधा, अर्जुनाच्या तीर्थयात्रेंतील मणिपुरची चित्रांगदा व नागकन्या उलूपी, शंकर–भिल्लीण, पुंडरीक–महाश्वेता, अशी किती म्हणून उदाहरणें द्यावींत ? पण हीं सर्व उदाहरणें, वरील व्यासाप्रमाणें व भगवान् श्रीकृष्णाप्रमाणेंच 'सेनेका' नांवाच्या एका पाश्चात्त्य तत्त्ववेत्त्यानें काढलेल्या, " The senses, full of delight as they are, will no doubt wreck us, if we yield to them, on the rocks and whirlpools of life !"—ह्या सिद्धान्ताच्या सत्यतेचीच साक्ष पटवीत नाहींत काय ? असो.

जी रूपाची आणि स्पर्शसुखाची गोष्ट, तीच रसनेनें चाखण्याच्या रसाची कथा आहे ! किंबहुना, या रसनेची रसस्वादाची चटक किती दांडगी आहे हें मद्यप्यांना, मांसाहाऱ्यांना, आणि चहाबाजांना जाऊन विचारा, म्हणजे ते तुम्हांस त्याची यथार्थ कल्पना देतील ! या लोकांना, विशेषतः त्यांतील समंजसांना, शुद्धीवर असतांना

वरील खाद्यपेयाविरुद्ध केलेला बुद्धिवाद कित्येकदां पटतो; नाहीं असें नाहीं; पण काय करतात बिचारे? वेळ झाली की चट् सारा विवेक बाजूला राहून, एखाद्या झपाटलेल्या मनुष्याप्रमाणें, तें अवशपणें त्यांत खेचलें जातात! धूम्रपानाचीहि अशीच गोष्ट आहे. किंबहुना, हें पंच-विषय म्हणजे पंच बाणच आहेत! त्यांतील कोणच्याहि बाणाचा अति-रिक्त आघात मनावर झाला,कीं प्राणी नागवलाच,असा निसर्गाचा रोकडा सिद्धान्त आहे! अशा तऱ्हेनें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, ह्या पंचवि-षयांच्या पंचकडींची पक्कड सध्यांच्या रंगेल, मूढ, व अधःपतित समाजा-वर किती बसली आहे, व त्यापुढें त्यास खाद्याखाद्य, पेयापेय, आणि सेव्यासेव्य इत्यादिकांचें कसें मुळींच भान राहिलें नाहीं, म्हणजेच विषयैक-परायण व धर्मपराङ्मुख बनून तो पशूंच्या पायरीवर कसा घसरत चालला आहे, ह्याचें वेगळें वर्णन पाहिजे काय? समग्र समाजावरून वरवर नजर फिरविणाराला सुद्धां हें दिसून येईल. पहा, प्रियवाचक! समाजाच्या अगदीं वरच्या थरापासून तो खालच्या थरापर्यंत आपली नजर फिरवा, म्हणजे तुम्हांला काय दिसतें? स्वकर्तव्याच्या खऱ्या जाणीवेचे लोक तुम्हांला त्यांत किती दिसतात बरें? बाकीचे सर्व लोक या कामिनी-कांचनाच्या मागें लागून या पंचविषयांच्या प्रियकर पाशांत गुरफटलेले—गुंगून, रंगून, आणि झिंगून पडलेलेच तुम्हांला दिसतात ना? पण ही बुद्धिहीन प्राण्यांची अवस्था, म्हणजे पशूंचीच अवस्था नव्हे काय? असें आम्ही पुन्हा विचारतों, कारण " असल्याच आयुष्यांत कृतार्थता मान-णाऱ्या मनुष्यांत आणि विष्ठेंतच सुख मानणाऱ्या ग्रामसूकरांत किंवा उंबराचें फळ हेंच जग मानणाऱ्या कीटकांत काय फरक आहे? त्या कीटकाला सुद्धां त्याच्या मतानें सुखप्राप्ति होत असते. " (वे. नि. पा. १०४) असाच कां आपण संसार करणार? आणि अशा संसा-रानेंच कां आपणांस धार्मिक, आत्मिक, ऐहिक, स्वतंत्रता मिळणार? ही गोष्ट कशाला बोलावी? केवल परक्यांच्याच नव्हे, तर स्वतःच्या इंद्रि-यांच्या आधीन होऊन—त्यांचे गुलाम बनून—विषयाचीं हाडकें चघळीत ज्यांनीं आहारविहाराचा आणि आचारविचाराचा नंगा नाच सुरू केला; ' स्वायत्तता ' म्हणजे काय हें ज्यांना स्वप्नांतही ठाऊक नाहीं—त्या विष

यांत वळवळणाऱ्या कीटकानी स्वातंत्र्याच्या आणि स्वराज्याच्या गप्पा कशाला माराव्यांत ? स्वातंत्र्य असें गाद्यागिरद्यावर लोळून आणि इंद्रियांना मोकाट सोडून मिळत नसतें ! यासाठीं या इंद्रियांच्या गुलामगिरींतून आधीं मुक्त व्हां, आणि मग धार्मिक व राजकीय स्वातंत्र्याच्या गप्पा मारा असें आमचें तुम्हांस सांगणें आहे!कारण,एका आधुनिक कवीनें म्हटल्याप्रमाणें–"स्वातंत्र्याच्या सुखनीमार्जी जन्म स्वतंत्राचे । गुलामगिरिच्या उकीरड्यावरी गुलाम निपजाचे ॥ श्वानहि भरतें पोट बापुडें चघळुनिया हाडें । शेणामार्जी बांधुनि वाडे नांदति शेणकिडे ! ॥ " अरेरे, असेंच कां आपण आयुष्य नेणार ? पण–" संसार असा जरि करी । मनुजता तरी । कशाशी धरी ? ! हो तुच्छ किडाचि न कां तो । जो गुलाम असुनी हंसतो । "–असेंच आम्हीही इंद्रियांचे दासानुदास झालेल्या आधुनिक जनतेला विचारतो !

अर्थात् " आयुष्य हें चैन नसून कर्तव्य आहे " हें तत्त्व एकदां मनाला पटलें कीं, त्या कर्तव्याचे म्हणजेच धर्माचे नियम अगदीं बारक्यासारख्या गोष्टींतसुद्धां साहजीकच आपणांस नियमित करतात, आपल्या मोकाट सुटलेल्या इंद्रियाना आवरून आपणांस एकप्रकारची उच्चता देतात, व आपणांस आपल्या कार्यास अधिक लायक आणि कार्यक्षम बनवितात ! आणि वरील उक्तीचें उच्च ध्येय डोळ्यापुढें असल्यावर त्या नियमांचा त्रासही वाटत नाहीं.शिवाय,आरंभीं कडु पण अंतीं गोड,असें सुखच सात्विक सुख होय, असें भगवंतांनीं म्हटलें आहे, आणि इंद्रियनियमनाचें सुख त्यांतलेंच आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! अर्थात " पशुवृत्ति आकळण्याचा पहिला धडा म्हणजे आत्मसंयमन होय " "The first step towards the control of animal impulse is to postpone its realization." P. 46. A story of Ethical principles by James Seth ) असें जें एका आंग्लतत्त्ववेत्त्यानें म्हटलें आहे–तेंच भगवंतांनीही गीतेंत जागोजाग सांगितलें आहे ! उदाहरणार्थ–" विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः।रसवर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ २–५२" व "युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ ६–१७ ". हें दोनच श्लोक पाहिले, तरी बस होणार आहे ! पण ते तरी दुसरे

काय सांगताहेत ? पहिल्यांत दैवी संपत्तीचा धडा, तर दुसऱ्यांत मानुषींतून दैवींत कसें जावें याची शिकवण!पण आर्धी अर्थात् पशुत्वाला जिंकावें, नव्हे आपल्यांतील पशुत्वाला जमल्यास ठार सुद्धां मारावें, हेंच भगवंतांचें सांगणें आहे; आणि आम्ही तरी दुसरें काय म्हणतों आहोंत ? आमची तक्रार हीच आहे कीं, चालू काळच्या समाजानें याप्रमाणें न वागतां उलट त्या पशुत्वाला आपल्या डोक्यावर घेतलें आहे ! पण " पायींची वहाण पायींच बरी " नव्हे काय ? तीच जर पायांतली काढून डोक्यावर घेतली, तर चालायला त्रास, माथ्यावर ओझें, आणि लोकांत हंसू होईल—यापेक्षां खरा लाभ तर त्यांत कांहीं दिसत नाहीं ! पण तीच " पायीची वहाण पायीं "ठेवल्यास पायांना सौख्य, चालायला सोपें, जिवाला विसांवा,आणि उच्च विचारांत गढण्यास माथ्याला अवसर, इतक्या गोष्टींचा लाभ होत नाहीं काय ? मग हे आम्ही केव्हां उमगणार? " धर्माचा अर्थ व्यापक म्हणजे रोजच्या वर्तनापर्यंत गेल्याचें हिंदुधर्मांचेंच उदाहरण आहे. रोजचा व्यवहार धार्मिक पाहिजे. एकदां उठल्याबरोबर टाळ्या पिटल्या किंवा एकदां देवळांत जाऊन साष्टांग नमस्कार घालून पश्चात्तापाची बतावणी केली म्हणजे दुसऱ्याला फसविण्याचा प्रयत्न होईल; पण ही गोष्ट धार्मिक नव्हे. " ( वे. नि. पा. ८७ ) असें श्री. फडके म्हणतात तें यासाठीं ! किंबहुना, आम्हीं तर असें म्हणतों कीं, अगदीं बारक्यासारख्या गोष्टींपासून तें मोठ्या गोष्टीपर्यंत जें आचरण ठेवायचें त्यांत आपलें शरीर, नीति, आत्मा, धर्म, कीर्ति, समाज, राष्ट्र, व ईश्वर ह्यांशीं आपण बेमान होत नाहींना, हें पाहिलें पाहिजे ! किंबहुना, धर्माच्या पोटांत ह्या सर्व गोष्टी येतातच; कारण धर्म म्हणजे कर्तव्यकर्म, आणि कर्तव्यकर्म म्हटले,कीं योग्य नियमांचें बंधन आलेंच !

पण ह्या कर्तव्यकर्माच्या धार्मिकबंधनाप्रमाणें हिंदुस्थानांतील आजची धार्मिक म्हणविणारी जनता वागते आहे कीं नाहीं, हें पाहिलें असतां आपणांस काय देखावा दृष्टीस पडतो बरें ? " ब्राह्मण बुद्धीपासोनि चेवले । आचारापासोनि भ्रष्टले । द्विजत्व सांडोनि झाले । दास दासांचे !।। " असाच देखावा—असेंच ब्राह्मण्याचें दृश्य आज आपणांस दिसत नाहीं काय ? " करिती ब्रह्म निरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।

ते जाणावें ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ ''–असें समर्थांनीं वर्णिलेले ब्राह्मण आज किती सांपडतील बरें ? " राज्य नेले म्लेंच्छक्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अरत्रीं ना परत्रीं । कोठेंचि नाहीं । ॥ हें तों ब्राम्हणांस कळेना । त्यांची बुद्धिच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्ख-पणाचा ! ॥ " असें समर्थांनीं तत्कालीन ब्राह्मणसमाजाचें केलेलें वर्णन आजच्याहि ब्राह्मण समाजाला तितकेंच लागू पडत नाहीं काय ?"वर्णानां ब्राह्मणो गुरुः " म्हणून म्हणवून घेणें सोपें आहे. पण त्याला तशी करणी करावी लागते ! मोठेंपण मिरवायला मोठें गोड वाटतें–आम्ही कोण, तर म्हणे वसिष्ठवामदेवाचे वंशज, पण इकडे शपथेवर खोटें सांगण्यास, रांडांच्या घरीं लोळण्यास, दारूचे ग्लास घशाखालीं ओतण्यास, अथवा अंडी,ब्रँडी व मांसमच्छर यथेच्छ खाण्यापिण्यास आमची पूर्ण तयारी; त्या कामीं आम्हांस मुळींच विधिनिषेध किंवा लाजलज्जा राहिली नाहीं,तर मग तुमच्या ब्राम्हण्याचा काय उपयोग ? तुम्हांला विचारतो कोण ? तुम्ही असेंच लाथाबुक्याखालीं कां तुडविलें जाऊं नयेत ? ' वर्णगुरुत्वा ' ची पदवी आपण आपलीच डोक्यावर धारण करून, सरकारी बिल्ल्याप्र-माणें मिरवायची नसते; ती लोकांनीं द्यावी लागते ! मोठेंपण फुकाचें नाहीं ! गाद्यागिरद्यांवर लोळून तें मिळत नसतें ! " ज्याचें अंगीं मोठेपण। तया यातना कठिण ! ॥ ऐरावती रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार! ॥ " असें तुकोबांनीं म्हटलें आहे तें यासाठींच ! पण आम्हाला त्या ' यातना ' व यमनियमांचा तो ' अंकुशाचा मार ' नको असून, फुकट मोठेंपण मात्र तेवढें मिरवायला व मिळवायला हवें ! पण असें तें कसें मिळेल बरें ? चालू काळच्या समग्र समाजालाच आपल्या कर्तव्याची भूल पडली असल्यामुळें, त्या समाजांतील घटकावयवांचीं कर्तव्यें तरी काय आहेत, तीं येथें पुन्हां सांगितल्यास वावगें होणार नाहीं, असें वाटतें. भववंतांनीं अगदीं सामान्यरूपरेखा त्याची पुढीलप्रमाणें आखून दिली आहे. ते म्हणतातः—

" ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ १८–४१
शमोदमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।

ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजं ॥ १८–४२
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनं ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजं ॥ १८।४३.
कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजं ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजं ॥ १८।४४ ”

असो.

पैकीं ब्राह्मण्याचा विचार वर झाला. आतां क्षत्रियांकडे वळल्यास तेहि असेच चैनबाजींत रंगून स्वकर्तव्याला विसरलेले तुम्हांला दिसून येतील. किंबहुना, समग्र हिंदुस्थानांत क्षत्रिय (म्हणजे संस्थानिक) आणि वैश्य हेच दोन वर्ग अत्यंत श्रीमान् असल्यामुळें, चैनबाजीचे सर्व अनर्थ त्यांच्यांतच विशेष दिसून येतात ! जुगार, मद्य, वारांगना, इत्यादि व्यसनांत ते सदैव झपाटलेले असून, घरचा काय किंवा देशाचा काय, संसार सुखानें करण्याचें एखाद्याच्याहि मनांत क्वचित्च येत असेल ! विशेषतः आत्मोद्धार आणि राष्ट्रोद्धार हे शब्दच त्यांना पारखे असतात ! आणि वैश्यांपेक्षां क्षत्रियांच्या पाठीशीं सत्तेचें बळ अधिक असल्यामुळें उपरिनिर्दिष्ट सर्व अनर्थांचें सळहीं त्यांचें ठायीं अधिक दृष्टीस पडावें, हें साहजीकच आहे ! कारण, “ यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता । एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयं ॥ ” ह्यांत, किंवा, “ गर्भेश्वरत्वमभिनवयौवनत्वमप्रातिमरूपत्वममानुषशक्तित्वं चेति महतीयं खल्वनर्थपरंपरा । सर्वाविनयानामेकैकमप्येषामायतनम् ” ह्या कादंबरीतील शुकनासोपदेशांत म्हटल्याप्रमाणें, श्रीमंती, तारुण्य, सौंदर्य, आणि सामर्थ्य, ह्या चार गोष्टींच्या पाठोपाठच बहुशः अविचार उभा असतो, आणि त्याच्या हातीं ह्या चार गोष्टी, म्हणजे माकडाहातीं कोलीत होय ! वरील चार गोष्टींनाही दाबून धरून, त्यांना विवेकानें आवरून सन्मार्गावर लावण्याचें सामर्थ्य विचारांत आहे ! पण अशा स्थितींत विचाराची बहुतेक फारकतच असते ! उंच व निमूळत्या अशा शैलशिखरावर जाऊन उभे राहिले असतां जशी चक्कर येते व फिरल्यासारखें वाटतें, तसेंच ह्या यौवनधनादि गोष्टींनीं डोकें भ्रमून जातें, व बहुशः अशा मनुष्याचा अधःपात होण्यास उशीर लागत नाहीं ! आजकाल ‘ केसरी ’-

सारख्या पत्रांतून येणारी संस्थानिकांची हालचाल वाचली, म्हणजे बहुतेक सर्व संस्थानिक स्वकर्तव्याला विसरून वरील प्रकारच्या अनर्थकारी व्यसनांच्या झपाट्यांत कसें सापडले आहेत, व कसे वेडे वेडे चार करीत आहेत, तें दिसून येते ! त्यांत खऱ्या क्षत्रिय कर्माला जागणारा व कालदेशवर्तमानानुरूप वागणारा एखादाच ! प्रत्यक्ष युद्धाचा प्रसंग नसल्यामुळें यांचें सर्व ' शौर्य, तेज, धैर्य, आणि दक्षता ' प्रजेला पिळण्यांत आणि छळण्यांत, व वरील प्रकारच्या व्यसनांतून लोळण्यांतच दिसून यावी,—व त्यांत रामचंद्रासारखा रामराज्य कारणारा किंवा युधिष्ठिरासारखा धर्मानें प्रजेचें पालन करणारा मायबाप एखादाच दृष्टीस पडावा—ही किती शरमेची गोष्ट ! आणि केवढा हा अधःपात!'अधःपात शतधा'असें ह्यांच्या बाबतींत म्हटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं!ह्या सर्व संस्थानिकांना आम्हाला हेंच सांगायचें आहे कीं, ' युद्धे चाप्यपलायनं ' ह्या गुणाला व आपसांतल्या एकीला तुमचे वाडवडलि पारखें झाल्यामुळेंच आज तुमच्यावर दुसऱ्याचे अंकित म्हणून घ्यायची पाळी आली आहे, व तुमची स्थिति रेसिडेंटाच्या कानपिचक्यांच्या तडाक्यांत मोठी केविलवाणी झाली आहे, ही गोष्ट खरी; पण त्यांतल्यात्यात असलेल्या स्वातंत्र्याचा उपयोग, तुम्ही काय वरील सारख्या व्यसनांत लोळण्यांत आणि प्रजेचे मायबाप होण्याचे ऐवजीं तिला छळण्यांत करणार ? " आर्तत्राणाय वः शस्त्रं न प्रहर्तुमनागसि ! " ह्या वचनाप्रमाणें पाहतां तुमच्या अधिकारी सत्तेच्या शस्त्राचा तुम्ही हा दुरुपयोगच करीत नाहीं काय ? यासाठीं त्यांतल्यात्यांत स्वत्वाला जागून, अगदींच एखाद्या मेषपात्रासारखे परक्यांच्या ' ताटाखालचीं मांजरें ' न बनतां व ' lick up and kick down ' ची पॉलिसी न स्वीकारतां, वरील व्यसनांच्या परंपरेपासून दूर राहून, शक्य त्या मार्गानें आपल्या प्रजेचें कल्याण कसें होईल, याचेंच अहर्निश चिंतन ठेवा, म्हणजे " शौर्य हें रणांगणावरच दृष्टीस पडतें किंवा लागतें असें नाहीं " ह्या म्हणण्याची सत्यता तुम्हांस पटेल ! तुमच्या तरवारी आज गंजून जात आहेत; आणि तुमच्या खऱ्या शारीरिक शौर्याला वाव नाहीं ही गोष्ट खरी. ईश्वरी कृपेनें स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं त्या तुमच्या असिलता निष्कोषित

करण्याचा, व बर्कनहेडसारख्याचें 'हेड' आपल्या 'बर्कन' दाजीनें ठेचून 'तरवारीच्या जोरावर आम्ही राज्य जिंकलें, करीत आहोंत, व करीत राहणार' ह्या त्याच्या उक्तीची घमेंड जिरविण्याचा, कधीं सुमंगल प्रसंग येईल तो येवो; पण तोंपर्यंत, 'वड्याचें तेल वांग्यावर' ह्या म्हणीप्रमाणें वागून, शारीरिक शौर्यास वाव मिळत नाहीं म्हणून अंगांत आलेला माज आणि मस्ती, वरीलप्रकारच्या व्यसनांत व प्रजेला छळण्यांत आणि पिळण्यांत खर्च करणें, हा निव्वळ पशूपणा आहे! हें तुम्हीं केव्हांही विसरूं नका! पण हिंदुस्थानच्या दुर्भाग्यानें असले पशू आणि नंदीबैलच आपणांस आजकाल ह्या राजेरजवाड्यांत आणि संस्थानिक व त्यांच्या गोतावळ्यांत पहावयास सांपडत नाहींत काय? ही गोष्ट काय दाखवितें? क्षत्रियांचा अधःपात!!! असो.

तिसरा वर्ग वैश्यांचा! ह्यांचें मुख्य कर्तव्य काय! "कृषि, गोरक्ष्य, आणि वाणिज्य" असें यांचें स्वाभाविक कर्तव्यकर्म आहे; पण आज आपणांस काय स्थिति दृष्टीस पडते? वास्तविक जर सूक्ष्मपणें आणि शांतपणें विचार केला, तर या कर्तव्यत्रयींत केवढा तरी अर्थ सांठविला आहे आणि त्यांना खुबीनें एकत्र गोंवून त्यांची माळ वैश्यवर्गाच्या गळ्यांत घालण्यांत प्रभूचें चातुर्यच व्यक्त होत आहे! कसें तें पहा, वैश्यवर्ग हा व्यापारीवर्ग असल्यामुळें, हिंदुस्थान हा कृषिप्रधान देश असल्यामुळें, गोमाता ही हिंदूंची पवित्र माता असल्यामुळें, आणि दह्यादुधाचें वैपुल्य,—कीं ज्याच्यावरच आमचीं बालकें गुटगुटित होऊन हे भावी पिढीचे आधारस्तंभ बळकट, सशक्त, सात्विक, व बुद्धिवान् निपजायचें,—तें गोरसाचें वैपुल्यहि ह्या गोरक्षणावरच अवलंबून असल्यामुळें, व्यापारांत मिळालेल्या मुबलक पैशाचा विनियोग, अस्मानाला भिडायला धावणारे प्रासाद बांधण्यांत, किंवा विलायती मोटारी उडाविण्यांत, किंवा नाचरंग तमाशांत उधळण्यांत न करतां, गोमातेचें संरक्षण करून तिच्याच पोटीं येणाऱ्या सशक्त बैलांच्या बळावर शेतींचें कार्यही उत्तमप्रकारें पार पाडा, असा भगवंतांचा दिव्य आदेश आहे! 'दान' आणि 'ईश्वरभाव' ह्यांचा स्पष्ट उल्लेख जरी वैश्यांच्या कर्मांत प्रभूंनीं केला नाहीं, तरी त्याचा अर्थ त्या गोष्टी त्यांनीं करायच्या नाहींत, असा मात्र

नव्हे. किंबहुना, गोरक्षणाचें पवित्र कार्याच्या पोटींच त्या दोन गोष्टींचा समावेश झाला आहे, असें आम्हांस वाटतें ! त्या ‘ गोपाळा’ स प्रिय असलेलें ‘ गोपालन ’ करून स्वतः ‘ गोपाळ’ बनायचें, कां तें ‘ गोपालन ’ न करतां स्वतः ‘ गोपाल ’ ‘ न ’व्हायचें हें ज्याचें त्यांनींच ठरवावें ! पण गोमातेच्या परिपालनांत आणि सेवाशुश्रूषेंत इतकें अद्भुत सामर्थ्य आहे ह्यांत शंका नाहीं ! ही मौज अनुभवांतून कळायची नाहीं— आणि A cow has no soul म्हणणारांना तर जन्मोजन्मीं कळायची नाहीं ! असो. तर सांगण्याचा भाग असा कीं अशा तऱ्हेचें गोपालन करून विप्रांला, ब्राह्मणांला, द्विजांला, गोदान करून महत्पुण्य त्यांनीं जोडावें व सर्व भूतमात्राचे ठायीं भगवंतभावही ठेवण्यास चुकूं नये, असेंच भगवंतांचें वैश्यांना सांगणें आहे ! रामायण, महाभारत काळाकडे आपण जर दृष्टिक्षेप केला तर आपणांस अशाच तऱ्हेच्या गोमातेच्या वैभवाची साक्ष दिसणार आहे ! किंबहुना, तात्कालीन समाज इतर धनोपक्षा गोधनालाच अधिक मान व किंमत देत होता असें आपणांस दिसून येतें. “ बहुधन असो नसो, परि एक असावें गृहीं गृहीं दुभतें । ” ही मोरोपंतांची द्रोणवर्णनप्रसंगींची ओळ हेंच दाखवितें. “ Health is wealth ” अशी इंग्रजींत एक म्हण आहे, आणि ती ‘ हेल्थ ’ म्हणजे शरीरसंपत्ति ज्या गोमातेच्या रसावर प्राप्त व्हायची, त्या गोमातेला प्रत्यक्ष धनाचा मान मिळावा, हेंच उचित नव्हे काय ? एके काळीं असा मान ह्या गाईंना मिळत होता !“ गोधन हरावयाला आले भट कोण कोण पाहों दे ” ही मोरोपंतांची उत्तर–गोग्रहणप्रसंगींची ओळ प्रसिद्धच आहे. अर्थात् अशा कामधेनुसदृश गोमातांचीं खिल्लारें, मोठमोठे गौळवाडे, आणि लक्षावधि गायींचे पुष्ट कळप, पूर्वीच्या काळीं दिसत असत, त्यांना चरण्यास हिरव्या गार गवतांचीं कुरणें लागतील तितकीं मुबलक पुरवलीं जात होतीं, व साहजिकच त्या गोरसावर पुष्ट होणारा तत्कालीन समाजाचा देहही मग धष्ट, पुष्ट, तेजस्वी आणि मर्दानी सौंदर्यानें चमकणारा दिसावा, हेंच साहजीकच नव्हे काय ?

पण आज काय स्थिति आहे ? कंस इतका दुष्ट, पण त्याच्या राज्यांत सुद्धां ‘ राखीव जंगलांचे नियम ’ नव्हते. पण आमच्या

चालू सरकारची कडी त्याच्यावरही होऊन, आमच्या गोधनाला चरण्यास पुरेशी कुरणें सुद्धां मिळत नाहींशीं झालीं आहेत; शिवाय ख्रिश्चन धर्माचा टेंभा मिरविणारे सध्यांचें सरकार तोंडानें भूत-दयेच्या गप्पा मारून वांद्र्यासारख्या टिकाणीं लक्षावधि गायींचा संहार स्वतःच कसें करीत आहे, व मुसलमानांच्याहि तशाच करणीला तें कशी आडकाठी करीत नाहीं, हें आम्हीं मागें सांगितलेंच आहे. अर्थात् ह्या दोन संस्कृतींच्या अवलादींच्या तडाक्यांत गोमातांची वाताहांत होण्याची वेळ आली आहे! पण समाजाच्या आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीनें आमचा हिंदुधर्मातील लोकांना आणि विशेषतः वैश्यवर्गाला असा सवाल आहे कीं, तुम्ही स्वतः आपल्या ‘गोरक्ष्या’च्या कर्तव्यास कितीसें जागत आहांत बरें? मनांत आणल्यास हें कार्य तुम्हांला सर्वांशानें नसलें, तरी पुष्कळच करतां येणार आहे! आज हिंदुस्थानांत दह्यादुधाचा आणि दूधदुभत्याचा मुबलक पुरवठा नसल्यामुळें त्या सकस अन्नाचे अभावीं हजारो बालकें कशीं मृत्युमुखीं पडत आहेत, नानातऱ्हेच्या रोग-राईचा शिरकाव समाजांत होऊन त्याशीं झगडतां झगडतां समाजाचा देह कसा निस्त्राण झाला आहे, व चालतींबोलतीं मढीं आपणांभोवतीं कशीं वावरत आहेत, हें तुम्हाला दिसत नाहीं काय? नुसतीं ‘शिशुस-साहाचीं’ नाटकें करून हें काम भागणार नाहीं, हें तुम्हीं विसरूं नका! कारण याकामीं मुळालाच हात घालून तीं बालकें ज्या गोरसाच्या शुद्ध, निर्भेळ आणि मुबलक पुरवठ्यावर पुष्ट व्हायचीं, तो गोरस त्या बालकांना आधीं कसा मिळेल ह्याच्या विचारास तुम्हीं लागावयास नको काय? यासाठीं “ ‘Wise men will always apply their remedies to the causes of evils’ इत्यादि तऱ्हेचें महात्मा बर्कचें बिनमोल वचन आम्ही मागें दिलेलें न विसरतां, या अनर्थपरंपरेच्या मुळालाच हात घालून, त्या मूळकारणाचा निरास कसा होईल हें पहा. या कामीं “ जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।” हें लक्षांत ठेवून परकी सरकारकडे पाहूं नका! पण सध्यांच्या आमच्या वैश्यवर्गाची वागणूक अशी आहे काय? त्याच्याकडे सोपाविलेलें कर्तव्यत्रय तो आज पाळीत आहे काय? याचा विचार केल्यास ‘नाहीं’ असेंच मोठ्या खेदानें

कबूल करणें आपणांस भाग आहे. शेती परी शेती गेली, आणि गरीबा-गुरिबांच्या हातांत ती पडल्यामुळें तिची वाताहात झाली, व त्यामुळें खेडेगावचा शेतकरी आज मुंबईचा मजूर व गुलाम बनण्यास धांवत आहे, गोरक्षणाची तीच अवस्था होऊन शेतीचें मूळच उपटलें गेलें; आणि वाणिज्य म्हणजे दलाली मात्र राहिली आहे—खऱ्या वाणिज्याचें, म्हणजे स्वदेशाच्या आणि स्वधर्माच्या अभिवृद्धीसाठीं कराव्या लागणाऱ्या व्यापाराचें, नांवच राहिलें नाहीं ! आज वाणिज्य याचा अर्थ दलाली असाच झालेला दिसत नाहीं काय ? उदाहरणार्थ, आपण 'कापडाचे व्यापारी' घेऊं. पुण्यामुंबईसारख्या ठिकाणीं 'आम्ही कापडाचे बेपारी आहों' म्हणून मोठ्या दिमाखानें सांगणाऱ्या आणि मिरवणाऱ्या ह्या बेपारी भाईच्या दुकानाकडे पहा, म्हणजे वाचक ! तुम्हाला तेथें काय देखावा दृष्टीस पडतो ? स्वदेशी मालाला उत्तेजन देण्यासाठीं स्वतःपडेल ती धस सोसून मी स्वदेशी मालच गिऱ्हाइकांना विकीन, आणि देशधर्म-कार्याला हातभार लावीन, असें म्हणणारे पुण्यात्मे यांत तुम्हाला किती दिसतात ? हाताच्या बोटांवर मोजण्याइतके तरी दृष्टीस पडतात काय ? बाकीचे सर्व, कोट्यावधि रुपयांच्या विलायती कापडांची विक्री करून स्वदेशाला आग लावणारे व त्यावरच स्वतःचें पोट जाळणारे देशबुडवे दलालच तुम्हांस प्रतिष्ठितपणें वावरताना दिसतात ना ? अरेरे ! कोण हा वैश्यवर्गाचा अधःपात ! ! ह्या अधःपाताचा जो जो विचार करावा तो तो ऊर दुःखानें भरून येतो ! ! ! कारण, वरीलप्रमाणें स्वधर्म आणि स्वकर्तव्य-पराङ्मुख होऊनच हे व्यापारी राहत नाहींत, तर दारूबाजी, रंडीबाजी, जुव्वेबाजी, चैनबाजी, इत्यादि यांच्या या 'बाज्यां'चा 'बाजा'ही चालूंच असतो; मग त्यापुढें गरीब बिचाऱ्या त्यांच्या हाताखालील, त्यांच्या गिरणींतून वगैरे काम करणाऱ्या मजूरवर्गाच्या दुःखांच्या मूकरुदनाचा टाहो त्यांस कोठून ऐकूं येणार ? कारण, 'नगाऱ्याची घाई, तेथें टिमकी तुझें काई' अशी म्हणच आहे ! असो. तर याप्रमाणें हे सर्वत्र भगवद्भा-वालाही आंचवलेले असतात. आपणाप्रमाणेंच त्या गरीब मजूरांनी आणि कामकऱ्यांना देह आहे, मन आहे, आत्मा आहे, व चार कच्चा-बच्चांचा संसारहि पण आहे, ही गोष्ट साफ विसरून उलट स्वतःच्या क्षुद्र

स्वार्थासाठीं त्यांच्या मजुरीस काट मारण्याचा माजुरी विचारही त्यांच्या डोक्यांत येण्यास कमी करीत नाहीं ! पण हा सर्व कशाचा प्रताप ? आणि ह्या सर्व गोष्टी काय दाखवितात बरें ? वैश्यवर्गाचा सर्वतोगामी अधःपातच ह्या गोष्टी दाखवीत नाहींत काय ? ' अधःपात शतधा ' असें ह्यांच्याहि बाबतींत म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं !!

राहता राहिला शेवटचा शूद्रवर्ण ! आणि तो जरी इमानेंइतबारें आपलें काम करीत असला, तरी वर सांगितलेल्या व्यसनांची झळ त्यालाही लागली असून, विशेषतः दारूबाजीच्या भयंकर मगरमिठीच्या पकडींत तो पूर्ण सांपडला असून, त्यापायीं त्याच्या बायकापोरांचें व कच्चाबच्चांचे हाल होऊन त्याच्या गरीबीच्या कां होईना पण सोन्यासारख्या संसाराची आज धूळधाण उडाली आहे ! यावरून ह्या शूद्र वर्गाचाहि किती अधःपात झाला आहे, याचा वाचकांनीं विचार करावा ! कारण, सर्व अनर्थांचें आणि पापांचें मूळ अशी ही दारू आहे, हें पुन्हा वेगळें सांगावयास पाहिजे काय ? " अहा दारुबाजी। झडे चांदरात रोजीं ॥ " " कुठवर रडु ग बाई रडूं " इत्यादि रा. शंकरराव लवाटेकृत हृदयभेद करून जाणारीं पद्यें वाचा व ऐका, म्हणजे वाचक ! आमच्या म्हणण्याची सत्यता तुम्हांस पटेल ! असो.

याप्रमाणें समग्र समाजाचें आलोकन केलें असतां, स्वधर्माच्या म्हणजेच स्वकर्तव्याच्या दृष्टीनें सर्व समाज कसा अधःपतित झाला आहे, त्याचा धर्माचा, पापपुण्याचा, नीतिअनीतिचा, बंध कसा तुटला आहे, व वर सांगितलेल्या सर्व व्यसनांच्या सपाट्यांत सांपडून, भलत्याच सुखाच्या कल्पनेनें तो कसा भ्रमला आहे, व " यावज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः॥ " ह्या भंगड चार्वाकांच्या चैनबाजीच्या नास्तिक मतापर्यंत त्याच्या एकंदर आचारविचाराची मजल कशी जाऊन पोहोंचली आहे, हें सूक्ष्मपणें पाहणारास तेव्हांच दिसून येणार आहे ! एकंदर समाजवृक्षाला याप्रयाणें आंतून कीड लागली आहे, " मटीरिॲलिझम् "च्या-म्हणजेच ऐहिक सुखवादाच्या कल्पनेकडे तो दिवसेंदिवस सपाट्यानें झुकत असून, पशूंच्या पायरीवर घसरत चालला आहे, असेंच कोणांसही दिसून येणार आहे. पांडुरोगांत अंगाला सूज

येते म्हणतात. पण ती पुष्टीची नसून यमाच्या तुष्टीची, म्हणजेच मृत्युपंथास लागल्याची खूण म्हणून येत असते;तशीच आमच्या समाजाची ह्या ऐहिक सुखवादाच्या पायीं स्थिति झाली आहे! नैसर्गिक आरोग्याचा तो तजेला नसून ही रोगाची पांडुरता आहे ! हा नैसर्गिक गौरवर्ण नसून सर्व समाजाला पशुवृत्तीच्या म्हणजेच ऐहिक सुखवादाच्या कोडकौतुकाचें कोड फुटलें आहे ! यापासून त्याचा लवकरच बचाव न झाल्यास त्याच्यावर मोठा दुर्धर प्रसंग आल्यावांचून राहणार नाहीं ! किंबहुना, त्याचीं कडू फळें आजही आपणांस थोडीबहुत चाखण्याची पाळी आली नाहीं काय ? मग आम्ही यांतून कधीं सावध होणार ?

सरतेशेवटीं, " स्त्रिया, मुलें, व शूद्र हीं राष्ट्रीयवृक्षाचीं मुळें होत ! " ह्या स्वामी रामतीर्थांच्या वचनांतील 'स्त्रियां'चा विचार करून आपण ह्या बऱ्याच लांबलेल्या ग्रंथाच्या समारोपाच्या तयारीला लागूं या.

ह्या स्त्रीसमाजाकडे दृष्टि फेकल्यास आपणांस काय दिसतें ? समग्र समाजाच्या अधःपतनाच्या सपाट्यांत त्याही बिचाऱ्या सांपडल्या आहेत, इतकेंच नव्हे, तर त्यांतील कोणी अज्ञानानें, तर कोणी जाणूनबुजून, म्हणजेच ऐहिक सुखवादाच्या कल्पनेनें भ्रमून जाऊन,लाज, लज्जा, विनय व मर्यादा यास तिळांजलि देऊन, समाजाच्या अधःपाताला अधिकच मदत करीत आहेत, असेंच आपणांस दिसत नाहीं काय ? जगांतील मनुष्यवस्तीपैकीं निम्याहून अधिक संख्या व्यापणारी स्त्रीजात ही एक विधात्यानें निर्माण केलेली विलक्षण चीज आहे, ह्यात शंका नाहीं ! " नारीयोकों निंदो नहि, नारी नरकी खान। जिस खानमें पैदा हुवे, राम भीष्म हनुमान् ॥ " ह्या कबीरवचनाप्रमाणें आजवर झालेल्या मोठमोठ्या साधुसंतांना, वीरांना, मुत्सद्यांना, कवींना, तत्ववेत्त्यांना, शास्त्रज्ञांना, आणि सज्जनांना जन्म देणारी म्हणून स्त्रीजातीला वंदन करावें, कीं त्याचबरोबर जगांत असणाऱ्या दुर्जनांचीही तीच खाण असून मोठमोठ्या सज्जनांना, वीरांना, मुत्सद्यांना, आणि कवींना भुलविणारी, व कनकाच्याबरोबरीनें जगांत झगडा, मारामाऱ्या, दुष्टावा, आणि असत्प्रवृत्ति—म्हणजेच नरकाचा थाट माजविणारी ही चालती बोलती 'लक्ष्मी' 'नरकी खान' नसून 'नरककी खान'

आहे म्हणून ह्या मूर्तिमंत 'महामाये'ला निंदावें, हेंच आम्हांस समजत नाहीं ! पण तें कांहीं असलें तरी, समग्र स्त्रीजातीला व विशेषतः त्यांतील तरुण आणि रूपसंपन्न रमणींना आम्हांला हेंच सांगायचें आहे कीं, भगनींनों आणि मातांनों, तुम्ही इतर रीतीनें कशाहि असलांत, तरी तुम्ही मदनाच्या हातचें 'सुकुमार प्रहरणं' आहांत, हें केव्हांही विसरूं नका ! मदनाला शंकरांनीं उभा जाळला, म्हणून अनंग झालेल्या ह्या अनंगानें जणों तुमच्या देहाचा आश्रय करून, तो तुमच्या अंगप्रत्यंगांतून वोसंडतच आहे कीं काय, असा भास होत नाहीं काय ? तुमचा तो घनकुटिलकृष्णकेशपाश, तें उन्नत वक्षस्थल, ते विलोल नेत्र, ते सुंदर कपोल, ते पुष्ट नितंब, तें रमणीय करकमल, त्या भरदार पण लुसलुशीत मांड्या, तो केतकी वर्ण, ती कमनीय देहलता, आणि तें अप्रातिम लावण्य, तें पक्वबिंबसम अधर, ती मोत्यांच्या माळेप्रमाणें अथवा डाळिंबाच्या दाण्याप्रमाणें असणारी दंतपंक्ति,—कशाकशाचे म्हणून वर्णन करावें ? पण ह्या सर्व गोष्टींतून मदनाचीच हालचाल दृग्गोचर होत नाहीं काय ? मदनाच्या माऱ्याचींच हीं सर्व ठिकाणें नाहींत काय ? किंबहुना, तुम्ही मूर्तिमंत 'मदनाच्या पुतळ्या'च नव्हेत काय ? मग अशा स्थितींत, त्या कृष्णकेशपाशाला लोकांचीं हृदयें खेंचून आणायला, अथवा ह्या जहरी कृष्णभुजंगाला लोकांच्या हृदयाला डंख करण्यासाटीं तुम्ही असाच मोंकळा अनाच्छादित ठेवणार काय ? पदराच्या परडींत त्याला झांकून ठेवल्यास समाजावर तुमचें अनंत उपकार होणार नाहींत काय ? विरविरीत पातळ अशा पातळांनीं स्वतःच्या देहाला झांकण्याऐवजीं तो उलट लोकांना आपण उघडा करून दाखवीत आहोंत, याची जाणीव तुम्हाला आहे काय ? आपल्या नयनांतून मदनाचे शर सुटत असतात, आपल्या कपोलावर, आणि रक्तोष्ठावर त्याच मकरध्वजाची ध्वजा फडकत असते, आणि आपल्या दंतपंक्तीच्या तेजांतून त्या अनंगाचेंच तेज विलसत आहे, हें लक्षांत ठेवून, तुम्ही मर्यादेचें अधोवदन केव्हां करणार ? तुमचे उन्नत वक्षःस्थल म्हणजे प्रत्येक प्राण्याला जिंकण्यासाठीं निघालेल्या ह्या अनंगवीराच्या हावित्झर तोफा चढविण्याची दोन टेकाडेंच होत, त्यावरून होणाऱ्या गोलंदाजीनें आजवर ठार झाला नाहीं असा हनुमान,

शुक, भीष्म, रामदास, एखादाच ! पण असें कुठवर म्हणून सांगत बसूं? शृंगऋषीसारख्या भोळ्या ऋषिकुमारापासून तों चालू काळच्या 'पशूंत उत्तम पशू ' अशा ' पुच्छविषाणहीन ' सुशिक्षित पशूपर्यंत सर्वांनाच तुमच्या सर्वांगाच्या सौंदर्यानें सारखेंच मोहिलें आहे, हें विसरूं नका! एवढेंच आम्ही येथें सांगतों ! मग असें असतांना उलट्या भांगाचे, कानावरून घेतलेले, फुगीर बुचडे घालून, मला डोकीवर घ्या म्हणून सांगण्यासाठीं खांद्यावर फडफडणारा विनयाचा पदर तसाच सोडून देऊन किंवा सतरांदा सावरून खांद्यावरच दाबीत तुम्ही अशाच लाजत, टुमकत, मुरकत आणि मुरडत चालणार आणि आधीच अधःपतित झालेल्या समाजाला अधिकच अधःपाताच्या खोल दरींत लोटण्याचें पातक करणार काय ? मग " ह्या शिकूनि शिकूनि उगाच लचकति ललना" असली कठोर टीका तुमच्यावर झाल्यास तो कुणाचा दोष? आपल्या शरीरशृंगाराचा असा उघडा बाजार मांडल्यावर, लोकांच्या पापी नजरेंनीं तो लुटावा, किंबहुना, दुष्टांनीं त्याला धक्का देऊन तो खाली पाडावा व त्याचा चक्काचूर मुद्धां उडवावा, हेंच साहजीक नव्हे काय? पण त्याची लाज तुम्हाला कुठें आहे ? पुरुषांच्या बरोबरीनें तुम्हाला स्वातंत्र्याचा मेवा लुटायला पाहिजे; पण असा अविचार करण्यापूर्वी त्यांच्या ठायीं नसलेल्या व तुमच्याठायीं असलेल्या अब्रूच्या ठेव्याचा विचार तुम्हीं करावयास नको काय ? " पुरुषांनीं आमच्याकडे, परस्त्रीकडे पापी नजरेंनीं, कामुक नेत्रांनीं, पाहूं नये " असें तुम्ही म्हणाल; पण त्यावर आमचें सांगणें इतकेंच आहे कीं, आपण म्हणतां ही गोष्ट खरी आहे, पण प्रश्न इतकाच कीं, असें होत आहे काय ? रस्त्यांत, आगगाडींत, आगबोटींत, ट्रॅममध्यें, व्याख्यान, प्रवचन, पुराण, कीर्तन, उत्सव, मेळे, जत्रा, इत्यादि सर्व ठिकाणीं, शेंकडा पाऊणशें लोकांच्या पापी दृष्टीची फेंक तरुण व सुंदर स्त्रियांवर सारखी सुरू असतें, असेंच आपणांस दिसून येत नाहीं काय ? आणि सौंदर्याचा संसार असा उघड्यावर मांडल्यावर सामान्यजनांच्या हातून, व तेंही सध्यांसारख्या अधःपतित अवस्थेंत, याहून अन्य वर्तन होणें कधींतरी शक्य आहे काय ? दारूचीं दुकानें गल्लोगल्लीं काढून " आम्ही कुठें लोकांना दारू प्या म्हणून सांगतों—दारुबाज बना म्हणून सांगतो ? " असें म्हणणाऱ्या सरकारसारखेंच हें म्हणणें हास्यास्पद नव्हे

काय ? आणि जितकी मदिरेची थरारी तितकीच, किंबहुना, कांकणभर जास्तच, अशी मदिराक्षीची भूल नव्हे काय ? परस्त्री, द्यूत, मद्य, मृगया, आणि चैनबाजी ही व्यसनें अशी आहेत कीं, त्यांचा संसार उघड्यावर मांडल्यावर हटकून त्या पापानें आपले पाय धुणारे लोकच बहुतेक सांपडतात !—'परस्त्रीचे ठायीं जो का नपुंसक ।' असे महात्मे व 'स्वस्त्री-सुखीं ( च फक्त ) लुब्धता' अशा गुणांचे निधी, कीं ज्यांना 'वंदिजे तत्वतां' म्हणजे खरोखर वंदन करावें, असें लोक या जगांत कितीबरें सांपडतील ? शुद्ध सात्विक गुणाचे पुतळे जगांत थोडे; बाकीच्या जगाचा थाट मुख्यतः राजस आणि तामस गुणावर व थोड्या,—अगदीं थोड्या,—अशा सात्विक गुणावर थाटलेला आहे ! पण त्या सात्विक गुणाचें रोपटें खुडून, तो सात्विकेचा बुरूज ढासळून पाडून, जनांच्या राजस व तामस वृत्ति जागृत करणें, हेंच कां तुम्ही जन्माला येऊन साधणार ? तुम्ही जात्या सत्वशील आहात, व वस्त्रालंकारादि शोभेची, विलासाची, आणि शृंगाराची, तुम्हांला नैसर्गिकच आवड आहे हें खरें; पण त्यावर आमचें म्हणणें इतकेंच कीं, त्यालाही कांहीं मर्यादा आहे. शुद्ध सात्विक सौंदर्याला शृंगाराची जरूरच नाहीं; राजसाला साधाच शृंगार असला पाहिजे, आणि तामस उर्फ मादक सौंदर्याला मात्र छचोर नटव्या शृंगाराची जरूर लागतें; किंबहुना, ह्या शृंगाराचा परिणाम सौंदर्यावर आणि शीलावर झाल्यावांचून राहात नाहीं ! आणि म्हणूनच नटव्या श्रृंगारानें नटणाऱ्या नटींना आम्हाला हेंच सांगायचें आहे कीं, हे तुमचे ' नटीचे नाच ' जर असेंच चालत राहतील, तर तुमचाहि एखाद्या दिवशीं अधःपात झाल्यावांचून व तुम्ही स्वतः शीलभ्रष्ट झाल्यावांचून राहणार नाहीं, आणि त्या भ्रष्टतेच्या पाठोपाठ " वर्णसंकर, जातिधर्माचा आणि कुलधर्माचा नाश, आणि शेवटीं नरकाचा निवास " हे ठेवलेलेच आहेत, हें विसरूं नका ! यासाठीं लवकरच शुद्धीवर या, स्वतः सुधारा, व समाजालाहि सुधारण्याचें श्रेय घ्या, एवढेंच आमचे समग्र स्त्रीसमाजाला सांगणें आहे. कारण " स्त्रियामधला स्त्रीपणा जे हरीते " अशी कोणचीही चालचलणूक, कोणचीहि फॅशन, कोणचेंहि शिक्षण, किंवा कोणचीही गोष्ट असली, तरी ती काय कामाची ? त्यापुढें ती कवडी किंम-

तीची आहे, असें आम्ही समजतो! पण याची जाणीव आणि लाज आमच्या स्त्रीसमाजाला कुठें आहे? तेव्हां जाणूनबुजून वा अजाणता होणारा स्त्रीसमाजाचा हा अधःपातच नव्हे काय? सरतेशेवटीं आमचा समाज शृंगार, शील व सौंदर्य ह्या बाबतींत कसा अधःपतित झाला आहे, याबद्दल "मौजे"च्या १९२४ च्या 'दिवाळी' अंकांत रा. शुक्लांनीं दिलेले विचार मननीय वाटल्यावरून, त्यांतील कांहीं भाग येथें उतरून घेतो. पण जमेल त्या वाचकांनीं त्यांचा 'नवदलशृंगार' हा लेख अवश्य मूळांतूनच वाचावा, अशीच आमची शिफारस आहे. असो. रा. शुक्ल म्हणतातः—

"जें सौंदर्य पाहणारांच्या मनांत वैषयिक विकारांची लाट उसळवितें, नीच कामुक वृत्तीला चालन देतें, तें मादक सौंदर्य होय!...फुलपांखरांच्या वृत्तीचे रंगेल तरुण, विकारी प्रेमानें शीलाला पायाखालीं तुडवीत या सौंदर्यगुलाबावरून त्या सौंदर्यगुलाबावर झडपा घालीत असतात, त्यांच्या त्या प्रेमाला 'प्रेम' हें पवित्र नांव न देतां 'पापी कामुकवृत्ति' हेंच नांव योग्य होय! हल्लीं आमच्या तरुण समाजांत प्रेमाचें पीक फारच फोंफावत चाललें आहे. प्रेम गुणांवर, शीलावर, आत्म्यावर करायचें असतें. सौंदर्य नाशिवंत आहे...फॅशनच्या पिशाचानें हल्लींच्या समजाला पुरतेपणीं पछाडल्यामुळें शृंगाराची चढती कमान, वाढत्या खर्चानें—नटव्या वैभवानें चढतचढतच चालली आहे! सौंदर्याला शृंगारसाजाचा अलंकार खुलून दिसतो खरा. पण श्रृंगाराची घुडदौड छचोर नटवेगिरीच्या मैदानांत चवचाल चाळे चालवून बेमर्याद भडकूं लागेल, तर तो प्रकार लोकांच्या टीकेलाच पात्र होणार! नैसर्गिक सौंदर्यापेक्षां कृत्रिम श्रृंगाराकडेच वेधणारे जग म्हणजेच खरोखर कृत्रिमतेचा बाजार झाला आहे!... तेव्हां शृंगाराची सीमा सौंदर्याच्या सरहद्दीला जरी नेऊन भिडविली, तरी समतोल बुद्धीनें विवेकाचा चुकता तोल सांवरला पाहिजे! केवळ सौंदर्यावरती प्रेम करणें जसें चांगलें नाहीं, तसेंच केवळ श्रृंगारावरतीही प्रेम करणें घातक आहे! गुलाबाच्या शांत, पवित्र सौंदर्यशृंगाराकडे जगाचें लक्ष पोचत नाहीं, पण भडक रंगाच्या घाणेरीच्या भपक्यावर मात्र बावळ्या जगाचे भोळे डोळे भाळतात. हें

एक कठोर परंतु घातकी सत्य आहे. कोणतीही तरुणी ( मग ती सद्गुणी असो वा दुर्गुणी असो ) स्टायलिश दिसली कीं तरुणाच्या प्रेमाला (?) पान्हा फुटलाच ! तरुण-( मग तो निरक्षर पशू कां असेना ) अपटुडेट-रंगेल दिसला कीं तरुणीच्या प्रेमाला महापूर लोटून तिचे प्राण कंठाशीं येऊन भिडलेच ! जणूं काय सूट, पँट, नेकटाय, कॉलर यांची फॅशन म्हणजेच पुरुषार्थाचें शिफारसपत्र !...... शुद्ध प्रेमाला श्रृंगारच लागत नसतो; पण विकारी-नाटकी प्रेमाला मात्र श्रृंगारसुखाची मिजास संभाळावी लागते ! पूर्वी स्त्रीपुरुष एकमेकांचें नैसर्गिक सौंदर्य व गुण पहात असत. पण आजकाल दुष्यंत-शकुंतला नाहींत, वसंतसेना-चारुदत्त सुद्धां नाहींतच. हल्लीं विकारी प्रेमाच्या नटवेपणाचा बाजार भरला आहे ! सौंदर्य तेहि कृत्रिम पाहिजे. श्रृंगार तोही छचोर नटवा पाहिजे ! तरच प्रेमाला उकळी फुटणार ! पूर्वी स्त्रिया पुरुषांच्या मर्दानी सौंदर्यावरच प्रेम करीत असत... पण आज ! मनगटांची मर्दुमकी तर नाहींच, मेंदूची करामत सुद्धां कःपदार्थ ठरते ! तिची जरूरी नाहीं. सूट-पँट चढविलेला हाडाचा सांपळा, तरुण, केशरचना, मिशांचा साफ कट्, चालण्याबोलण्यांत लवचिक नाजुकपणा इत्यादि शृंगारसाधनांनीं स्त्रियांशीं सादृश्य दाखवूं लागला कीं, त्या जनानी जवानावरून आजच्या कुमारिकांनीं आपली जान कुर्बान केलीच म्हणून समजावें ! नाटकांतल्या स्त्रीपार्ट्यांवर बायका भाळतात, त्यांतील रहस्य हेंच आहे.म्हणूनच कीं काय आजच्या विश्वविद्यालयाच्या पदवीधर सुशिक्षित तरुणांनासुद्धां पोषाखी जगाच्या नजरेंत भरण्यासाठीं चालण्याबोलण्यांत स्त्रीपार्ट्यांचे नाटकी रंगढंग आणि पोशाखांतही नाटकी नवलाईच दाखविण्याची महत्त्वाकांक्षा प्राप्त झाली आहे ! कुलांगनांना सुद्धां वारांगनांचीच वेषपद्धति उचलावी लागून, नाटकांतल्या हीरॉइनप्रमाणें श्रृंगार चढविण्याचे डोहाळे सुचूं लागले आहेत!हा नटवा श्रृंगार व्यक्तिची-समाजाची-राष्ट्राची-अवनतीच सुचवितो! खादी वापरून महात्मा बना, असा ब्रह्मज्ञानाचा उसना आव आणून अजागळ पोशाख वापरा असें सांगण्याचा भावार्थ नाहीं. पण ' साधी रहाणी, उच्च विचारसरणी ' हें तत्त्व ध्यानांत ठेवलें पाहिजे. श्रृंगार पाहिजे पण साधा-मध्यम रीतीचा पाहिजे....बेंगरूळ मवाळी वेष नको. तें अजागळपणाचें प्रदर्शन होईल. फॅशनचा नाटकी भपका नको; त्यांत छचोरपणा दिसेल. तर साधा टाप-

टिपीचा नीटनेटका पोशाख पाहिजे. कारण पोशाखावरून मनोवृत्तीची पारख होत असते. समाजांत सज्जनांच्या शुद्ध प्रेमादराला पात्र व्हावेंसें वाटत असल्यास पोशाखांत–आचारविचारांत–साधेपणा, शुद्धपणाच ठेवला पाहिजे. पोषाकी जग भपक्यावर भाळेल–प्रेमाचें प्रदर्शन मांडील–या दुराशेनें फॅशनच्या छचोरपणाला–नाटकी नादान श्रृंगाराच्या कृत्रिम सौंदर्याला-विकारवश होऊन बळी पडणें, म्हणजे स्वतःचा सत्यानाश करून घेणें होय ! ते आत्मिक–नैतिक अधःपाताचा अंगारच पदरीं बांधून घेणें होय ! ...तिसरा प्रश्न शीलाचा ! शील म्हणजे स्वभाव किंवा नियत. शील म्हणजे आत्म्याची तेजस्विता, विवेकाची प्रखरता, अंतःकरणाची पवित्रता ! सत्कुल–सौंदर्य–संपत्ति या दैवी देणग्या आहेत. पण शील स्वतंत्र आहे.ती परमेश्वरी देणगी नसून स्वतःच्या कर्तबगारीची निर्मिति आहे ! पण शीलाला पायांखालीं तुडवीत माणुसकीला मूठमाती देणारास पशुकोटींतच ढकललें पाहिजे. मेल्यावर कीर्तिरूपानें चिरंजीव राहण्यास शील अवश्य पाहिजे ! नुसत्या पत्रांतील मायन्यांतच चिरंजीव व्हायचें असेल तर शील नसलें तरी चालेल. अंगीं तेजस्विता येण्याला स्वताचे शील उत्तम पाहिजे. शरमिंदेपणा नादानवृत्तीची अधोगतीच सुचवितो. शील म्हणजे आत्म्याची तेजस्यिता ! ती तर लाखांत एखाद्या जवळच असेल. शील म्हणजे विवेकाची प्रखरता !त्याचाहि अग्नि विझूनच गेला आहे. शील म्हणजे अंतःकरणाची पवित्रता ! ती तरी कुठें राहिली आहे पवित्र सौंदर्याकडे पापी डोळे रोखणारा, स्वार्थासाठीं जगांतील नातींगोतींसुद्धां गुंडाळून ठवणारा,'व्यवहारी' म्हणवून घेण्यासाठीं खोटेपणानें हजारों उलाढाली करणारा, प्रसंगीं दैवी दिव्यतेलाही दडपून टाकणारा हा स्वार्थलंपट, अधमशीलाचा सर्वसाधारण समाज 'शीलसंपन्न आहे' असें कोण म्हणणार ? हल्लींचा हतभागी समाज शीलाच्या सात्त्विक समाधानाला पारखा झाला आहे ! शीलाचें पवित्र तेज अंगीं नसल्यामुळें तो दुबळा बनला आहे. राजकीय, सामाजिक, धार्मिक, नैतिक, प्रत्येक बाबतींत त्याची पिछेहाट होत आहे ! व्यवहारांत शीलाचा प्रश्न कुणी सहसा प्रामुख्यानें विचारांतच घेत नाहीं. कारण त्याचा कांहीं उपयोगच होत नाहीं. पवित्र विवाहबंधनानें तरुणतरुणींची जन्माची गांठ बांधतांना सुद्धां आईबापांना शीलाच्या प्रश्नाकडे डोळेझांकच करावी लागते...

'मुलगी पाहण्याचे' फार्स पाहिलें कीं आम्हींच आमच्या कुमारिकांना वेश्या कशा बनवितों हें स्पष्ट दिसतें. नवऱ्यामुलाच्या शीलाकडे पहायचें तरी कशाला ? 'आहे, बरा आहे, नाकाडोळ्यानें ठीक आहे, चार पैसे मिळवून बायकोचें पोट भरील' एवढाच विचार करायचा. आणि तेंहि खरेंच; कारण प्रत्येक आईबाप आपल्या मुलीसाठीं 'सर्वांग सुशील' मुलगा पाहूं लागले तर त्यांची निराशाच होईल आणि शेंकडा नव्याण्णव मुली अविवाहितच ठेवणें भाग पडेल ! या शीलाच्या बाबतींत जो जो विचार करावा तोंतों निराशाच होते. सामाजिक, धार्मिक, नैतिक बंधनें नुसतीं शिथिलच नव्हेत तर पार तुटून जाऊन जगांत फक्त स्त्री आणि पुरुष एवढाच भेद राहतो कीं काय याची भीति वाटते ! एवढ्या विकारी विषयवासनेच्या नीच स्वार्थाची पर्वतलाट उसळल्यावर त्यांत शुद्ध शीलाची पवित्र कोमलता कोठून राहणार? स्वरूप, शृंगार, संपत्ति, शक्ति बुद्धिमत्ता, सर्व कांहीं असावें आणि एकट्या शीलाची वाण असेल तर त्या सर्व गोष्टी मातीमोलच होत ! शीलभ्रष्ट मनुष्याला खऱ्या सुखाचें सात्विक समाधान कालत्रयींही लाभत नाहीं ! हल्लींचा हतभागी समाज ह्याच शीलाच्या सात्विक समाधानाला सर्वस्वी पारखा झाला असून " खोट्या, राजस व तामस सुखांतच तो गुंगून—रंगून—आणि झिंगून पडला आहे, असें म्हटल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं !

एकंदरींत, कोणच्याहि दृष्टीनें समाजाच्या कोणच्याहि अंगाचा विचार केल्यास त्याचा धार्मिक, नैतिक, सामाजिक, राजकीय, आत्मिक, शीलविषयक, किंबहुना, ईश्वरभीतिविषयक बंद सुद्धां पार तुटला आहे, व स्वतंत्रेतेच्या भलत्याच कल्पनांनीं सर्व समाज भ्रमला आहे असेंच आपणांस दिसून येत नाहीं काय ? पण स्वतंत्रता म्हणजे स्वेच्छाचार नसून स्व—तंत्रता म्हणजे आत्मिक नियंत्रण होय. " Freedom does not consist in the absence of restraint but in self—restraint. " ( Wills ) हें विसरून कसें चालेल ? तुमचा शुद्ध, बुद्ध, मुक्त आत्मा—परमात्म्याची ती छोटी प्रतिकृति–तुम्ही दारुबाज बना, जुगार खेळा, विश्वयोषितांच्या माड्या चढा, परस्त्रीचा पापी अभिलाष धरा, स्वतःचें शीलसंवर्धन करूं नका, चतुराश्रमांचा चुथडा उडवा,

जातिभेदाला मूठमाती देऊन वर्णसंकराचा उदोकार गाजवा, शूद्रांना पायाखालीं तुडवून, अनाथ अपंगांची व मुक्या जीवांची कींव करुं नका, गोविक्रय आणि कन्याविक्रय करा, आणि शाश्वत दैवी सुखाला पारखे होऊन पशुवृत्तीच्या पंकांतच सदैव लोळा, अशा तऱ्हेचा अहितकारक सल्ला तुम्हास कधीं तरी देणें शक्य आहे काय ? पण आम्ही त्या आत्म्याचा सल्ला घेतोंच आहोंत कशाला ? किंबहुना, वरील सर्व पापी अनर्थांच्या परंपरेंत पाय टाकतांना व तदनंतर, आम्हास क्वचित् आत्म्याच्या आक्रोशाचा ध्वनि ऐकूं आलाच तर, आत्मवंचनाकारक गोड अशा भुलथापांनीं आम्ही आमची स्वतःचीच फसवणूक करून घेत असतो व ‘ लाइफची रोमान्स ’ लुटीत असतो ! हरहर ! कोणही आमची स्थिति ! “ The fear of God is wisdom ” असें ‘ काऊपर ’ कवीनें म्हटलें आहे. त्या ईश्वरी भयाची दरकार बाळगण्याचा, खऱ्या ज्ञानाचा, आमच्या येथें खडखडाटच आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल काय ?

त्याचप्रमाणें, “ आधीं तें करावें कर्म । कर्ममार्गे उपासना । उपासकां सांपडे ज्ञान । ज्ञानें मोक्षाचि पावणें ॥ ” ही समर्थोपदिष्ट सायुज्यसोपानाची सुलभ शिडी आमच्या जवळ असतांना आम्ही त्याचा कितपत उपयोग करतों आहोंत बरें ? किंबहुना, कर्मकांडाची कटकट कंटाळवाणी म्हणून सोडून दिली, तरी आयुष्य हें क्षणभंगुर आहे आणि तरीही आपलें जीवित केवळ आहारनिद्रामैथुनादि पशुवृत्तींत आणि इतर रंगेल अशा राजस रागरंगांत व्यतीत होत आहे, इत्यादि आम्ही “ सायुज्य सोपानां ”त वर्णिलेलें “ जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं ” होऊन—नव्हे त्यांनीं जीव गुदमरून जाऊन हरिभक्तीच्या आणि हरिचिंतनाच्या वायूची झुळूक निदान मधूनमधून घेणारे तरी पुण्यात्मे किती सांपडतील बरें ? वास्तविक वरीलप्रकारच्या गुदमरणाऱ्या हवेंत जीवात्म्याच्या देहांतून तापत्रयात्मक उकाड्याच्या घामाच्या धारा सारख्या वाहत असतांना, ईश्वरी चिंतनाचा आणि ईश्वरी भक्तीचा ‘ फॅन् ’ म्हणजे पंखा मनोजागृतीच्या सद्वृत्तीच्या ‘ इलेक्ट्रिसिटीनें ’ म्हणजे विद्युत्सहाय्यानें, खऱ्या आनंदाचा शुद्ध व आल्हाददायी वायू मिळण्यासाठीं, वायुप्रमाणेंच अदृश्यपणें, सारखा फिरत राहिला पाहिजे; अथवा इतकें

होत नसेल तर रोज नित्य नेमानें शारीरिक आरोग्यासाठीं व सौख्यासाठीं, ज्याप्रमाणें आपण समुद्राच्या कांठीं कांहीं काळ फिरावयास जातो, त्याप्रणेंच ह्या संसाराच्या 'मुंबई'तहि उकाड्यानें जीव कासावीस होत असतांना आपणही त्या अनाद्यनंत अशा ईशस्वरूपाच्या 'बॅक्बे'वर जाऊन, त्या प्रभूच्या अफाट अशा रूपसागराकडे नजर देऊन, त्यावरून वाहाणाऱ्या दिव्य अशा आनंदाच्या वायुलहरीनें धष्ट, पुष्ट, व बलवान बनावयास नको काय ? अगदीं त्या बॅकबेवर सुद्धां तुम्हाला भुलवायला नानातऱ्हेचीं खाद्यपेयें व ऋद्धिसिद्धींच्या आणि स्वर्गीय अप्सरांच्या रमणी आहेतच ! पण एकदां त्या रूपसागरापुढें जाऊन उभें ठाकल्यावर, त्या ईश्वरी आनंदाच्या प्रसन्न व शीतल अशा झुळुकांच्या आनंदांत, आणि त्या अफाट दर्याच्या विस्तीर्ण व मृदु अशा वालुकाप्रदेशाच्या रमणीय भव्यतेंत त्या खाद्यपेयाची व रमणींच्या भुलभुलावणीची फारशी मातबरी वाटत नाहीं; त्यांना सहज एका बाजूस डावलून आपणास पुढें जातां येतें ! असो. पण अशा तऱ्हेचा स्वर्गीय वायूचा दिव्य आनंद आयुष्याच्या ' मोहमयींत ' राहावें लागल्यामुळें प्रत्येक दिवशीं कांहीं काळ कितीजण बरें नित्यनेमानें घेत असतील ? अफाट जनसमुदायाच्या मानानें बॅकबेवर रोज फिरायला जाणारांची संख्या जशी अल्प, त्याहूनही अल्प संख्या ईश्वरी बॅकबेवर नित्यनेमानें फिरायला जाणारांची आहे असें आपणांस दिसत नाहीं काय ? पण ही गोष्ट काय दाखविते ? अध्यात्मिकदृष्ट्या आमचा किती अधःपात झाला आहे हीच गोष्ट यावरून दिसते ना ?—

" बालस्तावक्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्तः ।
वृद्धस्तावच्चिंतामग्नः परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ "

आणि " कालो गच्छति क्रीडत्यायुस्तदपि न मुंचत्याशावायुः ॥" इत्यादि वचनांतून श्रीमच्छंकराचार्यांनीं ह्या स्थितीचें वर्णन केलें असून, " मूढ जहीहि धनागमतृष्णां कुरु तनुबुद्धे मनसि वितृष्णाम् । यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तं ॥ " अशा तऱ्हेचा गोड उपदेशही ह्या मूढ जीवाला त्यांनीं केला आहे; पण त्याकडे आज कितकांचें लक्ष्य आहे बरें ! कनककामिनीच्या हव्यासांत, ऐहिक सुखवादाच्या भुलभुलावणींत आणि " इदमद्य मयालब्धं इमं प्राप्स्ये मनोरथं " या ' शेख महंमदी' मनोराज्यांत समग्र समाज—अगदीं आपणास जगाचा आध्यामिक गुरु म्हण-

विणारा समग्र हिंदु समाज-बुडालेला पाहून खरोखर विचारी जीवाचा ऊर भरून येतो, आणि आमचें पुढें होणार तरी काय ? अशा विषण्ण विचाराची छाया त्यावर पसरल्यावांचून राहत नाहीं ! त्यांतच आलस्य, मोह, अज्ञान, यांची काळझोंप आम्हांस लागली असून नानातऱ्हेच्या व्यसनांची आणि चैनबाजीचीं सुखस्वप्नें आम्हांस पडत आहेत ! " I slept and dreamt that life was beauty म्हणजे " मी निद्रिस्त झालों व मला स्वप्न पडलें—स्वप्नांत दिसलें व भासलें—कीं आयुष्य म्हणजे चैन आहे—' इष्काचा प्याला ' आहे " असें एका आंग्ल कवीनें म्हटलें आहे, त्याप्रमाणें आजकाल आमची स्थिति झाली असून आम्ही मोहनिद्रेनें झपाटले गेले आहोंत ! पण तोच कवी पुढें म्हणतो कीं—" I woke & found that life was duty " म्हणजे " मी त्या खोट्या सुखस्वप्नांतून खडबडून जागृत होऊन डोळे उघडून पाहिलें तों आयुष्य हें चैन नसून एक तरवारीच्या धारेप्रमाणें खडतर कर्तव्य आहे असें मला दिसून आलें ! "—त्याप्रमाणें आमच्याहि सध्याच्या निद्रिस्त समाजाच्या कानीं " उत्तिष्टत, जागृत, प्राप्य वरान्निबोधत ! " ह्या जागृतीची भेरी, ह्या जागृतीची तुतारी, आणि ह्या जागृतीचे ' रणशिंग ' अत्यंत उच्च स्वरांत सारखें वाजत राहील तरच हा कुंभकर्णी झोंपेंत लोळणारा समाज कांहीं शुद्धीवर आल्यास येईल ! कारण त्याच्या अंतर्गत शुद्धीचीच आज त्यास अत्यंत आवश्यकता आहे ! पण हें कार्य होण्यास, आम्ही मागेंच म्हटल्याप्रमाणें, महाराष्ट्रांतच नव्हे, तर अखिल हिंदुस्थानांत पुनश्च " महाराष्ट्र धर्मा"चीच स्थापना झाली पाहिजे ! असें शेवटीं सांगून व अशा तऱ्हेच्या " महाराष्ट्रधर्मा"ची प्राणप्रतिष्ठा करणारे समर्थ रामदास, प्रभो, आमच्या साहाय्याला लवकर धाडून दे, अशा त्या दीनदयाळ प्रभूची अत्यंत कळवळ्यानें प्रार्थना करून पण त्याचबरोबर परमेश्वर आळशांना कधीं साहाय्य करीत नसतो, यासाठीं " उद्धरेदात्मनात्मानं " या भगवद्वचनाप्रमाणें आत्मोद्धाराच्या तयारीला खऱ्या कळकळीनें आणि मनाच्या तळमळीने लागा, समर्थांनीं सांगितलेली—" पहिलें तें हरिभजन । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ॥ चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।" ही चतुःसूत्री एकएकट्यानेंच नव्हे तर, " एकमेकां साह्य करूं । अवघे

धरूं सुपंथ ॥ " ह्या नामदेववचनाप्रमाणें संघशक्तीनें शक्य तितकी अमलांत आणण्याचा यत्न करा, ( कारण " कलौ संघशक्तिः " असें वचनच आहे, ) व " सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें । परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ! ॥ " ह्या समर्थवचनाला जागून आधीं हरिभजनाच्या तेजस्वी दाण्यांची पेरणी करा, म्हणजे तो दीनदयाळ, भक्तवत्सल प्रभू, आणि त्याचेच सेवक ते समर्थ रामदास तुमच्या साहाय्याला निस्संशय धावून येतील; आणि असें झाल्यावर मग तुमच्या सुखाला काय कमी ? सर्व ब्रह्मांडांत मावणार नाहीं, अशा अलोट सुखाचा ठेवा मग तुमचाच आहे, व त्यापुढें ऐहिक पारतंत्र्यच काय, पण जन्ममरणाच्या पारतंत्र्यांतूनही तुम्ही कायमचे मुक्त व्हाल—त्या पारतंत्र्याच्या शृंखला तुमच्या पायांतून खळकन् गळून पडतील, असें जनतेला सांगून, तसेंच ' देश आणि देव ' ह्यांत ' व ' कारापुढचा ' श ' कार आहे हें न विसरतां, देवाला विसरून जर तुम्हीं देशाच्याच नुसतें मागें लागाल, ' व ' काराच्या अधिष्ठानांआधीं ' श ' काराकडे वळाल, तर तुमची आजवर झाली तशीच यापुढेंहि, ' शकारा ' सारखीच स्थिति होऊन, " समर्थाची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी । " अशीच गत होईल—होत राहणार—हें लक्षांत ठेवा, आणि म्हणून, " या कारणें उठाउठी । भजन करावें ॥ " हा समर्थांचा मूलमंत्र न विसरतां, त्या मंत्राच्या सिद्धीनें तेजस्वी बनाल तरच तुमचा तरणोपाय आहे, अशी शेवटीं सर्वांना इशारत्वाची नम्र सूचना देऊन, हा " भारत वर्षाचा धार्मिक इतिहास " येथेंच पुरा करतों !

अखेरीस, " मूकं करोति वाचालं " असें ज्याचें अलोट सामर्थ्य आहे त्या प्रभूनें, प्रारंभी प्रार्थिल्याप्रमाणें, मजसारख्या दुर्बल जीवाकडून हें बोल वदविले अर्थात् अशा तऱ्हेची 'ज्याची कृपा' त्या 'परमानंद माधवाला'—त्या भगवान् श्रीकृष्णाला अत्यंत भक्तियुक्त हृदयानें अनन्य नमस्कार करून, लेखणीस विराम देतों. इति शम् ।

सर्वेत्र सुखिनः संतु सर्वे संतु निरामयाः।
सर्वे भद्राणि पश्यंतु मा कश्चिद्दुःखभाक् भवेत् ॥

॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥